ओंकार ट्रस्ट

# कल्याणी

भगवत् पूज्यपाद जगद्गुरू आद्य शंकराचार्य विशेषांक २००१





श्रुतिस्मृती पुराणानामालयं करुणानामालयम ।
नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम ।।



उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी,
पुणे - ४११ ०३७.
टेलिफोन क्रमांक - २४२१ ००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८० ग खाली आयकर सवलत





ओंकार ट्रस्ट २००९ चा ''भगवत् पूज्यपाद जगद्गुरु आद्य शंकराचार्य'' विशेषांक, संपादक मंडळ - श्रीमती रजनी गोपाळ काळे, श्री. भा.वा. सातवळेकर, श्री. अशोक शिवले, अतिथी संपादक पंडित वसंतराव गाडगीळ, यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १ बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.

टिप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** आहे.
(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.



* मुखपृष्ठ संकल्पना *
श्री. अभय व सौ. अंजली पुरंदरे

* अक्षरजुळणी *
प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९.

* प्रोसेसिंग *
चित्रभारती, प्रोसेसर, सदाशिव पेठ, पुणे.

* छपाई *
प्रतिमा ऑफसेट, पुणे-२९,
फोन नं. २५४६०२१६





श्री श्री जगदगुरु शङ्कराचार्य महासंस्थानम्, दक्षिणाम्नाय, श्री शारदापीठम्, श्रृङ्गेरी
**Sri Sri Jagadguru Shankaracharya Mahasamstanam**
**Dakshinamnaya, Sri Sharada Peetam, Sringeri.**

V.R. GOWRI SHANKAR, BE, DIISc, MIMA,
CEO & Administrator
Sri Sringeri Math and its Properties, Sringeri - 577 139 (Karnataka - India)

Ref: 363 Camp: Date:

माननीय प्रमुख ट्रस्टी '३ॐ कार' ट्रस्ट, पुणे
यांसी सादर प्रणाम.

'जगद्‌गुरु आद्य शंकराचार्य' यांच्या जीवन – चरित्र – कार्याचा मराठी वाचकांना परिचय करून द्यावा, यासाठी '३ॐ कार ट्रसट' ही संस्था 'कल्याणी' या आपल्या प्रकाशनाचा, विशेषांक प्रकाशित करित आहे. त्यासाठी श्रीशृंगेरी शारदापीठाच्या प. पू. जगद्‌गुरूंच्या आशीर्वाद–प्रसादाची प्रर्थना करणारे आपले विज्ञापना – पत्र प. पू. 'श्रीं' च्या चरणी सादर केले. "फुलगांवच्या श्रुतिसागर आश्रमाचे संस्थापक पू. स्वरूपानंद सरस्वतीमहराज यांच्या मार्गदर्शनाने आणि 'शारदा' कार पं. वसन्तराव गाडगील याच्या 'अतिथि – संपादक' – त्वाने आपण 'जगतगुरु आद्य शंकराचार्य' – विशेषांक – प्रकाशन येत्या आचार्य जयन्तीच्या शुभमुहूर्तावर करीत आहांत' हे आपल्या पत्रावरून समाजताच प. पू. 'श्रीं' अतिशय प्रसन्न झाले.

मानवतेच्या उद्धारासाठी सनातनधर्माची ध्वजा सतत उत्तुंग फ़डकत ठेवून म्लान् होत चललेला सद्धर्मदीप अखण्ड प्रज्वलित ठेवण्याचे फ़ार मोठे कार्य भगवान् आदि शंकराचार्य आणि त्यांच्या थोर परंपरेने केलेले आहे. त्याचा परिचय 'कलयाणी' च्या या विशेषांकाने जगांतील सर्व मराठी वाचकांना होऊन, सर्वांच्या अन्त:करणातील 'धर्म' नंदादीप अखंड प्रज्वलित राहील आणी सर्वांचे श्री शारदाम्बा – चन्द्रमौलीश्वर – कृपा – प्रसादाने कल्याण होईल, तसेच '३ॐकार' ट्रस्ट सनातन वैदिक धर्माची अखण्ड सेवा करीत रहाण्यासाठी असेच उत्मोत्तम उपक्रम् हाती घेत राहील. असा प. पू. 'श्री' चा आपल्याला शुभाशीर्वाद आहे.

प.पू. 'श्रीं' चा मन्त्राक्षता – प्रसाद यासोबत संलग्र आहे.

वे. रा. गौरीशङ्करः
(वी. आर. गौरीशंकर)

Phone Off.: 08265 - 250123 Resi. 08265 - 250192 Fax : 08265 - 250792 Bangalore Res. 080-28601698




अनन्तश्रीविभूषित ज्योतिष्पीठाधीश्वर एवं द्वारका शारदापीठाधीश्वर जगद्गुरुशङ्कराचार्य

स्वामी स्वरूपानन्द सरस्वती जी महाराज

श्रीशारदापीठम्
द्वारका, जामनगर, गुजरात
दूरभाष : ०२८९२-२३५१०९

ज्योतिर्मठ
त्रोटकाचार्य गुफा, चमोली, गढ़वाल, उत्तरांचल
दूरभाष : ०१३८९-२२२१८५




क्रमाङ्क :

दिनाङ्क : 23/2/09
स्थल : Dwarka

Dear Shree Satvalekar Ji,

We in acknowledgement of your letter have noted down the contents there in. We are very much impressed to know that the Omkar Trust is organizing many activities for the welfare of the common people, including the publication of Kalyani (an annual magazine). **Adi Shankaracharya**, an incarnation of Lord Shankar himself, preached and spread Advait philosophy. Shankaracharya through his literature made it easy for the people to understand and follow the Advait philosophy thereby leading to self-realization. We wish the special upcoming issue of Kalyani, which is going to be published on the auspicious occasion of Shree Shankaracharya Jayanthi, will provide the readers a vision to Shankaracharya philosophy and literature.

We hereby send our best wishes and blessings for the success of all your projects.

With Blessings,

On behalf of Shree Shankaracharya Maharaj.

# *Swami Swaroopananda Saraswati*

**Shrutisagar Ashram**
Phulgaon, Dist. - Pune 412 216
Phone : ~~020 - 25120799~~
Mobile : 9373336381

## आशीर्वचन !

श्रीमद् भगवत्पूज्यपाद आद्य शंकराचार्य भारताच्या वैदिक परंपरेमध्ये 'न भूतो न भविष्यति' अशी अलौकिक महान विभूति निर्माण झालेली आहे. त्यांनी वैदिक धर्माची, तत्त्वज्ञानाची पताका भारताच्या चारही दिशांना उत्तुंग फडकावली. इतकेच नव्हे तर, केवळ वैदिक तत्त्वज्ञानाच्या आधारानेच मानवजातीचा सर्वांगीण विकास होतो, हे त्यांनी आपल्या अनेक ग्रंथांच्याबरोबर भाष्यांच्यामधून सिद्ध केले. तसेच सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक आणि आध्यात्मिक एकसंघता निर्माण करून त्यांनी राष्ट्रीय एकात्मता निर्माण करण्यामध्ये फार मोठे योगदान दिले. त्यांच्यामुळेच आज आम्ही हिंदू म्हणून जगत आहोत, असे म्हटले तर अतिशयोक्ति होणार नाही.

आज केवळ हिंदू समाजाला नव्हे, तर अखिल विश्वाला आचार्यांच्या विचारांची नितांत आवश्यकता आहे. त्यामुळेच नवीन ध्येयाने प्रेरित झालेली निःस्वार्थ, चारित्र्यसंपन्न, त्यागमय, समर्पित अशी पिढी निर्माण होऊन समाजामध्ये नवचैतन्य निर्माण होईल.

अशा महान विभूतीचे जीवनचरित्र, तत्त्वज्ञान आणि जीवनकार्य यांचा मराठी समाजाला परिचय व्हावा म्हणून ओंकार ट्रस्ट-पुणे यांनी आचार्यांच्या जीवनावर विशेषांक संकलित केला आहे, हे पाहून अत्यंत आनंद व समाधान होत आहे. या विशेषांकामधून सर्वांना आचार्यांचा जीवनपरिचय होऊन प्रेरणा व स्फूर्ति मिळेल, असा विश्वास आहे. ओंकार ट्रस्टच्या सर्व विश्वस्तांनी खरोखरच हे मौलिक कार्य केलेले आहे. त्यांच्या या कार्यास शुभेच्छा व आशीर्वाद !

चैत्र शुद्ध नवमी
२-४-२००९



# SWAMI TEJOMAYANANDA

पवई

०४-०९-२००९

ॐ

## संदेश

कल्याणी मासिकाच्या ह्या वर्षीच्या विशेषांकाचा विषय ''भगवान आदि शंकराचार्य'' हा निर्धारित केला आहे. हा विषय अत्यंत ह्रदयस्पर्शी आहे. भाष्यकारांचे पुण्यस्मरणच साधकाला पवित्र करणारे व सिद्धाला आनंद देणारे आहे. हा विषय निवडल्याबद्दल आपल्या सर्वांचे अभिनंदन.

आपला प्रतिवर्ष विशेषांक काढण्याचा उपक्रम प्रशंसनीय आहे. ह्या उपक्रमाची भरभराट होत राहो हीच ईश्वरचरणी प्रार्थना.

सप्रेम,
प्रभुसेवेत
तेजोमयानन्द

स्वामी तेजोमयानन्द

CENTRAL CHINMAYA MISSION TRUST, SANDEEPANY SADHANALAYA, SAKI VIHAR ROAD, MUMBAI - 400 072, INDIA.
Tel.: 91-22-2857 2367, 2857 5806, 2857 2828 • Fax: 91-22-2857 3065 • E-mail: ccmt@vsnl.com • Website: www.chinmayamission.com

# संपादकीय ......

**आर्यावर्त देश पवित्र । तिथे नांदले धर्मराजे सुपात्र ।**
**तया आठविता महापुण्य राशी । नमस्कार माझा पुण्य मातृभूमीशी ।।**

या काव्य पंक्तीतील धर्मराजे कोण हा विचार मनात आला की, ''भगवद् पूज्यपाद जगद्गुरु आद्य शंकराचार्य'' यांचेच नाव प्रथम डोळ्या पुढे येते. आचार्यांचा जन्म ज्या कालखंडामध्ये झाला त्यावेळी वैदिक धर्माला अवकळा आलेली होती. बौद्ध व जैन धर्माचा प्रचार व प्रसार जोरात सुरू होता. वैदिक धर्मामध्ये पण संप्रदाय, पंथ, अुपपंथ आपले स्वतःचे अस्तित्त्व स्वंतत्रपणे प्रगट करीत होते. एकमेकांत भांडणे, वैरभाव व स्पर्धा या मध्येच निमग्न राहिल्यामुळे आपणच आपल्या मातृधर्माचे खच्चीकरण करीत आहोत हे त्यांच्या लक्षातच येत नव्हते. साहाजिकच परकीयांचे आक्रमण थोपवून धरण्याची क्षमता त्यांच्यात उरली नव्हती.

अशा पार्श्वभूमीवर केरळ प्रांतातील वेदविद्या विभूषित सुसंस्कृत अशा 'नंबुद्री' घराण्यामध्ये शंकराचार्यांचा जन्म झाला.

**''यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम् ।।७।।**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।८।।**

भगवंताने गीतेमध्ये दिलेले हे वचन आचार्यांच्या जन्माने पूर्ण केले. धर्माचे पुनरुज्जीवन करण्यासाठीच जन्म झालेल्या या अवतारी पुरुषाने भारतभ्रमण करून अधर्माचे खंडन केले. अद्वैत तत्त्वज्ञान आणि वेदान्त म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाचे सर्वोच्च शिखर आहे. या शिखराला पडणाऱ्या भेगा बुजवून त्यावर सोन्याचा कळस चढविण्याचे महान कार्य आचार्यांनीच केले. वैदिक धर्माला बळकटी आणून वैदिक तत्त्वज्ञानाची मूलतत्त्वे दृढ करून समाजापुढे मांडली आणि धर्माला लागलेले ग्रहण या ज्ञानसूर्याने आपल्या तेजाने नाहीसे केले. ज्ञानोत्तर भक्ती हा त्यांच्या भक्तीमार्गाचा पाया होता.

''ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या' जीवो ब्रह्मैव नापरः'' ब्रह्म हेच अंतिम सत्य असून जग हे मिथ्या आहे म्हणजेच अंतिम सत्य नाही आणि जीव हा ब्रह्माहून भिन्न नाही म्हणजेच जीवात्मा व परमात्मा यांचे अद्वैत आहे हे तत्त्वज्ञान सामान्य माणसाला पचण्यासारखे नाही हे ओळखून त्यांनी वेगवेगळ्या देवतांची स्तोत्रे रचून सगुण उपासनेचा पण पुरस्कार केला. खंडप्राय आर्यावर्त देशामध्ये सर्वत्र पसरलेल्या समाजाला धर्माच्या एका धाग्यामध्ये गुंफण्यासाठी देशाच्या चार दिशांना, चार धर्मपीठांची स्थापना करून समाजाला एकत्रित केले. एकात्मतेचे ते कट्टे पुरस्कर्तेहोते. त्यासाठीच त्यांनी पंचायतन पूजा सुरू केली. अशा या पुण्यशील, पुण्यप्रतापी आचार्यांचे चरणी हे साहित्य पुष्प समर्पित करताना ओंकार न्यासाला अतिशय आनंद होत आहे.

भगवत् पूज्यपाद जगद्गुरू आद्य शंकराचार्यांच्या साहित्यावर अंक काढण्याचे जेव्हा ठरले तेव्हा आम्हा सर्व विश्वस्त मंडळींच्या मनावर थोडे दडपणच आले होते. पण फुलगांवचे स्वामी 'स्वरूपानंद सरस्वती' यांनी आम्हाला आशीर्वाद देऊन अभय दिले. तेव्हा आता हा अंक चांगलाच निघणार याची आम्हाला खात्री वाटली. पंडित वसंतराव गाडगीळ यांच्या अनमोल सहकार्याने व संस्कृत साहित्याचे अभ्यासक असणाऱ्या विचारवंत लेखकांनी आपले लेख देऊन आम्हाला जी मदत केली आहे त्यामुळेच आज वाचकांच्या पुढे आम्ही हा अंक सादर करीत आहोत याची आम्हाला पूर्ण जाणीव आहे. त्या सर्वांचे आम्ही सदैवच ऋणी राहणार आहोत. तसेच अंक काढण्यासाठी आर्थिक सहाय्य करणारे जाहिरातदार आणि हस्ते परहस्ते मदत करणारे हितचिंतक या सर्वांच्या ऋणातून आम्ही कधीच मुक्त होणार नाही. कारण त्यांच्यामुळेच ओंकार न्यासाचे कार्य गेली १८ वर्षे अखंडपणे चालू आहे.



**जय जय रघुवीर समर्थ ।**

**– रजनी काळे**

# प्रगती पथ २००८ - २००९

गुरूंना स्मरून कै. सौ. वसुंधरा सातवळेकर यांनी संस्कार वर्गाची सुरुवात केली. २६ जुलै १९९१ गुरुपौर्णिमेच्या दिवशी ओंकार ट्रस्टचे बीज रोवले. बीज अंकुरले. आज हे रोप वाढून बहरू लागले आहे. ओंकार ट्रस्टचे प्रमुख उद्दिष्ट समाजसेवा, जनजागरण, आध्यात्मिक प्रबोधन हेच आहे. नवीन पिढीला सुसंस्कारित करण्याच्या उद्देशाने सुरू केलेले संस्कार वर्ग गुजर निंबाळकर वाडी, मांगेर वाडी तसेच हिंगणे



स्त्रीशिक्षण संस्था येथे आजही सुरू आहेत. गुजर निंबाळकर वाडी येथे खरेदी केलेल्या जागेवर घरकुल बांधण्यात आले आहे. १९९८ साली ट्रस्टने या घरकुलांत दोन निराधार मुलांचा सांभाळ करण्यास सुरुवात केली. आज या मुलांची संख्या ६ झाली आहे. मुलांना प्रेमाचा मायेचा आधार देऊन त्यांचे आयुष्य सवार्थाने घडविण्याचा प्रयत्न सुरू आहे.

आत्मगौरव न करता ट्रस्टच्या कार्याची ओळख व्हावी या हेतूने २००८-०९ या काळात केलेल्या सामाजिक सेवेची थोडक्यात ही ओळख.

प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालून आपले आयुष्य सार्थकी लावण्याची शिकवण आपल्याला संतांनी सतत दिली. अशा संतांची ओळख जनसामन्यांना व्हावी यासाठी 'कल्याणी' अंकाची




संकल्पना सुचली व ती प्रत्यक्षात उतरवली गेली. गेली १७ वर्षे हे कार्य अविरत सुरू आहे. २००८ मध्ये श्री समर्थ रामदास स्वामींच्या चारशेव्या जयंतीचे औचित्य साधून 'श्री समर्थ रामदास स्वामी' विशेषांकाचे प्रकाशन माननीय कै. श्री. चंद्रशेखर आठवले यांच्या




हस्ते २० एप्रिल २००८ या दिवशी करण्यात आले. श्री समर्थांची बलोपासनेची शिकवण आजच्या काळाचीही नितांत गरज आहे. याच दिवशी 'आपलं घर'चे श्री विजय फळणीकर व

सौ. साधनाताई फळणीकर यांना 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. अनेक अनाथ मुलांचे पालकत्व स्वीकारून त्यांच्यासाठी आपले आयुष्य वेचणाऱ्या या दांपत्याचा सत्कार करताना



ओंकार ट्रस्टतर्फे व्याख्यानमाला

पुणे, ता. ११ : ओंकार ट्रस्टतर्फे विश्वेश्वाडी भागातील पारिजात सेवाभावी [illegible] नुकतेच व्याख्यानमालेचे आयोजन करण्यात आले होते. भारतीय संस्कृती संगमचे संस्थापक शिवाजीराव चौधरी यांच्या हस्ते व्याख्यानमालेचे उद्घाटन झाले. निनाद बेडेकर, डॉ. सदानंद मोरे, डॉ. यशवंत पाठक यांनी विचार व्यक्त केले.

संक्षिप्त

व्याख्यानमाला

विश्वेश्वाडी येथील ओंकार ट्रस्टच्या वतीने आयोजित करण्यात आलेली तीन दिवसीय व्याख्यानमाला नुकतीच संपन्न झाली. या व्याख्यानमालेत निनाद बेडेकर, डॉ. सदानंद मोरे व डॉ. यशवंत पाठक आदी तज्ज्ञांनी विविध विषयांवर आपली मनोगते व्यक्त केली. ट्रस्टच्या वतीने विविध प्रकल्पांचे आयोजन करून सामाजिक कार्य केले जाते.

श्री. फ. मु. शिंदे यांच्या 'आई' या कवितेची आठवण झाली. खरच आई काय असते? जन्माची शिदोरी असते. जी सरत ही नाही उरत ही नाही.

आपला महाराष्ट्र जशी संतांची भूमी तशीच अनेक शूरवीरांची, क्रांतिकारकांची, समाजसुधारकांची जन्मदात्री. अशा या सुपुत्रांची ओळख, त्यांच्या कर्तृत्वाचे पुण्यस्मरण 'वासंतिक व्याख्यान' मालेद्वारे ट्रस्टने करून दिले. श्री. निनाद बेडेकर, डॉ. सदानंद मोरे व प्रा. डॉ. यशवंत पाठक यांनी आपल्या माहितीपूर्ण व प्रभावी वक्तृत्वाने




श्रोत्यांना मुग्ध केले (दि. ६-७ व ९ मे २००८ रोजी) 'शारदीय व्याख्यान मालेत २८ ते ३० नोव्हेंबर २००८ या काळात प्रा. यशवंत पाठक यांची व्याख्यान माला आयोजित करण्यात आली होती. जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मी रती वाढो । भूतां परस्परे पडो । मैत्र जीवांचे । असे सांगणाऱ्या ज्ञानेश्वर माऊली, ठकासी असावे महाठक असे रोखठोकपणे सांगणारे श्री समर्थ रामदास स्वामी, रामेश्वरहून आणलेले गंगाजल वाळवंटात तडफडणाऱ्या गाढवाच्या मुखी घालणारे संत एकनाथ महाराज या सर्वांचा जीवनपट प्रा. पाठक यांनी व्याख्यानातून श्रोत्यांसमोर जणू प्रत्यक्ष उभा केला.

२३ ते २५ मार्च २००९ या काळात समर्थभक्त श्री. सुनिल चिंचोलकर यांची आद्यशंकराचार्यांच्या 'साधना पंचकम्' वर प्रवचने आयोजित करण्यात आली होती. साधकाना त्याचा नक्कीच फायदा होईल.

ओंकारन्यासाकडून महेश शांताराम शिंदे यास १०वीची पुस्तके, प्रवेश फी व लायब्ररी फी देण्यात आली. कु. अश्विनी शिंदे हिला १० वीची परीक्षा फी देण्यात आली. सप्टेंबरमध्ये प्रवीण विजय कुलकर्णी यास कै. नलिनी विष्णु जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्यात आली. नोव्हेंबर २००८ मध्ये हेमा कोरेगांवकर

इयत्ता १२वी हिच्या उदरनिर्वाहाचा व शिक्षणाचा खर्च न्यासाने उचलला. कै. अशोक जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून निंबाळकरवाडी येथील मुलांना शिक्षणासाठी आर्थिक सहाय्य करण्यात आले. हे कार्य लिहिण्या मागचा उद्देश एवढाच की हितेच्छुनी दिलेल्या देणग्यांचा विनिमय हा उज्वल भविष्यासाठीच केला जातो.



जानेवारी २००९ मध्ये हिंगणे स्त्री शिक्षण संस्थेतील विद्यार्थीनीसाठी विविध स्पर्धा आयोजित करण्यात आल्या होत्या. निबंध स्पर्धा, पाठांतर स्पर्धा



यांत ५०० ते ६०० मुलींनी मोठ्या उत्साहाने भाग घेतला. स्पर्धकांना उत्तेजन मिळावे म्हणून त्यांना बक्षिसे देऊन शाबासकी देण्यात आली. मांगडेवाडी येथे समयस्फूर्त वक्तृत्व स्पर्धा घेण्यात आली.

ट्रस्ट करीत असलेल्या कार्याचा गौरव म्हणून मार्च २००९ मध्ये हिंगणे स्त्रीशिक्षण संस्थेने ट्रस्टचे



अध्यक्ष श्री. ढवळे यांचा तसेच संस्कार वर्ग चालिका सौ. लतिका कुलकर्णी यांचा सत्कार केला.

विशेष उल्लेख म्हणजे श्री. किशोर वैद्य गुजर निंबाळकर वाडी येथील ट्रस्टच्या मुलांना 'गीता' शिकवण्यासाठी येत असतात. ट्रस्टच्या निवासी ट्रस्टी श्रीमती मालती निर्मणिकर (मावशी) वाडीतील १०वीच्या मुलींना हिंदी व इंग्रजी विषय स्वच्छेने शिकवितात. गुजर निंबाळकर वाडी येथील ट्रस्टच्या मुलींनी नृत्य स्पर्धेत भाग घेतला व त्यांना उत्तेजनार्थ बक्षिसेही मिळाली.

तर अशी ही आमची उद्दिष्टपूर्तीची वाटचाल. आपल्या सारख्या अनेक हितचिंतक, देणगीदार यांना माहित असणे आवश्यक आहे असे वाटल्यामुळे हा लेखनप्रपंच. आपला सर्वांचा कृपालोभ असाच राहावा आणि आपण सर्वांनी सढळ हस्ते मदत करावी ही विनंती.





# अनुक्रमणिका



## कविता

''ओंकार'' न्यासातर्फे दरवर्षी ''वसुंधरा-कृतज्ञता पुरस्कार प्रदान करण्यात येतो. सन २००७-२००८ च्या वर्षासाठी 'श्री. विजयजी फळणीकर व सौ. साधनाताई फळणीकर' यांना हा पुरस्कार प्रदान करण्यात आला होता. त्यावेळी प्रदान करण्यात आलेले मानपत्र सर्वांच्या माहितीसाठी याअंकामध्ये प्रसिद्ध करत आहोत.

## वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार २००७ – २००८
## 'श्री. विजयजी फळणीकर व सौ. साधनाताई फळणीकर'

# गौरवपत्र

जगात सर्व सुखी कोणीच नसतो हे त्रिकाल बाधीत सत्य आहे. पण दुःखाशिवाय दुसरे काहीच जीवनात नसावे अशी व्यक्तीही विरळाच असते. भगवान श्रीकृष्णाचे स्मरण सतत रहावे म्हणून कुंती मातेने भगवंता जवळ दुःख मागून घेतले होते असे म्हणतात. खूप मोठे कार्य व्हावे अनाथांचा नाथ व्हावे म्हणूनच नियतीने विजय फळणीकरांसारख्या व्यक्तीच्या झोळीत दुःखाचे झुकते माप टाकले असे तर नाही नां ?

विजयजी ! आपल्या देखण्या, हसतमुख आणि प्रसन्न व्यक्तीमत्वाने किती दुःखे झेलली आहेत हे बघणाऱ्याला कधीही कळणार नाही. आपली जिद्द, कठोर परिश्रम आणि नियतीचे क्रूर घाव लीलया सोसण्याची आपली कला वाखाणण्याजोगी आहे. आपल्या कणखर छत्राखाली अनेकांचे मायबाप होण्याची आपली कोमल पण उदात्त भावना म्हणजे विधात्याचे जणू मुर्त रूपच आहे. या रुपाला त्रिवार वंदन.

नागपुरातील एका अत्यंत गरीब कुटुंबातील विजयला दोन वेळच्या खाण्याचीही भ्रांत होती. त्यामुळे त्यांनी आश्रय घेतला महानगरी मुंबापुरीचा. या महानगरीमध्ये या चिमुकल्याच्या नशिबी अत्यंत हीनदिन आयुष्य आले. वयाच्या बाराव्या वर्षी ''यशवंत रामकृष्ण काळे'' नावाचे एक संजीवन छोट्या विजयच्या जीवनांत आले. भरकटलेल्या विजयच्या आयुष्याला दिशा लाभली. शिक्षण सुरू झाले. नाटकाची आणि गाण्याची आवड असणाऱ्या विजयने शाळेला सलग तीन वर्षे नाटकाचे बक्षिस मिळवून दिले. सातवी पास झाल्यावर त्याची रवानगी परत नागपूरला झाली. गाव बदलले म्हणून जिद्द बदलली नाही. दिवसा छोटी मोठी कामे करायची आणि रात्री 'नाईट स्कुल' मध्ये जायचे असा दिनक्रम सुरू झाला. दहावी पास झाल्यानंतर मित्राच्या वडीलांच्या सांगण्यावरून स्टेज क्राफ्टचा डिप्लोमा केला. आत्मविश्वास आणि कठोर मेहनत यांच्या आधारे कामे सुरू झाली. नागपूरला नव्या सुरू झालेल्या दूरदर्शन केंद्रात संधी मिळाली. आयुष्यात सुखाची हिरवळ फुलली. एका डेप्युटी कलेक्टर रत्नपारखीने हे रत्न बरोबर हेरले आणि आपले कन्यारत्न त्याच्या पदरी सुपुर्त केले. साधना विजयचा संसार सुरू झाला. पुण्याला बालचित्रवाणीच्या नोकरी बरोबरच प्रतिमा कम्युनिकेशन ही संस्था सुरू झाली. दूरदर्शनवरील सिरीअलसाठी सेट, नाटकांसाठी नेपथ्ययोजना अशी मोठमोठी कामे सुरू झाली. विजय फळणीकर हे नाव नावारुपाला आले. मोठमोठ्या कलाकरांशी परिचय वाढला. सर्वांगाने जीवन फुलले.

१८ नोव्हेंबर २००१ या सुखी कुटुंबासाठीचा काळा दिवस. विजय साधनेच्या सुखी संसाराला दृष्ट लागली. ''वैभव'' त्यांचा एकुलता एक मुलगा १५ दिवसाच्या आजाराचे निमित्त होऊन त्यांना सोडून कधीही परत न येण्यासाठी निघून गेला. दोघांच्या आयुष्यांत भयाण अंधार पसरला. ज्या जिद्दीवर विजयजींनी आपल्या कठीण आयुष्यावर जय मिळविला होता ती जिद्दच त्याना सोडून गेली होती. वैभवच्या विम्याचे आलेले तीन लाख रुपये व स्वतःजवळचे काही पैसे एकत्रित करून त्यांनी ती रक्कम आपले स्नेही श्री सुरेशजी वाडकर यांचेकडे संगीत निकेतनला देणगी देण्यासाठी सुपुर्त करण्याचे ठरविले. पण सुरेशजींनी ती देणगी स्विकारली नाही. मुलाच्या स्मृतीसाठी पुण्यांतच काहीतर कर असा धीर दिला. काळजाचे पाणी पाणी होण्याच्या या स्थितीतही काही प्रसंग असे घडले की नात्यातील लोकांकडूनच पदरी अवहेलना आली. या अवहेलनेतूनच खोलवर दडलेल्या जिद्दीने परत डोके वर काढले. दोघांनी दुःखाला बाजूला सारले. निर्धार केला, एकाचेच काय अनेकांचे मायबाप व्हायचे.

'आपलं घर' अस्तित्वात आले. अनाथ मुलांसाठी आश्रम उभा राहीला. या 'आपल्या घरा'साठीही त्यांना खूप झगडावे लागले. अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. अडचणींवर मात हेच विजयजींचे जीवन होते. त्यात आतातर साथीला साधनाताईही होत्या. मग डगमगायचे कशाला? २००२ मध्ये 'आपलं घर' उभे राहीले. विजयजींनी नोकरीला रामराम ठोकला. 'वडीलकीचं' नातं निभावण्यासाठी पूर्ण वेळ दिला. एक दीड वर्षांच्या छोट्या चिमुकल्यापासून ते पंधरा सोळा वर्षांच्या मुला-मुलींपर्यंत ३० ते ३५ मुले आज या 'आपलं घर'मध्ये गुण्यागोविंदाने नांदत आहेत. जवळच्याच मामासाहेब मोहोळ विद्यालयात ही मुले शिक्षण घेतात. दोनवेळचे जेवण, कपडालत्ता आणि शिक्षण देणे एवढ्यावरच फळणीकर पती-पत्नीचे समाधान होत नाही. त्यांचा सर्वांगीण विकास व्हावा त्यांना व्यावसायिक शिक्षण मिळावे म्हणून 'आपलं घर'च्या परिसरांत संगणकाची लॅब आहे. सिरॅमिक-पॉट, कागदी-पिशव्या आणि शिवण काम या सुविधाही फळणीकरांच्या मुलांना येथे मिळतात.

या उभयतांनी मुलांना विमान प्रवासही घडवून आणला आहे. त्यांनी एक मुलगा गमावला. पुत्रवियोगाचे दुःख पचविले. वेगवेगळ्या ठिकाणाहून आलेली वेगवेगळ्या जाती धर्माची मुलं आता केवळ फळणीकर दांम्पत्याची मुलं झाली आहेत. अंधाराकडून प्रकाशाकडे जाणारा फळणीकर पतीपत्नीचा प्रवास म्हणजे - सर्व सामान्याच्या डोळ्याच्या कडा ओलावणारा प्रवास आहे. धन्य ते उभयता मायबाप आणि धन्य त्यांचे 'आपलं घर'च कुटुंब. कोणाकडूनही कोणतीही अपेक्षा न ठेवता आज हे दोघे कार्यरत आहेत. दहा रुपयाच्या देणगीला ही लाख मोलाची समजून त्या मागची भावना ओळखून फळणीकर ती स्विकारायला जातात. या पेक्षा मनाचा मोठेपणा आणखी तो काय असणार !

अशा या कार्याने कोण प्रभावित होणार नाही ? ओंकार न्यासाचे विश्वस्त मंडळ विजयराव व साधनाताईंच्या या असामान्य पालकत्वाने प्रभावित झाले आहेत. या उभयतांना 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्कार समारंभ पूर्वक प्रदान करताना ओंकार न्यासास अत्यंत आनंद व समाधान लाभत आहे. त्या उभयतांना त्यांच्या संस्थेला आणि मुलांना भविष्यातही सुयश लाभो. फळणीकरांच्या पाल्यांना देव सुबुद्धी, आरोग्य संपदा देवो हीच ईश्वर चरणी प्रार्थना. आपला

दिनांक :२० एप्रिल २००८

(सु. भि. ढवळे)

अध्यक्ष, ओंकार न्यास

# वाचकांच्या प्रतिक्रिया

॥श्री पांडुरंग॥

दि. ८/३/२००९
सध्या मुक्काम पंढरपूर
फोन नं. ९७६४४४३०६२

प्रति
संपादक, 'कल्याणी'
बिबवेवाडी पुणे-३७

महोदय,

आपल्या ओंकार ट्रस्ट तर्फे प्रकाशित झालेला 'कल्याणी' 'श्री समर्थ रामदास स्वामी विशेषांक' प.पू. बाबुराव महाराज देगलूरकर यांचे मठात वाचण्यात आला. आपला अंक सर्वांगसुंदर व केवळ वाचनीयच नाही, तर संग्रहणीय आहे. या पूर्वी देखिल अनेक संतांचे असे विशेषांक काढले असल्याचे नवीन अंकावरूनच कळले. ज्याअर्थी स्वामी समर्थांचा अंक इतका सुंदर साकारला आहे त्याअर्थी आपली सौंदर्य दृष्टी व अंक माहितीपूर्ण करण्यासाठी घेतलेले कष्ट हे आपण या पूर्वी प्रकाशित केलेल्या इतर संतांच्या विशेषांकात देखिल नक्कीच दृग्गोचर झाले असतील याची मला खात्री आहे.

असे उत्तम अंक मला उपलब्ध होऊ शकतील काय ही पृच्छा करण्याच्या हेतूनेच हे पत्र आपणास पाठविण्याचे धाडस केले.

मला कल्पना आहे कि आपले अंगिकृत कार्य हे सतीचे वाण आहे व जे निरनिराळे उपक्रम आपण राबवित आहात हे अतिशय स्तुत्य व समाजोपयोगी आहेत. आपल्या उपरनिर्दिष्ट अंकातील श्री समर्थांनी केलेल्या आरत्यांबद्दलचा लेख उत्तम आहे. खरे पाहू जाता त्या सर्व आरत्या संकलित करून एक छोटेखानी पुस्तिका या अंका बरोबर दिली असती तर ती योजना नाविन्यपूर्ण ठरली असती.

आपल्या पत्रोत्तराची अपेक्षा करतो

आपला
द. शं. कोटेकर.

पत्रव्यवहाराचा पत्ता पत्रावर दिला आहे.

---

**म.अ.कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद**

■ भाग्यश्री को ऑ हौसिंग सोसायटी लि., बी १, २६२, ताराबाई पार्क, कोल्हापूर - ३, फोन : २६५२०२५
■ सर्वे नं.१०१ / ओ, महावन रेसिडेन्सी, बी-६, फ्लॅट नं.२०३, पौड रस्ता, कोथरूड, पुणे-२९. फोन : २५२८३५५२

॥श्रीस्वामी समर्थ॥

कोल्हापूर
२५/४/०८

आदरणीय,
श्री. भा. वा. सातवळेकर,
स. न. वि. वि.

स्वामी कृपेने सर्व क्षेम.

२० एप्रिलचा, पुण्यामधील प.पू. स्वामी अमलानंद पुण्यतिथीचा कार्यक्रम आटोपून २२ तारखेलाच इकडे (कोल्हापुरी) परत आलो. २३, २५ एप्रिल रोजी इथे कार्यक्रम ठरलेले होते. ... असो.

आपण पाठविलेला 'कल्याणी' वार्षिक अंक व सोबतची प्रसाद भेट आजच पोहोचली. अतिशय आनंद झाला. अंक नेहमी प्रमाणे अत्यंत आकर्षक असाच झाला आहे. समर्थ रामदासांच्या जन्म चतु:शताब्दीचा योग साधून, त्यांच्या व्यक्तिमत्व आणि कार्यावरती लक्षणीय, प्रकाश टाकणारे उत्तमोत्तम लेख या अंकात प्रकाशित झाले आहेत. आपण मोठ्या कौशल्याने लेखकवर्ग सांभाळला आहे. जुन्या नव्या विचारवंत व लेखकांचा सुरेख संगम आपण नेहमीच साधत असता तसा तो याही अंकात साधलेला आहे. संदर्भग्रंथ म्हणून या अंकाचे सर्वत्र स्वागत केले जाईल असा मला विश्वास वाटतो. लेखांची मांडणी, सजावट, छपाई सारे सारे दर्जेदार आहे! आपणाला धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच आहेत. आपल्या संस्थेमार्फत जे विविध उपक्रम चालू आहेत ते उत्तरोत्तर अधिक वाढत व विकसित होत जावोत. समाजाच्या सर्व थरांतून त्या उपक्रमांना भरघोस प्रतिसाद मिळत राहो हीच समर्थचरणी प्रार्थना!....

कळावे, लोभ वृद्धिंगत व्हावा.

आपला नम्र
म. अ. कु.
(स्वामी प्रज्ञानंद)

# भगवान आदि शंकराचार्य : तत्त्वज्ञान व कार्य

**- स्वामी भौमानंद**

*रामकृष्णमठ पुणे-प्रमुख. स्वामी विवेकानंदांचे अग्रगण्य शिष्य विरजानंद यांचेकडून १९५२ साली संन्यास-ग्रहण. जीवनविकास, नागपूर या अंकाचे प्रकाशक. स्वामी विवेकानंदांचे साहित्याचे मराठी रूपांतरात मोठा सहभाग.*

**मंगलाचरण**

***भवता जनता सुहिता भविता***
***निजबोधविचारणचारुमते ।***
***कलयेश्वर जीवविवेकविदम्***
***भव शङ्कर देशिक मे शरणम् ।।***

(अर्थ – तुझ्यामुळे जनसमूह हिताचे आचरण करणारा आहे, कारण आत्मबोधाच्या विचाराने तुझी मती अत्यंत सुंदर व पवित्र आहे. ईश्वर व जीव यासंबंधी विवेकपूर्ण ज्ञान तू आम्हाला करून दे. हे शंकरदेशिका, तू माझा आश्रय हो.)

**पूर्वपीठिका**

भारतराष्ट्र हे उत्तुंग आध्यात्मिक व्यक्तिमत्त्वे नि तत्त्वचिंतक घडविण्यात प्राचीन काळापासून सुप्रसिद्ध आहेच. भारताने घडविलेल्या थोर अशा तत्त्वचिंतकांमध्ये आचार्य शंकरांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल.

भारताच्या सांस्कृतिक इतिहासात एक साक्षात्कारी पुरुष, एक थोर तत्त्वज्ञ आणि एक लोकाचार्य म्हणून श्रीशंकराचार्यांचे एक महत्त्वाचे स्थान आहे. याच साखळीतला पुढचा दुवा म्हणून ज्यांच्याकडे यथार्थपणे अंगुलिनिर्देश करता येईल असे आधुनिक युगाचार्य स्वामी विवेकानंद यांनीही शंकराचार्यांच्या शास्त्रमर्मग्राही अपूर्व मेधाशक्तीचा आणि आपल्या वैदिक राष्ट्राच्या पुनर्उभारणीच्या कार्याचा उच्चरवाने जयघोष केला आहे. इतकेच नव्हे तर पाश्चात्त्य जगतात तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात ज्यांची नावे आदरपूर्वक घेतली जातात त्या प्रो. मॅक्समुलर व प्रो. डॉयसन प्रभृतींनाही आचार्यांच्या कार्यापुढे नतमस्तक झालेले आपण पाहतो.

अवघ्या बत्तीस वर्षांच्या आपल्या जीवनकालात आचार्यांनी औपनिषदिक वैश्विक विचारांचा प्रसार व प्रचार करून अतिशय उच्च प्रतीचे विधायक कार्य केले आहे. या जगदुद्धारक विचारांचा प्रभाव आजतागायत कमी झालेला दिसत नाही; उलट अखिल मानवतेचे पोषण करीत हीच औपनिषदिक वाणी आता हळूहळू जगभर प्रसृत होत आहे.

**आचार्यांचा जन्मकाल : तत्कालीन सामाजिक परिस्थिती व आध्यात्मिक धारणा –**

या विषयाकडे वळण्यापूर्वी आचार्यांपूर्वीचे धर्मसंस्थापक – भगवान बुद्ध यांच्याद्वारे कशा पद्धतीने धर्मसंस्थापन झाले होते, त्यांच्या शिकवणुकीचा समाजावर कसा परिणाम झाला होता व कालौघात त्या उपदेशाने कशी वळणे घेतली होती, हे जाणून घेतले पाहिजे.

भोग, तृष्णा यांमुळे माणूस सदा जन्म–मृत्यूच्या शृंखलेत फिरत राहतो हे उमजून तसेच सदाचारयुक्त जीवन जगून माणूस निर्वाणाला प्राप्त होऊ शकतो हे जाणून भगवान बुद्धांनी भिक्षुसंघाची स्थापना केली. भगवान बुद्धांना अशी काही माणसे पाहिजे होती की जी स्वत:ला या संसार जंजालात गुंतवून न घेता उच्च आदर्श समोर ठेवून एखादे विधायक कार्य करतील, आत्मोन्नती करणारे शुद्ध आणि नैतिक जीवन स्वत: जगतील आणि खरे सत्य काय आहे हे तेणेकरून जाणू शकतील. इतकेच नव्हे तर लोकांचे दैन्य दूर करण्यासही ते समर्थ होतील. तात्त्विक ऊहापोह आणि स्वर्गलाभ इत्यादी सकाम हेतूने केल्या जाणाऱ्या समस्त कर्मकांडांना तिलांजली देऊन भगवान बुद्धांनी मानवाला व मानवाच्या दु:खनिवृत्तीला अग्रस्थान दिले. विविध आध्यत्मिक साधनांतून उन्नत होत अखेर स्वत: प्रबुद्ध होऊन त्यांनी एका विलक्षण क्रांतीचे प्रवर्तन केले, ज्यात सदाचारयुक्त चारित्र्य निर्माण व खरी प्रज्ञा विकसित करण्यावर भर राहिला. पीडित व दु:खी लोकांच्या दु:खाचे मूळ त्यांनी शोधले व त्यावरील उपाययोजना समाजापुढे मांडल्या. यासाठीच त्यांनी एका नवीन यतिसंघाचा पाया घातला.

थोडक्यात काय तर उपनिषदांची प्रत्यक्ष भाषा न वापरता पण तेच परमानंद प्राप्ती व आत्यंतिक दु:खनिवृत्तीचे औपनिषदिक सत्य भगवान बुद्धांनी मांडले. त्यांचा भर राहिला तो प्रामुख्याने लोकांचे दैन्य दूर करण्यावर. बुद्धांची विशाल करुणा व त्यांनी प्रवर्तित केलेला धर्म अनेक लोकांना सामावत अनेक शतके विस्तार पावत राहिला. परंतु यालाही अर्थात काही मर्यादा होत्याच.

आत्मोन्नतीच्या सुरुवातीच्या टप्प्यांवर असताना माणसांना

अशा आदर्शाची गरज असते की ज्याच्याकडून ते दैवी मदतीची अपेक्षा करतात. एक मानसिक गरज म्हणून जिची उपासना करता येईल, जिचे नामगुणसंकीर्तन करता येईल, जिच्यावर प्रेम करता येईल अशा सगुण साकार उच्च आदर्शाची तेव्हा आवश्यकता असते. मानवजात मुळातच बुद्धिप्रधान असल्याने अतींद्रियापुढे श्रद्धेने आत्मसमर्पण करण्यापूर्वी जगताचे मूलकारण शोधून काढताना तर्कबुद्धीचा पुरेपूर अवलंब करू इच्छिते. बुद्धांनी प्रवर्तन केलेल्या मार्गात ही उणीव राहून गेल्याने कालांतराने बुद्धानुयायांनी आपापल्या कामनांनी प्रेरित होऊन धर्मतत्त्वांचा स्वैर अर्थ लावल्याने तसेच वैयक्तिक क्षमता व पिंडगत संस्कार लक्षात न घेता साऱ्यांनाच काहीसा अधिकार निरपेक्ष उपदेश प्रदान केल्याने प्रचंड गोंधळ माजला. क्षणिकवाद, अनात्मवाद, निरीश्वरवाद इत्यादींमुळे लोक संभ्रमात पडत होते. या अपकर्षाची कारणे शोधताना आचार्य लिहितात. 'दीर्घेण कालेन अनुष्ठातृणां कामोद्भवात्' (म्हणजे 'दीर्घकाळ धर्मानुष्ठान करणाऱ्यांच्या मनात कामनांचा उदय झाल्याने') अशातूनच मग विकृत व गुप्तपंथीय उपासना प्रचलित होऊ लागल्या; त्याला पाठिंबा देणाऱ्या पोकळ तर्कावर उभारलेल्या विचारप्रणाली मूळ धरू लागल्या. वासनांचा मळ काढून टाकण्यासाठी ठरविण्यात आलेल्या वेदोक्त कर्मकांडांचे रूपांतरण हे अवडंबरयुक्त विधिअनुष्ठानात होऊ लागले नि हे धर्माचे बहिरंगच त्याच्या कलहाचे मूळ कारण होऊ लागले. त्यात विहित असणारे आत्मज्ञानाचे लक्ष्य धूसर होऊन जाऊ लागले. हे धार्मिक अराजक पाहून काही राज्यसंस्थांनी पुनरेकवार धर्माला त्याचे उज्ज्वल स्वरूप देण्याचा प्रयत्न केला; परंतु त्याला स्थायी फळे आली नाहीत. याच युगप्रयोजनाची पूर्ती करण्यासाठी आचार्यांनी जन्म ग्रहण केला.

**आचार्यांचा जीवनपट**

आचार्य हे अवतारी पुरुष असल्याचे पुढील पूर्वसंदर्भावरून सिद्ध होते.

श्री व्यासांनी कूर्मपुराणात म्हटले आहे-

***कलौ रुद्रो महादेवो लोकानामीश्वर: पर:***
***न देवता भवेन् नृणां देवतानां च दैवतं ।।***
***करिष्यत्यवताराणि शङ्करो नीललोहित: ।***
***श्रौतस्मार्तप्रतिष्ठार्थं भक्तानां हितकाम्यया ।।***
***उपदेक्ष्यति तत् ज्ञानं शिष्याणां ब्रह्मसंज्ञितम् ।***
***सर्ववेदान्तसारं हि धर्मान्वेदनिदर्शितान् ।।***

१.२८.३२,३३,३४

अर्थात- श्रुति-स्मृति प्रतिपादित धर्माची प्रतिष्ठापना करण्यासाठी व तेणे करून भक्तांचे हित करण्यासाठी परम-ईश्वर जो महादेव शंकर तो कलियुगात स्वत: अवतार धारण करील आणि ज्यात ब्रह्मस्वरूपाचा विचार सांगितला आहे, असे ते वेदान्तातील सारभूत ज्ञान शिष्यांना उपदेशील.

आचार्यांचा जीवनपट संक्षिप्तपणे असा सांगता येईल : आचार्यांचा जन्म इसवी सन ७८८ मध्ये झाला. त्यांनी केवळ वयाच्या आठव्या वर्षी चारही वेद आणि शास्त्रग्रंथांचे अध्ययन पूर्ण केले. त्यांनी वयाच्या बाराव्या वर्षी वेदविद्या व शास्त्रांमध्ये प्राविण्य संपादन केले आणि सोळाव्या वर्षांपर्यंत प्रस्थानत्रयींवर भाष्यरचना व इतर रचना केल्या.

उर्वरीत सोळा वर्षांत महर्षी व्यासांच्या आज्ञेने अखिल भारतातील पंडितांना जिंकून विविध धर्ममतांचा समन्वय करून वैदिकधर्माच्या अद्वैत तत्त्वज्ञानाची पुनरेकवार प्रतिष्ठापना करण्याचे अतिमौलिक कार्य आचार्यांनी केले. शेवटी ते वयाच्या बत्तिसाव्या वर्षी इसवी सन ८२० मध्ये समाधिस्थ झाले.

**आचार्यांद्वारा धर्मसंस्थापना**

तत्कालीन परिस्थितीचा आढावा घेऊन व आपल्या तपाचरणामुळे विशेष शक्तिसंपन्न होऊन आचार्यांनी पुढीलप्रमाणे कार्यप्रणाली आखली असे अनुमान करता येते.

१. अवंडबरयुक्त वाटणारे वैदिक विधी सुटसुटीत करणे. त्यांचे कालोचित शुद्धीकरण व आध्यात्मिकीकरण करणे.

२. ज्याची अनुरागयुक्त अंत:करणाने उपासना करता येईल अशा देवाला स्थान देणे.

३. श्रुतिवाक्यांची नीट छाननी करून ज्ञान-भक्ती-कर्म व योगांचा समतोल साधणे.

४. एक सहस्रभर अंमल गाजवलेल्या बुद्धधर्मातील सारभूत वैदिक सनातन धर्माशी सुसंगत असणारा भाग कायम राखणे, परंतु त्यातील विधिअनुष्ठानांना योग्य रूप देणे.

५. समाजाची आत्मज्ञानाच्या रोखाने उभारणी करणे. परंतु समस्त कर्मे, कर्तव्ये व आध्यात्मिक साधनांचे नियमन हे मात्र त्या त्या माणसाच्या व्यक्तिगत क्षमता, विकासाचा स्तर, आकलनशक्ती लक्षात घेऊनच केले गेले पाहिजे यावर कटाक्ष राखणे.

६. संन्यस्त संघजीवन हे कालौघात आदर्शापासून च्युत होऊन भ्रष्ट होणार नाही याची दक्षता घेणे.

७. अनाठायी नकारात्मक व शून्यवादी तत्त्वज्ञानाची जागा औपनिषदिक आत्मतत्त्व व चिरंतन शांती इत्यादी संकल्पनांनी भरून काढणे. पुन्हा या अद्वैत तत्त्वज्ञानातील गोष्टींचा तत्त्वज्ञानाच्या इतर शाखांशी मेळ घालून त्याचे सहज अनुशीलन व अनुसरण होईल अशी काळजी घेणे.

### आचार्यांची तीन पदरी शास्त्रीय कार्ययोजना

आचार्यांनी आपल्या कार्याची सुरुवातच सर्व शिकवणुकीचा समन्वय साधणाऱ्या अद्वैत-वेदान्ताच्या शिकवणुकीने केली आणि ऐहिक अभ्युदय व पारलौकिक नि:श्रेयस म्हणजेच कल्याण साधून देणाऱ्या सनातन वैदिकधर्माचा शंख फुंकला. ऐन विशीत भारतभ्रमण करीत असताना या लोकोत्तर पुरुषाने ठिकठिकाणी विरोधकांना आत्मसात करीत, शिष्यसंप्रदाय जोडीत, विविध धर्ममतांचे शुद्धीकरण करीत, वैदिकधर्माची गुढी उंच उभारली.

आपल्या सहज संस्कृतातून आचार्यांनी प्रस्थानत्रयींवर भाष्ये रचली.

उपनिषदे- ज्यात वैदिक तत्त्वज्ञान व आध्यत्मिक स्पृहा कशी कशी विकसित होत अंतिम सत्यापर्यंत घेऊन जाते याचे विवरण आहे.

ब्रह्मसूत्रे - ज्यात शास्त्रांचे, औपनिषदिक आध्यात्मिक अनुभूतींचे व संतांच्या दर्शनांचे प्रमाणीकरण (Standardization) केलेले आहे.

भगवद्गीता - जीत या तत्त्वज्ञानाची दैनंदिन जीवनाला स्पर्श करेल अशी बाजू मांडली आहे.

म्हणूनच **श्रुती** हा मूलाधार, त्यावर श्रुत्यनुकूल तर्क- **युक्ती** व या साऱ्याची परिणती म्हणून स्वत:च्या साधनेतून अखेरीस **स्वानुभूती** अशाप्रकारे एक वैश्विक पाया वेदान्ताने तयार केला आहे. आचार्यांच्या या सूक्ष्म आध्यात्मिक अंतर्दृष्टियुक्त प्रस्थानत्रयीवरील भाष्यांमुळेच जगताच्या तात्त्विक व धार्मिक इतिहासात पहिल्यांदाच एवढी सुस्पष्टता व पारदर्शकता आली.

### आचार्यांचा शास्त्राधार अथवा श्रुतिप्रामाण्य

गीतेत म्हटल्याप्रमाणे,

*य: शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारत: ।*
*न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ।।*
*तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ*
*ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ।।*

(१६. २३ व २४)

आपल्या भारतभ्रमणात आचार्यांनी लोकांना मन:पूत वागताना पाहून व धर्माच्या नावाखाली ओंगळ आचरण करताना पाहून हे स्पष्टच बघितले असावे की अशाने हे या पारलौकिक काय पण या जगातील सुखांनाही आचवत आहेत. म्हणूनच इहपारलौकिक कल्याण साधण्यासाठी शास्त्रोक्त विचारांचाच पाया घातला गेला पाहिजे. वेदान्त तत्त्वज्ञानाला सर्व तत्त्वज्ञानांची संमीलनभूमी मानून आचार्यांनी समाजजीवनाचीच फेररचना केली. इंद्रियगम्य अनुभव, इंद्रियातीत अनुभव यांचे विस्तृत विवेचन करून अपरोक्षानुभूतीला अग्रस्थान दिले. उपनिषदांनी सत्यानुभूतीसाठी श्रवण-मनन-चिंतनाची त्रिसूत्री आखून दिली आहेच. त्यांचा उद्घोष आहे **'आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्य: मन्तव्य: निदिध्यासितव्य:।'** हे वत्सा, आत्म्याचे प्रथम अधिकारी पुरुषांकडून अथवा शास्त्रग्रंथांतून श्रवण केले पाहिजे. त्यानंतर त्यावर योग्य तर्क करून नीट मनन केले पाहिजे. आपल्या अनुभवांशी व प्रयोगांशी ते ताडून बघितले पाहिजे. अखेरीस ती सूर्याप्रमाणे स्वयंप्रकाशी आत्मानुभूती प्रत्ययास येते, जेथे तर्क इत्यादी सारे मावळून जाते. अशा पद्धतीने श्रुत्योक्त तीनही प्रमाणांना एकमेकांच्या आधाराने पुष्टी देत देत उन्नत होत होत त्या एकमेवाद्वितीयात व अनंतात पूर्णत: प्रतिष्ठित व्हावयाचे असते.

### विचारप्रणालींचा समन्वय

आचार्यांनी पारलौकिक सत्ता, व्यावहारिक सत्ता आणि प्रतिभासिक सत्ता मानून त्या त्या सत्तांमध्ये येणाऱ्या अनुभवांचे वर्गीकरण करून सर्वच विचारप्रणालीतील अनुभवांना व अनुभूतींना त्यांचे त्यांचे स्थान दिले आहे.

आचार्य ब्रह्म व आत्मा यांचे एकत्व दाखवून केवळ थांबत नाहीत तर जीव, जगत् आणि जगदीश्वराचे ब्रह्माशी असणारे ऐक्यही दाखवतात. शिवाय माया, प्रकृती यासंबंधी आचार्योक्त विवेचनही मुळातून बघण्यासारखे आहे. या साऱ्यामुळेच आचार्यांनी एका वैश्विक आध्यात्मिक धर्माचे प्रवर्तन केले आहे, असे यथार्थाने म्हणता येईल.

आपल्या विचारप्रणालींच्या समन्वयाला आचार्यांनी कृतीची जोडही दिलेली होती. या वैश्विक समन्वयक विचारांच्या प्रसाराच्या दृष्टीनेच त्यांनी मठस्थापना केल्या. पूर्वेस पुरी येथे, पश्चिमेस द्वारका येथे, उत्तरेस बदरीनाथ येथे आणि दक्षिणेस श्रृंगेरी येथे आचार्यांनी प्रमुख मठांची स्थापना करून भारतामधील धार्मिक व आध्यात्मिक एकछत्रताच दिग्दर्शित केली.

समाजाला पुन्हा सनातन धर्माकडे वळवण्यासाठी आचार्यांनी आणखी एकप्रकारे समन्वयक कृती केली. भारतात त्या काळी गणेश, शिव, दुर्गा, नारायण आणि सूर्य यांची पूजा करणारे जणू कट्टर म्हणावेत असे गटच अस्तित्वात आले होते. त्या त्या गटाच्या श्रद्धेचा बिमोड न करता ती व्यापक करण्याच्या हेतूने आचार्यांनी पंचायतनपूजा प्रतिपादिली. यामुळे पंथोपपंथामधील कट्टरपणा नाहीसा होऊन परस्पर सहिष्णुभाव आणि त्याच्याच परिणामी आध्यात्मिक एकता निर्माण होण्यास उपकारक वातावरण तयार झाले. अशा रीतीने आचार्यांची पंचायतनपूजा ही आध्यात्मिक समन्वयाची एक मोठी देणगीच म्हणायला हवी.

**आधुनिक युगाच्या निर्मितीत आचार्य शंकरांचे योगदान**

गेली काही शतके विज्ञान व तंत्रज्ञान जरी जगतावर अंमल गाजवत असले तरी काही मूलभूत प्रश्न हे हरेक काळात, हरेक समाजात, हरेक मानवसमूहाला पडत असतात. या प्रश्नांचा पाठपुरावा करणे आणि त्यांचा तळ गाठणे यातच मानवी बुद्धीचे खरे श्रेष्ठत्व दडलेले आहे. नानात्वाचा शोध घेणारी बुद्धी अखेरीस उन्नत होत त्यामागील एकत्व शोधण्यास प्रवृत्त होते व आत्मशुद्धी करून घेत त्या सत्याचा साक्षात्कार करून घेते. ही सारी वरकरणी गुंतागुंतीची वाटणारी प्रक्रिया आचार्यांनी अतिशय सुलभ करून त्याला वैदान्तिक वैश्विक परिमाण बहाल केले आहे. सत्यसंशोधनास प्रवृत्त झालेल्या कोणत्याही यात्रेकरूला मार्गदर्शक ठरतील अशी वेदान्तिक विचारसरणी आचार्यांनी आपल्या प्रस्थानत्रयीवरील भाष्यांतून जगासमोर सादर केली.

आज जग विकासाच्या ज्या टप्प्यावर उभे ठाकले आहे तेथे अनेकानेक मूलभूत मूल्यांची कठोर चिकित्सा होत आहे. धर्म, संस्कृती, राष्ट्र या संकल्पनांचा मुळातून शोध घेतला जाऊ लागला आहे. राष्ट्रवादासारख्या संकल्पना क्षीण होऊन Global Village सारख्या संकल्पना रूढ होऊ पाहात आहेत. या साऱ्या पार्श्वभूमीवर पुनरेकवार वेदान्तिक कल्पनांचे पुनरुज्जीवन कसे करता येईल व मानवजातीला एका छत्राखाली आणून परस्पर साहचर्य व प्रेमादरयुक्त सहजीवन प्रस्थापित करून ते एका उच्च ध्येयाप्रती कसे प्रेरित करता येईल, याचे यथार्थ मार्गदर्शन आपल्याला आचार्यांच्या शिकवणुकीत व प्रत्यक्ष जीवनात आढळून येते. आज याच मुद्द्यांवर पाश्चात्त्य विचारवंत कुंठित झालेले आढळून येतात. भारतवर्षातील अनेक विचारवंतांनी सनातन धर्माच्या दिव्य आलोकात स्वत: कृतार्थ होऊन अशा अनेक धर्मपिपासूंची तृष्णा शमवली आहे व वेळोवेळी या अध्यात्मिक विचारांचा पूर जगभर वाहवून दिला आहे. याच दृष्टीने आपल्याला श्री शंकराचार्यांकडे पाहावयास हवे. येथे हेही लक्षात घेणे आवश्यक आहे, की अध्यात्मप्रवाह हे अतिशय संथ पण अविराम वाहत असतात. बाह्य जगतात सहजपणे दिसून येणाऱ्या बेबंद वळणे घेत जाणाऱ्या इतर मतप्रवाहांप्रमाणे हे प्रवाह नाहीत.

जीवनाशी घनिष्ठपणे परिचय झालेल्यांसाठी जेव्हा हे विषय व समस्या जीवन-मरणाइतक्याच गरजेच्या होऊन बसतात आणि ते या घनघोर जीवनसंग्रामामध्ये प्राणपणाने सत्याचा धांडोळा घेऊ लागतात, तेव्हा असे आचार्य त्यांना अखिल मानवजातीचे उपासक व पूजक म्हणून भेटतात. त्यांचे अपूर्व चारित्र्यबल, त्यांचा अद्भुत ईश्वरानुराग, त्यांचा लोककल्याणकारी गुरुभाव हे आपल्याला मोहून टाकतात आणि नतमस्तक होऊन आपणही 'अनंताचा पंथ' जोपासू लागतो. त्यांनी प्रसृत केलेली औपनिषदिक तत्त्वप्रणालीच मग आपल्या जीवनाचा मूलाधार व जगण्याचे प्रयोजन होऊन बसते. आपापल्या वाटा चोखाळत असतानाच हे आत्मतत्त्वाचे भान राखल्यास सारेच क्रमश: उन्नत होऊ शकतात. आधुनिक युगाचार्य स्वामी विवेकानंद म्हणत असत त्याप्रमाणे ही तत्त्वे गुहागिरीकंदरांमध्ये पडून न राहता ती सर्वांच्या हातात पडावयास हवीत. एखादा मासेमारी करणारा जर जाणेल की तोच आत्मा आहे, तर तो अधिक चांगला मासेमार होईल; एखादा विद्यार्थी जर जाणेल की तो तोच आत्मा आहे, तर तो अधिक चांगला विद्यार्थी होईल.

नव्या युगाला हे आत्मभान राखण्याचीच खरी गरज आहे, जेणेकरून या जगत पसाऱ्यात आपण हरवून न जाऊ. आणि यासाठीच आचार्योक्त वेदान्तिक विचारांची कास धरणे आवश्यक होऊन बसले आहे.

**– स्वामी भौमानंद**

अध्यक्ष, रामकृष्ण मठ,

दांडेकर पुलाजवळ, पुणे – ४११०३०.

दूरभाष : २४३३५१३०, २४३३३७२७



# धन्यपुरुष

**स्वामी तेजोमयानन्द**

*सेंट्रल चिन्मय मिशन प्रमुख*

मनुष्य जन्मप्राप्तीचे प्रयोजन काय आहे? तसेच मनुष्य जन्माची धन्यता कशात आहे? याचे वर्णन प्रात:स्मरणीय भगवान आदि शंकराचार्यांनी स्वरचित 'धन्याष्टकम्' स्तोत्रामध्ये केले आहे. या धन्याष्टकम् मधील प्रथम श्लोकाचे यथामति निरुपण करत आहे.

***तज्ज्ञानं प्रशमकरं यदिन्द्रियाणां***
***तज्ज्ञेयं यदुपनिषत्सु निश्चितार्थम् ।***
***ते धन्या भुवि परमार्थनिश्चितेहा:***
***शेषास्तु भ्रमनिलये परिभ्रमन्ति: ।।१।।***

***'धन्याष्टकम्'***

जे इंद्रियांना शांत करते तेच खरे ज्ञान होय. खरे ज्ञेय तेच होय ज्याचा निश्चित निर्णय उपनिषदातून केलेला आहे. तेच लोक खरोखर धन्य होत जे परमार्थप्राप्तीसाठी दृढतेने प्रयत्न करत आहेत. बाकी सर्व भ्रमरुपी संसारचक्रामध्ये इतस्तत: भरकटत असतात.

**संक्षिप्त व्याख्या**

जे इंद्रियांना शांत करते (प्रशमकरं यत् इन्द्रियाणाम्) त्यालाच ज्ञान (तत् ज्ञानम्) ही संज्ञा देता येईल. प्राप्त करण्यास योग्य असे ज्ञान तेच आहे. (तत् ज्ञेयम्). इंद्रियशांतीमध्ये ज्ञानाचा हेतू काय असेल?

ज्ञानाचे अनेक प्रकार आहेत (जसे भौतिकशास्त्र, विज्ञान, इतिहास, अर्थशास्त्र, राजनीति इत्यादि) व पर्याप्त प्रयत्नांनी ते प्राप्त केले जाणे संभव आहे, परंतु ज्ञानाचे हे सर्व प्रकार प्रत्येकाने प्राप्त केलेच पाहिजेत असे नाही. मग असे कोणते ज्ञान आहे जे प्रत्येकासाठी सुलभ आहे तसेच आवश्यक व अनिवार्य आहे? असे कोणते ज्ञान आहे की ज्याच्याविना मनुष्यजीवन अपूर्ण राहाते?

जो उपनिषदांचा सुनिश्चित प्रतिपाद्य विषय आहे (यत् उपनिषत्सु निश्चितार्थम्). जे उपनिषदाद्वारे सुनिश्चित केलेले आहे तेच ज्ञान प्रत्येक व्यक्ती प्राप्त करू शकते आणि तेच अवश्य प्रापणीय आहे म्हणजे प्रत्येकाने प्राप्त केलेच पाहिजे.

या जगात (भुवि) तेच धन्य आहेत. (ते धन्या:) जे परमार्थ प्राप्तीसाठी सदैव प्रयत्नशील आहेत (परमार्थ निश्चितेहा:). अन्य सर्व भ्रान्तीच्या चक्रात परिभ्रमण करीत आहेत (शेषास्तु भ्रमनिलये परिभ्रमन्त). ज्यांनी इंद्रियांना शांत करणाऱ्या आत्मज्ञानासाठी प्रयत्न केलेला नाही.

**व्याख्या**

**ज्ञान –** साम्प्रत आपण ज्याला ज्ञान समजतो ते इंद्रियाग्राह्य तर्कबुद्धीवर आधारित अनुमानाने वा हस्ते परहस्ते (जसे वर्तमानपत्रांद्वारे) प्राप्त होणारे असते. या ज्ञानप्राप्तीची साधने असतात आपली ज्ञानेंद्रिये. ज्ञानेंद्रियांच्या माध्यमातून आम्ही शब्द, स्पर्श, रूप, रस व गंधाचे ग्रहण करतो. या ज्ञानेंद्रियांच्या आधारावर आम्ही ज्या निर्णयाप्रत पोहोचतो त्यालाच जगात आम्ही ज्ञान म्हणतो. अनुमान प्रमाणाने प्राप्त ज्ञानाचा प्रकार वेगळाच असतो पण त्याचा आधार मात्र इंद्रिय प्रत्यक्षच आहे. उदाहरणार्थ गुरुत्वाकर्षणाची शक्ती इंद्रियगोचर नाही पण न्यूटनने अनुमान केले ते वृक्षावरून पडणाऱ्या सफरचंदाला पाहूनच. वस्तुनिष्ठ ज्ञान हे परोक्ष किंवा प्रत्यक्ष ज्ञान आहे तर परमतत्त्वाचे ज्ञान, आत्मस्वरूपाचे ज्ञान साक्षात् अपरोक्ष आहे.

**इंद्रियशमन–** आम्ही जे वस्तुनिष्ठ ज्ञान म्हणजे लौकिक पदार्थांचे ज्ञान प्राप्त करतो त्याचा आमच्या मनावर काय प्रभाव पडतो?

अशा ज्ञानामुळे आमचे मन सदैव विषयाभिमुख होऊन चंचल व उत्तेजित होत राहाते. त्यामुळे आमच्या आत्मनिरीक्षणामध्ये बाधा येते. उदाहरणार्थ, उत्तेजित कार्यक्रमांद्वारे दूरदर्शन आमचे मन आकर्षित करते. ज्ञानाची अशा प्रकारची साधने लोकांचे मनोरंजन करत राहतात व मनाला कधीच त्याचा कंटाळा येत नाही.

मनाची रिकामी पोकळी / रितेपण भरून काढण्यासाठी लोक वेगवेगळे उपाय करतात. कधी लोकसंग्रह करतात तर कधी दुसऱ्यांवर आपला अधिकार गाजवितात. कधी जगातील घडामोडींमध्ये रुचि घेतात तर कधी भौतिक वस्तूंचा संग्रह करतात. मनाची ही पोकळी एवढी विशाल असते की ती भरण्यासाठी ते इंद्रियजन्य आनंदाच्या मागे लागतात किंवा सदैव एखाद्या सनसनाटी घटनेची प्रतीक्षा करत असतात. कधी त्यासाठी ते रेडिओ, टिव्ही चालू करतील तर कधी

मित्र–मैत्रिणींना भेटतील. मनुष्यमात्र उपलब्ध नसेल तर त्यांना पशू, (कुत्री, मांजरी) देखील चालतात कारण असे लोक घाई, गडबड, गोंगाट यांच्याशिवाय राहूच शकत नाहीत.

इंद्रियजन्य ज्ञान, मनामध्ये सदैव क्षोभ, क्रोध, आसक्ति, काम, मद, मात्सर्यादि विकारांची उत्पत्ति करत असते. जसे दुसऱ्याला लागलेली लॉटरी आमच्या मनात ईर्ष्येचे जागरण करीत असते. अत: इंद्रियजन्य ज्ञान कधीच संपूर्ण शांती देऊ शकत नाही. परिणामत: आम्ही सदैव तणावग्रस्त राहतो तथा जीवन विषय चिंतीत राहतो.

वेदान्त म्हणतो की सत्याचे ज्ञान आम्हाला कधीच बहिर्मुख बनवत नाही तसेच आपल्या स्वरूपापासून विचलितही करत नाही. उलटपक्षी हे ज्ञान आपल्या ज्ञानेंद्रियांना शांती प्रदान करून आपल्या स्वरूपाकडे आकृष्ट करते. ज्ञानेंद्रिय शांतीचा अर्थ ज्ञानेंद्रियांचा उपयोगच न करणे असा होत नाही. उदाहरणार्थ काही न बघणे, काही न ऐकणे किंवा कशालाच स्पर्श न करणे. असे करणे अव्यावहारिक होईल तथा ते संसारापासून पलायन होईल. इंद्रियशांती त्यालाच म्हणतात जेव्हा आमचे जीवन संयमित होते, इंद्रियभोगांवर आमचे सुख निर्भर नसते व मन आत्मस्वरूपापासून विचलित होऊ इच्छित नाही.

प्रशांत अंत:करणयुक्त स्थितप्रज्ञ व अज्ञानी मनुष्य यांच्यातील भेदाचे सुंदर वर्णन भगवद्‌गीतेच्या दुसऱ्या अध्यायामध्ये केलेले आहे. दोन्ही प्रकारच्या माणसांसाठी जग व जगाचा अनुभव सारखाच असतो पण अज्ञानी इंद्रियचिंतनात, विषयचिंतनात मग्न होऊन जे काही उपभोगतो (पाहतो, ऐकतो...) त्यामध्ये आसक्त होतो. विषयप्राप्तीची कामना करतो. कामना पूर्ण न झाल्यास निराश तथा क्रोधित होतो. जीवनाच्या अशा दिशेला अग्रेसर होऊन अन्तत: नष्ट होतो.

उलटपक्षी ज्ञानी मनुष्य याच संसारामध्ये रागद्वेषरहित जीवन जगतो. विषयांचा उपभोग घेतानाही त्यापासून अलिप्त राहतो. तो सदैव शांत, संयमित व संतुलित राहतो. भगवान् श्रीकृष्ण म्हणतात, ''तो योगी सर्व व्यवहार करत असतानाही माझ्यामध्ये निवास करतो'' मग तो कोण्या देशाचा शासक असो वा वृक्षाखाली निवास करणारा अकिंचन मनुष्य असो, तो भले भिक्षा मागून खावो, भले विक्षिप्त आचरण करणारा दिसो किंवा विद्वज्जन असो. त्याचे खरे निवासस्थान परमात्माच असतो. हेच सत्य ज्ञान आहे.

ज्ञानी कधीच विषयनिर्भर नसतो तर संसारी सदा विषयकामना करत असतो. या विषयासक्तीमुळेच ध्यानकाळातही संसारी मनुष्य दिव्यप्रकाश, मधुरध्वनी किंवा अमृतस्वादाची कामना करीत राहातो. योगसाधनेमध्ये अशाप्रकारचे अनुभव प्राप्त होऊ शकतात पण ती अपरोक्षानुभूति नाही. ही ज्ञानाची स्थिती पण म्हणता येणार नाही कारण अशा सिद्धी मनुष्याला स्वरूपापासून विमुख करतात.

**'स्व'ला जाणा**

**तज्ज्ञेयं यदुपनिषत्सु निश्चितार्थम्** – उपनिषद प्रतिपाद्य विषयच जाणून घेण्यास योग्य आहे.

आज तर, उपनिषदाचे नावसुद्धा न जाणणारे बरेच लोक आहेत. उपनिषद नावांचे ग्रंथ आहेत हे पण त्यांना ज्ञात नाही. असे लोक वरील विधानाशी सहमत होणार नाहीत परंतु या लोकांनासुद्धा उपनिषद प्रतिपाद्य विषयाला जाणणे अपरिहार्य आहे. मग भले हे जाणण्याचा स्रोत उपनिषद असो वा अन्य असो.

डॉक्टर असो, वकील असो, उद्योगपति असो वा अन्य कोणीही असो, सर्वांनाच आपले वास्तविक स्वरूप जाणून घेणे आवश्यक आहे. सामान्य स्तरावर, सर्व लोक आपण मनुष्य आहोत याचा स्वीकार करतात. हे सर्वसामान्य, मूलभूत व्यक्तित्व ज्याला अवगत नसेल त्याचे अन्य सर्व ज्ञान दोषयुक्त मानले जाईल. या जगामधील त्याचा व्यवहारही असंगत होईल. ज्यांना आपल्या मानवी व्यक्तित्वाची विस्मृती होते त्यांना भ्रमित (वेडा) मानले जाते. त्यांची आपल्या वास्तविकतेशी फारकत होते. अशा भ्रमित लोकांना आपल्या व्यक्तित्वाची विस्मृती होते. त्या ऐवजी अन्य व्यक्तित्वाशी ते एकरूप होतात. परिणामत: भ्रमवश ते स्वत:ला महात्मा गांधी वा श्रीराम वा श्रीकृष्ण वा जीझस समजतात! मग सामान्य व्यवहारही त्यांच्यासाठी अशक्य होऊ लागतो.

भगवान रमणमहर्षि एकदा म्हणाले की जर आम्ही आमच्या 'स्व'लाच जाणत नाही तर आमचे इतर ज्ञान यथार्थ कसे असेल? उदाहरणार्थ जसा एका मद्यपीचा आचार विचार असम्बद्ध असतो किंवा एक भ्रमित व्यक्ती एखाद्या स्वामींचा हार घालून सत्कार करते वा स्वामींना धक्का मारून अपमान पण करू शकते. अशावेळी स्वत:चे मानवी व्यक्तिमत्त्व विस्मृत झालेल्या त्या भ्रमित माणसाच्या केलेल्या मानापमानांनी काय ते स्वामी संतुष्ट वा रुष्ट होतील?

अधिकांश लोकांचा परिचय त्यांच्या भौतिक रूपाशी असतो. ते आपल्या देहालाच आपले स्वरूप मानतात. त्यांचा हा निर्णय अनेक संभ्रमाला जन्म देतो. जसे अमेरिकेत नव्याने आलेल्या भारतीय मुलांना त्यांचा व्यवहार भारतीय असावा की अमेरिकन असावा हा संभ्रम पडतो. मातापित्यामधील एक भारतीय हिंदू व दुसरा अमेरिकन ख्रिस्ती असेल तर त्यांच्या अपत्यांना प्रश्न पडतो, ते हिंदू आहेत की ख्रिश्चन? दक्षिण आफ्रिकन पाद्रींची स्थिती पण वेगळी नाही. भौतिक शरीराशी असलेल्या तादात्म्यामुळे अशा

समस्या व संभ्रम जन्म घेतात.

आपल्या वास्तविक स्वरूपाचे ज्ञान झाल्यास या सर्व प्रकारच्या समस्यांपासून सुटका होते. त्या व्यक्तीला समज येते की, त्याचे व्यक्तित्व, त्याच्या स्थूलदेहाचे रंगरूप, प्रकृतिसापेक्ष आहे तथा विशेष महत्त्वपूर्ण नाही. त्यानंतरच तो स्वरूपाशी एकनिष्ठ होऊ लागतो.

अत: सर्वांत महत्त्वपूर्ण प्रश्न हा आहे की मी कोण आहे? या प्रश्नाचे उत्तर उपनिषदच देते. ईशावास्य, केन इत्यादि उपनिषदांचे अध्ययन करण्याची संधी सर्वांना उपलब्ध होईलच असे नाही. परंतु उपनिषद प्रतिपाद्य स्वरूपाचे ज्ञान मात्र आवश्यक आहे.

**परिपूर्णता व अमरत्व**

कोणतीही व्यक्ती आपल्या आत्मस्वरूपाला जाणूनच इंद्रिय-संयमी व सुखी होऊ शकते. अशा व्यक्तीला इंद्रियसुखाच्या क्षणिक तरंगांऐवजी अपरिमित आनंदाचा सागर प्राप्त होतो. एक अद्वितीय, परम सत् हाच आपला अनन्त आत्मा आहे. तो आत्मसंतुष्ट, आप्तकाम, पूर्णकाम आहे. त्याच्या ठिकाणी विषयसुखाची कामनाच नाही. भगवत् गीतेच्या १३ व्या अध्यायात भगवान् श्रीकृष्ण म्हणतात 'जाणून घेण्यास योग्य तेच आहे ज्याला जाणून घेण्याने अमरत्वाची प्राप्ती होते.'

अमरत्व म्हणजेच जे कालातीत आहे किंवा जे प्रतिक्षण होणाऱ्या परिवर्तनापासून तथा भवरोगापासून मुक्ती देते. उपलब्ध कालमर्यादेमध्ये आपण नेहमीच काही- ना-काही बनू इच्छितो. हाच भवरोग आहे. एक लहान मूल मोठे होऊ इच्छिते. तर एक इंजिनियर व्यवस्थापक होऊ इच्छितो. काही वेळा ही परिवर्तने इतकी असंख्य होतात की त्यांचे व्यवस्थापन करणे कठीण होते.

आपल्या कालातीत स्वरूपाची प्राप्ती होणे तथा मृत्यूचे भय निवृत्त होणे म्हणजेच अमरत्वाची प्राप्ती होणे होय. अमरत्वप्राप्तीनंतर निरंतर परिवर्तनशील जगात अक्षुब्ध व अप्रभावित राहून आनंदाने जीवन जगत रहावे. आपल्या हृदय गुंफेमधील प्रकाशमान व निर्विकार आत्मस्वरूपाचे ज्ञान झाल्याने आमचे आजचेच अनुभूत विश्व अद्भुत व विलक्षण प्रतीत होते.

**ते धन्या भुवि परमार्थनिश्चितेहा: –** परमार्थसिद्धीसाठी दृढतेने प्रयत्न करणारे पुरुषच धन्य होत. जगातील अधिकांश लोक धन, संपत्ती प्राप्त करण्यासाठी अथक परिश्रम करताना आढळतात. केवळ एक साधकच परमार्थरूपी अक्षय संपत्तीच्या संचयामध्ये व्यग्र असतो. खरोखरी, तोच धन्य होय.

**शेषास्तु भ्रमनिलये** – अन्य सर्व लोक भ्रमरूपी संसारामध्ये भटकत असतात. भौतिक विद्येच्या प्राप्तीने ते भ्रममुक्त होऊ शकत नाहीत. कला, विज्ञान, व्यापार इत्यादीचे ज्ञान त्यांना जीवनाच्या शोकांतिकेपासून वाचविण्यास सहायक होत नाही. एखाद्या विषयाचा संशोधक, एक महान वैज्ञानिक किंवा एखादा डॉक्टर, मृत्यू वा धनहानीसारख्या परिस्थितीमध्ये तेवढाच व्यथित होतो जेवढा एखादा सामान्य अशिक्षित मजूर होईल. अशा प्रसंगी पूर्वप्राप्त धन, संपत्ती, पद किंवा शिक्षण त्याच्या उपयोगी पडत नाही. याचा अर्थ भौतिक शिक्षण व्यर्थ आहे असा नाही तर भौतिक शिक्षण ही शिक्षणाची अंतिम स्थिती नव्हे, हे समजणे आवश्यक आहे. आत्मज्ञानाव्यतिरिक्त इतर सर्व ज्ञान प्राप्त करणे म्हणजे 'स्व'ची विस्मृति होऊन संपूर्ण जगाची प्राप्ती करून घेण्यासारखे आहे. याचा काय लाभ?

भौतिक विद्या हे परम ज्ञान नव्हे. केवळ भौतिक विद्येने कृतकृत्य होऊन चालणार नाही तर परमात्मतत्त्वप्राप्तीपर्यंत अथक परिश्रमांची आवश्यकता आहे अन्यथा काळ व संसाराची गुलामी कधी संपणारच नाही.

– **स्वामी तेजोमयानन्द**
सेंट्रल चिन्मय मिशन ट्रस्ट, 'संदिपनी साधनालय' साकी विहार रोड, मुंबई ४०००७२.
फोन नं. ०२२-२८५७२३६७.

# श्रीमज्जगद्गुरु आद्यशंकराचार्य : अवतार, कार्य, तत्त्वज्ञान आणि संप्रदाय

**श्री. वि. ना. दंडगेशास्त्री**

*पुणे येथील कै. गुरुवर्य विष्णुशास्त्री बापट यांच्या आचार्यकुल या संस्थेमध्ये व काशी येथील साङ्गवेद विद्यालय येथे कै. गुरुवर्य राजेश्वरशास्त्री द्रविड यांचेकडे प्रारंभिक शिक्षणापासून साहित्य, व्याकरण, वेदान्त इत्यादी विषयांचा अभ्यास. १९४५ ते १९७५ बेळगाव येथे संस्कृत व मराठी विषयाचे अध्यापन. प्रवचनाच्या माध्यमातून अविरत ४० वर्षे आचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानाचा प्रसार. जगन्नाथपंडित यांच्या 'गंगालहरी'चा ओवीबद्ध मराठी अनुवाद व आचार्यांच्या अनेक प्रकरणग्रंथांचा मराठी अनुवाद. पुणे येथे 'ऋषि' पुरस्काराने सन्मानित. श्रृंगेरी पीठ, कांचीकामकोटी पीठ, वैदिक संम्मेलन पुणे व नाशिक यांच्याकडून सन्मान.*

***वक्तारमासाद्य यमेव नित्या सरस्वती स्वार्थसमन्विताभूत् ।***
***निरस्तदुस्तर्ककलंकपङ्का नमामि तं शंकरमर्चितांघ्रिम् ।***
***यदीयवाग्वैभवमादरेण शिरःसु सन्तः सततं वहन्ति***
**वन्दे तमज्ञानहरं प्रबोधसुधाकरं शंकरदेशिकेन्द्रम् ।।**

आपल्या भारतामध्ये अनेकवार धर्मसंस्कृति इत्यादिकांच्या घडामोडीमुळे धर्माला आलेली ग्लानी व अधर्माचा होणारा विकास यामुळे जनतेची अतिशय दुरवस्था होते, अशावेळी हे संकट दूर करून जनतेला स्थिरस्थावर करण्यासाठी अवतार होत असतात, झाले आहेत व होत रहाणार आहेत या बद्दलची भगवदुक्ति प्रसिध्द आहे; 'यदा यदा हि धर्मस्य...' इ.

श्रीमत् आद्य आचार्यांच्या अवतारापूर्वीसुध्दा आपल्या भारतामध्ये बौध्द, चार्वाक, कापालिक, भैरव, शाक्त व गाणपत्यादि पंथामध्ये धर्माच्या नावाखाली गोंधळ चालू होता. एकमेकांची मते एकमेकाच्या विरूध्द होती यामुळे काय करावे व काय करू नये हे सामान्य जनतेला कळत नव्हते, त्यामुळे जनता गोंधळून गेली होती. ही आपल्या धर्मप्रिय भारताची परिस्थिती भगवान् शंकरांनी पाहिली आणि आता याचे निर्मूलन कसे करावयाचे याचा विचार करून कुमार कार्तिकस्वामी या आपल्या ज्येष्ठ पुत्रास आज्ञा देऊन भारतात पाठविले. त्यांचा सत्कुलामधे जन्म होवून (कुमारील भट्ट) सर्व विद्यापारंगत होऊन उदयास आले. त्यावेळी हा भारत बौध्दमय बनलेला होता. वेदांबद्दलची, शास्त्रांबद्दलची अनास्था माजली होती. चंद्रगुप्त, अशोकादिकांसारखे राजेसुध्दा बौध्दधर्मानुयायी बनून त्याप्रमाणे वागत होते. दररोज बौध्द्धर्माच्या प्रचाराकरिता सभा होत असत त्यामध्ये वैदिकधर्माची निंदा चालत असे. अशी सभा एक दिवस चालली असतांना कुमारील भट्ट, (त्यांना भट्टपाद म्हणत असत) त्या सभेमध्ये आले. त्यांनी सर्व सभा अवलोकन केली. वेद किंवा श्रुति हे नाव जरी ऐकले तरी लोक अपशब्द ऐकल्यासारखे समजून कानांवर हात ठेवीत असत. वेदांच्या निंदेने तोंडसुख घेत असत. असे चालले असताना एका बौध्द पंडिताने भट्टपादांच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या आहेत हे पाहिले आणि हा आपल्यापैकी कुणी नसून वेदाभिमानी असा कुणी आहे असे त्यांना वाटले. राजाला त्यांनी ही हकीकत सांगितली आणि त्या ब्राह्मणाची चौकशी करण्यास सांगितले. भट्टपादांनीसुध्दा आपण वेदाभिमानी आहोत हे कबूल केले. त्यांनी वेदमाहात्म्यही सांगितले, त्यांचे अपौरूषेयत्वही सांगितले. तेव्हा सर्व बौध्दपंडित आश्चर्यचकित होऊन राजास म्हणाले; हा कुणीतरी वेदाभिमानी असलेला मनुष्य, याने येथील मागच्या पर्वतावरून उडी घेऊन वेदप्रामाण्य सिध्द् करून दाखविल्यास आम्ही वेद प्रमाण मानू. राजाने ही गोष्ट भट्टपादांना सांगितली. भट्टपादांनी ते मान्य करून तसे करून दाखविण्यास ते तयार झाले. जवळच्या पर्वत शिखरावर जावून प्रतिज्ञा केली की,

***यदि वेदाःप्रमाणंस्युः न मे काचित् भवेत् क्षतिः***

असे म्हणून त्यांनी पर्वताच्या शिखरावरून उडी घेतली. भट्टपादांचा तो देह एखाद्या कापसाच्या गोळ्याप्रमाणे हलका होऊन सावकाश खाली पडला. लोक चकित झाले. भट्टपादांना पायाच्या अंगठ्याला थोडीशी जखम झाली. लोक ते पाहून आश्चर्यचकित झाले. त्यावेळी आकाशवाणी झाली की त्यांच्या प्रतिज्ञेमध्ये 'यदि' हा शब्द संशयात्मिकता दर्शवितो त्यामुळे यांच्या अंगठ्यास थोडी जखम झाली आहे. यांनी 'वेदाः प्रमाणम् एव' असे म्हंटले असते तर यांना काही झाले नसते. सर्वांचे विचार बदलले. पण अभिमान सुटेना! त्यांनी राजाला सांगितले की हा कुणीतरी जादूगार आहे. त्यामुळे याचा

नायनाट करून टाकावा. राजाच्याही मताचे परिवर्तन होत चाललेले होते. शेवटी राजानेच एक युक्ती ठरविली आणि सांगितले की, मी आता एक प्रयोग करणार आहे. त्याचे उत्तर जो कुणी योग्य प्रमाणाने देईल त्याचे म्हणणे मी प्रमाण मानेन. राजाने एका सुवर्णकुंभामध्ये एक साप ठेवला. त्याचे तोंड बंद केले व तो कुंभ सभेमध्ये आणून ठेवला आणि सर्वांना सांगितले की यात काय आहे हे जो कोणी बरोबर सांगेल त्याचे म्हणणे मी प्रमाण मानेन. बौध्द पंडितांचे गणित चालू झाले आणि त्यांनी सांगितले की यात पिवळसर रंगाचे काहीतरी लांब आहे. भट्टपादांना विचारले असता ते म्हणाले 'महाराज या सुवर्ण कलशामध्ये भगवान शेषशायींची मूर्ति आहे'. राजाने दोघांचे म्हणणे ऐकून घेतले व कलशाचे तोंड उघडले. आत पहातात तो भगवंतांची शेषशायी मूर्ति ! हे पाहिल्याबरोबर बौध्द पंडितांची तोंडे काळी ठिक्कर पडली, त्यांचा थरकांप उडाला, आणि ठरल्याप्रमाणे त्या पंडितांना तिबेटच्या बाहेर हाकलून दिले. अशातऱ्हेने त्या काळामध्ये स्वतःचा प्राण पणाला लावून वेदप्रामाण्य सिध्द् करणारा समाज आणि विद्वान मंडळी होती.

त्याचवेळी आपल्या भारतात अशी घटना घडली की केरळ प्रांतामध्ये कालटी या गावी शिवगुरू आणि आर्यांबा यांच्या पवित्र कुळामध्ये एक मुलगा जन्माला आला. अतिशय सुंदर, देखणा, ज्ञानाचे मुखावर तेज हे पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. गावातील सुवासिनींनी, ब्राह्मण कुटुंबांनी शिवगुरू व आर्यांबेचे कौतुक केले. बाळ दिवसेंदिवस वाढू लागला. तिसऱ्या वर्षी तो सर्व भाषासंपन्न झाला. त्या मुलाचे पाळण्यातील नाव शंकर ठेवण्यात आले. भगवान शंकरच साक्षात जन्माला आले होते. भट्टपादाने कर्मकांडाच्या द्वारा, वेदप्रामाण्याच्या द्वारा आचार्यांचा ज्ञानप्रसाराचा मार्ग मोकळा केला होता. म्हणूनच त्यांना प्रत्यक्ष जन्म घ्यावा लागला. वयाच्या ५ व्या वर्षी त्यांची मुंज करण्याचे ठरविले, पण दुर्दैवाने त्यांच्या तिसऱ्या चौथ्यावर्षी त्यांना पितृछत्रास मुकावे लागले. काही काळानंतर आर्यांबांनी मुलाची मुंज करण्याचे ठरविले. बाळ मोठा मातृभक्त होता. आईला रोज नदीवर स्नानास घेऊन जाई, तिची सेवा अतिशय उत्तम तऱ्हेने तो करी. 'न मातुःपरदैवतम' हे त्यांच्या हृदयावर कोरलेले होते. अशा तऱ्हेने दिवस चालले असतांना बालशंकराची मुंज झाली. आपल्या पुढच्या कार्याची दिशा काय हा विचार त्यांच्या मनात आला. आणि मनाशी काही निश्चय करून आईला नदीवर स्नानासाठी घेऊन आले, आईचे स्नान झाले, तिला कपडे दिले व आईला काठावर बसवून ते आंघोळीला गेले. त्यानी नदीमध्ये बुडी मारली. त्यावेळी त्यांनी असा देखावा आपल्या आईला दाखविला की एका भयंकर मोठया मगराने आपला पाय तोंडात धरून ते आपणास पाण्यात खेचत आहे. पााण्यातूनच बालशंकर ओरडायला लागले. 'माझा पाय मगराने धरला आहे. मी आता बुडून मरणार!' म्हाताऱ्या आईची तारांबळ उडाली. 'आई हा मगर म्हणतो, तू संन्यास घेत असशील तर तुला मी सोडतो, नाहीतर बुडवून टाकतो!' काठावर बसलेल्या आईस काही सुचेना. काय बरे करावे? संन्यास घेण्यास परवानगी द्यावी तर मुलगा जाणार, नाहीतर मगर गिळून टाकणार, मगराने गिळण्यापेक्षा संन्यास घेऊन जिवंत राहील, पुन्हा भेटेल तरी, असा विचार करून वृध्द आईने त्याला संन्यास घेण्याची परवानगी दिली. आई थकली होती. दररोज नदीचे स्नान हे तिचे व्रत होते, तिला नदीवर येववत नव्हते म्हणून नदीची प्रार्थना करून बालशंकराने नदीला आपल्या घराजवळून वाहण्याची विनंती केली. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी पाहतात तो नदीचा प्रवाह घरासमोरून चालला आहे ! लोक आश्चर्यचकित झाले. बाळ शंकराने दुसऱ्या दिवशी प्रस्थान ठेवण्याचे ठरविले. आईचा निरोप घेतला आणि प्राण कंठाशी आणून वृध्द मातेने आपल्या एकुलत्या एक मुलास निरोप दिला. आई म्हणाली 'शंकरा ! मी थकले रे ! तू मला एकटा! तू गेल्यावर माझे और्ध्वदेहिक कर्म कोण करील ? तू संन्यासी, तुला अधिकार नाही, बाळ शंकराने उत्तर दिले 'आई तू काळजी करू नको. तुझे और्ध्वदेहिक कर्म कुणी केले नाही तर मी करेन. तू माझे स्मरण कर, मी तुझ्या अंतकाली येतो', असे सांगून बाळ शंकर निघाले गुरूच्या शोधाकरिता!

गुरूंचा शोध घेत ते नर्मदेकाठी एका आश्रमात असलेला गौडपादाचार्यांच्या आश्रमात आले. ते जणू त्यांची वाटच पहात होते. त्यांनी आपल्या दरवाज्यात एक तांब्या ठेवला होता. त्यामध्ये नर्मदा नदीचा प्रवाह सामावत होता. कुटीला धोका नव्हता. बाल शंकरांना आश्चर्य वाटले. दोघांची भेट होऊन गौडपदाचार्यांनी आपले शिष्य गोविंद भगवत्पाद यांचेकडे बालशंकराना पाठविले. तेथे राहून बालशंकराने सर्व वेद शास्त्रांचा अभ्यास केला. ग्रंथ लेखनालाही आरंभ केला. तो त्यांच्या कानावर भट्टपाद तुषाग्नी प्रवेश करताहेत ही बातमी आली. त्यांची भेट घेऊन आपण आपल्या कार्याला आरंभ करावा असा विचार करून ज्या ठिकाणी भट्टपाद तुषाग्नीप्रवेश करीत आहेत त्या ठिकाणी ते आले. बालशंकर त्यांना म्हणाले, 'आपल्याला यापुढे फार मोठे कार्य करावयाचे आहे, हे आपण काय चालविले आहे ? आपण बाहेर यावे', तेव्हा भट्टपाद म्हणाले, 'तू कोण आहेस हे मी जाणतो पण मला हे प्रायश्चित्त घेणेच भाग आहे. ज्या वेदांवरील श्रध्देने मी अनेक विद्वानांना वादामध्ये परास्त केले. त्याचे पाप आणि त्याचे प्रायश्चित्त मला घेणे भाग आहे. मी ते घेणार! इथून माहिष्मतीनगरीमध्ये मंडनमिश्र

माझा शिष्य, मीमांसक, विद्वान आहे. त्याला वादामध्ये जिंकून त्याचा पराजय केल्यास मला जिंकल्यासारखे होईल.' हे ऐकून बालशंकरांना वाईट वाटले. भट्टपादांच्या इच्छेप्रमाणे माहिष्मतीनगरीमध्ये मंडनमिश्र कोण आहे हे पाहण्याकरिता ते निघाले. जाताना वाटेत नदीवर काही बायका पाणी भरण्यासाठी आल्या होत्या. त्यांच्याकडे बालशंकराने मंडनमिश्रांचा पत्ता विचारला. माहिष्मतीनगरीमध्ये महापंडित म्हणून मंडनमिश्र ओळखले जात होते. बालशंकरांचा हा प्रश्न ऐकून त्या बायकांना आश्चर्य वाटले. त्या म्हणाल्या, 'तुला त्यांचे घर माहिती नाही ? हे पहा ज्यांच्या घरच्या वळचणीवर पिंजरे टांगले आहेत व त्यामध्ये असलेले पोपट व मैना संस्कृत भाषेमध्ये वाद करताहेत,

***जगत् ध्रुवं स्यात् जगदध्रुवं स्यात् कीरांगना यत्र गिरं गिरंति ।***
***व्दारस्थनीडांकितसन्निरूध्दाः जानीहि तन्मंडनपंडितौकः ।।***

'ते घर मंडनमिश्रांचे समज.' घर उघडण्याची शक्यता दिसत नाही असे पाहून बालशंकराने योगमार्गाने सूक्ष्म शरीर धारण केले व घरच्या अंगणामध्ये उतरले. तो त्यांना मंडन श्राध्द करण्यात मग्न आहेत असे दिसले. ब्राम्हण बसलेले आहेत. त्यांची पूजा चालू आहे, अशा परिस्थितीमध्ये, समोर संन्यासी पाहिल्याबरोबर महाकर्मठ पंडितान मंडन एकदम रागावून 'कुतो मुन्डी?' असा प्रश्न केला. शंकराने त्यांना चिडविण्याच्या दृष्टीनेच छलवाद स्वरूपाने त्या शब्दांचा अर्थ घेऊन उत्तरे देण्यास सुरूवात केली. 'कुतो मुन्डी ? आगलात् मुन्डी!' मंडन म्हणाले, 'पंथास्ते पृच्छते मया' 'किम् आह ते पंथाः?' शंकराने विचारले. मंडन म्हणाले 'त्वन्माता मुण्डा इति आह' अशा प्रकारे छलवाद रूपाने त्याला क्रोधाविष्ट करून बालशंकराने त्यांच्याकडे वादभिक्षा मागितली. दोघांचा वादाचा दिवस ठरला. मंडनपत्नीना अध्यक्ष ठरविण्यात आले. तिने दोघांनाही बाहेरच्या सोप्यामध्ये सिंहासनावर बसून वादविवादास आरंभ करण्यास सांगितले. दोघांच्याही प्रतिज्ञा झाल्या. शंकर हरला तर त्याने लग्न करावे आणि मंडन हरला तर त्याने संन्यास घ्यावा, असे ठरले. हरल्याची खूण म्हणून ज्याच्या गळयातील पुष्पमाला सुकेल तो हरला ही अट दोघांनीही मान्य केली. रोज मंडनपत्नी शंकराला भिक्षेला चला, (कारण ते संन्यासी) आणि आपल्या पतीला भोजनास चला (कारण ते गृहस्थाश्रमी) असे सांगावयाची. वादविवाद बरेच दिवस चालला होता. जो तो आपल्या परीने शास्त्रप्रमाणे दाखवून आपले मत सिध्द करण्याचा प्रयत्न करीत होता. एक दिवस भोजनाचे वेळी मंडनपत्नी बाहेर येऊन पाहते तो आपल्या पतीच्या गळ्यातील माळ सुकलेली असल्याचे तिला दिसले. हे पाहून त्या दिवशी तिने दोघांनाही भिक्षेस चला असे आमंत्रण दिले. शंकराने, बाल संन्याशाने, मंडनांना संन्यास आश्रम घ्यावयास लावला आणि त्यांची कर्नाटकातील श्रृंगेरी या पीठावर सुरेश्वराचार्य म्हणून नेमणूक केली.

आचार्यांच्या अद्वैत प्रचार कार्याला आरंभ झाला. एक दिवस हिमालय पर्वतामध्ये हिंडत असतांना ते आपल्या शिष्यासमवेत एके ठिकाणी राहिले होते. ज्या ठिकाणी ते राहतील त्याठिकाणी त्यांचे पाठप्रवचन चालत असे. एका वृध्द ब्राह्मणाच्या वेषात व्यासमहर्षी तेथे आले आणि शिष्यांना विचारले की, 'हा कोण संन्यासी आहे? काय करतो आहे ?' तेव्हा शिष्यांनी सांगितले की ते आम्हाला शारीरभाष्य शिकवताहेत. 'वा !' व्यास म्हणाले. दोघांचे वाद विवाद चालू झाले. व्यासांनी आचार्यांना विचारले की एका सूत्राचा अर्थ मी तुला विचारतो,

***तदन्तरप्रतिपत्तौ रांहति संपरिष्वक्तः प्रश्ननिरूपणाभ्याम्***

या सूत्रावर दोघांचा बराच वाद झाला. कुणी हटेना. तेव्हा शिष्यांना प्रश्न पडला की हा कुणी साधा ब्राह्मण नव्हे. हे व्यास असतील का ? तेव्हा त्यांनी आचार्यांना सांगितले. आचार्यांनी मनात प्रार्थना केली आपण व्यास असाल तर मला दर्शन देऊन कृतार्थ करावे ! मनोमनी प्रार्थना समजली आणि व्यासांनी आचार्यांना दर्शन दिले. आचार्यांना आनंद झाला. 'तुझी रचना उत्तम आहे. यावच्चंद्रदिवाकरौ तुझे हे भाष्य पृथ्वीवर राहील' असा व्यासांनी आशीर्वाद दिला. तेव्हा आचार्य म्हणाले, 'माझे वय सोळा वर्षाचे आहे. माझे येथील कार्य संपले आहे. मला आपण परवानगी द्यावी'. व्यास महर्षी म्हणाले, 'आत्ताच कामाला प्रारंभ झाला आहे. मी माझ्या सामर्थ्याने तुला आणखी सोळा वर्षाचे आयुष्य देतो, तुला तुझ्या कार्याचा, ग्रंथांचा प्रचार करावयाचा आहे. लक्षात ठेव!'

इथून आचार्यांच्या कार्याला आरंभ झाला. आपल्या प्रचारकार्यामध्ये आपल्या तत्त्वज्ञानाच्या प्रचाराकरिता आणि रक्षणाकरिता आचार्यांनी चारही दिशेला चार मठांची स्थापना करून चार उत्तम अधिकारी शिष्यांची नेमणूक केली. पद्मपाद, हस्तामलक, तोटकाचार्य आणि सुरेश्वराचार्य अशी त्यांची नावे आहेत. ते कार्य अद्ययावत् यथाशक्ती चालू आहे. या कालामध्येच आचार्यांनी आपल्या सिध्दांतांचा प्रचार करण्यासाठी पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. आकर ग्रंथामध्ये ब्रम्हसूत्रे, त्यांच्यावरील भाष्य, गीताभाष्य आणि उपनिषद्भाष्य हे ग्रंथ आहेत. या तीन भाष्यांना प्रस्थानत्रयी असे नाव आहे. गीता हा स्मृतिग्रंथ आहे. उपनिषदे हा श्रुतिग्रंथ आहे आणि ब्रह्मसूत्रभाष्य हा तर्कग्रंथ आहे. या तीन प्रमाणांनी आचार्यांनी अद्वैताची सिध्दी केली आहे. अद्वैताकडे जाण्याचा या मार्गाने विचार होतो.

ईशकेनकठादि दहा उपनिषदांवर, पाचशेहे पंचावन्न व्याससूत्रांवर आणि श्रीमद्भगवत्गीतेवर हे भाष्य आहे. ब्रह्मसूत्रभाष्यामध्ये प्रतिपक्षांचे सांख्य, मीमांसा, न्याय, बौध्द इ. मतांचे तर्काने विचार करून खंडन केले आहे. शारीरभाष्यातील स्मृतिपाद आणि तर्कपाद प्रसिध्द्च आहेत. ब्रह्मसूत्रभाष्याचे चार अध्याय आहेत, प्रत्येक अध्यायाचे चार पाद आहेत. प्रत्येक अध्यायातील विषय संपल्यानंतर तिसऱ्या आणि चौथ्या अध्यायामध्ये परलोक, उपासना वगैरे गोष्टींचा विचार केलेला आहे. याशिवाय प्रकरण-ग्रंथामध्ये अनेक देवतांची स्तोत्रे आहेत. आचार्यांनी पंचायतन पूजा भेदनिरसनाकरिता रूढ केली. आचार्यांची ग्रंथसंपदा फार मोठी आहे. विष्णुसहस्रनाम व महाभारतातील सनत्सुजातीय या ग्रंथावर आचार्यांचे भाष्य आहे.

'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' हा आचार्यांचा अद्वैतसिध्दान्त सर्वत्र प्रसिध्द आहे. ग्रंथसंपत्ती विपुल आहे. याचप्रमाणे आचार्यांनी वेदांचे अपौरूषेयत्व सिध्द केले आहे. इतर शास्त्रकारांनी वेद हे, वेदांतील काही शब्दांवरून, पुरुषकृत आहेत असे मानले आहे. 'त्रयो वेदस्य कर्तारः भंड धूर्त निशाचराः' असे म्हणून त्यांची नालस्ती करण्याचा प्रयत्न केलेला आहे. आचार्यांनी भ्रम प्रमाद विप्रलिप्सा व करणपाटवादि दोष नसल्यामुळे ते अपौरूषेय आहेत असे सिध्द केलेले आहे. यामुळे शास्त्राचे प्रबळ प्रमाणत्व तर सिध्द होतेच व त्यांच्याबद्दलची प्रामाण्यबुध्दीही उत्पन्न होते. इतर सर्व सांप्रादायिक संतांनी आपल्या ग्रंथामध्ये वेदाला परमेश्वराचे घोरणे असे म्हटले आहे. घोरणे पुरूषप्रयत्नपूर्वक नसते. त्यामध्ये स्वाभाविकता असते. श्रीज्ञानेश्वरांनी याच अर्थाने त्याला 'जव निद्रिताचा घोरू' असे म्हटले आहे.

या पध्दतीने विचार केला असता वेद हे मनुष्यकृत नसून ते सदा सर्वकाळ नित्यस्वरूपाचे आहेत असे सिध्द होते. जी परब्रह्मवस्तु जगत् निर्माण करण्यापूर्वी ब्रह्मदेवाला निर्माण करते व त्यांचेकडे वेद पाठविते, याचा अर्थ या प्रमाणे जगताची निर्मिती करावी असा होतो.

'यो ब्रह्माणम् विदधाति पूर्वम् यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै' अशी श्रुति आहे. यावरून वेदांचे नित्यत्त्व सिध्द् होते. हे कार्य फार मोठे आहे. 'शास्त्रयोनित्त्वात' या सूत्रामध्ये शास्त्र या शब्दाचा महर्षी व्यासांना अभिप्रेत असणारा अर्थ 'सर्व वेद' असाच आहे. म्हणून आचार्यांनी भाष्यामध्ये 'शास्त्रं नाम वेदादिः' असे म्हटले आहे.

'शास्त्रयोनित्त्वात्' या सूत्राचा दोन प्रकारांनी विग्रह करून अर्थ करता येतो. 'शास्त्रस्य योनिः' हा एक. 'शास्त्रं योनिः यस्य' असे दोन्हीही अर्थ केले आहेत. शास्त्र निर्माण करण्याकरिता कारणीभूत आहे, हे प्रब्रह्माचे स्वरूपलक्षण मानलेले आहे.

'जन्माद्यस्य यतः' हे तटस्थ लक्षण मानले आहे. अशा तऱ्हेने आचार्यांनी वेदांचा संपूर्णतया विचार करून सर्व वेद हे मनुष्यमात्रांचे कल्याण करणारे आहेत असे सांगितले आहे. याचप्रमाणे ज्ञानेश्वरानीसुध्दा

*अहितापासोनि रक्षिति । हित देवोनि वाढविती ।*
*नाही गा श्रुतिपरौति माऊली । जगामाजी ।।*

असे म्हटले आहे.

मातेची उपमा देऊन त्यांनी वेदांना गौरविले आहे. म्हणूनच मनुष्यमात्रांनी त्यातील उत्तम गोष्टींचा विचार करून आपले जीवन उत्तम प्रकारे घडवावे असे सिध्द होते. वैदिक पंडितांनी वेदांच्याच आधारे ज्ञानेश्वरादि भावंडांना संस्कारांचा अधिकार नाकारला म्हणून त्यांनी वेदांबद्दल अनुद्‌गार काढले नाहीत. हीच त्यांची थोरवी आहे. वैदिक संस्कारांच्या योगानी मनादिकांची शुध्दी करून याच जन्मामध्ये जीवनमुक्त अवस्था प्राप्त करून घेता येते याचे उत्कृष्ट उदाहरण 'सदाशिवेंद्रसरस्वती' यांचे देता येईल. या पूर्वीच्या श्रृंगेरी पीठावरील आचार्यांनी त्यांना गुरूस्थानी मानले आहे. ते फार मोठे अधिकारी पुरूष होऊन गेले. यावरून असे दिसते की जगाची सुस्थिती चालण्याकरिता म्हणून ब्रह्मविद्या आणि धर्म यांची अत्यंत आवश्यकता आहे. आचार्य कौटिल्यांनी आपल्या ग्रंथामध्ये

*आन्वीक्षिकी ब्रह्मविद्या दंडनीतिश्च शाश्वती ।*
*विद्याः चतस्त्रएवैताः लोकसंस्थितीहेतवः ।।*

असे म्हटले आहे. यावरून आपली भारतीय संस्कृती ही संपूर्ण जगाला आदर्शभूत असून शाश्वत, कल्याणकारी आहे.

**सर्वज्ञशारदापीठाधिरोहण :**

सर्वत्र भ्रमण चालू असता श्रीआचार्यांच्या कानावर काश्मीरमधील सर्वज्ञपीठाची हकीकत आली. तिकडे आचार्य गेले व त्यांनी पीठावर बसण्याची इच्छा दर्शविली. त्यावेळी प्रत्यक्ष शारदेने संगितले की, येथे सर्वज्ञता सिध्द करून दाखवावी लागते. तेव्हा माझ्या प्रश्नाची उत्तरे दिल्यास तुम्हांस पीठाधिरोहण करता येईल. 'विचारा' असे आचार्य म्हणाले. सरस्वतीने त्यांना काम शास्त्रातील प्रश्न विचारले. उत्तर देणे कठीण ! कारण बालपणीच संन्यास घेतलेला होता. उत्तर न द्यावे तर पराजय ! तेव्हा त्यांनी सरस्वतीपाशी १ ते २ महीन्याची मुदत मागितली. ती दिली गेली. त्यासुमारास अमरूक नावाचा एक राजा मरण पावला होता व त्याचे शरीर दहनाकरिता आणले जात होते. अचार्यांनी विचार करून आपले शरीर एका गुहेत शिष्यांस सांभाळण्यास सांगून त्यांनी त्या राजाच्या शरीरांत प्रवेश करून सर्व विषयांचा उपभोग घेऊन, परत

येऊन आपल्या शरीरात प्रवेश करून ते पीठाकडे गेले व सरस्वतीला 'आता प्रश्न विचार' असे म्हणताच ती म्हणाली 'आता तुम्हाला उत्तर देणे सहज शक्य आहे'. सरस्वतीच्या इच्छेप्रमाणे आचार्यांनी दक्षिणेकडच्या पीठावर आरोहण केले. सर्वज्ञतेचा डांगोरा पिटला गेला. दुसऱ्या शरीराच्या माध्यमातून भोग भोगल्यामुळे कोणताही दोष या शरीराला लागला नाही. जीवनातील नियोजित सर्व गोष्टी झाल्यामुळे आता आचार्यांनी निवृत्त व्हायचे ठरवून हिमालयाकडे प्रयाण केले.

**आचार्यांची ग्रन्थ संपत्ति :**

प्रमुख दहा उपनिषदांच्यावरील भाष्ये, ब्रम्हसूत्र शारीरभाष्य, भगवत्गीता हे आकर ग्रन्थ असून सर्व वेदान्त सिध्दान्त सारसंग्रह (मराठी अनुवादित), साधनपंचक, उपदेशसाहस्री, शतश्लोकी, अपरोक्षानुभूति, प्रबोधसुधाकर, अनेक देवतांची स्तोत्रे, धन्याष्टक, इत्यादी प्रकरणाचे अनेक ग्रन्थ आहेत. भाषा सुन्दर, सुलभ लालित्यपूर्ण असून भावनांना प्रेरणा देणारी आहे.

**संप्रदाय :**

अशा तऱ्हेने जागतिक स्तरावर कार्य करणाऱ्या श्रीमत् आद्य शंकराचार्यांचा संप्रदाय पुढील प्रमाणे आहे.

***नारायणं पद्मभवं वसिष्ठं शक्तिं च तत्पुत्र पराशरं च***
***व्यासं शुकं गौडपदं महान्तं गोविंदयोगीन्द्रमथास्य शिष्यम्***
***श्री शंकराचार्यमथास्य पद्मपादं च हस्तामलकं च शिष्यम्***
***तंत्रोटकं वार्तिककारमन्यान् अस्मद्गुरून् संततमानतोस्मि ।***

ही ब्रह्मविद्या श्रीमन् नारायणांच्यापासून ब्रह्मदेवांना, ब्रह्मदेवांपासून वसिष्ठांना, वसिष्ठांपासून शक्तिंना, शक्तींचे पुत्र पराशरांना, पराशरांपासून व्यासांना, व्यासांच्यापासून शुकाचार्यांना, शुकाचार्यांपासून गौडपादाचार्यांना, गौडपादाचार्यांपासून गोविंदयोगींन्द्रांना, त्यांचे शिष्य शंकराचार्य आणि शंकराचार्यापासून त्यांचे शिष्य पद्मपाद, हस्तामलकाचार्य, तोटकाचार्य आणि वार्तिककार (सुरेश्वराचार्य) या गुरूपरंपरेने आपल्यापर्यंत आलेली आहे.

आम्ही भारतीय त्यांचे ऋण आपल्या मस्तकी धारण करून त्यांचे चरणी नतमस्तक होऊया.

*शास्त्रं शारीरमीमांसा देवस्तु परमेश्वरः ।*
*आचार्याः शंकराचार्याः सन्तु मे जन्मजन्मनि ।।*

इतिशम्

**– वि. ना. दंडगेशास्त्री**
डी १/२, राहूल नगर, कोथरूड, पुणे ३८
फोन : २५४२०७७६

# हस्तामलक

**श्री. किसनमहाराज साखरे**

*टि.म. विद्यापीठाची डी.लीट पदवी. स्वतिश्री मासिकाचे गेली ३६ वर्षे संपादन. आळंदी-देहू परिसर विकास समितीचे अध्यक्ष. जिजामाता पुरस्कार, कॉसमॉस पुरस्कार, पुणे प्राईड ॲवार्ड इ. पुरस्कारांनी सन्मानित*

श्रीमत् जगद्‌गुरू श्रीशंकराचार्य दिग्विजय- यात्रेस निघाले असता, एका गावात आचार्यांना एक बालक भेटले. त्या निरागस बालकास पाहिल्याबरोबर आचार्यांना काही वेगळेच व विलक्षण वाटले.

कारण तसे ते बालक खरोखरच काहीसे आगळे- वेगळेच होते. अर्थात् जे बालक वयाच्या नवव्या वर्षांपर्यंत म्हणजे श्री शंकराचार्यांचे दर्शन होईपर्यंत कधीही, कोणाशीही, केव्हाही, काहीही बोललेच नव्हते. यावरून त्याचे माता-पिता, इष्ट-संबंधी लोकांना- किंबहुना गावातील समस्तही लोकांची कल्पना अशी झाली की, ''हा मुलगा मुकाच असावा'', पण श्रीआचार्यांना पाहिल्याबरोबर आणि त्यांनी त्यास ''कस्त्वं शिशो त्वं कुत आगतोऽसि''- तू कोण आहेस? तू कोठून आलास? असे विचारताक्षणी ते बालक जे बोलले ते वेदान्तवेत्त्या थोर ज्ञात्यासहि कळणे कठीण आहे, मग अनुभूतीची गोष्ट तर फारच दूर! त्या बालकाच्या उत्तरादाखलच्या बोलण्यालाच म्हणजे श्रीशंकराचार्य आणि 'हस्तामलक' यांच्या झालेल्या संवादालाच 'हस्तामलक- स्तोत्र, असे म्हटले जाते.

वास्तविक **'हस्तामलक'** हे त्या बालकाचे नाव आहे; पण तेच नाव त्याने उत्तरादाखल बोललेल्या 'वचना'ला, स्तोत्राला, ग्रंथाला दिले गेले. 'हस्तामलक' असे नाव त्या 'बालकाला' किंवा 'संवादाला' पडण्याचे कारण असे आहे की, त्या 'बालका'ला 'ब्रह्मज्ञान' किंवा 'उपलब्ध- अभिव्यक्त' झालेला 'बोध' हातात घेतलेल्या आवळ्यासारखा आहे. आमलक = आवळा अर्थात् जसे हातात असणाऱ्या आवळ्याचे अपरोक्ष- ज्ञान होते, असा त्याचा अर्थ आहे. किंवा 'हस्तामलक' म्हणजे हातातील निर्मळ- स्वच्छ पाणी जसे पूर्ण समजते, त्याप्रमाणे अनुभवात्मक ज्ञान झाले होते म्हणून त्याचे नाव हस्तामलक.

'हस्तामलका' विषयी एक कथा सांगतात. तसेच आद्य श्रीशंकराचार्यांच्या चार- पट्ट शिष्यांपैकी 'हस्तामलकाचार्य' हे एक होते. ते अगदी लहान असताना कोणाशी काही बोलतही नसत व कोणाचे काही ऐकतही नसत. अगदी जडभरतासारखे त्यांचे वागणे होते. लोकांना ते वेडे वाटत होते.

त्याविषयी असे सांगतात की, यमुनेच्या काठी कोणी एक सिद्ध योगी महात्मा रहात असे. एकदा एक ब्राह्मणाची बाई आपल्या लहान मुलाला बरोबर घेऊन तेथे स्नानाला आली. तिने त्या योग्याजवळ आपले मूल ठेवले व ''महाराज! मी स्नान करून येते, तोपर्यंत आपण या मुलाकडे लक्ष ठेवा!'' अशी विनंती करून ती स्नानास गेली. इकडे त्या योग्यास समाधी लागली व देहभान हरपले. ते मूल रांगत रांगत प्रवाहाकडे गेले व प्रवाहात पडले. आपले मूल गतप्राण झालेले पाहून त्या बाईने हंबरडाच फोडला! त्या मृत पुत्राला घेऊन ती त्या योग्याजवळ आली. आक्रोश करू लागली. इतक्यात योग्याची समाधी उतरली, व ते भानावर आले. तिचे 'अनावर' दुःख व 'अमर्याद' आकान्त पाहून योग्याचे मन कळवळले आणि त्याने योगबलाने आपला देह सोडून त्या मुलाच्या मृत शरीरात प्रवेश केला! ते मूल जिवंत झाले! तेच हे 'हस्तामलक' होत. अशा रीतीने ते बालपणीच स्वत: सिद्ध व ज्ञानी झाले.

आईबापांना मात्र आपला मुलगा बहिरा, मुका व जडमति आहे, असे वाटू लागले! त्याचे योग्यवेळी उपनयन केले; पण तो काही केल्या काही ऐकेना, शिकेना, बोलेना व चालेना. लोकही त्याचा उपहास करू लागले. त्याला वेडा म्हणू लागले. तो दिसायला मात्र अत्यंत तेजस्वी व रूपवान असा होता.

योगायोगाने आद्य श्रीशंकराचार्य दक्षिणेकडील तीर्थयात्रा करीत करीत 'हस्तामलका'च्या 'श्रीबलि' नावाच्या गावी आले. आचार्यांचा प्रभाव, अलौकिक विद्वत्ता- वैभव आणि तेज पाहून मुग्ध झालेल्या वेद-शास्त्र संपन्न प्रभाकराने आपल्या पत्नीसह त्या मुलाला (हस्तामलकाला) बरोबर घेतले व आचार्यांचे सादर- नम्रतापूर्वक दर्शन घेऊन आचार्यांच्या चरणी त्याला अर्पण केले.

लोकांचा व आई-वडिलांचा अभिप्राय लक्षात घेऊन आचार्यांनी सर्वांच्या समक्ष त्याला काही प्रश्न केले. तेच प्रश्न या 'स्तोत्रा'च्या पहिल्या श्लोकांत आहेत. नंतर पुढच्या बारा श्लोकांनी त्या प्रश्नांची उत्तरे दिली आहेत. चौदावा श्लोक मात्र स्तोत्राच्या

संदर्भात- वृत्तात बसत नाही. तथापि 'स नित्योपलब्धि-स्वरूपोऽहमात्मा' हा व हाच समस्त- प्रश्नांच्या उत्तरांचा मानबिंदू- प्रधान आशय आहे. त्या चौदाव्या श्लोकात विश्वव्यापक विष्णूच्या यथार्थ स्वरूपाचे यथार्थ स्तवन आहे.

आतापर्यंत कधीही कोणाशी एक अक्षरही न बोलणाऱ्या मुलाच्या तोंडून जेव्हा घडा घडा म्हटल्या जाणाऱ्या श्लोकांच्या रूपाने आचार्यांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे ऐकली तेव्हा त्या मुलाची माता- पितरे व समस्त लोक यांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. तो जरी सर्वांना वेडा, बहिरा, मुका व जडमति वाटत होता, तरी त्याला 'करतलामलकवत्' म्हणजे तळहातावरील आवळ्याप्रमाणे ब्रह्मत्मैक्यबोध अत्यंत स्पष्ट- नि:संदिग्ध (करतळीं आवळे तैसा हरि।।) स्वरूपाचे झालेले होते. म्हणूनच पुढे ते 'हस्तामलकाचार्य' याच नावाने प्रसिद्धीस आले.

'हस्तामलक- स्तोत्र' हे वेदान्त- प्रकरणांत अत्यंत महत्त्वाचे आहे. यावर एक संस्कृत टीका आहे. त्यावर शांतिब्रह्म श्रीएकनाथ महाराजांनी विस्तृत (६७४ ओव्या) ओवीबद्ध टीका लिहिली आहे.

ते ''हस्तामलक- स्तोत्र'' आम्ही सार्थ- स्वरूपात देत आहोत- **आचार्य उवाच**

***कस्त्वं शिशो! कस्य कुतोऽसि गन्ता,***
***किं नाम ते त्वं कुत आगतोऽसि।***
***एतन्मयोक्तं वद चार्भक! त्वम्,***
***मत्प्रीतये प्रीतिविवर्धनोऽसि ।।१।।***

श्रीआचार्यांनी विचारले, बाळ! तू कोण आहेस? कोणाचा आहेस? तुला कोठे जावयाचे आहे? तुझे नाव काय आहे? तू कोठून आला आहेस? बाळ! माझ्या संतोषासाठी तू, मी विचारलेल्या या प्रश्नांची उत्तरे दे. तुझ्याकडे पाहून मला मोठा संतोष वाटतो. तू संतोष वाढविणारा आहेस.

**हस्तामलक उवाच**

***नाहं मनुष्यो न च देवयक्षौ, न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रा:।***
***न ब्रह्मचारी न गृही वनस्थो, भिक्षुर्न चाहं निजबोधरूप: ।।२।।***

हस्तामलक म्हणाले, 'महाराज! मी मनुष्य नाही, मी देव नाही अथवा यक्षही नाही; मी ब्राह्मण नाही, क्षत्रिय नाही, वैश्य नाही व शूद्रही नाही. मी ब्रह्मचारी नाही, गृहस्थाश्रमी नाही; मी वानप्रस्थ किंवा संन्यासी देखील नाही. सांगू! मी कोण आहे ते? अहो! मी निजबोधस्वरूप आत्मा आहे. अर्थात् मी निजानंद स्वरूप आहे; मी विशुद्ध सच्चिदानंद घन परिपूर्ण परब्रह्म आहे.'

***निमित्तं मनश्चक्षुरादिप्रवृत्तौ,***
***निरस्ताखिलोपाधिराकाशकल्प:।***
***रविर्लोकचेष्टानिमित्तं यथा य:,***
***स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।३।।***

जो मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार, त्याचप्रमाणे हात, पाय, कान, नाक, डोळे इत्यादी कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये यांच्या प्रवृत्तीचे निमित्त आहे; ज्याच्यामुळे हे सर्व आपापले कार्य करण्यास प्रवृत्त होतात; ज्याला तत्त्वत: कोणतीही उपाधि नाही; जो आकाशासारखा अत्यंत निर्मळ व सर्वव्यापी आहे; सूर्य जसा सर्व लोकांच्या व्यवहाराला निमित्त होतो; त्याचप्रमाणे सर्वांच्या व्यवहाराला निमित्त होणारा, असा जो नित्यज्ञानस्वरूप आत्मा, तोच मी आहे! ।।३।।

***यमग्न्युष्णवन्नित्यबोधस्वरूपं,***
***मनश्चक्षुरादीन्यबोधात्मकानि ।***
***प्रवर्तन्त आश्रित्य निष्कम्पमेकं,***
***स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।४।।***

नित्य उष्ण असणे, हा जसा अग्नीचा स्वभाव आहे, त्याचप्रमाणे नित्य ज्ञानस्वरूप असणे, हा आत्म्याचा स्वभाव आहे. स्वभावत: जडस्वरूप असलेली मन, डोळे इत्यादी करण- इंद्रिये ज्याच्या आश्रयानेच आपापले कार्य करण्यास प्रवृत्त होतात; जो निष्कंप म्हणजे स्पंदनरहित अर्थात् निर्विकार आहे; एकमेव, अद्विितीय, नित्यज्ञानस्वरूप आत्मा आहे; तोच मी आहे.

***मुखाभासको दर्पणे दृश्यमानो,***
***मुखत्वात्पृथक्त्वेन नैवास्ति वस्तु ।***
***चिदाभासको धीषु जीवोऽपि तद्वत्***
***स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।५।।***

आरशात दिसणाऱ्या मुखाच्या प्रतिबिंबाला मुखापेक्षा निराळे व स्वतंत्र असे तत्त्वत: काय अस्तित्त्व आहे? आरसा हा उपाधी पुढे असल्यामुळे प्रतिबिंब रूपाने मुखच तेथे प्रतीतीला येते; पण प्रतिबिंब हे मुखाहून निराळे भासते आणि आरसे अनेक असल्यास ती प्रतिबिंबेही परस्परांहून निराळी भासतात. त्याचप्रमाणे बुद्धीमध्ये पडलेले चैतन्याचे प्रतिबिंब म्हणजेच जीव होय.

बुद्धिरूपी उपाधीमुळे शुद्धचैतन्यच बुद्धीत प्रतिबिंबित होऊन जीवरूपाने प्रतीतीला येते. तो जीव शुद्धचैतन्याहून निराळा भासतो. बुद्धी म्हणजे अन्त:करण. ही अन्त:करणे अनेक असल्यामुळे ते जीवही परस्परभिन्न असे प्रतीतीला येतात. तत्त्वत: पाहू गेले असता त्या चैतन्याच्या प्रतिबिंबाला चैतन्यापेक्षा निराळे असे काय अस्तित्त्व आहे? मुखाचा आभास असलेले प्रतिबिंब जसे मुखाहून निराळे नाही. त्याचप्रमाणे शुद्ध चैतन्याचा आभास असलेला जीव शुद्धचैतन्याहून निराळा नाही. शुद्ध चैतन्य हे नित्यज्ञानस्वरूप आहे.

त्यालाच 'आत्मा' म्हणतात; आणि तोच मी आहे. मी नित्यज्ञानस्वरूप आत्मा आहे.

*यथा दर्पणाभाव आभास हानौ,*
*मुखं विद्यते कल्पनाहीनमेकम् ।*
*तथा धीवियोगे निराभासको य:,*
*स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।६।।*

प्रतिबिंब हे कल्पनामात्र आहे. स्वच्छ आरशात पडलेली मुखाची छाया म्हणजेच प्रतिबिंब. मुखापुढील आरसा नाहीसा झाला की, प्रतिबिंब कल्पना मावळते व मुख मात्र शिल्लक राहते. त्याचप्रमाणे 'धीवियोग' म्हणजे बुद्धिरूपी उपाधीचा निरास, तो झाला की, आभास- रहित शुद्धचैतन्यच शिल्लक राहते. तेच नित्यज्ञान स्वरूप आत्मा होय आणि तोच मी आहे.

*मनश्चक्षुरादेर्वियुक्त: स्वयं यो,*
*मनश्चक्षुरादेर्मनश्चक्षुरादि: ।*
*मनश्चक्षुरादेरगम्यस्वरूप:*
*स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।७।।*

जो आत्मा स्वत: मन, कान, नाक व डोळे इत्यादी इंद्रिये आणि देहादिक यांच्याहून अगदी निराळा आहे, जो मनाचे मन आणि डोळ्याचा डोळा आहे, मनाला मनन करण्याची शक्ती व डोळ्याला पाहण्याची शक्ती ज्याच्यामुळे येते, अथवा घटादि स्थूल पदार्थांचे ज्ञान, मन व डोळा यांच्यामुळे होते, पण मन आणि डोळा यांचे ज्ञान आत्म्यामुळे होते, म्हणून आत्म्याला मनाचे मन आणि डोळ्याचा डोळा असे म्हणतात.

मन व डोळा वगैरे कोणीही ज्याचे स्वरूप जाणू शकत नाहीत, असे ज्याचे स्वरूप आहे, तो सर्वसाक्षी नित्यज्ञानस्वरूप आत्मा, तोच मी आहे.

*य एको विभाति स्वत: शुद्धचेता:*
*प्रकाशस्वरूपोऽपि नानेव धीषु ।*
*शरावोदकस्थो यथा भानुरेक :,*
*स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।८।।*

जो एकच एक स्वत: सिद्ध शुद्ध चैतन्यस्वरूप व प्रकाशस्वरूप असूनही अन्त:करणरूपी उपाधि अनेक असल्यामुळे अनेकरूप असल्यासारखा प्रतीतीला येतो; सूर्य जसा तत्त्वत: एकच आहे; पण वेळण्या, परळ, खापरे इत्यादिकांमध्ये साठलेल्या पाण्यात प्रतिबिंबित होऊन अनेक रूपांनी प्रतीतीला येतो, तीच स्थिती आत्म्याची आहे. महाराज! असा जो एकमेव, अद्वितीय, स्वयंप्रकाश, नित्यज्ञानस्वरूप आत्मा, तोच मी आहे ।।८।।

*यथानेकचक्षु: प्रकाशो रविर्न,*
*क्रमेण प्रकाशीकरोति प्रकाश्यम् ।*
*अनेका धियो यस्तथैक: प्रबोध:,*
*स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।९।।*

प्रकाशस्वरूप सूर्य जसा सर्व डोळ्यांना, प्रकाश्य स्वरूप असलेल्या घटपटादि पदार्थांना पाहण्याचे सामर्थ्य एकदम देतो, तो काही क्रमाक्रमाने एकेक विषय दाखवितो असे नाही. त्याचप्रमाणे प्रकृष्ट बोधस्वरूप, चित्स्वरूप असलेला एकमेव अद्वितीय 'आत्मा' देखील अनेक बुद्धींना आपआपला विषय ग्रहण करण्याची शक्ती एकदमच देतो; तो काही क्रमाने देत नाही. असा जो नित्य ज्ञानस्वरूप 'आत्मा' तोच मी आहे.

तात्पर्य, सूर्य जसा एकदम सर्व चक्षुरिंद्रियांचे ठिकाणी अधिष्ठित होऊन चक्षुरादि इंद्रियांना आपापले घटपटादि विषय ग्रहण करण्याचे सामर्थ्य देतो, त्याचप्रमाणे स्वत: सिद्ध, स्वयंप्रकाश असलेला प्रकृष्ट ज्ञानस्वरूप जो आत्मा तो सर्व बुद्धींच्या ठिकाणी अधिष्ठित होऊन, सर्व बुद्धींना आपापले विषय ग्रहण करण्याचे सामर्थ्य देतो. तोच नित्य ज्ञानस्वरूप असलेला 'आत्मा' मी आहे.

*विवस्वत्प्रभातं यथारूपमक्षम्,*
*प्रगृह्णाति नाभातमेवं विवस्वान् ।*
*यदाभात आभासयत्यक्षमेक: ,*
*स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।१०।।*

सूर्याच्या प्रकाशाने प्रकाशित झालेल्या घटपटादि विषयांनाच चक्षुरिंद्रिय प्रकाशित करू शकते. सूर्यप्रकाशाने प्रकाशित नसलेल्यांना ते प्रकाशित करू शकत नाही. त्याचप्रमाणे सूर्य देखील चैतन्याच्या प्रकाशाने प्रकाशित असेल 'तर' आणि 'तरच' तो चक्षुरादि इंद्रियांना प्रकाशित करू शकतो.

अथवा घटपटादि विषय-ग्रहण करण्याचे सामर्थ्य देऊ शकतो; नाही तर नाही. सारांश, घटपटादि विषयांना चक्षुरादि इंद्रिये प्रकाशित करतात. चक्षुरादि इंद्रियांना सूर्य प्रकाशित करतो व सूर्याला चिदात्मा प्रकाशित करीत असतो. तो मात्र स्वत: सिद्ध-स्वयंप्रकाश, स्वसंवेद्य- सु-असंवेद्य आहे. नित्य- ज्ञानस्वरूप आहे. असा जो नित्यज्ञानस्वरूप आत्मा तोच मी आहे. ।।१०।।

*यथा सूर्य एकोऽप्स्वनेकश्चलासु,*
*स्थिरास्वप्यनन्यद्विभाव्यस्वरूप: ।*
*चलासु प्रभिन्नासु धीष्वेक एव,*
*स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।११।।*

सूर्य जसा एकच आहे; पाण्याच्या हालचालींमुळे पाण्यात प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या ठिकाणी चंचलत्त्व भासते, तसेच पाण्याच्या स्थिरत्वामुळे पाण्यात प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या

ठिकाणी स्थिरत्त्व प्रतीतीला येते. वस्तुत: पाहू गेले असता ते चंचलत्व किंवा स्थिरत्त्व त्या सूर्याचे ठिकाणी नसते. ते पाण्याच्याच ठिकाणी असते. कारण, चंचलत्व, स्थिरत्त्व हे धर्म पाण्याचे आहेत, त्या पाण्याच्या संपर्कामुळे ते त्या सूर्याच्या ठिकाणी भासतात एवढेच.

त्याचप्रमाणे बुद्धीच्या अनेकत्त्वामुळे अनेक रूपाने प्रतीतीला येणारे किंवा बुद्धीच्या चांचल्यामुळे चंचल, अस्थिर म्हणून प्रतीतीला येणारे चित्तत्त्वही तत्त्वत: एकरूप, कूटस्थ, अचल, निर्विकार असेच आहे. ते नित्य ज्ञानस्वरूप आहे व त्यालाच 'आत्मा' असे म्हणतात. महाराज! असा जो नित्यज्ञानस्वरूप आत्मा तोच मी आहे.''

***घनच्छन्नदृष्टिर्घनच्छन्नमर्कं,***
***यथा निष्प्रभं मन्यते चातिमूढ: ।***
***तथा बद्धवद्भाति यो मूढदृष्टे:,***
***स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।१२।।***

मनुष्याचे दृष्टिमंडल मेघमंडळाने आच्छदित झालेले असते, त्यामुळे त्याला सूर्य दिसत नाही; पण मनुष्य मात्र असे समजतो की, मेघमंडळाने सूर्यमंडळच झाकून गेले आहे! वस्तुत: मेघमंडळापेक्षा सूर्यमंडळ कितीतरी पटींनी मोठे असते. ते मेघमंडळाने कसे बरे झाकले जाणार? पण हे त्या मूढदृष्टी असलेल्या मनुष्याला कळत नाही. तो भ्रांत असतो. तो ढगाने सूर्य झाकला गेला असेच समजतो. सूर्य स्वभावत: प्रकाशस्वरूप असूनही तो निष्प्रभ झाला, निस्तेज झाला असेच समजतो.

त्याचप्रमाणे आत्मा हा नित्यमुक्त, निर्मल, स्वयंप्रकाश आणि चित्स्वरूप असूनही अविवेकी मूढ मनुष्याला तो बद्ध, मलिन व जडस्वरूप भासतो; कारण, त्याच्या बुद्धीला अविद्येने पछाडलेले असते. अज्ञानामुळे तो बुद्धीलाच 'आत्मा' समजतो आणि बुद्धीचे धर्म जे सुख-दु:ख, दैन्य व शोक इत्यादी ते सर्व आत्म्याचे ठिकाणी मानतो. वस्तुत: आत्म्याचे ठिकाणी या कोणत्याही धर्माचा, तिळमात्रही संबंध नाही. 'आत्मा' हा नित्यज्ञानस्वरूप आहे आणि महाराज! तोच आत्मा मी आहे.

***समस्तेषु वस्तुष्वनुस्यूतमेकं,***
***समस्तानि वस्तूनि यन्न स्पृशन्ति ।***
***वियद्वत्सदा शुद्धमच्छस्वरूपं,***
***स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ।।१३।।***

जे तत्त्व सर्व वस्तूंमध्ये एकच एक गोवले गेलेले आहे; सर्वत्र ओतप्रोत भरलेले आहे, असे असूनही जगतातील कोणतीही वस्तू त्याला स्पर्श करू शकत नाही. जगतातील कोणत्याही पदार्थाने त्याचे साकल्याने आकलन होऊ शकत नाही. जे तत्त्व आकाशाप्रमाणे सदा- सर्वकाळ शुद्ध व स्वच्छ आहे, त्यालाच नित्यज्ञानस्वरूप 'आत्मा' म्हणतात व तोच मी आहे; मी दुसरा कोणीही नव्हे, हे खास.

(तत्त्वत: या ठिकाणी हे स्तोत्र पूर्णावले- संपले आहे, तरी चौदाव्या श्लोकाने विश्वव्यापक व आत्मस्वरूप, अशा श्रीविष्णूची स्तुती केली आहे. वाचक व अभ्यासक अशांच्या जिज्ञासेकरिता तो श्लोक व त्याचा सरलार्थ पुढे देत आहोत.)

***उपाधौ यथा भेदता सन्मणीनां,***
***तथा भेदता बुद्धिभेदेषु तेऽपि ।***
***यथा चन्द्रिकाणां जले चञ्चलत्त्वं,***
***तथा चञ्चलत्त्वं तवापीह विष्णो! ।।१४।।***

ज्याप्रमाणे प्रतिबिंबांना व्यक्त करणारे आरसे किंवा मणि म्हणजे रत्ने ही अनेक असतात, अनेकता हा उपाधींचा धर्म आहे. त्यात प्रतिबिंबित होणारे बिंब म्हणजे तत्त्व, हे एकच असते; त्याचप्रमाणे सिद्धान्तामध्ये उपाधिभूत बुद्धी म्हणजे अंत:करणेही अनेक असतात, पण भिन्न भिन्न अंत:करणामध्ये प्रतिबिंबित होणारे चित्- आत्मतत्त्व, हे मात्र एकच आहे.

हे विष्णो! विश्वव्यापी अनंता!! हे परमेश्वरा !!! ते आत्मतत्त्व म्हणजे तूच आहेस. या जगतात सर्वत्र, सदा- सम- सर्वस्वरूपाने सर्वकाळ तूच तू विराजमान आहेस. तुझ्याशिवाय दुसरे यत् किंचितही नाही.

ज्याप्रमाणे जलांत प्रतिबिंबित झालेल्या चंद्रिकेच्या ठिकाणी दिसणारे चंचलत्त्व, हे त्या चंद्रिकेचे नसून ते जलाचे असते; त्याचप्रमाणे हे परमेश्वरा! उपाधीमुळे तुझ्या ठिकाणी प्रतीतीला येणारे गुणधर्म तत्त्वत: तुझे नसून ते उपाधीचेच आहेत.

तू मात्र सर्वोपाधिविनिर्मुक्त, निर्गुण, निराकार, निर्विकार, सकल- संसार, धर्म-विरहित, शुद्ध, अखंड, अनंत, सच्चिदानंद घन, नित्यज्ञानस्वरूप, स्वयंप्रकाश, परिपूर्ण परब्रह्मच आहेस. सारांश, तुझ्याशिवाय दुसरे काही नाही, असे म्हटल्यानंतर मी देखील तूच म्हणजे परिपूर्ण परब्रह्मच आहे, असा अर्थ झाला.

याप्रमाणे **'कस्त्वम्'** या पहिल्या प्रश्नाच्या उत्तरांतच बाकीच्या प्रश्नांची उत्तरे सामावली असल्यामुळे, बाकीच्या प्रश्नांना निराळे उत्तर देण्याची आवश्यकता राहत नाही. माता-पिता, जन्म-मृत्यू, जाणे-येणे इत्यादी कोणत्याही गोष्टी परिपूर्ण परब्रह्माचे ठिकाणी संभवतच नाहीत. ''एकमेवाद्वितीयम् ब्रह्म, नेह नानास्ति किंचन!'' हा श्रुतिसिद्धान्त निर्बाध आहे हेच खरे!!

**- श्री. किसन महाराज साखरे**
साधकाश्रम- आळंदी देवाची, जि. पुणे.
फोन नं. : ९८५०८८१०१८

# आदि शंकराचार्य व महाराष्ट्रीय भक्ति परंपरा

**- स्वामी गोविंददेवगिरि**

*एम.ए.तत्त्वज्ञान. काशीची आचार्य पदवी. थोर राष्ट्रसंत. भारतभर रामकथा व भागवतकथा प्रवचन. कॅनडात श्री ज्ञानेश्वर गुरुकुलाची स्थापना. भारतात अनेक ठिकाणी वेदव्यास-प्रतिष्ठानतर्फे गुरुकुल विद्यालयांची स्थापना. वेदविद्येचा प्रसार हेच जीवन.*

गेली अडीच हजार वर्षे भारतीय तत्त्वज्ञान, अध्यात्मविचार व सांप्रदायिक परंपरा या तिन्ही दृष्टींनी अखंड अधिराज्य गाजवीत असलेले भगवान आदिशंकराचार्य म्हणजे वैदिक संस्कृतीला लागलेले ग्रहण संपवून टाकून पुन: तेजाने तिला तळपण्यास उपयुक्त ठरलेले सर्वाधिक पुरुषार्थी महापुरुष होत. आचार्यांचा जीवनपट बघता त्यांचे संपूर्ण कार्य केवळ अलौकिक वाटावे असे आहे.

***अष्टमे चतुरो वेदा द्वादशे सर्वशास्त्रवित्***
***षोडशे कृतवान् भाष्यम् द्वात्रिंशे मुनिरभ्यगात् ।।***

केरळच्या नंबुद्रिब्राह्मण वंशात, पूर्णा नदीच्या तीरावरील कालाडी या गावात जन्माला आलेल्या या महान् पुरुषाने वयाच्या आठव्या वर्षी चारही वेदांचा अभ्यास पूर्ण केला. बाराव्या वर्षापर्यंत सर्व शास्त्रांचा अभ्यास संपविला, ब्रह्मसूत्रांवरील अजोड असे शारीरक भाष्य वयाच्या सोळाव्या वर्षी लिहिले आणि पुढील सोळा वर्षे आसेतुहिमाचल धर्मप्रचार करून वयाच्या केवळ तिसाव्या वर्षी हा महात्मा समाधिस्थ झाला.

आचार्यांच्या जन्मशतकाबद्दल मतभेद असले तरी वरील जीवनपटाबद्दल एकूण एक विद्वानांचे एकमत आहे. त्यांच्या जन्मशतकाचा काळ इ.स. आठवे शतक नसून इ.स. पूर्व पाचवे शतक आहे हे आता सर्व पुराव्यानिशी सिद्ध झाले आहे. उपनिषत्तीर्थ पं. द. वा. जोग यांनी अभ्यासांती काढलेला निष्कर्ष फार महत्त्वाचा आहे ते म्हणतात,

''कांचीकामकोटी आणि द्वारकामठ यांच्या आचार्य परंपरेवरून आचार्यांचा काळ ख्रि.पू. पाचवे शतक येतो. ज्या दोन शांकरदिग्विजयावरून वै. शु. १० शके ७१० हा काल ठरतो, त्यातील कालविपर्यास व व्यक्तिविपर्यास झालेला आढळतो. याला कारण कामकोटीपीठावरील ३८ वे आचार्य धीरशंकरेंद्रसरस्वती ज्यांना अभिनव शंकराचार्य म्हणत असत, त्यांचे जीवनचरित्र आचार्यांप्रमाणे असल्यामुळे दोन आचार्यांची गल्लत झाली आहे. धीरशंकरेंद्रसरस्वतींनी ग्रंथ लेखन केले नाही, त्यांनी धर्मप्रचाराचे कार्य केले. भारतभर दौरा काढला. त्यांना दीर्घायुष्य प्राप्त झाले होते व शेवटी त्यांनी हिमालयात गुहाप्रवेश केला. आद्य शंकराचार्यांनी ख्रि. पू. ४७७ वैशाखी पौर्णिमेला कामाक्षी देवीसमोर योगासन मांडून आचार्य अनंतात विलीन झाले. के. टी. एस. नारायणशास्त्री हे ख्रि. पू. ५०९ ते ४७७ हा आचार्यांचा जीवनकाल ठरवितात. श्री. ए. एस. नटराज अय्यर व श्री. नरसिंहशास्त्री यांनी सर्व पीठातील कागदपत्रे आधारास घेऊन वरील कालनिर्णयास दुजोरा दिला आहे. प्रा. वा. रा. अंतरकर यांनी एकंदर अठरा शांकरदिग्विजय विचारांत घेऊन वरीलप्रमाणे मान्य केले आहे. विजयवाड्याचे पं. कोटावेंकटाचलम् यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक नेपाळच्या इतिहासातील कालगणनेची फेररचना करून आचार्यांचा नेपाळ भेटीचा काळ ख्रि. पू. ४८८ ते ४८७ असा ठरविला आहे. आचार्यांनी प्रथम पश्चिम, मग उत्तर, नंतर पूर्व आणि शेवटी दक्षिण अशी पदयात्रा केली असून शेवटची वर्षे त्यांनी दक्षिणेत घालविली. द्वारकेला पहिला शारदामठ ख्रि. पू. ४९० मध्ये स्थापिला. आचार्यांनी वृषभदेवाच्या कारकीर्दीत नेपाळला भेट दिली. आचार्यांच्या स्मृत्यर्थ मुलाचे नाव शंकरदेव ठेविले. राजघराण्यातील वंशावळीवरून या भेटीचा काळ ख्रि. पू. ४८८ असा ठरतो. बदरीकेदार येथे ज्योतीर्मठाची स्थापना त्याच वेळेला केली.'' (श्री गौडपादीय कारिका भाष्यार्थ प्रकाश) या संदर्भात स्वामी ज्ञानानंद सरस्वती यांनी नुकतेच लिहिलेले 'आदि शंकर लाईफ अँड फिलॉसॉफी' (नीता प्रकाशन, दिल्ली) हा संशोधन ग्रंथ अत्यंत वाचनीय आहे. इ.स. २००६ पर्यंत प्रकाशित झालेल्या सर्व ग्रंथांचा ऊहापोह करून त्यांनी आदि शंकराचार्यांचे जन्मवर्ष इ.स. पूर्व ५०९ हेच निर्णायक पद्धतीने सिद्ध केले आहे.

त्यांचा जन्म केरळमध्ये झाला, संन्यास दीक्षा मध्यप्रदेशात ओंकारेश्वराला झाली, भाष्यलेखन हिमालयात केले व त्यांच्या

कार्याचा आरंभ कुमारिल भट्टांच्या भेटीनंतर झाला. दशोपनिषद् भाष्य, ब्रह्मसूत्रभाष्य व गीताभाष्य यांच्यामधून त्यांनी श्रुतिप्रणीत अद्वैतमताचा डिंडिम जगास ऐकविला आणि बौद्ध तत्त्वज्ञानाने व्याप्त झालेल्या भारतीय जनजीवनावर पुन: वेदश्रद्धेचा ठसा उमटविला. वस्तुत: आचार्यांना दोन मोहऱ्यांवर झुंजावे लागले. एकीकडे बौद्ध विचारांनी वेदश्रद्धा बव्हंशी संपुष्टात आणली होती, त्यांना तर्काने उत्तरे देणे आवश्यक होते तर दुसरीकडे आचार्यांचे पूर्वसूरि कुमारिलभट्ट यांनी बौद्ध मतावर विजय मिळविला खरा, पण समाजावर पूर्वमीमांसा म्हणजे कर्मकांडांचा पगडा बसविला. त्यांनाही शह देणे आचार्यांना आवश्यक ठरले. अशाप्रकारे एकीकडे नास्तिक बौद्धविचार तर दुसरीकडे केवळ कर्मकांडी वेदविचार या दोन्हींना मागे सारून आचार्यांना मांडावयाचा होता तो ज्ञानप्रधान शुद्ध वैदिक विचार!

सांस्कृतिक दृष्टीने वरील दोन विचारप्रवाहांना खंडित करणे जसे आवश्यक होते तसे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने प्रधानमल्ल म्हणजे मुख्य प्रतिस्पर्धी म्हणून सांख्य विचारांचेही खंडन परमावश्यक होते. ते आचार्यांनी अद्‌भुत तर्काने लीलया करून दाखविले. याखेरीजही शुद्ध वैदिक विचारांच्या प्रतिष्ठापनेसाठी त्यांना जैन, शैव, शाक्त, कापालिक आदि अनेक मतांचे खंडन करावे लागले. पण वरील तिघांच्या तुलनेत हे कार्य तसे सोपे होते. मतामतांच्या गलबल्यामधून समाजमानसाला बाहेर काढून अत्यंत उदात्त व व्यापक शुद्ध वैदिक विचार प्रवाहात आणण्याचे महान कार्य आचार्यांनी विपुल लेखन, विविध शास्त्रार्थ, अखंड प्रवास व समन्वयाचा दृष्टिकोन यांच्या बळावर साध्य केले.

या त्यांच्या संपूर्ण सांस्कृतिक व वैचारिक कार्याचा सर्वात मोठा प्रभाव गेली अडीच हजार वर्षे भारतातल्या सर्व प्रांतातील संत महात्मे, विचारवंत आणि सामान्य जनता यांच्यावर पडलेला दिसतो. पण अभ्यासांती एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती अशी की त्यांच्या विचारांचा सर्वात अधिक वारसा महाराष्ट्र भूमीतील संतांनी पुढे चालविला. आपल्या देशातील प्रत्येक प्रांतात विविध संप्रदायांचे अनेक संत प्रत्येक शतकात कमी-अधिक प्रमाणात झालेले दिसतात. या सर्व संतांनी भगवंताची भक्ती हाच परमार्थाचा राजमार्ग सांगितल्याचेही आढळते. आश्चर्य म्हणजे सगुणवादी संतांनी तर भक्तिमार्ग सांगितलाच पण निर्गुणवादी संत कबीरांसारख्यांनी भक्तिमार्गच प्रतिष्ठापिला. भगवंताचे नाम हा सगुणवादी व निर्गुणवादी दोन्ही प्रकारच्या संतांना जोडणारा दुवा ठरला व नामसाधनाप्रधान प्रेमलक्षणाभक्ती ही सर्व संतांच्या प्रतिपादनाचे अविभाज्य अंग ठरली. असे सर्वत्र आढळत असले तरी महाराष्ट्रीय संतांची बात थोडी वेगळी आहे. महाराष्ट्राबाहेरील सामान्यत: सर्वच संतांनी भक्तिमार्गासाठी द्वैताची आवश्यकता मानली आणि आत्मभिन्न परमात्म्याशी प्रेमलक्षणभक्तीने सलगी केली. पण संतसम्राट श्री ज्ञानेश्वर महाराजांपासून संतश्री गुलाबराव महाराजांपर्यंत महाराष्ट्रामध्ये प्रवाहित असलेली भक्तिपरंपरा मात्र आदि शंकराचार्यांच्या अद्वैत अधिष्ठानावर ठामपणे उभी असलेली दिसते.

संतश्री ज्ञानेश्वर महाराजांचे तत्त्वज्ञान परंपरेनुसार शंकराचार्य मतानुयायीच मानले गेले. पण मागील शतकापासून ज्ञानेश्वरमहाराज आपल्या तात्त्विक विचारात शंकराचार्यांचे अनुसरण करीत नसून ते काश्मिरी शैव सिद्धांताचे पुरस्कर्ते आहेत असा किंवा आचार्यांप्रमाणे ज्ञानेश्वरमहाराज जग मिथ्या मानत नाहीत, सत्यच मानतात म्हणून माऊलींचे तत्त्वज्ञान आचार्यांपासून वेगळे आहे, म्हणजे आचार्य मायावादी तर ज्ञानेश्वरमहाराज चिद्‌विलासवादी आहेत असे अट्टाहासाने मांडण्याचा प्रयत्न दशकानुदशके शतकभर चालत राहिला, आणि त्यासाठी

*तैसा व्यासाचा मागोवा घेतु ।*
*भाष्यकारातें वाट पुसतु ।*
*अयोग्यही मी न पवतु ।*
*कें जाईन ?*

या ज्ञानदेवांच्या ओवीतील 'भाष्यकार' कोण, आदि शंकराचार्य की अभिनव गुप्तादि अन्य कोणी, भाष्यकार एक की अनेक याचा निर्णय करण्यासाठी शब्दातील अनुस्वारावर प्रचंड भर देऊन पुष्कळ लिहिले, बोलले व छापले गेले. हे सर्व करण्यात पं. बाळशास्त्री हुपरीकर, प्रो. बनहट्टी, पंडित पांडुरंग शर्मा, डॉ. भा. पं. बहिरट इत्यादि अनेक महानुभावांनी हिरीरीने भाग घेतला. यातील काहींना खरोखरीच प्रामाणिकपणे आचार्यांचे व माऊलींचे तत्त्वज्ञान यात अंतर दिसले असावे आणि त्यामुळे त्यांनी दोघांच्या विचारात तफावत असल्याचा सिद्धांत पुढे आणण्याचा प्रयत्न केला हे खरे आहे. पण या दिशेने चालणारे असेही महाभाग आहेत ज्यांनी तत्त्वविश्लेषणात्मक आशयापेक्षा महाराष्ट्र भक्तिपरंपरेची नाळ भगवान आदि शंकराचार्यांपासून तोडावी, हा आंतरिक हेतू ठेवून मग त्या दिशेने प्रमाणे शोधण्याचा व पुढे रेटण्याचा प्रयत्न सतत चालू ठेवला.

या प्रयत्नाचा एक भाग असाही होता की ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि चांगदेव पासष्टी या ग्रंथांतील विचारात तफावत असल्यामुळे या तीनही ग्रंथांचे कर्ते एक ज्ञानेश्वरमहाराज नसून किमान दोन ज्ञानेश्वरनामक व्यक्तींनी हे ग्रंथ प्रतिपादिले आहेत हे सिद्ध करता यावे. अशाप्रकारे महाराष्ट्रातील भक्तिपरंपरेच्या आधारस्थानी

असलेल्या श्रीज्ञानेश्वरमाऊलींनाच आचार्यांपासून वेगळे केले की या संपूर्ण भक्तिपरंपरेचा शंकराचार्यांशी संबंधच रहात नाही हे आपोआपच निश्चित होते.

सुदैवाने ज्ञानेश्वरमहाराज आचार्यांचे अनुसरण करीत नाहीत किंवा ज्ञानेश्वर नावाच्या एकापेक्षा अधिक व्यक्तींनी ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व चांगदेव पासष्टी हे ग्रंथ लिहिले आहेत या अपसिद्धांतांचे पूर्ण खंडन संत श्री गुलाबराव महाराज, त्यांचे उत्तराधिकारी पू. बाबाजी महाराज पंडित, श्री. ल. रा. पांगारकर, गुरुदेव रानडे, श्री. निसाळशास्त्री, डॉ. शं. दा. पेंडसे आणि डॉ. वा. ना. पंडित आदि विद्वानांनी अत्यंत समर्थपणे केले. संत श्री गुलाबराव महाराज यांचे या संदर्भातील सडेतोड प्रतिपादन नि:संशय करणारे आहे. ते म्हणतात, ''आम्हां वारकरी लोकांना स्तन्य देणारे जरी प्रत्यक्षात तात (ज्ञानेश्वर) आहेत तरी वंशप्रचारक शंकराचार्य आहेत. उपनिषद् बीजपुरुष आणि वसिष्ठ अंकुरपुरुष आहेत या चौकडीच्या अद्वैतात कोठे भेद नाही.'' (मुमुक्षु १६ जुलै १९१४) याचा सरळ अर्थ वेदान्त तत्त्वज्ञान आदि शंकराचार्यांचे तत्त्वज्ञान व श्री. ज्ञानेश्वर महाराजांचे तत्त्वज्ञान अगदी एकरस आहे असा होतो. डॉ. शं. दा. पेंडसे यांनी तर पू. मामासाहेब दांडेकर यांनी ज्ञानेश्वर महाराज व शंकराचार्य यांच्यात दाखवलेला थोडासा भेदसुद्धा खोडून काढला आहे. ते म्हणतात,

''प्रो. दांडेकर यांनी ज्ञानेश्वर दर्शनांतील अध्यात्मखंडात लिहिलेल्या ''ज्ञानेश्वरमहाराजांचे तत्त्वज्ञान'' या लेखात शंकर हे ''केवलाद्वैती होते'' आणि ज्ञानेश्वर हे ''पूर्णाद्वैती'' होते असा जो भेद काढला आहे (पान १०) तो खरा नाही. तसेच शंकराचार्य हे व्यतिरेकी मार्गावर व अध्यस्त निरासावर जोर देणारे असल्यामुळे त्यांचे ब्रह्म पुष्कळांना शून्याच्या जवळजवळ आहे असे वाटते व कित्येक तर त्यांच्यावर प्रच्छन्न बौद्धत्वाचाही आरोप करितात. उलट ज्ञानदेव हे संकलनपद्धती जवळ येणाऱ्या अन्वयावर जोर देणारे असल्यामुळे त्यांना सर्वसामान्य आत्मा हा शून्य केव्हाच होत नाही हे त्यांचे विधानही (पान १६) बरोबर नाही हे वरील विवेचनावरून लक्षात येईल. वस्तुस्थिती उलट आहे. शंकराचार्य हा शून्य शब्द किंवा बौद्धांची परिभाषा मुद्दाम टाळतात तर उलट ज्ञानेश्वर ''सर्वशून्याचा निष्कर्ष'' म्हणण्यास भीत नाहीत. शांकर आणि ज्ञानेशांचे अद्वैत एकच आहे. मग त्यांना केवलाद्वैती म्हणा किंवा पूर्णाद्वैती म्हणा. ज्ञानेश्वर मायावाद मानीत नाहीत हे त्यांचे म्हणणेही बरोबर नाही हे मागेच दाखविले आहे.'' (श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान पृष्ठ ४६८) श्री. शं. दा. पेंडसे यांनी श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान या अजोड ग्रंथात सर्व मतांची सूक्ष्म मीमांसा सुमारे ४५० पृष्ठात करून जो निष्कर्ष काढला तो फारच बोलका आहे. ते म्हणतात,

''काश्मीरी शैवाद्वैत शंकराचार्यांच्या अद्वैतापेक्षा भिन्न नाही. आत्मख्यातीने ते अद्वैत सिद्ध करितात तर शंकर अनिर्वचनीय ख्यातीने करतात एवढाच भेद आहे. ज्ञानेशांचे तत्त्वज्ञान शांकर-तत्त्वज्ञानाप्रमाणेच अद्वैतवादी आहे. हे अद्वैत सिद्ध करण्याकरिता ज्ञानेशांनी शंकरांच्या अनिर्वचनीय मायावादाचा किंवा अज्ञानवादाचा उपयोग केला आहेच. पण त्याशिवाय गौडपादकारिका, योगवासिष्ठ, शैवाद्वैत आणि नाथपंथ यांत अद्वैतसिद्धीकरिता योजलेले युक्तिवादही ज्ञानेशांनी घेतले आहेत. त्यामुळे ज्ञानेशांचे निर्गुण, निर्विशेष, अद्वैत तत्त्वज्ञान एका बाजूने शून्यवादी आणि मायावादी तर दुसऱ्या बाजूने विज्ञानवादी, दृष्टिसृष्टिवादी आणि स्फूर्तिवादी बनले आहे व आत्मख्याति आणि अनिर्वचनीय ख्याति किंवा अन्वय आणि व्यतिरेक या दोन्ही प्रकारच्या विवेचन पद्धतींचा त्यांनी उपयोग केला आहे. शंकरांपेक्षा अधिक युक्तिवाद योजिल्यामुळे शंकरांपेक्षा ज्ञानेशांचे तत्त्वज्ञान भिन्न होऊ शकत नाही. वेदांतांतील अद्वैत संप्रदायांशिवाय विशिष्टाद्वैती, शुद्धाद्वैती किवा द्वैताद्वैती यापैकी कोणत्याही संप्रदायाला ज्ञानेश्वर अनुसरलेले नाहीत. ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान म्हणजे वेदांतांतील अनेक मतांची खिचडी नाही. सर्व रीतीच्या युक्तिवादांनी एकाच अद्वैताचेच प्रतिपादन त्यांच्या तत्त्वज्ञानात केले आहे. ज्ञानेश्वरांच्या सर्व ग्रंथात एकच तत्त्वज्ञान प्रतिपादिले आहे. कोठे अन्वय प्रकारावर भर आहे तर कोठे व्यतिरेकावर भर आहे. ज्ञानेश्वर हे केवळ भाषांतरकार नाहीत. गीतेचे अनेक ठिकाणी त्यांनी स्वतंत्र अर्थ केले आहेत. शिवाय तत्त्वज्ञानामधील नवीनता ही तत्त्वांपेक्षा तत्त्वप्रतिपादनाच्या शैलीमध्ये असते ज्ञानेश्वरांच्या प्रतिपादन शैलीची ही नवीनता किंवा अपूर्वता त्यांच्या सर्व ग्रंथात दिसून येते. ते स्वत: साक्षात्कारी योगी होते. म्हणून वसिष्ठ, याज्ञवल्क्य, अश्वघोष, गौडपाद, शंकराचार्य इत्यादि अद्वैत संप्रदायांतील महर्षींच्या पंक्तीत सन्मानाने बसविण्याइतकी ज्ञानेशांची योग्यता आहे.''

महाराष्ट्रातील संत एकनाथ महाराज, संत नामदेव महाराज, संत तुकाराम महाराज, संत निळोबाराय आदि सर्व संतमंडळी ज्ञानेश्वर माऊलींचे पूर्ण अनुसरण करीत असल्यामुळे आचार्यांच्या विचारांशी ज्ञानेश्वर महाराज पूर्ण सहमत आहेत हे सिद्ध झाल्यावर वरील सर्व संत मंडळी आचार्यांच्या विचारांनाच अनुसरते हे ओघानेच येते. श्री समर्थ रामदास स्वामी व संपूर्ण दत्त संप्रदायसुद्धा आदि शंकराचार्यांना अनुसरणारे आहेत. यानुसार महाराष्ट्रातील वारकरी, समर्थ व दत्त हे तीनही भक्ति संप्रदाय आदि शंकराचार्यांना पूर्णपणे अनुसरतात असेच म्हणावे लागते. या संदर्भात आणखी पुष्कळ

लिहिणे आवश्यक आहे पण वेळेअभावी माझ्या चिंतनाचे केवळ निष्कर्ष पुढे देत आहे. त्याने आचार्यांबद्दलचे अनेक भ्रम दूर होतील अशी आशा बाळगतो.

१) आदि शंकराचार्यांचा कार्यकाल इसवी सनाचे ८ वे शतक नसून इ.स. पूर्व ५ वे शतक हाच आहे.

२) आचार्यांनी आपल्या ४ प्रमुख शिष्यांसाठी शृंगेरी, द्वारका, बदरीनाथ व जगन्नाथपुरी या ठिकाणी ४ पीठे स्थापन केली व स्वत:साठी कांचीपीठ ठेवून तेथे निवास केला.

३) आदि शंकराचार्यांचे अद्वैतमत व महाराष्ट्रातील वारकरी संप्रदाय, समर्थ संप्रदाय व दत्त संप्रदाय या तिघांमधील अद्वैतमत पूर्णपणे एकच आहे.

४) बौद्धमताच्या खंडणासाठी आचार्यांनी ज्ञान पक्षावर भर दिला असला तरी ते स्वत: भगवत् साक्षात्कार संपन्न भक्त होते व ज्ञानोत्तर भक्ति त्यांना पूर्णपणे मान्य आहे.

५) ज्ञानोत्तर अवस्थेत ते मायेचे अस्तित्व मानीत नसल्यामुळे त्यांना केवळ मायावादी म्हणता येत नाही. ज्ञानोत्तर अवस्थेत ते ज्ञानेश्वर माऊलींप्रमाणे चिद्‌विलासवादीच आहेत.

६) ज्ञानपूर्व अवस्थेत जितक्या प्रमाणात माया आचार्यांनी मानली तितक्याच प्रमाणात श्रीज्ञानेश्वरादि सर्व संतांनीही मानली आहे.

७) आचार्यांची व संतांची भक्तिविषयक धारणा एकच असून ती अद्वैतावर ठामपणे उभी आहे.

८) भगवंताचे सगुण रूप आचार्यांनी मिथ्या मानले नसून संतश्री गुलाबराव महाराजांनी म्हटल्याप्रमाणे अनध्यस्त विवर्तरूप मानले आहे.

९) प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण अशा दोन वैदिकधर्म परंपरा त्यांनी मानलेल्या असल्यामुळे प्रपंचाशी त्यांचा पूर्ण अविरोध आहे.

१०) भगवंताची सगुण, निर्गुण ही दोन्ही रूपे त्यांच्या दृष्टीने समान आहेत.

११) महाराष्ट्रातील भक्तिपरंपरेची अन्य कुठल्याही आचार्यांशी इतकी जवळीक नाही.

**– स्वामी गोविंददेवगिरि**
'धर्मश्री' मानसर अपार्टमेंट, विद्यापीठ रस्ता,
पुणे ४११०१६.

# वेदान्ताच्या उंबरठ्यावर

**श्री. विघ्नहरि महाराज देव**

*एम.ए. न्यायशास्त्र,एम.ए. वेदान्त, बी.एड., प्राध्यापक. प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष. चिंचवड देवस्थानचे अध्यक्ष. हॅम्लेट नाटकाचा संस्कृत अनुवाद. दीपदान (हिंदी)- संस्कृत अनुवाद*

दर्शन या शब्दाचा ढोबळपणे शास्त्र असा अर्थ करायला हरकत नाही. भारतीय तत्त्वज्ञानात अनेक दर्शने आहेत. प्रामुख्याने सहा नास्तिक आणि सहा आस्तिक दर्शने आहेत. जैन एक, वैभाषिक, सौत्रान्तिक, योगाचार आणि माध्यमिक अशी, बौद्ध चार आणि चार्वाक एक अशी सहा नास्तिक दर्शने आणि सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा आणि वेदान्त अशी सहा आस्तिक दर्शने आहेत. अस्ति असे जे म्हणतात, ते आस्तिक आणि नास्ति असे जे म्हणतात ते नास्तिक. ईश्वर: अस्ति असे मानणारे आस्तिक आणि ईश्वर: नास्ति असे मानणारे नास्तिक, असा सर्वसाधारण समज आहे. पण तो बरोबर नाही. वेद: प्रमाणम् अस्ति असे मानणारे आस्तिक आणि वेद: प्रमाणम् नास्ति असे मानणारे नास्तिक असा खरा विभाग आहे. वेदप्रामाण्य मानणारे सांख्य, मीमांसक हे ईश्वर मानत नाहीत. पण त्यामुळे त्यांच्या आस्तिकतेला बाध येत नाही.

सर्व दर्शनांचे प्रमाण विचार आणि प्रमेय विचार असे भाग असतात. प्रमाण हा शब्द व्यवहारात पुरावा या अर्थाने रूढ आहे. एखाद्याने काही विधान केले की, दुसरा विचारतो, याला प्रमाण काय? त्याला म्हणावयाचे असते की तुझ्या विधानाला पुरावा काय? पण शास्त्रात प्रमाण याचा अर्थ थोडा वेगळा आहे. प्र + मा या धातूपासून प्रमा असा शब्द तयार होतो. त्याचा अर्थ खरे ज्ञान किंवा यथार्थ ज्ञान असा होतो. ज्ञानात जे भासते त्याला अर्थ किंवा विषय म्हणतात. हा घट आहे या ज्ञानात घट भासतो म्हणून तो अर्थ किंवा विषय आहे. सर्पज्ञानात सर्प हा अर्थ किंवा विषय आहे. तो सर्प जर खरा असेल तर ते ज्ञान यथार्थ होते किंवा प्रमा होते. पण दोरी आहे आणि सर्प भासायला लागला, तर ते ज्ञान अयथार्थ किंवा अप्रमा ठरते. तो भ्रम असतो. वस्तुत: रजत आहे आणि 'रजत' असे ज्ञान झाले, तर ती प्रमा आणि वस्तुत: शिंप आहे आणि 'रजत' असे ज्ञान झाले तर ती अप्रमा किंवा भ्रम. यालाच विपर्यय असेही म्हणतात. शुक्ति का रजत, रज्जु का सर्प असा संशय यायला लागला तर त्याला अप्रमा (संशय) म्हणतात. प्रमेचे साधन म्हणजे प्रमाण. डोळा हे प्रमेचे साधन किंवा करण आहे म्हणून त्याला प्रमाण म्हणतात. डोळ्याने रंग दिसतो आणि ज्याला रंग आहे अशी वस्तू दिसते. रंगालाच शास्त्रात रूप म्हणतात. व्यवहारात आपण रूप म्हणजे आकार असे समजतो. पण ते तितकेसे बरोबर नाही. अगदी सुंदर आकाराची वस्तू बनवली आणि तिला कोणताच रंग दिला नाही, तर ती डोळ्याला अजिबात दिसणार नाही. म्हणून रूप म्हणजे रंग. रूप हा डोळ्याचा विषय आहे; त्याचप्रमाणे रूपवान पदार्थ हाही डोळ्याचा विषय आहे. आवाज हा कानाचा विषय आहे. कठीण, मऊ स्पर्श हा त्वचेचा विषय आहे. गोड, कडू, तिखट हे जिभेचे किंवा रसनेचे विषय आहेत. सुगंध, दुर्गंध हे घ्राणेन्द्रियाचे म्हणजे नाकाचे विषय आहेत. चक्षू, श्रोत्र, त्वचा, रसना, घ्राण ही इंद्रिये आहेत आणि त्यांना कळणारे रूप, शब्द, स्पर्श, रस, गंध हे विषय आहेत. चक्षुरादि इंद्रियांना प्रमाण म्हणतात किंवा प्रत्यक्ष प्रमाण म्हणतात, त्यातून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानाला प्रत्यक्ष प्रमा किंवा प्रमिति म्हणतात आणि त्यात कळणाऱ्या विषयांना प्रमेय म्हणतात.

मन हे सर्व ज्ञानांचे साधारण कारण आहे. मन विषयाकडे गेले नाही तर कोणतेच ज्ञान होत नाही. एक इषुकार बाणाला धार लावत होता. शेजारून राजाची मिरवणूक गेली. इषुकार आपल्या कामात इतका रंगून गेला होता की त्याला मिरवणुकीची जाणीवच झाली नाही. तो म्हणाला, 'अन्यत्रमना अभूवम्, न किंचिद् अद्राक्षम्; अन्यत्रमना अभूवम्, न किंचिद् अश्रौषम्।'

दूर डोंगरावर धूर दिसतो, धूर असेल तेथे आग असते. हे व्यवहारात खूप वेळा पाहिलेले असते, पर्वतावर धूर आहे, त्या अर्थी आग असली पाहिजे असे ज्ञान होते, ती अनुमिति, आणि धूर आणि आग यांचे साहचर्यज्ञान म्हणजे व्याप्तिज्ञान, हे अनुमान प्रमाण.

एखादा माणूस गवा गायीसारखा असतो, असे ऐकून असतो, अरण्यात त्याला तसा प्राणी दिसतो, गायीसारखा गवा असतो, हे सादृश्यज्ञान सांगणारे वाक्य आठवतो आणि हा गवय आहे अशी त्याची खात्री पटते. या ज्ञानाला उपमिति म्हणतात, सादृश्यज्ञानाला उपमान प्रमाण म्हणतात.

एखादा माणूस कोणी उच्चारलेले वाक्य ऐकतो किंवा

लिहिलेले वाचतो, ते शब्द प्रमाण आणि त्यापासून उत्पन्न झालेले ज्ञान म्हणजे शाब्द ज्ञान किंवा शाब्दी प्रमा.

याशिवाय इतरही काही प्रमाणे शास्त्रकारांनी मानली आहेत. एखादा माणूस दिवसभर काही खात नाही आणि तरी त्याच्या गलेलठ्ठपणात कमतरता झालेली दिसत नाही, अशावेळी रात्रीच्या वेळी जेवण केल्याशिवाय त्याच्या लठ्ठपणाची उपपत्ति लागत नाही, म्हणून तो रात्री जेवत असला पाहिजे, असे जे ज्ञान होते ते अर्थापत्ति प्रमाणाने होते. जमिनीवर घट असला, तर दिसला असता, ज्या अर्थी दिसत नाही त्या अर्थी तो नाही असे जे ज्ञान होते ते अनुपलब्धि प्रमाणाने होते. मात्र ती वस्तू दिसायला, स्पर्शाला, ऐकायला योग्य असावी लागते, त्याला योग्यानुपलब्धि असे म्हणतात. उपलब्धि म्हणजे ज्ञान. त्याचा अभाव म्हणजे अनुपलब्धि प्रमाण; त्यामुळे विषयाचा अभाव कळतो. एखादे वेळी एखादी प्रिय व्यक्ती भेटणार असे सारखे वाटत असते आणि खरोखरच ती व्यक्ती भेटते. त्या वाटण्याला प्रतिभा म्हणतात आणि त्यापासून झालेल्या ज्ञानाला प्रातिभ ज्ञान म्हणतात.

इतकी सामान्य माहिती झाल्यावर वेदान्ताबद्दल काही प्राथमिक माहिती असणे आवश्यक आहे. वेद किंवा श्रुति म्हणजे संहिता, ब्राह्मण, आरण्यक आणि उपनिषद्. यातला शेवटचा भाग म्हणजे उपनिषद. म्हणून उपनिषदांना वेदान्त म्हणतात. दुसरा अर्थ असा की, अन्त म्हणजे सिद्धान्त. वेदांचा जो सिद्धांत तो वेदान्त. तो उपनिषदात आला आहे. म्हणून त्याला वेदान्त म्हणतात. उपनिषदातले ज्ञान व्यवस्थित सांगण्यासाठी बादरायण व्यासांनी ब्रह्मसूत्रे लिहिली, आणि अर्जुनाला निमित्त करून भगवान कृष्णाने गीता सांगितली. म्हणून उपनिषदांप्रमाणेच भगवद्‌गीता आणि ब्रह्मसूत्रे यांना वेदान्त म्हणतात आणि त्यावर निर्माण झालेली भाष्ये, टीका यासारखे समग्रविषयांचे विवेचन करणारे आकरग्रंथ आणि त्यातल्या काही विषयांचे विवेचन करणारे प्रकरणग्रंथ या सगळ्यांना वेदान्त म्हणतात. उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि भगवद्‌गीता या तिन्ही प्रस्थानांवर किंवा त्यातील काहींवर शंकराचार्य, रामानुजाचार्य, निंबार्काचार्य, वल्लभाचार्य, मध्वाचार्य यांनी भाष्ये लिहिली आणि आपापल्या सिद्धान्ताच्या इमारती उठविल्या. आपले मतच श्रुति-स्मृतींना अभिप्रेत आहे, असे प्रतिपादन सर्व आचार्यांनी केले आहे.

सत्ता हा शब्द व्यवहारात अधिकार, राजवट या अर्थाने वापरतात. शास्त्रात मात्र सत्ता हा शब्द अस् (२४) या धातूपासून साधला आहे. त्याचा अर्थ असणे असा आहे. अस्तित्व, अस्मिता या शब्दांचाही तोच अर्थ आहे. ही सत्ता तीन प्रकारची असते.

**१. पारमार्थिक सत्ता :** खऱ्या अर्थाने असणे. जगातील सर्व पदार्थांना उत्पत्ति, स्थिती आणि लय अशा अवस्था असतात. ब्रह्म हा पदार्थ मात्र असा आहे की ज्याला उत्पत्ति नाही आणि लयही नाही. फक्त स्थिती आहे. ब्रह्म नाही असे कधीच होत नाही. त्याचा प्रागभाव नाही आणि प्रध्वंसाभावही नाही. ते परमार्थ सत् आहे आणि त्याची सत्ताही पारमार्थिक आहे.

**२. व्यावहारिक सत्ता :** व्यवहार काळात असणे. घट, पट, घर, दार इ. गोष्टी व्यवहारात आहेत. त्यांची सत्ता ही व्यावहारिक सत्ता.

**३. प्रातिभासिक सत्ता :** जाणीव आहे तोपर्यंतच असणे. रज्जूवर भासणारा साप, शुक्तीवर भासणारे रजत या गोष्टी जोपर्यंत भासतात तोपर्यंतच असतात. रज्जूचे ज्ञान झाले, शुक्तीचे ज्ञान झाले म्हणजे त्यांना अस्तित्व उरत नाही. अधिष्ठानज्ञानाने त्याचा बाध होतो. स्वप्नातले पदार्थ स्वप्न असेपर्यंतच असतात. स्वप्नात कोणी राजा होतो, कोणी रंक होतो, पण जाग आल्याबरोबर त्या राजेपणाचा आणि रंकपणाचा बाध होतो. आपण पूर्वी जसे होतो, तसेच आहोत याची जाणीव होते. सुख-दु:ख हे पदार्थही प्रातिभासिक सत्तेतलेच असतात. घर, दार, गाड्या, माड्या ही सुखाची साधने आहेत. ती बाह्य आहेत. सुख अंत:करणात असते. शिवाय, ही साधने असली म्हणजे माणूस सुखी असतोच असे नाही. कधी त्यामुळे मन सुखावते, तर कधी त्या वस्तू डोळ्यासमोर सुद्धा नकोशा होतात. त्यांची सत्ता ही प्रातिभासिक सत्ता असते.

याशिवाय काही पदार्थ हे फक्त नावातच असतात. त्यांना अस्तित्व मुळीच नसते. सशाला कधी शिंग नसते, आकाशात फूल उमलत नाही. आणि वन्ध्येला मुलगा होत नाही. पण शशशृंग, खपुष्प, वन्ध्या-सुत असे शब्द मात्र रूढ आहेत. या पदार्थांना अत्यंत असत् म्हणतात.

आता शुक्तिरजत, रज्जुसर्प या गोष्टींना असत् म्हणता येत नाही. कारण असत्पदार्थ कधीच भासत नाही. वन्ध्यापुत्राला कोणी पाहिले नाही. खपुष्पाचा सुगंध घेतला नाही आणि शशशृंगाचे धनुष्य केले नाही. शुक्तिरजत असत् असते तर ते कधी कुणाला भासलेच नसते. शुक्तिरजताचा भास होतो, ते घेण्याकरिता माणूस धावतो. त्यामुळे त्या असत् म्हणता येत नाहीत. बरे सत् म्हणावे, तर सत् पदार्थांचा कधीच बाध होत नाही. ब्रह्म नाही अशी स्थिती कधी नसते. शुक्ति आहे असे कळल्यावर रजत नाही अशी खात्री होते. अधिष्ठानाच्या ज्ञानाने आरोपिताचा बाध होतो. म्हणून त्याला सत् ही म्हणता येत नाही. असत् चेत् न प्रतीयेत, सत् चेत् न बाध्यते। शुक्तिरजतं प्रतीयते च बाध्यते च । अत: न तत् असत् , न सत्। सत्, असत् असे ज्याचे विवेचन करता येत नाही, दोन्हीतून जे भिन्न आहे विलक्षण आहे,

अधिष्ठानाच्या ज्ञानाने ज्याचा बाध होतो, त्याला मिथ्या म्हणतात. ज्याला शुक्तिज्ञान झाले, त्याच्या दृष्टीने रजत अस्तित्वात नाही, ज्याला रज्जुज्ञान झाले, त्याच्या दृष्टीने सर्प अस्तित्वात नाही, आणि ज्याला ब्रह्मज्ञान झाले, त्याच्या दृष्टीने प्रपंच अस्तित्वात नाही. सर्व मिथ्या आहे. ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या।

अज्ञान हा एक असाच गंमतीदार पदार्थ आहे. अज्ञान म्हणजे ज्ञानाभाव नव्हे. अभाव पदार्थापासून काही निर्माण होत नाही. अज्ञानातून जग निर्माण होते, अज्ञान हा ज्ञानविरोधी भावपदार्थ आहे. सत्त्व, रजस्, तमस् हे त्याचे तीन गुण आहेत. आवरण विक्षेप या त्याच्या दोन शक्ती आहेत. रज्जूचे अज्ञान आपल्या आवरण शक्तीने रज्जूचे खरे स्वरूप झाकून टाकते आणि विक्षेप शक्तीने त्यावर सर्पाचा आभास निर्माण करते. ब्रह्माचे अज्ञान आपल्या आवरण शक्तीने सत् चित् आनंद हे ब्रह्मस्वरूप झाकून टाकते, आणि असत्, जड, दु:ख हे प्रपंचाचे स्वरूप त्यावर भासवते. आणि खरं सांगायचं तर अज्ञान रज्जूला काहीच करत नाही. प्रमात्याच्या बुद्धीवर ते आवरण करते आणि त्याच्या बुद्धीत सर्पाचा विक्षेप करते. मेघ सूर्याला झाकत नाही, बघणाऱ्याच्या दृष्टीला झाकतो. पेनकिलर वेदना नष्ट करत नाही, वेदना जाणणारी बुद्धी नष्ट करते. रज्जूवर सर्प भासत नव्हता, तेव्हा तेथे सर्प नव्हता, रज्जुज्ञानाने सर्पाचा बाध झाला तेव्हा तेथे सर्प नव्हता, आणि जेव्हा सर्प भासत होता, तो चावेल या भीतीने जीव अर्धमेला झाला होता, तेव्हाही खऱ्या अर्थाने सर्प तेथे नव्हताच. केवळ भास होत होता. उत्पत्तीच्या आधी ब्रह्मावर प्रपंच नव्हता; ब्रह्मज्ञानाने प्रपंचाचा बाध झाल्यावर तो राहणार नाही आणि जेव्हा प्रपंच भासतो, त्याही वेळी खऱ्या अर्थाने प्रपंच नाहीच आहे. सगळाच भास! भ्रम. शंकराचार्य जगन्मिथ्या म्हणतात त्यावेळी त्यांचा अभिप्राय हा असतो.

याला म्हणतात विवर्त. विवर्तात कारणांत काहीच बदल होत नाही. कारण कार्यरूपाने फक्त भासते. अन्यथाप्रथा म्हणजे अन्यरूपाने भास असतो. पण वास्तविक अन्यथाभाव नसतो. अतत्त्वतोऽन्यथाप्रथा विवर्त इत्युदीरित:।

याउलट सांख्यांचा परिणामवाद. यात कारणात खऱ्या अर्थाने बदल होतो, आणि बदललेल्या रूपात कार्याचा भास होतो. दुधात बदल होतो आणि दही भासते. प्रकृति स्वत: प्रपंचरूपाने परिणाम पावते आणि प्रपंच म्हणून तिचे भान होते. सतत्त्वतोऽन्यथा प्रथा विकार इत्युदीरित: ।

वेदान्ती आणि सांख्य दोघेही सत्कार्यवादी आहेत. त्यांच्या मते उत्पत्तीच्या अगोदर कार्य अस्तित्वात असते. यात आणखी एक साम्य असे आहे की अज्ञान, माया, अविद्या आणि प्रकृति यात मूलत: फारसा फरक नाही. ईश्वराची उपाधि असणाऱ्या अज्ञानाला माया म्हणतात. जीवाची उपाधि असणाऱ्या अज्ञानाला अविद्या म्हणतात. मायेवर ईश्वराचा ताबा असतो. तर अविद्या जीवात्म्याला आपल्या अधीन ठेवते. सांख्यादि प्रकृति कर्त्री आहे. वेदान्त्यांची माया, अविद्या अघटित घटना पटीयसी आहे. प्रकृति अचेतन आहे. माया अविद्या पण अचेतन आहेत. माया ईश्वराची शक्ती आहे.

याउलट न्याय- वैशेषिक आरंभवादी किंवा असत्कार्यवादी आहेत. त्यांच्या मते उत्पत्ती पूर्वी नसलेले कार्य म्हणजे असत् असे कार्य नंतर उत्पन्न होते. नैयायिकांच्या मते कार्य कारणावर राहते. वेदान्तिमतात कार्यकारण एक असते. कार्याला कारणाशिवाय स्वतंत्र सत्ता नसते.

शंकराचार्यांच्या अद्वैतमतात परिणामाचे जोरदार खंडन आहे; पण काही बाबतीत परिणाम मानलेलाही आहे. रज्जु हे सर्पाचे विवर्तोपादान आहे आणि रज्जूचे अज्ञान परिणामी उपादान आहे. रज्जूवर सर्प भासतो, आणि रज्जूचे अज्ञान स्वत:च सर्परूपाने परिणाम पावते. ब्रह्म हे प्रपंचाचे विवर्तोपादान आहे आणि ब्रह्माचे अज्ञान प्रपंचाचे परिणामी उपादान आहे. प्रपंच ब्रह्मावर भासतो आणि ब्रह्माचे अज्ञान स्वत: प्रपंच रूपाने परिणाम पावते.

वेदवेदांगांचा अभ्यास झाल्यावर मुमुक्षूला आपातत: ज्ञान होते. काम्य निषिद्ध कर्मांचा तो त्याग करतो. नित्य- नैमित्तिक कर्मांनी अंत:करण शुद्ध करून घेतो, उपासनेने मन एकाग्र करतो. ब्रह्मच फक्त नित्य आहे, इतर सर्व अनित्य आहे, याची त्याला खात्री पटते, स्वर्गादि सुखाबद्दल तो उदासीन होतो; शमदमादि साधनांनी युक्त झाल्यावर तो विद्वान आणि अनुभवी, गुरूकडे जातो. शाब्दे परे च निष्णात:' अशा गुरूकडून 'तत्त्वमसि' अहं ब्रह्मास्मि' इ. वाक्यांवरून 'जीवो ब्रह्मैव नापर:' हे तो समजून घेतो. जीव आणि ब्रह्म यांचे अत्यंत ऐक्य आहे हे श्रवण, मनन, निदिध्यासन यांनी समजावून घेतो. अपरोक्ष साक्षात्कारानंतर त्याच्या संचिताचा दाह होतो, क्रियमाण कर्मे अनुत्पादक होतात आणि प्रारब्धकर्मांचा भोगून क्षय होईपर्यंत तो जिवंतपणी मुक्ती भोगतो. ही त्याची जीवनमुक्ती. देहपातानंतर तो मुक्त होतो, ही त्याची विदेहमुक्ति.

वेदान्ताच्या गहन प्रमेयांची उकल करावी, मूलभूत तत्त्वांची चर्चा करावी, हा या लेखाचा उद्देश नाही. पण वेदान्ताच्या उंबरठ्यावर पाऊल टाकू इच्छिणाऱ्या जिज्ञासूला शास्त्रांची काही जुजबी का होईना पण प्रारंभिक माहिती मिळावी, वेदान्तातील काही संकल्पनांचा परिचय व्हावा, या अगदी मर्यादित उद्देशाने हा लेख लिहिला आहे, इति शम् ।

**– विघ्नहरि देव**

कापरे अंगण- चिंचवड, पुणे ४११०३३. फोन नं. २७६१०१९८

# काव्यात्मक आदिशंकराचार्य - चरित्र

**डॉ. श्रीमती कमलताई वैद्य**

*एम.ए.पीएच.डी., निवृत्त प्राध्यापक. श्रीराम चरितमानस मंडळाच्या माजी अध्यक्षा. दासबोध मराठी गद्य अनुवाद. वाल्मिकी रामायण मराठी अनुवाद. प.पू. स्वामी प्रज्ञानंद सरस्वतींच्या शिष्या.*

*।। श्री सद्गुरु प्रसन्न ।।*

*प्रथम वंदन । करूं गजानना ।*
*सरस्वती चरणा । वंदू भावे ।।१।।*

*आदि शंकराचार्यचरित्र ।*
*वर्णावे परम पवित्र ।*
*अशी इच्छा धरुनी अत्र ।*
*लेखणी हाती धरलीसे ।।२।।*

*श्रीसद्गुरु स्वामीकृपे ।*
*जशी प्रेरणा होईल तसे ।*
*यथामती वर्णीन ते ।*
*गोड करुनी घ्यावे हो ।।३।।*

*लोक हो, आठव्या शतकात ।*
*सनातन धर्माला आले दुर्दिन ।*
*बौद्धधर्माचा ऊर्जित काळ ।*
*लोक होते भांबावले ।।४।।*

*अनेक पंथ संप्रदाय ।*
*लोक झाले दिशाहीन ।*
*अज्ञाने ग्रासले जाऊन ।*
*दुःख अत्यंत भोगती ।।५।।*

*अशा समयी अवतरले शंकराचार्य ।*
*आयुष्य ज्यांनी वेचले धर्मसंस्थापनार्थ ।*
*सनातन धर्म जागवून आर्यावर्त ।*
*ऋणी केला कायमचा ।।६।।*

*पूर्वीच्या मलबार प्रांती ।*
*पूर्णा नदीकाठी कालाडी ग्रामी ।*
*दांपत्य नंबुद्रिपाद कुळी ।*
*आर्याम्बा, शिवगुरु नांदत होते ।।७।।*

*विवाहानंतर अनेक वर्षे ।*
*पोटी संतान न झाल्याने ।*
*अखेरचा उपाय म्हणून त्यांनी ।*
*शिवाराधन आरंभले ।।८।।*

*पत्नीस दृष्टांत झाला ।*
*स्वप्नात साक्षात् शिव प्रकटला ।*
*मूर्ख दीर्घायुषी पुत्र तुला ।*
*हवा की अल्पायु मेधावान् ।।९।।*

*तिने मागितला अल्पायु मेधावान ।*
*शिव तिसी देऊन वरदान ।*
*तात्काळ पावले अंतर्धान ।*
*शिवकृपे गर्भ तिसी राहिलासे ।।१०।।*

*शिव अवतरला पुत्ररूपे ।*
*'शंकर' नामाभिधान लाभले त्याते ।*
*तीन वर्षाचा असताच त्याने ।*
*प्रतिभा बुद्धिमत्ता दाविली ।।११।।*

*वयाच्या आठव्या वर्षी शंकराचे ।*
*अध्ययन संपूर्ण झाले शास्त्रग्रंथांचे।*
*वेध त्यास लागले संन्यास घेण्याचे ।*
*गुरु शोधण्या निघाला ।।१२।।*

*परि तत्पूर्वीच वडील ।*
*पावले होते पंचत्व ।*
*मातोश्रींचा गुंतला होता हेत ।*
*अल्पवयी सुपुत्रात ।।१३।।*

*म्हणे 'मज सोडून नको जाऊ ।*
*अजून बालवय तुझे शंकरु ।*
*तुझ्याविण मी कोणाकडे पाहू ।*
*पित्यास देवाज्ञा झाली असे' ।।१४।।*

एकदा पूर्णा नदीत करीत असता स्नान ।
शंकराचा पाय पकडला मगरीने अकस्मात् ।
म्हणे 'माते अनुमति द्यावी संन्यासास ।
तरीच यातून वाचेन ।।१५।।

माता फार घाबरी झाली ।
संन्यासास अनुमति देती झाली ।
शंकराचा पाय सोडून मगरी ।
निघून गेली पात्रात ।।१६।।

आईची अनुमति मिळाली ।
बालशंकराने आठव्या वर्षी ।
गृह सोडून नर्मदा गाठली ।
जेथे असती गुरु गोविंद भगवत्पाद ।।१७।।

नर्मदेस आला होता पूर ।
शंकराने कमंडलू पाण्यात बुडवून ।
नर्मदेची सुंदर काव्यात स्तुति करून ।
प्रसन्न तिजला केली असे ।।१८।।

श्रीगुरु गोविंद भगवत्पाद ।
गुहेत राहाती अन्य शिष्यासमवेत ।
त्यांनी विचारले, 'तू कुठला कोण' ।
उत्तरी 'निर्वाण षटक्' प्रगट झाले ।।१९।।

'मी नाही मन, बुद्धि, चित्त, अहंकार' ।
हे ऐकून विलक्षण उत्तर ।
प्रसन्न झाले गोविंदपाद यतिवर ।
संन्यासदीक्षा दिधलीसे ।।२०।।

'नर्मदे'चा पूर जो ओसरवील ।
तोच व्यासांचा ब्रह्मसूत्रावर भाष्य करील ।
असे पूर्वीच अत्रिऋषीनी केले भाकित ।
तेच पुढे सत्य ठरले ।।२१।।

गुरुपाशी अध्ययन करून ।
गुर्वाज्ञेने दिग्विजय यात्रा करून ।
भारतभर भ्रमण करून ।
अद्वैत सिद्धांत स्थापिला ।।२२।।

वाराणसीमध्ये असता वास्तव्य ।
चांडालरूपे येऊन शिव साक्षात् ।
अद्वैतसिद्धीचा पाठ पढवून ।
अंतर्धान पावती ।।२३।।

शंकराचार्य बद्रीस जाऊन ।
परम गुरु श्रीगौडपादांचे दर्शन घेऊन ।
परत वाराणसीस येऊन ।
प्रस्थानत्रयीवर भाष्य लिहिती ।।२४।।

तेथे वेदव्यास दर्शन देती ।
भाष्यावरील चर्चा उभयता मधली ।
दीर्घकाळ चाललेली पाहून शिष्य विनविती ।
भगवान् वेदव्यास संतोषती ।।२५।।

शंकराचार्य होते अल्पायुषी ।
सोळावे वर्षी मृत्यु होता निश्चिती ।।
वेदव्यासे आणखी सोळा वर्षे कालावधी ।
वाढवून दिला कृपा करून ।।२६।।

दिग्विजय यात्रेत शंकराचार्यांची भेट ।
झाली प्रसिद्ध मंडनमिश्रासमवेत ।
दोघात शास्त्रार्थ होत ।
मंडनमिश्र पत्नी सरस्वती मध्यस्थ असे ।।२७।।

दोघांच्या गळ्यात घालून पुष्पमाळा ।
सरस्वती बोलली त्या वेळा ।
नाही सुकणार ज्याच्या गळ्यांतील माळा ।
तो विजयी ठरेल ।।२८।।

अठरा दिवस शास्त्रार्थ होई ।
मंडनमिश्रांची माळा कोमेजली पाही ।
सरस्वती म्हणे, 'ते हरले जरी ।
मी अर्धांगी मजला हरवावे' ।।२९।।

'तरीच होईल तुमचा विजय' ।
ती कामशास्त्रावर प्रश्न करीत ।
शंकराचार्य सहा महिन्यांची मुदत ।
मागून घेती ।।३०।।

एका राजाच्या मृतदेहात ।
परकाया प्रवेश करुन ।
सकळ मर्म घेती जाणून ।
तोवर शिष्य रक्षिती कलेवर ।।३१।।

पुन्हा स्वदेही प्रवेशती ।
सर्व रहस्य जाणे सरस्वती ।
पतीसह पराभव मान्य करी ।
दोघे शिष्यत्व स्वीकारती ।।३२।।

*मंडणमिश्र तेच झाले सुरेश्वराचार्य ।*
*शृंगेरी–मठाचे हेच प्रथम आचार्य ।*
*जगन्नाथपुरी मठाचे आचार्य ।*
*पद्मपादाचर्य जाहले ।।३३।।*

*द्वारकापीठाचे हस्तामलकाचार्य ।*
*ज्योतिर्मठाचे तोटकाचार्य ।*
*असे चार पीठी चार आचार्य ।*
*शंकराचार्यांनी नेमिले ।।३४।।*

*अद्यापही ही चारी पीठे ।*
*कार्यान्वित असती शिष्यपरंपरेने ।*
*अनेक सत्पुरुषांनी भूषविली पदे ।*
*यांच्या मठाधिपतींची ।।३५।।*

*माता आर्याम्बा जेव्हा झाली मरणासन्न ।*
*तिने पुत्राचे केले असे स्मरण ।*
*तात्काळ तेथे पोहोचून ।*
*कृष्णदर्शन मातेस घडविले ।।३६।।*

*धन्य धन्य ती माता ।*
*जिच्या पुत्राची कीर्तिध्वजा ।*
*अद्यापही त्रिलोकी फडके देखा ।*
*सनातनधर्म संरक्षक म्हणूनी ।।३७।।*

*त्या समयी कापालिक मताचा होता प्रभाव ।*
*एक कापालिक नाम त्याचे उग्रवैभव ।*
*शंकराचार्यांच्या हत्येचा करून निश्चय ।*
*शिष्य बनुनी राहिला ।।३८।।*

*हळूहळू बनला प्रिय पात्र ।*
*एके दिनी साधून एकान्त ।*
*आचार्यांकडून घेतले वचन ।*
*'जे मागशील ते देईन' ।।३९।।*

*'काय पाहिजे बोल तुला ।*
*शंकराचार्यांनी विचारले त्याला ।*
*ब्रह्मज्ञान्याचे शिर पाहिजे मला ।*
*अलौकिक सिद्धिसाठी हो ।।४०।।*

*'कृपा करोनी शिर द्यावे' ।*
*प्रथमच वचन दिले होते ।*
*म्हणुनी शंकराचार्य त्याला वदले ।*
*'शिर अवश्य देईन ।।४१।।*

*जेव्हा कोणी शिष्य जवळी नसे ।*
*तेव्हा तू साधावे कार्य आपले ।*
*अन्यथा विघ्न येईल बरे ।*
*सावध तुवा असावे ।।४२।।*

*एके दिवशी जेव्हा आचार्यांजवळ ।*
*कोणीही शिष्य नसे आसपास ।*
*त्रिशूळ घेऊन उग्रभैरव ।*
*मारावया धावला, ध्यानस्थ बसता ।।४३।।*

*भगवंतास हे कसे व्हावे मान्य ।*
*अवचित् पद्मपादाचार्य पातले तेथ ।*
*त्यांनी तोच त्रिशूल घेऊन ।*
*उग्रभैरवास धाडिले यमसदनी ।।४४।।*

*कापालिक मत झाले नष्ट ।*
*शंकराचार्यांची थोरवी कळून येई स्पष्ट ।*
*वचन आपुले करावया सत्य ।*
*जीवावरही उदार झाले पहा ।।४५।।*

*ऐसे अलौकिक व्यक्तिमत्त्व ।*
*सनातन वैदिकधर्म राहिला त्यांच्यास्तव ।*
*बत्तीस वर्षे होता पूर्ण ।*
*महासमाधि घेतली ।।४६।।*

**हरिः ॐ तत् सत्**

**– डॉ. श्रीमती कमलताई वैद्य**
होली माऊंट बंगला, श्रीशिल्प चिंतामणी सोसायटी,
३५ विजयनगर, सांगली मिरज रोड, पो वानलेसवाडी,
जि. सांगली – ४१६४१४.
फोन नं. : ०२३३–२६०१२१९



# आचार्यांचे विष्णुसहस्रनाम भाष्य : हरिपाठाचा संस्कृत पूर्वावतार

- डॉ. सौ. भाग्यलता पाटसकर

*व्याकरण या विषयात पीएच.डी., संचालक, वैदिक संशोधन मंडळ (आदर्श संस्कृत शोध संस्था)
८ पुस्तकांचे संपादन. ७० लेख प्रकाशित*

विष्णुसहस्रनामावरील आचार्यांचे भाष्य हे तसे पाहू जाता अन्य भाष्यग्रंथांच्या तुलनेत अगदी लहान आहे. प्रकरणग्रंथांसारखा एखादा गंभीर विषयही त्यात त्यांनी शास्त्रीय शिस्तीने व अन्यत्र आढळणाऱ्या त्यांच्या पल्लेदार बांधेसूद शैलीत मांडला आहे, असेही नाही, तरीही हे भाष्य महत्त्वाचे ठरते कारण त्यातून त्यांनी सर्वसामान्य समाजासाठी 'एक धर्म' अगदी आग्रहाने मांडला आहे. मांत्रिकांच्या आहारी जाणारा समाज त्यांनी मोठ्या शर्थीने सात्त्विक उपासनेकडे वळविला असे त्यांचे चरित्रकार म्हणतात. विष्णुसहस्रनामावरील भाष्यात आचार्यांचे हे रूप मला विशेष प्रकर्षाने जाणवले.

विष्णुसहस्रनामाच्या सुरुवातीसच युधिष्ठिराने एक प्रश्न विचारला आहे,

***को धर्मः सर्वधर्माणां भवतः परमो मतः?***

(कोणता धर्म तुमच्या मते सर्वश्रेष्ठ आहे?)

भीष्मांनी त्यास उत्तर दिले आहे,

***एष मे सर्वधर्माणां धर्मोऽधिकतमो मतः ।***
***यद्भक्त्या पुण्डरीकाक्षं स्तवैरर्चेन्नरः सदा ।।***

(भक्तिभावाने स्तुती करून माणसाने पुण्डरीकाक्ष विष्णूची उपासना करावी. हा सर्व धर्मामध्ये उत्तम धर्म आहे.)

या श्लोकावरील आचार्यांचे भाष्य आणि या नंतरच्या श्लोकांवरील नामस्मरणाचे महत्त्व सांगणारे आचार्यभाष्य हे म्हणजे सामान्य जनांसाठी अध्यात्मिक उन्नतीचा रुचणारा आणि झेपणारा मार्ग दाखवून देणाऱ्या करुणाहृदयी संताचे प्रवचन आहे!

आचार्यांच्या या ठिकाणच्या भाष्याचा मथितार्थ असा – जपयज्ञ हाच सर्वात श्रेष्ठ मार्ग आहे. कारण त्याला अन्य यज्ञात असलेले असे कोणतेच निर्बंध नाहीत, तसेच तो करायला फार काही आडम्बरही लागत नाही.

यानंतर आचार्यांनी जपयज्ञ किंवा नामस्मरण याच विषयावर एक प्रदीर्घ भाष्य केले आहे. मनुस्मृति, महाभारत (गीता), उपनिषदे, पुराणे यातून नेमके संदर्भ वेचून त्यांनी आपला मुद्दा अगदी आग्रहीपणे मांडला आहे की जप किंवा भगवन्नामोच्चारण हीच कलियुगातली साधना आहे. उपनिषदे, वेदान्तसूत्रे यांच्यातच असलेली आणि म्हणून केवळ चतुर्थाश्रमातच झेपणारी अध्यात्माची साधना आचार्यांनी अशी सर्वसामान्यांच्या, तेही गृहस्थांच्या आवाक्यात आणून ठेवली, ती अशी! आपणा मराठी माणसांच्या दृष्टीने विष्णुसहस्रनामाचे हे प्रस्तावना भाष्य म्हणजे 'हरिपाठाचा' पूर्वावतार आहे.

यानंतर एक महत्त्वाचा मुद्दा आचार्यांनी मांडला आहे, तो म्हणजे 'एको देवः'

युधिष्ठिराचा प्रश्न आहे, 'किमेकं दैवतं लोके?' यावर भीष्माचे उत्तर आहे,

***'पवित्राणां पवित्रं यो मङ्गलानां च मङ्गलम्।***
***दैवतं देवतानां च भूतानां योऽव्ययः पिता ।।***
***तस्य लोकप्रधानस्य जगन्नाथस्य भूपते ।***
***विष्णोर्नामसहस्रं मे शृणु पापभयापहम् ।।***

आचार्य अद्वैतवादाचे खंदे पुरस्कर्ते आहेत. जगत्कारणच जिथे एकच आहे, तिथे शिव, विष्णू इ. अनेक देवतांची उपपत्ती कशी लावावयाची? एवढेच नव्हे तर अन्य देवतांची नावे म्हणून रूढ असणारे शब्द जेव्हा पुढे विष्णूच्या नावात काही शिव, शर्व, आदित्य इ. अन्य देवतांची नावे येतात, तेव्हाही या एकत्वाची उपपत्ती लावण्याचा प्रश्न येतो. अशा वेळेस आचार्यांमधील शिस्तबद्ध, तार्किक, दार्शनिक आणि शास्त्रकार सरसावून पुढे येतो.

वेद व उपनिषदांतील अनेक उद्धृते देऊन 'एको देवः' ही गोष्ट प्रथम आचार्यांनी प्रतिपादिली. सृष्टि निर्मितीविषयक विचार मांडणारे हिरण्यगर्भ हे एक प्रसिद्ध सूक्त आहे. त्यातील 'कस्मै देवाय हविषा विधेम?' (कोणत्या देवाला आम्ही हविर्भाग अर्पण करावा?) या मंत्रात अनेक देवता गृहीत धरल्या आहेत. आचार्य इथे म्हणतात, 'या ठिकाणी एकस्मै असे खरे तर आहे, त्यातील 'ए' चा लोप झाला आहे. (अर्थ एका देवास हविर्भाग अर्पण करावा.)

एक देव आहे हे जरी स्वीकारलं तरी वेगवेगळ्या अर्थी प्रसिद्ध असलेले शब्द उदा. 'आदित्य, ऋतु, औषध, कपि इ. विष्णु या अर्थी कसे असतील? आचार्यांचे यावरील उत्तर असे की आदित्य इ. वस्तू या विष्णूच्या 'विभूती' आहेत. त्यामुळे आदित्याची स्तुती ही विष्णूचीही स्तुती ठरतेच!

विष्णुसहस्रनामात काही शब्द पुन्हा पुन्हा येतात. (उदा. ईश्वर, उद्‌भव, विष्णू, धाता इ.) तसेच काही वेळेस शब्द बदलला तरी अर्थ तोच राहतो (उदा. मा-धव मा म्हणजे लक्ष्मी तिचा धव- पती आणि श्री- पति). या ठिकाणी शब्दाची तसेच अर्थाची पुनरुक्ती दिसते आणि पुनरुक्ती हा दोषच असतो. आचार्य या ठिकाणी असे दाखवून देतात की येथे पुनरुक्ती हा दोष नाही. तोच शब्द पुन्हा योजला असे वाटते, ते त्यातील वर्णक्रम समान असतो म्हणून, प्रत्यक्षात त्याचा अर्थ वेगळा असतो. त्यामुळे तो खरे तर वेगळाच शब्द असतो. दुसऱ्या उदाहरणात अर्थ जरी तोच असला तरी वापरलेली वर्णावली (एका ठिकाणी मा-धव, दुसरीकडे श्री-पति) ही वेगळी असल्याने ते शब्द निराळेच ठरतात. तात्पर्य असे की विष्णुसहस्रनामातील प्रत्येक शब्द विष्णूचेच वर्णन करणारा किंवा त्याची स्तुती करणारा आहे.

या सहस्रनामातील काही शब्द पुल्लिंगी आहेत (वषट्‌कार: प्रभु: इ.), काही स्त्रीलिंगी आहेत (कृति:, भूति:, भू:, मुक्तानां परमा गति: इ), काही शब्द नपुंसकलिङ्‌गी आहेत. (उदा. विश्वम्, ब्रह्म, औषधम् इ.) हे भिन्नलिंगी शब्द विष्णूसाठी आहेत, हे कसे समजून घ्यावयाचे? आचार्यांचे समर्थन असे की यापैकी पुल्लिंगी शब्द विष्णूसाठी आहेत. स्त्रीलिंगी शब्द 'विष्णूदेवता' यासाठी आहेत आणि नपुंसकलिंगी शब्दाने 'ब्रह्म विशिष्यते', ब्रह्मस्वरूप सांगितलेले आहे. देवताविज्ञानातील एक अत्यंत मौलिक गोष्ट आचार्य या ठिकाणी सांगतात. 'विष्णू'च्या ठिकाणी त्यास तीन पैलू दिसतात, एक म्हणजे तो भक्तांच्या आराधनेचा, भक्तीचा विषय आहे.

दुसरे म्हणजे विष्णू हे एका कार्य घडवून आणणाऱ्या शक्तीचे नाव आहे, जी विविध अनुष्ठानांचा- जसे की यज्ञ, पूजा, अभिषेक, हवन, अर्चन इ.- विषय आहे आणि हेच निर्गुण, निराकार, सर्वव्यापी अशा परब्रह्माच्या आपल्यापुरत्या प्रकट झालेल्या अंशाला दिलेले नाव आहे. एक अंश भावगम्य आहे, दुसरा कर्मप्राप्य आहे आणि तिसरा समाधिसाध्य आहे.

आचार्यांचे थोरपण हेच की आपल्या भाष्यविषयाला सुरुवात करण्यापूर्वी त्याविषयीच्या सर्व शंकाचे ते निरसन करतात.

आता प्रत्यक्ष भाष्याची काही वैशिष्ट्ये थोडक्यात पाहू- अनेक नावे जेव्हा एकामागोमाग एक येतात, तेव्हा आधीच्या नावातील अभिप्रायांमुळे जर कुणी भलतेच स्पष्टीकरण देऊ लागला, तर त्याच्या निवारणासाठी पुढचे नाव असते असे आचार्य मानतात- भूतकृत्, भूतभृत् असे म्हटले की परमेश्वराच्या ठिकाणी त्रैगुण्य मानावे लागते. वस्तुत: ते नाही, हे स्पष्ट करण्यासाठी पूतात्मा, परमात्मा या पुढच्या नामांची योजना आहे.

कित्येकदा आचार्य साध्या वाटणाऱ्या नामातील रहस्याचे पदर उलगडून दाखवतात. उदा. केशव. आचार्य म्हणतात, सुंदर केश आहेत म्हणून केशव, किंवा क, अ आणि ईश अशा त्रिमूर्ती (ब्रह्मा, विष्णू, महेश) हेच ज्याच्या आधिपत्याखाली (वशे) आहेत तो केशव, किंवा केशी या राक्षसाचा वध केला म्हणून केशव. पुरुष, हृषीकेश इ. शब्दांच्या त्यांनी एकापेक्षा अनेक व्युत्पत्त्या दिल्या आहेत. 'अप्रमेय' या नावावर आचार्यांनी केलेले भाष्य त्यांच्यातील शास्त्रकार दाखवून देते. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, अर्थापत्ति, शास्त्र इ. कोणत्याच प्रमाणाने तो का कळून येत नाही, हे ते विस्ताराने सांगतात. शिवाय तो भावरूप आहे आणि 'अभाव' साक्षी आहे. अमेय या शब्दावर भाष्य करताना मात्र ते म्हणतात, 'एवढा आहे' असे ज्याचे मोजमाप करता येत नाही, तो अमेयात्मा! प्रत्येक शब्दातलं जणू ते 'सत्त्व' काढून आपल्यापुढे मांडतात.

नामांचं विवरण करताना जरूर तिथे श्रुति, स्मृति, पुराणे, महाभारत, हरिवंश यांचे आधार तर आचार्य देतातच, पण काही वेळेस नामाचे व्याकरणाच्या अंगानेही ते साधार स्पष्टीकरण करतात. (प्रग्रह- भक्तांनी दिलेले स्वीकारणारा किंवा विषयांमागे धावणाऱ्या इंद्रियांचा लगाम. या अर्थी तो प्रग्राह हवा होता पण आद्य व्याकरणकार पाणिनीनेच प्रग्रह यास लगाम या अर्थी वर्णिल्यामुळे तो योग्य ठरतो, असे आचार्य म्हणतात.)

काही ठिकाणी आचार्यांनी अशीही सूचना केली आहे की दोन शब्द असले तरी ते नाव म्हणून एक धरावे. उदा. संकर्षणोऽच्युत: आणि यास ते काही कारणही देतात. आचार्यांची सूक्ष्मेक्षिका पहावयाची असेल तर 'नन्दनोनन्द:'(श्लोक ६९) यावरील भाष्य पहावे. या ठिकाणी त्यांनी नन्द: असे एक नाम घेतले आहे, ज्ञानसमृद्ध या अर्थी, आणि मग 'अनन्द: असा बरोबर विरुद्धार्थी शब्द सन्धि विग्रहाच्या बळावर वेगळा केला व वैषयिक सुख (=नन्द) ज्याच्या ठिकाणी मुळीच राहत नाही असा अनन्द!

कित्येक नामं अशी आहेत की त्यांच्यात एक पुराणकथा किंवा काही सिद्धांत लपलेली असते. उदा. 'नारसिंहवपु:'. पण कित्येक वेळा अशी कथा सहज समजण्याइतकी प्रचलित किंवा प्रसिद्ध नसते. आचार्यांचं भाष्य अशा वेळेस फार महत्त्वाची भूमिका बजावते. 'चतुर्व्यूह' हा वासुदेव, संकर्षण इ. चार मूर्तींनी स्वत:ला 'व्यूह्य'

प्रकट करून त्यांनी सृष्टिनिर्मिती केली, असा उल्लेख असल्याचा आचार्य उल्लेख करतात.

'सुमुख' या शब्दावरचं आचार्यांचं भाष्य, एका दार्शनिकाचं भाष्य म्हणून त्याची उंची दाखविण्यास पुरेसं आहे. 'सुमुख' याचा आपल्याला सहज सुचतो तो तर अर्थ आहेच पण ते रामावताराचं वर्णन आहे,

*न वनं गन्तुकामस्य त्यजतश्च वसुन्धराम् ।*
*सर्वलोकातिगस्यैव मनो रामस्य विव्यथे ।।*

(पृथ्वीचे राज्य सोडून वनात जायला निघालेल्या रामाचे मन जराही दु:खी नव्हते. त्रैलोक्यात श्रेष्ठ असलेला राम!) असा रामायणातील संदर्भ देऊन त्याचं 'प्रसन्नमुखत्व' स्पष्ट करतात. प्रत्येक शब्दावरील भाष्यानुसार आचार्यभाष्याचे असे अनेक विशेष सांगता येतील.

आचार्यांचे भाष्य वाचल्यावर असं वाटतं की, त्या अनादि अनन्त सच्चिदानन्दाचा 'अनिर्वचनीय' असा अनुभव घेतल्यावर शब्दांच्या जगात आल्यावर आता त्याचा एकेक कण ते त्या शब्दांद्वारे पकडून ते तो अनुभव आपणास देत आहेत. व्यासांनी त्यांच्या प्रतिभेने जे पाहिले, ते आचार्य अनुभवत आहेत, आपल्या अद्वैताच्या सिद्धांताच्या चौकटीत त्याची मांडणी करीत आहेत. त्यामुळे विष्णुसहस्रनाम हे विष्णूच्या हजार नामांचे स्तोत्र न राहता शब्दातीताचे शब्दात पकडता आलेले हजारभर पैलूंचे दर्शन ठरते. प्रत्येक शब्द सिद्ध करताना त्यांना शब्दाचं खूप कौतुक वाटतं असं वाटतं. कलियुगातील मुक्तीचं साधन म्हणून त्यांचा नामजपाच्या सामर्थ्यावरील विश्वास आहे, पण आपल्या तत्त्वज्ञानाला अनुसरून ते हेही आग्रहाने प्रतिपादितात की 'जपकर्मणा साक्षान्मुक्तिशङ्कायां कर्मणां साक्षान्मुक्तिहेतुत्वं नास्ति, ज्ञानेनैव मोक्ष इति दर्शयितुं वेदान्तगोब्राह्मण: स्यात् इत्युक्तम् । कर्मणां तु अन्त:करणशुद्धिद्वारेण मोक्षहेतुत्वम्।' जपकर्माने अन्त:करणशुद्धी होते व मग मोक्ष मिळतो. आपल्या संतांनी पुढे नामभक्तीला 'साक्षाद् मुक्तिहेतुत्वं' दिले. असो! विष्णुसहस्रनामावरील भाष्यात आचार्य दार्शनिक किंवा वेदान्तशास्त्रकार प्रथम आणि भक्त नंतर तर त्यांच्या स्तोत्रात ते भक्त प्रथम आणि अद्वैतवेदान्तशास्त्रकार नंतर असे वाटतात.

संस्कृतात फक्त सुट्या सुट्या शब्दावर अशा तीन प्रकारच्या व्याख्या आहेत, एक म्हणजे वेदांतील निघण्टु नावाच्या शब्दसंग्रहावरील यास्काचार्यांची 'निरुक्त' नावाची व्याख्या. गत 'शब्दातीत अशा स्वसंवेद्य वेदप्रतिपाद्याचे' शब्दाद्वारा ज्ञान करून घेण्याची एक पद्धती (Method) सांगितली आहे, त्या पद्धतीचंही नाव 'निरुक्तं च'. (ही पद्धतही आचार्यांनी वापरली आहेच. उदा. हंस: वरील भाष्य पहा) दुसरी म्हणजे विष्णुसहस्र-नामावरील आचार्यांचे भाष्य. हे त्यांच्या अद्वैतसिद्धान्ताचे आणि त्याचवेळेस नामभक्तीचे महत्त्व प्रतिपादन करण्याच्या हेतूने प्रेरित आहे. तिसऱ्या प्रकारची व्याख्या म्हणजे अमरकोशासारख्या कोशातील शब्दांवरील व्याख्या. या केवळ शब्दाचे भाषिक स्पष्टीकरण देण्याच्या हेतूने केलेल्या असतात. अर्थात आचार्यांच्या प्रस्तुत भाष्यात तुरळक ठिकाणी का होईना पण त्यांची कोशाच्या व्याख्याकाराची भूमिका दिसते.

असो! विष्णुसहस्रनाम गोड आहेच, पण आचार्यांच्या प्रसन्न आणि विशद शैलीमुळे त्याची गोडी आनन्दपर्यवसायी झाली आहे, एवढे नक्की!

**- डॉ. सौ. भाग्यलता पाटसकर**
संचालक, वैदिक संशोधन मंडळ,
(आदर्श संस्कृत शोधसंस्था), मुकुंदनगर, टिमवि कॉलनी,
पुणे ४११०३७.
दूरध्वनी : २४२६२६३५ (कार्यालय)
२४४८४२०१ (घर)

# शंकराचार्य- पंचायतनपूजा

**सौ. कल्याणी नामजोशी**

*एम.एस.सी. (इलेक्ट्रॉनिक्स) एम.ए.संस्कृत, संगीत विशारद, व्याख्यात्या व प्रवचनकार, गीताधर्म मंडळाच्या अध्यक्षा. सहलेखक- साक्षेप समर्थांचा, एका जनार्दनी तेजाचं चांदणं. अनेक पुरस्कारांनी सन्मानित.*

भगवत्पूज्यपाद शंकराचार्य ज्ञानमार्गाने कैवल्याच्या प्राप्तीची भूमिका मांडणारे आचार्य आहेत. 'ज्ञानात् एव तु कैवल्यम् ।' हे त्यांच्या ज्ञानमार्गाविषयी संक्षेपाने म्हणता येईल. परंतु त्यांनी गृहस्थाश्रमी व ज्ञानमार्गात गती व रुची नसणाऱ्या साधकांच्यासाठी भक्तिमार्गाचा प्रसार- प्रचार केला. सुंदर- सुंदर स्तोत्रांची रचना करून ज्ञान व भक्तीचा मार्ग सुलभ करून सांगितला. त्यांची स्तोत्र रचना इतकी अप्रतिम आहे की भक्तिमार्गी आचार्यांनाही त्यांच्या स्तोत्रवाङ्मयाची भुरळ पडावी! या सर्व उपासना साधनांबरोबरच त्यांनी गृहस्थाश्रमींसाठी पंचायतन पूजेचा मार्ग दृढ केला. गृहस्थधर्माचा अविभाज्य भाग बनविला.

श्री शिव, विष्णू, देवी, सूर्य व गणपती या पाच देवतांच्या एकत्र उपासनेला पंचायतन पूजा हे नाव आहे. भारतात अनेक उपासनापंथ प्रचलित आहेत त्यांचे उपासनामार्गही स्वतंत्र आहेत. त्यामुळे कित्येकदा पंथापंथामध्ये वैमनस्य निर्माण झालेले दिसते. जसे शैव-वैष्णव पंथात कट्टर भेद केला जात असे. हे योग्य नाही. म्हणून त्यादृष्टीने प्रयत्न सुरू झाले. 'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति!' एकाच सद् वस्तूला ज्ञानी लोक अनेक प्रकारे संबोधतात. या ऋग्वेदातील मंत्रात पंचायतन पूजेचे बीज सापडते. भिन्न भिन्न संप्रदायातील बुद्धिमान पुरुषांना व उदार मतवाद्यांना हे कळत होते की, भिन्न पंथांच्या भिन्न उपास्य देवता ही सारी एकाच परमेश्वराची भिन्न भिन्न नामरूपे असून परमेश्वर त्या सर्वांना व्यापून आहे. वेदान्त मताच्या माध्यमातून म्हणजे भगवतपूज्यपाद शंकराचार्यांच्या वेदान्त तत्त्वज्ञानाच्या प्रसारामुळे हा विचार वाढीस लागला व त्यातूनच स्मार्त धर्माचा अवलंब करणाऱ्या ब्रह्मवृन्दांनी पंचायतनपूजेचा उपक्रम सुरू केला. त्यासाठी श्रीविष्णू, शिव, देवी, सूर्य व गणपती अशा पाच देवता निवडल्या. या पंचायतनात विष्णुसाठी शाळिग्राम, शिवासाठी बाणलिंग, सूर्यासाठी स्फटिकमणी, देवीसाठी मूर्ती व गणपतीसाठी नर्मदेतला तांबडा गोटा बसविण्याची चाल रूढ झाली. मुख्य उपास्य देवतेची स्थापना मध्यभागी करून बाकीच्या देवता चारही दिशांना स्थापितात. उपास्यभेदाने ही मांडणी खालीलप्रमाणे स्पष्ट करता येईल.

१) विष्णुपंचायतन - मध्यभागी विष्णू, ईशान्येस शिव, अग्नेयेस गणपती, नैऋत्येस सूर्य व वायव्येस देवी.

२) शिवपंचायतन - मध्यभागी शिव, ईशान्येस विष्णु, आग्नेयेस सूर्य, नैऋत्येस गणपती व वायव्येस देवी.

३) सूर्यपंचायतन - मध्यभागी सूर्य, ईशान्येस शिव, आग्नेयेस गणपती, नैऋत्येस विष्णु व वायव्येस देवी.

४) देवीपंचायतन - मध्यभागी देवी, ईशान्येस विष्णु, आग्नेयेस शिव, नैऋत्येस गणपती व वायव्येस सूर्य.

५) गणपतिपंचायतन - मध्यभागी गणपती, ईशान्येस विष्णु, आग्नेयेस शिव, नैऋत्येस सूर्य व वायव्येस देवी.

गृहस्थाने आपल्या घरात पंचायतनाची स्थापना करून त्याची नित्यपूजा करावी, असे धर्मशास्त्रात सांगितले आहे.

पंचायतनातील पाच प्रमुख देवतांच्या पार्षद देवता पुढीलप्रमाणे सांगितल्या आहेत.

विष्णुच्या रमा, ब्रह्मा, शुक, सनत्कुमार, सनक, सनंदन, सनातन, विष्वक्सेन, उद्धव आणि अक्रुर.

शिवाच्या बाण, रावण, चंडीश, नंदी, भृंगी आणि रिटी.

सूर्याच्या माठर, पिंगल, दंड आणि चंडांशू.

देवीच्या शक्ती, उच्छिष्टा, चांडाली, गणपती, रवी व चंद्र.

गणपतीच्या गालव, गार्ग्य, मृद्गल व सुधावर.

मुख्य पूजा झाल्यावर मग या पार्षदांचा नामोच्चार करून त्यांना पुष्पांजली वाहतात. पंचायतनपूजेचा पुरस्कार भगवत् पूज्यपाद शंकराचार्यांनी केला व त्यामुळे विविध दैवत संप्रदायातील वैर बऱ्याच प्रमाणात कमी झाले. त्याचे श्रेय आद्य शंकराचार्यांकडे जाते, असे म्हटले जाते.

अनेक देवता एका प्रतिमेत एकत्रित करणे ही प्रवृत्ती हिंदूंच्या मूर्तिकलेतही दिसून येते. बिहारमध्ये एक पंचायतन शिवलिंग सापडले आहे. त्याला चार मुखे आहेत. ती विष्णू, सूर्य, पार्वती व गणपती या देवतांची आहेत. भारतात कित्येक ठिकाणी पंचायतन

मंदिरांचा समूह आढळतो. त्यात प्रमुख देवतेचे मंदिर मध्यभागी असते व बाकीच्या चार देवतांची मंदिरे चार कोपऱ्यात असतात. अशी रचना भारतभर उत्तरेपासून दक्षिणेकडे व पूर्वेपासून पश्चिमेकडे वैपुल्याने आढळते. नव्याने निर्माण होणाऱ्या मंदिरात तर सामान्यत: अशी रचना केली जाते. परदेशातही भारतीय देवतामंदिरांमध्ये सामान्यत: पंचदेवतांची मंदिरे असतात. त्याचबरोबर शीखपंथीय, जैनपंथीय आदींच्या देवतांचाही समावेश केला जातो. हा विसाव्या शतकातील अधिक व्यापक विचार संभवतो. भारतातही भारतातील सर्व तीर्थक्षेत्रांचे दर्शन यात्रेकरूंना एका स्थानावर घडावे यासाठी काही तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी अनेक देवतामंदिरांची निर्मिती केली आहे.

पूजाविधिसंबंधी थोडा विचार करणे योग्य ठरेल. एखाद्या देवतेला श्रद्धायुक्त अंत:करणाने, विधियुक्त केलेले उपचार समर्पण याला देवतापूजन असे म्हणतात. 'तत्र पूजा नाम देवतोद्देशेन द्रव्यत्यागात्मकत्वाद्याग एव...' देवतेला उद्देशून द्रव्यत्याग केला जात असल्यामुळे पूजा म्हणजे यागच होय, असे न्यायकोशात म्हटले आहे. पूजा देवाला सोळा उपचार समर्पून करायची असते. त्यासाठी पुरुष- सूक्ताच्या ऋचा प्रत्येक उपचारासाठी एक अशा रीतीने विनियुक्त केलेल्या आहेत.

पूजकाने मृगाजिन, रेशमी वस्त्र किंवा लोकरी वस्त्र यांच्या आसनावर बसून देवावरील निर्माल्य काढावे. आणि घंटी वाजवावी. मग आवाहन, प्राणायाम, इष्टदेवता, कुलदेवता इत्यादींचे नमन व देश-कालांचा उच्चार करून 'अमुक देवताया: षोडशोपचार पूजां करिष्ये' असा संकल्प करावा. गणपतीचे स्मरण करावे. आसनाविधी करावा. षोडशांग किंवा षडंगन्यास करावा. कलश, शंख, घंटा व दीप यांची गंधाक्षतपुष्पांनी पूजा करावी. शंखात पाणी भरून त्याने पूजासाहित्य व स्वत:चे शरीर यांचे प्रोक्षण करावे. ओंजळीत फूल घेऊन ज्या देवाची पूजा करायची असेल त्यांचे ध्यान करावे. मग त्याला भक्तिपूर्वक सोळा उपचार समर्पावे.

आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, अनुलेपन, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, नमस्कार, प्रदक्षिणा व मंत्रपुष्प या षोडशोपचारांचे क्रमाने समर्पण करावे.

पंचायतन पूजेमध्ये पदार्थानुसमय हा संकेत स्वीकारतात. पूजा पद्धतीत दोन प्रकारचे संकेत स्वीकारलेले आहेत. एक कांडानुसमय व दुसरा पदार्थानुसमय. कांडानुसमयात इष्ट देवतेची पूजा प्रथम केली जाते व अन्य पूजनीय देवतांपैकी एकेका देवतेची तशाच प्रकारे वेगवेगळी पूजा करावी असा संकेत आहे. तर पदार्थानुसमयाप्रमाणे इष्ट देवतेबरोबरच अन्य देवतांनाही तोच उपचार समर्पित करावा ही पद्धती स्वीकारली जाते. पंचायतन पूजेमध्ये या पद्धतीने देवतापूजन केले जाते.

सर्व वर्णाच्या स्त्री-पुरुषांना पूजेचा अधिकार आहे. देवपूजेची सहा स्थाने वृद्ध हारीताने पुढीलप्रमाणे सांगितली आहेत.

***अप्स्वग्नौ हृदये सूर्ये स्थाण्डिले प्रतिमासु च ।***
***षट् स्थानेषु हरे: सम्यगर्चनं मुनिभि: स्मृतम् ।।***

अर्थ - जल, अग्नी, हृदय, सूर्यमंडळ, वेदी व प्रतिमा या सहा स्थानांच्या ठिकाणी श्रीहरीची चांगल्याप्रकारे पूजा करावी.

या सहा स्थानांमध्ये मूर्ती हे स्थान विशेष रूढ आहे. समाजात फार मोठा वर्ग भाविक, पण तात्त्विक दृष्टी नसलेला असतो. अशा समाजाच्या श्रद्धा-भक्तीच्या पूर्ततेसाठी कोणत्यातरी देवतामूर्तीचीच आवश्यकता असते. हे लक्षात घेऊनच पुढे देवपूजेत मूर्तिकरणाचा विचार अधिक परिपूर्णतेने रूढ झाला. त्याचाच परिपाक म्हणजे पंचायतनपूजा. आद्य शंकराचार्यांनी पंचायतन पूजापद्धती दृढ करण्यासाठी पद्धतशीर प्रयत्न का केले असावेत त्याची भिन्न भिन्न कारणे लक्षात येतात.

गृहस्थाने घरात किंवा भक्ताने मंदिरात केलेली देवपूजा ही भक्तीचे सुख, मन:प्रसाद व अध्यात्मिक समाधान यांच्यासाठी असते. तसेच काही लोकांच्या जीवनात पूजाविधी हा संकटे दूर करणे, व्यावहारिक जीवनातील अडीअडचणींवर मात करण्यासाठी असतो. माणसाची सांस्कृतिक उंची जसजशी वाढत जाते तसतशा भावना, उपचार, मंत्र विधि-विधान इ. सर्वच गोष्टी बदलत जातात. पूजा अधिकाधिक सूक्ष्म संवेदनाशील पातळीवर उतरते.

पंचायतन पूजेची व्यावहारिक, अल्प प्रमाणात कर्मकाण्डात्मक बाजू अत्यंत संक्षेपात विचारात घेतली. पंचायतन पूजेच्या मागील ईश्वराचे श्रेष्ठत्व, समर्थत्व आणि एकमेवाद्वितीयत्व पाहाणे अगत्याचे ठरते. पूजा ईश्वराचीच का करायची? त्याची महती काय? असे अनेक प्रश्न उपस्थित होतात. कुणाच्या अंत:करणात ईश्वराच्या अस्तित्वा विषयीच साशंकता असते. वास्तविक पाहाता वेदात सांगितलेल्या सिद्धांताला अनुलक्षून ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणारे असे कितीतरी बलवत्तर अनुकूल तर्क आहेत की त्या तर्कांचे खंडण होऊ शकत नाही. ज्यांना ईश्वराविषयीच्या तर्कांचे खंडणही करावयाचे नाही व ईश्वराचे अस्तित्वही मानावयाचे नाही त्यांचे समाधान करणे सामान्य लेखकाला अवघड आहे. यथार्थ जिज्ञासेने विचार करण्यास प्रवृत्त झालेल्या जिज्ञासूस काही चिंतन निश्चितच दिलासा व समाधान देणारे ठरेल.

उपनिषदे, ब्रह्मसूत्रे व गीता हे ईश्वराला पहाण्याचे तीन मार्ग आहेत. या तीन मार्गांना प्रस्थानत्रय असे म्हणतात. 'प्रस्थीयते अनेन

इति प्रस्थानम् ।' अशी प्रस्थान शब्दाची व्युत्पत्ती आहे. प्रस्थान म्हणजे जाण्याचे अथवा जाणण्याचे साधन. या प्रस्थानत्रयींवरील आचार्यांचे भाष्य प्रसिद्धच आहे. आचार्यांचे भाष्य इतके सुमधुर आहे की त्याला संस्कृत वाङ्‌मयात तोड नाही. आचार्यांचा युक्तिवादही असाच बिनतोड आहे. आचार्य म्हणतात ईश्वराच्या अस्तित्वाविषयी व त्याच्या सर्वज्ञत्वाविषयी मनात तीळमात्रही शंका नको. 'तत्सिद्धिर्जगतो नियतप्रवृत्तेः' अत्यंत नियमबद्ध पद्धतीने चाललेली विश्वाची प्रवृत्ति हीच ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करण्यास पूर्ण समर्थ आहे. ईश्वर हा सृष्टीचा नियामक आहे. जगाची रचना कौशल्याने करणारा रचनाकार परमेश्वर आहे. कुणी जर म्हटले की ईश्वर नाही निसर्ग आहे. सृष्टीतूनच सृष्टी निर्माण होते. त्यासाठी ईश्वराची आवश्यकता काय? सृष्टीतून सृष्टी निर्माण होते असे म्हणायचे तर जनक सृष्टी व जन्य सृष्टी निराळी असते. तेव्हा मूळ जनक सृष्टीचा निर्माता त्या सृष्टीहून निराळाच असावा लागतो. तो जो आदिसृष्टीचा जनक आहे त्यालाच परमात्मा म्हणतात. सृष्टी ही अनादी आहे म्हणजे सृष्टिपरंपरा अनादी आहे. या परंपरेतील प्रत्येक सृष्टीला आदी आणि अंत हा आहेच. पूर्वपूर्व सृष्टीच्या अनुरोधानेच उत्तरोत्तरकालीन सृष्टी निर्माण केली जाते. याच अभिप्रायाने 'धाता-यथापूर्वमकल्पयत्' हे वेदवचन प्रसिद्ध आहे. सृष्टी निर्माण होण्याच्या पूर्वकाळात त्या परमेश्वराशिवाय दुसरे काहीच नव्हते. नासदीय सूक्तात वर्णन केले आहे ते असेच आहे. 'तस्माद्धान्यन्न परः किंचनास' अशाप्रकारे अनुकूल तर्कांनी व वेदवचनांनी सृष्टीचा कर्ता ईश्वर असल्याचे सिद्ध होते.

माणसाची कर्मे ही सुखदुःखात्मक फले देणारी असली तरी कर्मांना फलोन्मुख करणारा कोणी तरी प्रवर्तक पाहिजेच. कर्मे ही अदृष्टद्वारा सुखदुःखाची निमित्तमात्र असतात. कर्माप्रमाणे जीवांना सुखदुःखात्मक फळे देणारा कोणी निराळाच दाता असला पाहिजे. परमात्मा हा कर्मफलांचा दाता आहे.

आचार्यांचा ईश्वर हा 'अणोरणीयान्' आणि 'महतो महीयान्' अशा स्वरूपाचा आहे. सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्म परम सूक्ष्म आणि मोठ्यापेक्षाही मोठा आहे. अशा दोन टोकांना सामावून घेणारा ईश्वर मध्यम परिणामाचा सारा विश्वप्रपंच परमात्मस्वरूपात सामावून जाण्यास अडचण नाही. विश्वातील कोणताही पदार्थ त्यामुळे परमात्म्याला सोडून असणे शक्य नाही. म्हणून आचार्य परमेश्वराचे वर्णन करताना म्हणतात तो अखंड, अनंत, अपरिच्छिन्न, अपरिमित आणि अद्वैत स्वरूपाचा आहे. स्तोत्र वाङ्‌मयात आचार्यांनी त्याचे वर्णन,

१) 'चिदानन्दसान्द्राय शान्ताय तुभ्यं...'

चिदानन्द हेच एक तुमचे लक्षण आहे. तुम्ही चिद्घन, आनंदघन आहात. तुम्ही अत्यंत शांत आहात.

२) 'जगज्जीवनं ज्योतिरानन्दरूपम्'

३) 'प्रसन्नं सदानन्दसंवितस्वरूपम् ।

४) नित्यानन्दं स्वसंवित् सुखयति यमिनो यत्तदव्यान्महो नः ।

५) आनन्दकन्दं हतपापवृन्दं.

अशाप्रकारे तो चिद्घन, आनंदघन, परमशांत, शिव, सुंदर, सदानंद, चिदानंद, आनंदकंद, स्वयंज्योति, इत्यादी लक्षणांनी वर्णिला आहे.

परमेश्वराचे परमसूक्ष्म स्वरूप हे मानवी दृष्टीच्या आकलनाच्या पलिकडचे आहे. तरीही भगवान श्रीहरी हे मध्यम परिणामाने नयनमनोहर अशा रमणीय रूपाने क्वचित शंख, चक्र, गदा, पद्म हातात घेऊन श्रीविष्णूच्या रूपाने तर कधी अर्धनारी नटेश्वराच्या रूपाने, क्वचित नंदिकेश्वराच्या सान्निध्यात त्रिशूल धारण करून उभे असलेले फणिभूषण भगवान शंकर, गळ्यात रुद्राक्ष माळा, मस्तकी गंगा, कमरेभोवताली व्याघ्रांबर, सर्वांगी विभूती चर्चिलेली अशा मोहक रूपात दर्शन देतात, तर क्वचित राजराजेश्वरी श्रीललितांबा महात्रिपुरसुंदरीच्या रूपाने प्रकट होतात, तर कधी मंगलमूर्ती श्रीगजाननाचे मंगलमय स्वरूपात प्रकट होतात तर तो विघ्नहर्ता, विघ्नराज, भवध्वंसहेतु, कृपाकोमल, रुणुझुणु, रुणुझुणु नाद करणाऱ्या घुंगरांच्या मंजुळ तालावर इकडे तिकडे भ्रमण करणारा, गणेश तांडव नृत्याच्या वेळी पद्मतालात पदन्यास करणारा, त्याच्या तुंदील तनूवर नागराज हाराप्रमाणे शोभणारा, दैदिप्यमान माणकाप्रमाणे किंवा प्रभातकालीन अरुणाप्रमाणे ज्याची कांती दैदिप्यमान आहे अशा वक्रतुंड, एकदन्त रूपात प्रकट होतो. सूर्यनारायण हे तर परमात्म्याचे प्रत्येक जीवाला दर्शनसुलभ रूप आहे. तो ब्राह्मणवेषाने प्रकट होतो तर कधी आपल्या सहस्त्ररश्मींनी सत्याला झाकून टाकतो, आदित्यमंडलात निवास करणाऱ्या पुरुषाच्या रूपाने प्रकट होतो. परमात्मा या भिन्न भिन्न रूपात प्रकट होतो तर मग आम्हाला का दिसत नाही. त्यामुळे ईश्वरी उपासना करताना मन सश्रद्ध होणे अवघड जाते. ईश्वराचे दर्शन होत नाही म्हणून साशंक होण्याचे कारण नाही. अशा अनेक गोष्टी आहेत ज्या आम्हाला प्रत्यक्ष दिसत नसल्या तरी आम्ही विश्वास ठेवतो. पृथ्वी सूर्याभोवती फिरते याचा अनुभव कोणी घेतला आहे. पण ते मान्य आहे. रात्री आकाशात तारे दिसतात, दिवसा मात्र दिसत नाहीत. मग दिवसा आकाशात तारेच नाहीत असे म्हणता येईल का? तसेच ईश्वराचे समजावे. सूर्याच्या प्रखर प्रकाशात त्याच्या तेजाने डोळ्यांची शक्ती कुंठित होते व त्यामुळे आकाशात तारे

असूनही दिसत नाहीत. त्याचप्रमाणे अज्ञान व मोह, माया व अहंकार यांच्या योगाने ज्यांची बुद्धी हतबल झाली आहे त्यांच्या समोर ईश्वर असूनही दिसत नाही.

'नहि अयं स्थाणोरपराध:, यदेनं अन्धो न पश्यति।' असे उदयनाचार्यांनी म्हटले आहे. आंधळ्या मनुष्याला खांब दिसत नाही हा काही त्या खांबाचा अपराध नाही. स्थाणु शब्दाचा अर्थ भगवान शंकर किंवा कूटस्थ परमात्मा असाही आहे. अंध शब्दाचा अर्थ अविवेकी लोकांना परमात्मस्वरूप कळले नाही तर तो काही परमात्म्याचा दोष नाही. परमेश्वराला पाहण्यासाठी विवेकाचा, भक्तीचा, वैराग्याचा डोळा असणे आवश्यक आहे. त्यासाठी प्रसिद्ध दृष्टांत आहेत. दुधात तूप असते, काष्ठात अग्नी असतो तो आपातत: दिसत नाही याचा अर्थ तो नाही असा होऊ शकत नाही. भक्ती हे ईश्वरसाक्षात्काराचे अत्यंत सोपे व उत्कृष्ट साधन आहे. ती भक्ती स्वाभाविकपणे विकसित व्हावी, कळत न कळत त्यासाठी साधन घडावे, सर्वांनाच ईश्वरदर्शनाची ओढ असेल असे नाही. परंतु जीवन सुखी-समाधानी राहण्यासाठी, मानसिक संतुलन विपरीत परिस्थितीत कायम टिकण्यासाठी तसेच जीवनात सामर्थ्य संपन्न, धैर्यवान राहण्यासाठी ज्या संस्कारांची आवश्यकता आहे ते संस्कार दैनंदिन पूजा-अर्चादी विधी संपन्न करतात त्यासाठी पंचायतन पूजेची योजना आहे. तत्त्व जरी समजले नाही तरी आचारधर्मातून तत्त्वापर्यंत जाण्याची सहज सोय होते. म्हणून दैनंदिन पूजाअर्चा विश्वास, श्रद्धा, आवड असो- नसो. त्याविषयी मन नि:शंक असो नसो तत्त्वत: मान्य असो नसो, पटो न पटो परंतु रोज पूजा एक आवश्यक दैनंदिन कर्म म्हणून केली पाहिजे. त्याचे लाभ कालांतराने कुटुंबाच्या दृष्टीने लक्षात येतात व मग महतीही पटते. पण तोपर्यंत आमचा पूजा-अर्चा यावर विश्वास नाही असे म्हणून ईश्वराशी संवाद साधणाऱ्या एका सुलभ साधनाचा अवलंब केला नाही असे होऊ नये, म्हणून घरात पंचायतन पूजा दररोज केली जावी. तिचा लाभ कुटुंबातील घटकांना केव्हा, कसा, कुठे, किती प्रमाणात होईल सांगता येत नाही. त्यामुळे भारतीय संस्कृतीने आचारधर्माला विशेष महत्त्व दिले आहे. तत्त्व समजेल तेव्हा समजेल पण तोपर्यंत आचारधर्म प्रामाणिकपणे आचरल्यास व्यक्ती योग्य मार्गावर राहण्यास व अधिकाधिक बिनधोक मार्गाने वाटचाल करण्यास साहाय्यकारी ठरते. भाग्याने पूजा-अर्चा या कर्माचरणात गोडी असेल तर उत्तमच आहे. परंतु ती तशी नसेल तर मनाला थोडेसे मारून मुटकून आणि बरेचसे आंजारून- गोंजारून पूजाविधीमध्ये गुंतवावे. त्यामुळे पूजेविषयी आवड निर्माण होईल. हळूहळू ईश्वरी सामर्थ्याचा प्रत्यय येईल. तसतशी गोडी वाढत जाईल. अभिरुची वाढेल तसे तसे मन त्यामध्ये तन्मय होईल. जशी जशी तन्मयता वाढेल तसा तसा चित्तामध्ये भगवत्स्वरूपाचा आविष्कार अधिक होईल. त्यासाठी भारतीय परंपरेत एक सुलभ साधन अवलंबलेले आहे ते म्हणजे पंचायतन पूजा.

ईश्वराला अनेक प्रमाणांनी पहाता येते. श्रुती आणि अनुभवी संत महात्मे यांची वचने हे सर्वात मोठे प्रमाण. ईश्वर हा 'विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता' म्हणजे तो सर्व विश्वाचा जनक असून त्रिभुवनाचेच नव्हे तर चुतर्दशभुवनात्मक ब्रह्माण्डाचे संरक्षणही करतो. तो 'नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानाम् ।' म्हणजे नित्य म्हणून समजल्या जाणाऱ्या पदार्थांपेक्षाही नित्य आहे व चेतनांनाही चैतन्य देणारा आहे. त्याचे सामर्थ्य अगाध आहे. ईश्वर हा सर्वसमर्थ आणि सत्यसंकल्प आहे. त्यामुळे तो कोणत्याही वेळी आवश्यकता वाटल्यास आवश्यक त्या कार्यासाठी आवश्यक ते रूप धारण करतो. वस्तुत: त्याचे संकल्पसामर्थ्य अपरिमित आहे. त्याला अवतार घेण्याचे काही कारण नाही. तरीही तो भक्तजनांच्या करिता दिव्य विग्रह धारण करून अलौकिक लीला करीत असतो.

ईश्वर सर्वज्ञ आणि सर्वसमर्थ आहे तर मग त्याने निर्माण केलेल्या सृष्टीत कोणी अत्यंत दरिद्री तर कोणी अत्यंत श्रीमंत आहेत, ही विषमता कशामुळे! ईश्वर निर्दय आणि भेदभावाने वागणारा आहे काय? असा प्रश्न निर्माण होतो. जीव हा आपल्या कर्माप्रमाणे सुख-दु:ख भोगत असतो. अपराध्याला त्याच्या गुन्ह्याप्रमाणे दंड करणारा न्यायाधीश कधी दोषी मानला जातो का? तसेच परमात्म्याचे आहे. तो आधी न्यायी आहे व नंतर दयाळू आहे. त्यामुळे कंसोद्धार पुतनोद्धार असे म्हणतात. कर्मानुरूप फल देणाऱ्या ईश्वराच्या ठिकाणी वैषम्याचा दोष येऊ शकत नाही. उलट तो परम दयाळू आहे. तो भक्तवत्सल आहे. त्याला इतिहास साक्षी आहे. इतिहास खरा कशावरून असे म्हटल्यास त्यास बाधक प्रमाण उपलब्ध होत नाही. यावरून बाधक प्रमाण उपलब्ध नसताना इतिहास खोटा म्हणायचा असेल तर मग सर्वच इतिहास खोटा आहे असे म्हणावे लागेल.

लौकिक व्यवहारात दयेचा अर्ज केल्यानंतर राष्ट्राध्यक्ष देखील योग्य वाटल्यास फाशीची शिक्षा रद्द करू शकतात. मग अखिल ब्रह्माण्डाचा नायक परमात्मा, त्याला अनन्यभावाने शरण गेल्यास तो आपल्या अपराधांची क्षमा करील यांत काय संशय! परमात्म्याचे तात्त्विक स्वरूप सत्य, ज्ञान, अनंत, नित्य, विज्ञान, ज्योती, स्वयंप्रकाश, निर्गुण, निराकार, निर्विकार, अपरिच्छिन्न, अपरिमेय, कूटस्थ, अचल, अलक्ष्य, निरंजन, सद्घन, चिद्घन, आनंदघन इत्यादी अर्थपूर्ण व मधुर शब्दांनी उपनिषदांत वर्णन केले आहे. याच एकमेव अद्वितीय विश्वव्यापी तत्त्वाचा आचार्यांनी प्रामुख्याने

पुरस्कार केला आहे. आचार्य हे सर्व विश्व तत्त्वत: एकजिनसी एकरूप मानतात. तथापि प्रत्ययाला येणाऱ्या सर्व व्यावहारिक भेदाचीही ते मोठ्या कुशलतेने उपपत्ती लावतात. अद्वैततत्त्वाला धक्का न लावता विश्व प्रपंचातील उपासना, भक्ती आदी गोष्टींची संगती आचार्य अतिशय उत्तमप्रकारे लावतात. निर्गुणाच्या अनुभूतीबरोबरच चित्तशुद्धीसाठी सगुण उपासनेचा पुरस्कार करणारे आचार्य अत्यंत सुंदरपणे पंचायतन पूजापद्धतीच्या रूपाने पंचमहाभूतांच्या उपासनेची संगती लावतात.

देवतांची रूपे अनेक आहेत. रुचिवैचित्र्याप्रमाणे आपल्याला रुचेल त्या कोणत्याही इष्टदेवतेची उपासना करावी. आचार्यांच्या मते सर्व देवता एकरूप आहेत. आचार्यांच्या स्तोत्र वाङ्मयात त्या त्या देवतेचे सगुण स्वरूप आणि पारमार्थिक स्वरूप वर्णन केलेले दिसते. गणेश देवता सामान्यत: पृथ्वीतत्त्वाची प्रतीकरूप देवता मानली जाते. त्याचप्रमाणे देवी शक्तिदेवता ही जलाचे प्रतीक आहे तर, सूर्यदेवता अग्नीउपासनेचे प्रतीक आहे. रुद्र, शिवदेवता वायुतत्त्वाची प्रतीकरूप देवता आहे तर भगवान विष्णू आकाशतत्त्वाची देवता आहे. अशाप्रकारे पंचमहाभूतांपासून निर्माण झालेल्या सृष्टीतील मानव पंचमहाभूतांची उपासना प्रतीकरूपाने करतो. या पाच उपासनांचे इष्टदेवतेला अनुसरून पाच प्रकार होतात. ते गाणपत्य, शाक्त, सौर, शैव आणि वैष्णव या नावाने ओळखले जातात. उपासनेचे फळ देण्याच्या संदर्भात प्रत्येक देवतेचे एक वैशिष्ट्य आहे आणि त्याच बरोबर ती देवता उपासकासाठी मनोवांच्छित पूर्ण करणारी तसेच मोक्षसुखाच्या अनुभवासाठी लाभदायी ठरणारी उपासना आहे. जसे गणपती ही विघ्ननाशक व ज्ञानदायक- विद्यादायक उपासना आहे. संकटांचा परिहार व्हावा व ज्ञानाची- विद्येची प्राप्ती व्हावी यासाठी विशेषरूपाने उपासना केली जाते. अथर्व जो स्थिर आहे. त्याच्याकडून अथर्व बुद्धी, आरोग्यसंपन्न शरीर आणि निश्चल मनाचे मागणे मागितले आहे. त्याचबरोबर भोवतालचे वातावरण प्रसन्न, अनुकूल असावे अशी अपेक्षा केली आहे. तर शक्तिदेवतेच्या उपासनेत वाईट गोष्टींचा परिहार आणि मंगल गोष्टींची प्राप्ती व्हावी यासाठी उपासना केली जाते. तर सूर्य उपासना ही गायत्री मंत्राच्या आधारे शरीर, मन, बुद्धी, सतेज आणि तेजस्वी असावे यासाठी केली जाते. गय म्हणजे प्राणांचे रक्षण करणारी देवता असा तिचा महिमा वर्णन केला आहे. तर शिवदेवता ज्ञान व वैराग्य प्रदान करते. विष्णुदेवता सर्व वैभवाची प्राप्ती करून देणारी आहे. आकाश या महाभूताची उपासना विष्णू स्वरूपात केली जाते व आयुरारोग्य, बल, तेजासहित प्राप्ती व्हावी यासाठी केली जाते. अशाप्रकारे अत्यंत अल्पशब्दात पंचायतन पूजा करता येते. हा वरवरचा फलाच्या अनुषंगाने देवताधिकाराचा विचार अत्यंत त्रोटक स्वरूपात केला.

गणपतीचे पूजन कोणत्याही मंगलकार्याच्या आरंभी केले जाते. कारण तो विघ्नहर्ता, विघ्नराजही आहे. तो आपल्या प्रेरणेने विघ्नांना प्रेरणाही देऊ शकतो व विघ्नांचे दमन व शमनही करू शकतो. गणेशापासून भुक्ती व मुक्तीही प्राप्त होते कारण तो यांचा नायक आहे. शारदेचाही अधिपती आहे. त्यामुळे विद्येच्या क्षेत्रात विशारद होण्यासाठी त्याचे ध्यान करावे असे पू. शंकराचार्य म्हणतात.

'भवति अथवा भवते इति भव:।' विश्वरूपाने जो नटतो त्याला भव असे म्हणतात. भव म्हणजे परमात्मा परब्रह्म. त्यालाच शिव, आदिनारायण, आदिविष्णु, भगवान्, वासुदेव गणाधीश, गुणाधीश इत्यादी नावांनी संबोधतात. विश्वाच्या आरंभी परब्रह्मतत्त्व पुरुषरूपाने नटले म्हणजे त्याला वरील नावांनी संबोधतात. तेच तत्त्व स्त्रीरूपाने नटले म्हणजे त्याला आदिमाया, महाशक्ती, महालक्ष्मी, महादेवी, शिव-शिवानी, मृड-मृडाणी, रुद्र-रुद्राणी, भव-भवानी, शर्व-शर्वाणी इत्यादी नावांनी संबोधतात. त्यांचा अर्थ मात्र एकच आहे, तो म्हणजे विश्वाच्या रूपाने नटणारे तत्त्व.

ईशस्वरूप असलेल्या शंकरांनाच भव असे म्हणतात. त्या भवाशी अभिन्न एकरूप असलेली शिवाची शक्ती भवानी होय. तिलाच दुर्गा, उमा, पार्वती असेही म्हणतात. तिलाच आचार्यांनी या स्तोत्रात महादेवी आणि राजराजेश्वरी असे म्हटले आहे. आचार्यांची उपास्य असलेली श्रीविद्या ती हीच होय. हिलाच त्रिपुरसुंदरी महात्रिपुरसुंदरी म्हणतात.

**सांब सदाशिव** – आचार्यांचे सांब सदाशिव हे परिपूर्ण परब्रह्म स्वरूप आहेत. केवळ कंठात रुद्राक्षमाळा किंवा हातात त्रिशूल आणि डमरू तसेच मस्तकी जटाभार किंवा कमरेभोवती व्याघ्रांबर इत्यादी चिन्हांनी अलंकृत असलेली परिच्छिन्न परिमित पार्वतीसह शंकरांची मूर्ती म्हणजेच सांब एवढाच अर्थ आचार्यांना अभिप्रेत नाही. तर साऱ्या विश्वप्रपंचाचा अधिष्ठाता मायासंवलित परब्रह्म परमात्मा म्हणजे सांब. माया ही त्याची अनिर्वचनीय शक्ती आहे व तिच्यामुळेच तो शक्तिमान् झाला आहे. त्याची शक्ती त्याच्याहून निराळी पहाता येत नाही व त्या शक्तीहून तोही निराळा दिसत नाही. म्हणूनच तत्त्ववेत्ते शक्ती आणि शक्तिमान यांच्यात अभेद मानतात. सांब हा शब्द देखील पार्वती आणि परमेश्वर यांच्यातील अभेदच व्यक्त करणारा आहे. 'अम्बया सहित: साम्ब:' अशी सांब शब्दाची व्युत्पत्ती आहे.

**भगवान विष्णू** – 'विश्' म्हणजे प्रवेश करणे. श्रीहरीने सर्व

विश्व अर्थात् विश्वातील स्थावर, जंगम प्राणिमात्रांचे देह निर्माण केले व त्यानंतर त्या सर्व देहात जीवरूपाने तोच प्रविष्ट झाला. थोडक्यात, सर्व विश्वाला व्यापणे, सर्व विश्व निर्माण करण्याचा संकल्प करून विश्व निर्माण करणे, सर्व विश्वाला प्रकाशित करणे किंवा प्रकाश देणे, विश्वामध्ये जीवरूपाने प्रवेश करून राहणे, विश्वाचे संगोपन करणे, प्रलयकाळी विश्वाला आत्मस्वरूपात लीन करून घेणे, हे सर्व करण्याला समर्थ एक भगवान श्रीविष्णूच आहे. असा हा श्रीविष्णू परिपूर्ण परब्रह्मच आहे.

आदिविष्णु भगवान, सृष्टीच्या स्थितिकालामध्ये कार्यपरत्वे अनेक रूपे धारण करतात. ही रूपे क्वचित् व्यक्तीच्या निमित्ताने असतात तर क्वचित् समष्टीच्या रूपाने असतात. समाजाच्या, राष्ट्राच्या उद्धाराकरिता असतात. निमित्तभेदाने परमेश्वराने कोणतेही रूप धारण केलेले असले तरी ते तत्त्वत: परब्रह्मस्वरूपच आहे. निर्गुण आणि सगुण ही दोन्ही रूपे एकाच परमेश्वराची आहेत. अवस्थाभेद एवढाच त्यात फरक आहे. अवस्थाभेदाने स्वरूपात भेद होत नाही.

अशाप्रकारे पंचायतन पूजाविधी, त्यामागील प्रेरणा, फलप्राप्तीचा विविध अंगांनी विचार, परमेश्वराचे पूजनच का आवश्यक याविषयी चिंतन व परमेश्वराच्या अनन्य भक्तीने मानवी जीवनातील संकटांचा परिहार होऊन अंततोगत्वा परमेश्वरप्राप्ती, या अंगांनी येथे पंचायतन पूजेविषयी स्पष्टीकरण जाणून घेण्याचा प्रयत्न केला. भगवत् पूज्यपाद शंकराचार्यांची भूमिका पंचायतन पूजेसंबंधाने काय आहे यासंबंधी त्यांच्या स्तोत्रवाङ्मयाच्या आधाराने जाणून घेण्याचा प्रयत्न केला. यातील जे स्वीकार्य वाटेल तो आचार्य वाङ्मयाचा महिमा आहे. जे अस्वीकार्य वाटेल ती लेखकाची दुर्बलता आहे. परंतु एक गोष्ट निश्चित आहे ती म्हणजे पंचायतनपूजा ही मानवाच्या कल्याणासाठी, वेदवाङ्मयाच्या आधाराने व संत आणि आचार्य यांच्या कृपेने लाभलेला अलौकिक निधीच आहे. परमेश्वरचरणी अनुग्रहासाठी विनम्र प्रार्थना करून लेखणीला विराम देते.

**सौ. कल्याणी नामजोशी**
१०१२/४ शिवाजी नगर, 'पुष्कराज' मित्र नगर, पुणे १६.
टे.नं. २५६५४८६६.

**संदर्भ ग्रंथ –**

१) भारतीय संस्कृतिकोश.
२) सुबोध स्तोत्र संग्रह. म.म. पांडुरंग गणेश गोस्वामी.
३) श्रीउपनिषदर्थ कौमुदी खंड ५वा, अ. दा. आठवले.

# आचार्य आणि ब्रह्मसूत्रांतर्गत चतुःसूत्री

**सौ. मनीषा भास्कर अभ्यंकर**

*एम.ए.संस्कृत गोल्डमेडलिस्ट,*
*ज्ञानेश्वरीचा गाढा अभ्यास. 'बापरखुमादेविवरु' अंकात अनेक लेख प्रकाशित*

आद्य शंकराचार्यांचा जन्म वैदिकधर्माच्या पुनः प्रस्थापनेसाठी होता. प्राचीन काळी भारतात बौद्धधर्माचा प्रभाव अतिशय वाढला होता. बौद्धधर्माला राजाश्रय सुद्धा मिळाला होता. त्यामुळे सर्व राजे, प्रजा बौद्धधर्माचे अनुयायी बनू लागले होते. लोकांनी स्वधर्म, स्वकर्म, यज्ञ वगैरेंचा त्याग केला होता. आत्मज्ञानाचा मार्ग बंद पडला होता. अशा पार्श्वभूमीवर इ.स.च्या आठव्या शतकात शंकराचार्यांचा जन्म झाला. त्यांनी जुन्या वैदिक धर्माचा प्रचार सर्व भारतात चालू केला. जणू प्रत्यक्ष शंकरच शंकराचार्यांच्या रूपाने वैदिक धर्माच्या प्रसारासाठीच अवतीर्ण झाले होते. आपल्या अवघ्या ३२ वर्षांच्या आयुष्यात त्यांनी जे अद्वितीय कार्य केले ते केवळ परमेश्वरालाच अवतार घेऊन करणे शक्य आहे. सामान्य मनुष्याच्या हातून असे कार्य घडणे केवळ अशक्य. त्यांनी पूर्वेला जगन्नाथपुरी येथे गोवर्धनपीठ, दक्षिणेला शृंगेरी येथे शृंगेरीपीठ, पश्चिमेला द्वारकेला शारदापीठ व उत्तरेला बदरीनारायण येथे ज्योति पीठ स्थापन करून तेथे अनुक्रमे त्रोटकाचार्य, हस्तामलकाचार्य, सुरेश्वराचार्य व पद्मपादाचार्य अशा चार शिष्यांची योजना केली. दशोपनिषदे, भगवद्गीता, ब्रह्मसूत्रे वगैरे ग्रंथांवर भाष्यग्रंथ, प्रकरण ग्रंथ, स्तोत्रवाङ्मय असा त्यांनी साहित्य समुदाय निर्माण केला.

अध्यात्मशास्त्राची परंपरा भारतात तीन-चार हजार वर्षे अखंडितपणे चालू आहे. वेदांमध्ये हे तत्त्वज्ञान उगम पावले व उपनिषदांमध्ये पूर्णतेला पोचले. उपनिषदे म्हणजे अध्यात्मशास्त्राचे भांडार आहे. तत्त्वज्ञानाच्या सर्व शाखांचा उगम उपनिषदांमध्ये दाखवता येतो. द्वैत, अद्वैत, एकेश्वर, अनेकेश्वर, निरीश्वर, चार्वाक अशा परस्परविरोधी तत्त्वज्ञानाची विचारधारा उपनिषदात पहावयास मिळते. त्यामुळे उपनिषदे म्हणजे तत्त्वज्ञानाचे आकर वाङ्मय आहे.

या दृश्य जगाचे अवलोकन करून त्याचे मूळ कारण काय यासंबंधी प्राचीन विचारवंतांनी जे व्यवस्थित मत प्रतिपादन केले त्यातून 'दर्शन' नामक तात्त्विक स्वरूपाच्या वाङ्मयाचा उगम व विकास भारतात झाला.

'दर्शन' हा शब्द 'दृश' धातूपासून बनला आहे. त्याचा अर्थ आहे पाहणे, भेटणे, डोळ्यांना गोचर होणे. पहाणे फार व्यापक असते. चर्मचक्षूने पहाणे हे जसे खरे, तसेच ज्ञानचक्षूने पहाणे हेही तितकेच, किंबहुना त्याहीपेक्षा खरे आहे. व्यावहारिक बुद्धीने पहाण्यापेक्षा सूक्ष्म बुद्धीने पहाणे हे श्रेष्ठ पहाणे आहे. शुद्ध बुद्धीने अंतिम तत्त्वाचे ज्ञान करून घ्यायचे व तर्काने त्याची व्यवस्थित मांडणी करावयाची याला 'दर्शन' असे म्हणतात. त्यामुळे दर्शन म्हणजे अंतिम तत्त्वाचे ज्ञान, साक्षात्कार असा अर्थ होतो.

भारतामध्ये **'षड्दर्शने'** हा शब्द लोकप्रिय आहे. १) न्याय, २) वैशेषिक, ३) सांख्य, ४) योग, ५) पूर्वमीमांसा, ६) उत्तरमीमांसा ही सहा शास्त्रे किंवा आस्तिक षड्दर्शने प्रसिद्ध आहेत. अंतिम तत्त्वाचे ज्ञान झाले की मोक्ष मिळतो ही गोष्ट सर्व दर्शनांना संमत आहे. त्यामुळे १) अंतिम तत्त्व कोणते, २) कोणत्या प्रमाणांनी त्याचे ज्ञान होते, ३) विचार पद्धतीसाठी तर्कशास्त्र, ४) आचार सांगणारे आचारशास्त्र अशा चार मुद्द्यांवर भारतीय दर्शनांनी कमी-अधिक भर दिला. अर्थात् प्रत्येक दर्शनाने ठरवलेले अंतिम तत्त्व वेगवेगळे आहे. न्यायशास्त्राच्या मते १६ पदार्थांचे ज्ञान झाले की मुक्ती मिळते, तर वैषेशिकांच्या मते ७ पदार्थांच्या ज्ञानाने. सांख्य द्वैती आहेत. प्रकृति-पुरुष याच्या विवेकाने मुक्ति मिळते असे ते सांगतात. ते ईश्वर मानीत नाहीत, तर योगदर्शन ईश्वर मानते. पूर्व-मीमांसा शास्त्र सांगते की कर्माने मोक्ष मिळतो तर उत्तर मीमांसा म्हणते की ब्रह्मज्ञानाने मोक्ष मिळतो. अंतिम तत्त्वाचे ज्ञान झाले की मोक्ष मिळतो हे सर्व दर्शनांना मान्य आहे. परंतु अंतिम तत्त्वाविषयी मात्र मतभेद दिसून येतात. जीव व जड ही दोन तत्त्वे, त्यांचे परस्पर संबंध, व्याख्या, गुणधर्म, पोटभेद, त्यांचे यथार्थ ज्ञान, ते ज्ञान होण्यास उपयुक्त साधने व प्रमाणे, ज्ञानाचे फल इत्यादि बाबतीत तत्त्ववेत्यांमध्ये मतभेद दिसून येत असले तरी जीव व जड या पदार्थांचे यथार्थ ज्ञान तेच तत्त्वज्ञान, ते तत्त्वज्ञान झाले की मोक्षप्राप्ती म्हणजे दुःखातून पूर्णतः निवृत्ति हा विचार सर्वांना सारखाच मान्य आहे.

तत्त्वज्ञानाच्या सर्व शाखांनी आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ उपनिषदांकडेच बोट दाखवले आहे.

संहिता, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद मिळून सर्वांना वेदवाङ्मय म्हणतात. प्रत्येक वेदाचे वरील चार भाग आहेत. वेदसंहितेमध्ये जे मंत्र आहेत त्यांचा विनियोग कोणत्या विधीत, कोठे व कशा रीतीने करायचा ही चर्चा त्या त्या वेदाच्या ब्राह्मण ग्रंथात आलेली असते. वानप्रस्थी लोकांनी जे यज्ञ करायचे त्याची माहिती आरण्यक ग्रंथात आलेली असते. यज्ञाचे अध्यात्मिक स्पष्टीकरण यात केलेले आहे. तसेच कर्ममार्ग व ज्ञानमार्गाचा समन्वय केलेला आहे. उपनिषदात आलेल्या विस्तृत ब्रह्मज्ञानाचे मूळ या आरण्यक ग्रंथात दिसून येते.

कर्म व ज्ञान या दोन्हींचे वर्णन वेदात आहे. त्यातील कर्मा विषयी चर्चा करण्यासाठी ब्राह्मणग्रंथ निर्माण झाले व ज्ञानचर्चा उपनिषदांनी केली.

धर्मग्रंथांमध्ये वेद हे आद्य धर्मग्रंथ आहेत. धर्माचे मुख्य प्रतिपादन वेदात केलेले आहे. धर्म हा साध्य व सिद्ध असा दोन प्रकारचा आहे. तप, यज्ञ, दान वगैरे पुण्यकारक कर्मे करून अधिकाधिक श्रेष्ठ स्थिती प्राप्त करून घेणे हा साध्य धर्म आणि उपनिषद्प्रणीत तत्त्वज्ञानाच्या सहाय्याने प्रथम परोक्ष व नंतर अपरोक्ष परब्रह्माचे चिंतन करणे हा सिद्धधर्म होय. ऋग्वेदादि ग्रंथांमध्ये साध्य धर्मांचे व उपनिषदांत सिद्ध धर्माचे प्रतिपादन केलेले आहे. उपनिषद् भागाला वेदान्त असे म्हणतात. कारण उपनिषदे वेदाच्या अंतिम भागात येतात. हाच वेदांचा मुख्य भाग आहे. यातील सिद्ध धर्म हा श्रेष्ठ आहे. साध्य धर्म हा सिद्ध धर्माचा अंगभूत आहे.

वेदसंहिता ही एखाद्या ऋषीची रचना नाही. शेकडो वर्षांच्या कालावधीतील अनेक ऋषींना स्फुरलेली सूक्ते वा मंत्र यात संग्रहीत केलेली आहेत. सहाजिकच वेदांचा सर्व अर्थ सर्व ठिकाणी सहज समजण्यासारखा नाही. काही ठिकाणी अर्थ मुळीच समजत नाही, काही ठिकाणी भलताच अर्थ मनात येतो तर काही ठिकाणी अर्थाबाबत संशय निर्माण होतो. त्यामुळे अज्ञान, विपर्यय व संशय दूर करून खऱ्या अर्थाचा निश्चय करण्याकरता मीमांसाशास्त्र प्रवृत्त झाले आहे. वेदातील साध्य धर्माचे प्रतिपादन करणाऱ्या वेदाच्या अर्थाचा निश्चय करण्यास पूर्वमीमांसा शास्त्र प्रवृत्त झाले आहे. त्यावर व्यासांचा शिष्य जैमिनी याचा १२ अध्यायी सूत्रग्रंथ आहे. सिद्ध धर्माचे प्रतिपादन करणाऱ्या वेदाच्या अर्थाचा निश्चय करण्याकरता उत्तर मीमांसाशास्त्र प्रवृत्त झाले आहे. यावर श्रीव्यासांनी चार अध्यायी सूत्रग्रंथ लिहिला आहे. त्यालाच ब्रह्मसूत्रे असे म्हणतात.

प्राचीन काळी सूत्रशैली ही ऋषींनी मुद्दाम विकसित केली होती. कारण हजारो वर्षांच्या कालावधीत साहित्य प्रचंड प्रमाणात निर्माण झाले होते व ते मौखिक परंपरेने टिकवावे लागत होते. कारण काहींच्या मते लिपी अस्तित्वात आलेली नव्हती. लिपी अस्तित्वात आल्यावर धूळपाट्यांच्या सहाय्याने मुले अक्षर ओळख करून घेत होती. कागद, शाई वगैरेंचा शोध लागला नव्हता. त्यामुळे टिकाऊ लेखन साहित्य नव्हते. त्यामुळे सर्व साहित्य पाठांतराने टिकवावे लागत होते. म्हणून पाठांतर करण्यास सोपे जावे म्हणून संक्षिप्त रूपात म्हणजेच सूत्ररूपात ग्रंथरचना करण्याचा कल वाढीस लागला. धर्म, तत्त्वज्ञान, व्याकरण, योग वगैरे सर्व क्षेत्रांत सूत्रग्रंथ लिहिले गेले. ग्रंथ सूत्ररूपात तयार करायचा व शिष्यांना तो स्पष्ट करून सांगायचा. त्यामुळे आचार्यांनी शिकवलेला ग्रंथ जसाच्या तसा बुद्धीत धारण करून ठेवणे यात शिष्यांची कसोटी लागत होती. एखाद्या पिढीनंतर हे सूत्रग्रंथही दुर्बोध होऊन जात असत. त्यामुळे त्यावर भाष्यग्रंथ लिहिणे ही काळाची गरज झाली. नंतर भाष्यग्रंथातील कठीण विषय समजावून देण्यास भाष्यग्रंथावर भाष्यग्रंथ लिहिले गेले व साहित्य गुणाकाराच्या पटीत वाढत गेले.

व्यासांनी ही जी चार अध्यायात उत्तर मीमांसा सूत्रे रचली त्यात ब्रह्माचा विचार केलेला असल्यामुळे या ग्रंथाला ब्रह्मसूत्र असे म्हणतात. ब्रह्मसूत्राचे मूळ असणारी उपनिषदे, ब्रह्मसूत्रे व वेदान्त संप्रदायात मान्य पावलेली भगवद्गीता हे तीन ग्रंथ म्हणजे वेदान्त दर्शनाची प्रस्थानत्रयी आहेत. प्रस्थान म्हणजे उगम. साऱ्या वेदान्त–विचारांचा उगम या तीन ठिकाणी पहावयाचा व वेदान्तविचारांची शुद्धता पारखायची हा साऱ्या वेदान्त्यांचा शिरस्ता आहे.

प्राचीन संस्कृत साहित्य हे मौखिक परंपरेने आलेले आहे. नंतरही लिखित स्वरूपात उपलब्ध झाले तरी विरामचिन्हांचा वापर केला जात नसे. त्यामुळे आपापल्या बुद्धिनुसार एक विचारधारा निश्चित करून वेदान्ताच्या आचार्यांनी प्रस्थानत्रयीवर आपल्या विचारधारेला अनुकूल अशी भाष्ये लिहिली. त्यामुळे त्यांनी सूत्रांचे विभाजन आपल्या मतानुसार केले. त्यामुळे ब्रह्मसूत्रे या एकाच ग्रंथावर विभिन्न मतांची भाष्ये लिहिली गेली. १) शांकरभाष्य, २) भास्करभाष्य, ३) रामानुजभाष्य, ४) निम्बार्कभाष्य, ५) माध्वभाष्य, ६) श्रीकण्ठभाष्य, ७) श्रीकरभाष्य, ८) वल्लभभाष्य, ९) विज्ञानभिक्षुभाष्य, १०) बलदेवभाष्य, ११) शक्तिभाष्य अशी अकरा भाष्ये या ग्रंथावर उपलब्ध आहेत. या व्यतिरिक्तही अनेक भाष्ये या ग्रंथावर लिहिली गेली असतील, पण ती कालौघात नष्ट झाली. अशाप्रकारे ब्रह्मसूत्रावर जरी अनेक भाष्ये लिहिली गेली असली तरी या सर्व भाष्यांमध्ये शांकरभाष्य हे सर्वांत प्राचीन भाष्य आहे.

उपनिषदांचा मुख्य सिद्धांत काय असावा याविषयी प्राचीन काळातल्या मोठ्यामोठ्या विद्वानांमध्ये तीव्र मतभेद होते. आठव्या शतकात होऊन गेलेल्या शंकराचार्यांनी अद्वैतवाद मांडला. ११ व्या शतकात रामानुजाचार्यांनी विशिष्ट द्वैतवाद मांडला. १२व्या शतकात निंबार्काचार्यांनी द्वैताद्वैतवाद मांडला. १३ व्या शतकातील मध्वाचार्यांनी द्वैतवादाचा पुरस्कार केला. तर १५ व्या शतकातील वल्लभाचार्यांनी विशुद्धाद्वैतवाद सिद्ध केला.

सर्व दर्शनात वेदान्तदर्शनामध्ये तत्त्वविचारांचा परिपूर्ण विकास झालेला आहे. व्यासांनी लिहिलेली उत्तरमीमांसा सूत्रे हा या दर्शनाचा सूत्रग्रंथ. व्यासांनी ही जी उत्तर मीमांसासूत्रे रचली त्यांना भिन्न अभिप्रायांनी भिन्न नावे देण्यात येतात.

१) वेदान्तसूत्रे- या सूत्रात उपनिषद् वाक्यांचा विचार केला असल्यामुळे व उपनिषदे म्हणजे वेदाचा अंतिम भाग असल्यामुळे या सूत्रांना वेदान्तसूत्रे म्हणतात.

२) ब्रह्मसूत्रे - या सूत्रात ब्रह्माचा विचार केला असल्यामुळे या सूत्रांना ब्रह्मसूत्रे म्हणतात.

३) शारीरक सूत्र- घाणेरडे शरीर ते शरीरक. त्या शरीरकामध्ये वास करणारा जीव तो शारीरक. हा शारीरक जीव ब्रह्मच आहे. हा सिद्धांत या सूत्रात सिद्ध केला असल्यामुळे यांना 'शारीरक सूत्रे' असे म्हटले जाते.

४) व्याससूत्रे - ही सूत्रे व्यासांनी रचली. म्हणून यांना व्याससूत्रे म्हणतात.

५) पाराशर्य-सूत्रे - व्यास हे पराशरांचे पुत्र. म्हणून त्यांचे नाव पाराशर. त्यांनी रचलेली म्हणून पाराशर्य सूत्रे असेही या सूत्रांना संबोधतात.

६) भिक्षुसूत्रे - भिक्षू म्हणजे संन्यासी. यांनीही अध्ययन-अध्यापन द्वारा वेदान्तसूत्रांचे रक्षण करणे हे सामाजिक कर्तव्य असते, संन्यासी या कर्तव्याचे पालन करतात म्हणून यांना भिक्षु सूत्रे असेही म्हणतात.

ब्रह्मसूत्रांचे एकूण चार अध्याय आहेत व एकूण ५५५ सूत्रे आहेत. प्रत्येक अध्याय चार पादांत विभागला आहे.

१) **समन्वयाध्याय -** पहिल्या अध्यायाचे समन्वयाध्याय असे नाव आहे. पहिल्या प्रस्तावनेच्या चार सूत्रानंतर ५ व्या सूत्रापासून प्रथमाध्याय पूर्ण होईपर्यंत वेदांचा समन्वय ब्रह्माचे ठिकाणी कसा होतो ते सिद्ध केले आहे. या अध्यायाच्या पहिल्या पादात 'ज्या वेदवाक्यांमध्ये ब्रह्माचे चिन्ह स्पष्ट आहे' अशा वेदवाक्यांच्या अर्थाचा निश्चय केला आहे. ज्या वेदवाक्यात ब्रह्माचे चिन्ह अस्पष्ट आहे अशा वेदवाक्यांच्या अर्थाचा निश्चय दुसऱ्या पादात केला आहे. अर्थाचा ज्या वेदवाक्यात ज्ञेय वस्तूचा विचार केला आहे. त्या वेदवाक्यांच्या अर्थाचा निश्चय तिसऱ्या पादात केला आहे. शेवटी चौथ्या पादांत वेदवाक्यातील 'अव्यक्त', 'अजा' वगैरे जी संशयित पदे आहेत त्यांच्या अर्थाचा निश्चय करून 'जगाचे मूळ कारण ब्रह्म आहे हे सांगण्याविषयी वेदांचे तात्पर्य आहे ही गोष्ट निश्चित केली आहे.

२) **अविरोधाध्याय -** ही निश्चित केलेली गोष्ट 'ब्रह्म हेच जगाचे मूळ कारण आहे' हे कोणत्याही प्रमाणांशी विरुद्ध नाही. हे सिद्ध करण्यासाठी दुसऱ्या अध्यायाला प्रारंभ केला आहे. म्हणून या दुसऱ्या अध्यायाचे नाव अविरोधाध्याय असे आहे. या अध्यायातील पहिल्या पादात सांख्य वगैरे स्मृतींशी विरोध येत नाही हे सिद्ध केले आहे. दुसऱ्या पादात इतर मतांशी विरोध आला तरी तो जुमानण्याचे कारण नाही. कारण 'ती मते दुष्ट आहेत' असे सिद्ध केले आहे. वास्तविक श्रुतींमध्ये कोठेही परस्पर- विरोध नाही; तरीही काही ठिकाणी परस्पर- विरोध भासतो. त्यामुळे श्रुतीने प्रतिपादन केलेल्या वस्तूच्या प्रामाण्याविषयी संशय निर्माण होतो. त्यामुळे व्यासांना श्रुतीमध्ये परस्परविरोध नाही हे स्पष्ट करावे लागले. म्हणून त्यांनी तिसऱ्या पादात पंचमहाभूते वगैरेंचे प्रतिपादन करणाऱ्या श्रुतीमध्ये भासणाऱ्या विरोधाचा परिहार केला आहे व लिंगशरीराचे प्रतिपादन करणाऱ्या श्रुतीमध्ये भासणाऱ्या विरोधाचा परिहार चौथ्या पादात केला आहे.

३) **साधनाध्याय -** श्रुतीने प्रतिपादन केलेली ब्रह्मविद्या कशी प्राप्त होते ते समजण्याकरता ब्रह्मविद्येची साधने सांगितली पाहिजेत. ती तिसऱ्या अध्यायात सांगितली आहेत. म्हणून या अध्यायाला साधनाध्याय असे म्हणतात. साधने सांगण्यापूर्वी ब्रह्मविद्येचा अधिकार कसा प्राप्त होतो ते सांगितले पाहिजे. अधिकार प्राप्त होण्यास वैराग्याची आवश्यकता आहे. जन्म-मृत्यूचे रहाटगाडगे सतत चालू असते हे कळल्याशिवाय वैराग्य उत्पन्न होणार नाही. म्हणून या अध्यायातील पहिल्या पादात परलोकगतीचा विचार केला आहे. वैराग्य प्राप्त झाल्यावरसुद्धा जीवाला आपले व परब्रह्माचे खरे स्वरूप समजल्याशिवाय ब्रह्मसाक्षात्कार होणार नाही. म्हणून दुसऱ्या पादात त्वंपदार्थ जो जीव व तत्पदार्थ जे ब्रह्म त्यांच्या खऱ्या स्वरूपाचे विवेचन केले आहे. नंतर ब्रह्मसाक्षात्काराच्या साधनापैकी सगुण ब्रह्मविद्या हे जे पहिले साधन त्याचा विचार तिसऱ्या पादात केला आहे. यात कोणत्या धर्मानी ब्रह्मचिंतन करावे ते सांगितले आहे. चौथ्या पादात निर्गुण ब्रह्मविद्येचा व तिच्या साधनांचा विचार केला आहे.

४) **फलाध्याय-** चौथ्या अध्यायात ब्रह्मविद्येच्या फलांचा

विचार केला आहे. म्हणून या अध्यायाला फलाध्याय असे म्हणतात. यातील पहिल्या अध्यायात ब्रह्मविद्या प्राप्त झालेल्या ज्ञानी मनुष्याचा पापपुण्याशी असलेला संबंध कसा दूर होतो ते सांगितले आहे. दुसऱ्या पादात ज्ञानी मनुष्याच्या प्राणोत्क्रमणाचा प्रकार वर्णिला आहे. तिसऱ्या पादात सगुण ब्रह्मोपासकाचा मार्ग व चौथ्या पादात मोक्षावस्था वर्णिली आहे.

ब्रह्मसूत्रातील पहिल्या अध्यायाच्या पहिल्या चार सूत्रांना चतु:सूत्री असे म्हणतात. कोणताही ग्रंथ लिहिताना त्या आधी प्रस्तावना लिहिण्याची पद्धत असते. सर्वसाधारणपणे प्रस्तावनेमध्ये ग्रंथाचा विषय काय आहे त्याची माहिती दिलेली असते. त्याचप्रमाणे ब्रह्मसूत्रांतर्गत ही चतु:सूत्री प्रस्तावनेसाठी आलेली आहे. ही सूत्रे वाचण्याविषयी लोकांची प्रवृत्ती व्हावी म्हणून ही सुरुवातीची चार सूत्रे आहेत. ज्या विषयांचे प्रतिपादन करावयाचे त्याची साधारण कल्पना व त्याच्या खरेपणाबद्दल जे प्रमाण असेल, त्याची साधारण माहिती याचे ज्ञान प्रस्तावनेवरून झाले म्हणजे मनुष्य आपली योग्यता पाहून तो ग्रंथ वाचण्यास प्रवृत्त होतो.

'अथातो ब्रह्मजिज्ञासा' या पहिल्या सूत्रात बादरायण व्यासांनी 'ब्रह्मविचार हा या शास्त्राचा विषय आहे' हे सांगितले. ब्रह्म म्हणजे काय आहे हे सांगण्याकरता दुसरे सूत्र आहे. 'जन्माद्यस्य यत:' निराकार, निर्गुण अशा ब्रह्माची कल्पना मनुष्याला करता येत नाही. डोळ्यासमोर असलेल्या एखाद्या वस्तूचा व ब्रह्माचा संबध सांगितला तर ब्रह्माची साधारण कल्पना करता येईल हे जाणून सूत्रकारांनी या सूत्रात जगाचा ब्रह्माशी कार्यकारणभावरूप संबंध सांगितला आहे. ब्रह्म हे या विस्तीर्ण जगाचे कारण आहे असे सांगितले आहे. आपल्या या मताच्या पुष्ट्यर्थ प्रमाण कोणते ते तिसऱ्या सूत्रात सांगितले. तिसरे सूत्र आहे 'शास्त्रयोनित्वात्.' सर्व प्रमाणांमध्ये मुख्य जो वेद तोच याविषयी प्रमाण आहे हे तिसऱ्या सूत्रात सांगितले. ब्रह्माच्या ठिकाणीच सर्व वेदांचा समन्वय होतो हे 'तत्तु समन्वयात्' या सूत्रात सांगितले आहे. व पुढे जी उपनिषदातील वाक्ये विरोधी भासतात, त्या वाक्यात वास्तविक विरोध नसून त्यांचा ब्रह्मामध्येच समन्वय होतो हे सिद्ध केले आहे. अशाप्रकारे चतु:सूत्रीत वेदान्त शास्त्राचा संक्षेपत: प्रतिपाद्य विषय सांगितलेला आहे. आचार्यांनी या सूत्रांवर कसे भाष्य केले आहे. त्याची रूपरेषा स्थूलमानाने मांडण्याचा या लेखात मी प्रयत्न करणार आहे.

श्रीशंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रावर 'ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ' हा खंडन- मंडनात्मक भाष्यग्रंथ सादर केला. हा ग्रंथ लिहिण्याचा आपला काय उद्देश आहे ते त्यांनी ग्रंथाच्या प्रारंभी उपोद्घातामध्ये स्पष्ट केले आहे. ते म्हणतात,

'एवम् अयम् अनादि:, अनन्त:, नैसर्गिक: अध्यास: मिथ्या- प्रत्ययरूप:, कर्तृत्वभोक्तृत्व प्रवर्तक: सर्वलोकप्रत्यक्ष: । अस्य अनर्थ हेतो: प्रहाणाय आत्मैकत्वविद्याप्रतिपत्तये सर्वे वेदान्ता: आरभ्यन्ते। यथा च अयम् अर्थ: सर्वेषां वेदान्तानां तथा वयम् अस्यां शारीरकमीमांसायां प्रदर्शयिष्याम:। म्हणजे- 'अशा रीतीने अनादिकालापासून चालत आलेला व पुढे अनंत कालापर्यंत चालणारा, स्वाभाविक, मिथ्याज्ञानस्वरूप तसेच आत्म्याच्या ठिकाणी कर्तृत्व व भोक्तृत्व उत्पन्न करणारा अध्यास सर्व लोकात प्रसिद्ध आहे. तेव्हा सर्व अनर्थांचा बीजभूत असणारा हा जो अध्यास त्याचा निरास होऊन लोकांना आत्मैक्याचे ज्ञान प्राप्त व्हावे या हेतूने सर्व वेदान्तग्रंथ प्रवृत्त झाले आहेत; आणि हाच सर्व वेदान्तग्रंथांचा अभिप्राय आहे, असे आम्ही शारीरक मीमांसेत सिद्ध करून दाखवू.

सर्व वेदान्त-ग्रंथात आत्मैक्य प्रतिपादलेले आहे, हे सिद्ध करण्याकरता आचार्यांनी ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहिले. अध्यासाचा निरास करून आत्मैक्य किंवा ब्रह्मैक्य त्यांनी सिद्ध केले. या सिद्धांतावर येणाऱ्या अनेक आक्षेपांचे खंडन करून स्वमत प्रस्थापित केले.

'अध्यास' या शब्दाच्या निरनिराळ्या लोकांनी निरनिराळ्या व्याख्या दिल्या असल्या तरी त्याचे सर्वसाधारण लक्षण किंवा व्याख्या म्हणजे 'एका वस्तूवर पूर्वी पाहिलेल्या दुसऱ्या वस्तूचा भास होणे' आत्मवस्तूवर अनात्मवस्तूंचा जो आरोप केला जातो तो दूर करून आत्मैक्य सिद्ध करणे हा आचार्यांचा ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहिण्याचा उद्देश आहे.

प्रत्येक मनुष्याला जे ज्ञान होते त्या ज्ञानात दोन गोष्टी असतात. एक ज्ञाता व दुसरी ज्ञेय. ज्याला ज्ञान होते त्याला ज्ञाता म्हणतात व ज्या वस्तूचे ज्ञान करून घ्यायचे त्या वस्तूला ज्ञेय म्हणतात. 'ज्ञाता' हा फक्त आत्मा आहे. ज्ञेय वस्तू मात्र विविध आहेत. ज्ञात्यालाच 'विषयी' असे म्हणतात व ज्ञेयाला 'विषय' असे म्हणतात. 'विषयी' असणारा आत्मा हा चिद्रूप म्हणजेच चैतन्यरूप आहे व 'विषय' म्हणजे ज्ञेय या सर्व जड वस्तू आहेत.

अर्थातच चेतन आत्मा व जड शरीर एकत्र येऊन सृष्टी आकाराला आली आहे. पण मनुष्याची दृष्टी बहिर्मुख असल्यामुळे त्याला जड सृष्टीचे ज्ञान होते, आत्मतत्त्वाचे मात्र ज्ञान होत नाही. आत्मतत्त्व इंद्रियगोचर नसल्यामुळे त्याच्या अस्तित्वाविषयीच तो शंका घेतो व देहच मी मानतो. आत्मतत्त्व व जड सृष्टी या दोन्ही गोष्टी प्रकाश व अंधकाराप्रमाणे परस्पर भिन्न आहेत. आत्मतत्त्व हे सत्य, नित्य आहे. तर जड सृष्टी अनित्य असत्य आहे. त्यामुळे या

परस्परविरोधी गोष्टींचा एकमेकांवर आरोप संभवत नाही. 'आत्मा म्हणजे मन आहे', किंवा 'मन म्हणजे आत्मा आहे' हे म्हणणे संभवत नाही. आत्मतत्त्व व जडसृष्टी या दोनही गोष्टी पूर्णत: भिन्न असतानाही तो भेद अज्ञानाने कळून येत नाही. म्हणून आचार्य म्हणतात की, 'अत्यन्तविविक्तयो: धर्मधर्मिणो: मिथ्याज्ञाननिमित्त: सत्यानृते मिथुनीकृत्य, अहम् इदम्, मम इदम् इति नैसर्गिक: अयम् लोकव्यवहार:।' आचार्य म्हणतात की, अज्ञानाने भेद कळून येत नसल्यामुळे परस्परांवर परस्परांच्या स्वरूपाचा व धर्मांचा आरोप (अध्यास) करून, खरे व खोटे यांचे बेमालूम मिश्रण करून, 'हे मी', 'हे माझे' अशा प्रकारचा मिथ्याज्ञानमूलक व्यवहार लोक स्वाभाविक रीतीने करत आले आहेत. किती प्रकारांनी मनुष्य अशा प्रकारचा अध्यास करतो तेही आचार्यांनी स्पष्ट केले आहे.

स्वत:चा पुत्र, पत्नी स्वस्थ असले म्हणजे मनुष्य आपण स्वस्थ आहोत असे मानतो व ते अस्वस्थ असले की तो स्वत:ला अस्वस्थ मानतो. अशाप्रकारे मनुष्य आपल्याहून दुसरे जे स्त्री, पुत्र त्यांचा व त्यांच्या अस्वास्थ्यादि धर्माचा म्हणजेच परकीय धर्माचा आपल्या आत्म्यावर अध्यास करतो. 'मी लठ्ठ, मी बारीक, मी काळा, मी गोरा, मी सुंदर, मी कुरूप' अशाप्रकारे मनुष्यदेहाच्या धर्मांचा आत्म्यावर अध्यास करतो. वास्तविक हे धर्म शरीराचे आहेत, आत्म्याचे नाहीत. 'मी मुका, मी आंधळा, मी बहिरा' अशा इंद्रियांच्या धर्माचा मनुष्य आत्म्यावर आरोप करतो. संकल्प, निश्चय, इच्छा, संशय हे वास्तविक अंत:करणाचे धर्म. त्यांचाही मनुष्य आत्म्यावर आरोप करतो. अंतकरणाच्या धर्मांप्रमाणेच अंत:करणाचा सुद्धा आत्म्यावर आरोप करतो. याच्या उलट अंत:करणादिकांवर त्या सर्वसाक्षी आत्म्याचा अध्यास करतो. आत्म्यावर बुद्धी वगैरेंचा आरोप केल्यामुळे पुरुषाला कर्तृत्व प्राप्त होते व बुद्धी वगैरेंवर आत्म्याचा अध्यास केल्यामुळे चैतन्य प्राप्त होते. अशाप्रकारचा हा अध्यास प्रत्येकाच्या अनुभवाचा आहे. किंबहुना असा अध्यास केला जातो म्हणूनच लोकव्यवहार चालू राहतात. मनुष्य संसारात गुंतत जातो. आणि नाना इच्छा पूर्ण करून घेण्यासाठी जन्म-मृत्यूच्या चक्रात अडकतो. व पुन्हा पुन्हा दु:ख भोगतो. या चक्रातून मुक्ती हवी असेल तर हे जे आत्मविषयक अज्ञान आहे ते दूर व्हायला हवे. सुख-दु:ख, जन्म-मृत्यू हे सर्व धर्म देहाचे आहेत, आत्मा या सर्वांपासून अलिप्त आहे, आत्मा हा कर्ता नाही, भोक्ता सुद्धा नाही, तर तो परब्रह्मस्वरूप आहे, हे आत्मैक्याचे ज्ञान लोकांना प्राप्त व्हावे, ही जी अविद्या वा अज्ञान आहे ते दूर व्हावे यासाठीच सर्व वेदान्तग्रंथ प्रवृत्त झाले आहेत, ही गोष्ट आपण या ब्रह्मसूत्रावरील शारीरक- मीमांसेत स्पष्ट करणार आहोत असे आचार्यांनी आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे.

या अध्यास विषयावर जे काही आक्षेप संभवतात, त्यांचेही त्यांनी खंडन केले आहे

चतु:सूत्रीतील पहिले सूत्र आहे 'अथातो ब्रह्मजिज्ञासा ।।१।। (अथ अत: ब्रह्मजिज्ञासा) 'आता म्हणून ब्रह्मजिज्ञासा' असा या सूत्राचा अर्थ दिसून येतो.

ग्रंथारंभी भगवंताचे मंगलाचरण करावे असा शिष्टसंप्रदाय आहे.

*ॐकारश्चाथशब्दश्च द्वावेतौ ब्रह्मण: पुरा ।*
*कण्ठं भित्त्वा विनिर्यातौ तस्मात्माङ्गलिकावुभौ ।।*

ॐकार व अथ हे दोन शब्द ब्रह्मदेवाच्या कंठातून प्रथमच बाहेर पडले. त्यामुळे हे दोन्ही शब्द स्वभावत:च मंगलकारक आहेत अशा अर्थाची स्मृति आहे. तेव्हा सूत्रकारांनी 'अथ' हा शब्द मंगलाचरणासाठी वापरला आहे की आणखी दुसऱ्या कोणत्या हेतूने वापरला असावा त्याची आचार्यांनी चर्चा केली आहे.

संस्कृतमध्ये अथ हा शब्द मंगलवाचक आहे, तसेच तो आरंभवाचक व आनंतर्यवाचकही. 'आपण आता ही गोष्ट करू या' असे आपण म्हणतो तेव्हा 'आपण या गोष्टीला सुरुवात करू या' असा 'आता' या शब्दाचा आरंभ असा अर्थ होतो तसेच 'ही गोष्ट झाली, आता ही गोष्ट करू या' असे म्हणतो तेव्हा तेथे क्रम अभिप्रेत असतो. एका गोष्टीनंतर दुसरी गोष्ट. म्हणजे आता या शब्दाचा आनंतर्य असा सुद्धा अर्थ होतो. मग सूत्रकारांनी येथे 'अथ' हा शब्द कोणत्या अर्थाने वापरला असावा?

आचार्यांच्या मते येथे अथ शब्दाचा मंगल या अर्थाचा वाक्यात अन्वय होत नसल्यामुळे मंगल असा अर्था घेता येत नाही. 'अथ' हा शब्द अन्य अर्थी योजून या शब्दाच्या श्रवणाने मंगल प्रयोजन सिद्ध होते, पण सूत्रार्थात मात्र मंगल हा अर्थ घेता येत नाही. तसेच आरंभ हा अर्थ सुद्धा घेता येत नाही. 'ब्रह्मज्ञानाच्या इच्छेचा आरंभ' असे म्हणणे योग्य नाही. कारण इच्छेचा आरंभ होत नसून, इच्छा झाली की ती वस्तू मिळविण्याच्या कृतीला प्रारंभ होतो. त्यामुळे आचार्यांच्या मते येथे 'अथ' शब्द आनंतर्यवाचक आहे.

मग कशानंतर ब्रह्मजिज्ञासा करायची असा प्रश्न उभा राहतो. वेदाध्ययनानंतर कर्मकांडाच्या ज्ञानानंतर ब्रह्मजिज्ञासा संभवत नाही याचे विवेचन केल्यावर ब्रह्मजिज्ञासेपूर्वी कशाची अपेक्षा आहे ते आचार्यांनी स्पष्ट केले आहे. आचार्य म्हणतात की, नित्य काय, अनित्य काय याविषयी विवेक, ऐहिक व पारलौकिक

फलभोगांविषयी तिरस्कार, शमदमादि साधनांची प्राप्ती व मोक्षाची इच्छा या चार गोष्टी प्राप्त झाल्या असतील तर ब्रह्मजिज्ञासा करावी. म्हणजे ब्रह्मज्ञान होऊ शकेल. अशाप्रकारे सूत्रातील 'अथ' शब्दाने ब्रह्मजिज्ञासेचा अधिकारी कोण ते सूत्रकारांनी सुचवले आहे. व्यवहारातही एखादी गोष्ट प्राप्त करण्यास ठराविक अधिकाराची अपेक्षा असते. उदा. १२ वी पास झालेला मुलगा मेडिकल किंवा इंजिनिअरची पदवी प्राप्त करून घेण्यास अधिकारी ठरतो. गाडी चालविण्याचा परवाना ज्याने प्राप्त केला आहे तोच मनुष्य गाडी चालवण्यास पात्र असतो. जी गोष्ट व्यवहारात तीच परमार्थात. कारण परमार्थ हे अनुभवण्याचे शास्त्र आहे. त्याचा अनुभव वैयक्तिक पातळीवर त्या त्या व्यक्तीच्या अधिकारानुरूप कमी-जास्त येणार आहे. येथे आत्मानात्मविवेक, ऐहिक व पारलौकिक फलाविषयी अनिच्छा, शमदमादि सद्गुण व मुमुक्षत्व ज्याच्याकडे आहे तोच ब्रह्मजिज्ञासेला लायक आहे, असे आचार्यांनी स्पष्ट केले आहे.

सूत्रातील दुसऱ्या 'अत:' या शब्दाने वर सांगितलेले साधनचतुष्टयच ब्रह्मजिज्ञासेला कारणीभूत होते, असे आचार्यांनी स्पष्ट केले आहे. 'तद्यथेह कर्मचित: लोक: क्षीयते एवम् एव अमुत्र पुण्यचित: लोक: क्षीयते' असे छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे. 'इहलोकी कर्माने प्राप्त केलेले फल जसे क्षय पावते तसेच परलोकी पुण्याने संपादन केलेले फलही नाश पावते' असे म्हटले आहे. त्याअर्थी आत्म्याखेरीज सर्व वस्तू अनित्य आहेत असा निश्चय होतो व त्या सर्व वस्तूविषयी वैराग्य प्राप्त होते. त्यामुळे साधनचतुष्टय हेच ब्रह्मजिज्ञासेला कारणीभूत आहे असे 'अत:' शब्दाने सांगितले आहे. 'अत:' या संस्कृत शब्दाचा म्हणून, या कारणास्तव असे अर्थ आहेत. ज्यामुळे अत: शब्द सुद्धा येथे हेतुबोधकच आहे.

सूत्रातील तिसरा शब्द आहे ब्रह्मजिज्ञासा. यातील ब्रह्म या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. ब्राह्मण जातीतील एक मनुष्य, जीव, वेद, ब्रह्मदेव इत्यादी अनेक अर्थ असता हा शब्द कोणत्या अर्थाने वापरला आहे असा प्रश्न निर्माण होतो. आचार्य म्हणतात की वरील कोणत्याही अर्थाने ब्रह्म शब्द वापरलेला नाही. कारण पुढच्या सूत्रात 'ब्रह्म' म्हणजे जगाची उत्पत्ती ज्यापासून होते ते 'ब्रह्म' असे सांगितले आहे. त्यामुळे सर्व जगाचे कारण असणारे ब्रह्मच येथे 'ब्रह्म' या शब्दाने विवक्षित आहे.

'ब्रह्मजिज्ञासा' हा ब्रह्माची इच्छा असा षष्ठी तत्पुरुष समास होतो. जिज्ञासा हे ज्ञा = जाणणे या धातूच्या इच्छार्थकापासून बनलेले नाम आहे. त्याचा अर्थ आहे जाणण्याची इच्छा. त्यामुळे 'ब्रह्मजिज्ञासा' शब्दाचा ब्रह्म जाणून घेण्याची इच्छा असा होतो. म्हणजे येथे 'ब्रह्म' हा शब्द जाणणे या शब्दाचे कर्म आहे. संस्कृत वाक्यरचनेत कारकविभक्तींखेरीज सर्व शब्दांची षष्ठी विभक्ती योजतात. मालक-मालकी संबंध, अवयव-अवयवी- संबध, नातेसंबंध हे षष्ठीने दाखवतात. उदा. माझे पुस्तक, माझा हात किंवा माझा मुलगा वगैरे. आचार्य म्हणतात की, येथे 'ब्रह्मण: इति कर्मणि षष्ठी, न शेषे' येथे ब्रह्मण: ही ब्रह्मन् शब्दाची जी षष्ठी विभक्ती आहे ती कर्मबोधक आहे. काय जाणून घ्यायचे आहे तर ब्रह्म जाणून घ्यायचे आहे. नुसतीच ब्रह्माची माहिती करून घ्यायची नाही तर त्याचा साक्षात्कार करून घ्यायचा आहे. ब्रह्माचे ज्ञान वेगळे व साक्षात्कार वेगळा. उपनिषद् वाक्यांवरून ब्रह्मज्ञान होते. म्हणजे ब्रह्म निर्गुण, निराकार वगैरे माहिती कळते. म्हणजेच Theory कळते. त्याचा तसा प्रत्यक्ष अनुभव घ्यावा लागतो. (Practical) तेव्हा उपनिषदातील ब्रह्माविषयी माहिती ऐकल्यावर ब्रह्मसाक्षात्कार हा पुरुषार्थ प्राप्त करावा. या ब्रह्म साक्षात्काराने सकल संसाराचे बीज जी अविद्या (अज्ञान) तिचा व तिच्यामुळे अनर्थाचा नाश होतो.

येथपर्यंत 'साधन- चतुष्टयानंतर ब्रह्माची जिज्ञासा करावी' असा पहिल्या सूत्राचा अर्थ आचार्यांनी स्पष्ट केला. पुढे आचार्यांनी एका शंकेचे खंडन करून हे 'जिज्ञासा प्रकरण' संपवले आहे.

शंका- शंका अशी आहे की ब्रह्म प्रसिद्ध आहे की अप्रसिद्ध? म्हणजेच ज्ञात आहे की अज्ञात आहे? प्रश्न असा उपस्थित केला आहे की कोणतेही उत्तर दिले तरी ब्रह्मजिज्ञासा करण्याचे कारण रहात नाही. ज्ञात आहे उत्तर दिले तर जी गोष्ट ज्ञात आहे तिची इच्छा करण्याचे कारण रहात नाही. व जी गोष्ट अज्ञात असते तिची इच्छा करताच येत नाही. दुसरा सूर्य अथवा चंद्र नाहीच तर 'मी तो पृथ्वीवरून पाहीन' अशी इच्छा करणे व्यर्थच असते.

यावर आचार्य उत्तर देतात की ब्रह्म हे प्रसिद्धच आहे. अप्रसिद्ध आहे असे म्हणता येत नाही. कारण ते जाणून घेण्याची इच्छा होते. 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' अशी श्रुती (वेदवाक्य) आहे. तसेच ते नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सर्वज्ञ, सर्वशक्तीने युक्त आहे असे वेदवचनांवरून कळते. वेदाने 'अयम् आत्मा ब्रह्म' असे म्हटले आहे. ब्रह्म हा सर्वांचा आत्मा असल्यामुळे त्याचे अस्तित्वही प्रसिद्ध आहे. कारण प्रत्येकाला 'मी आहे' असे आत्म्याच्या अस्तित्वाचे ज्ञान होतच असते. त्यामुळे ब्रह्म प्रसिद्ध आहेच. पण तरीही ते जाणून घेण्याची इच्छा असते कारण 'आत्मा म्हणजे ब्रह्म' हे ब्रह्माचे सामान्य स्वरूप माहीत असले तरी त्याच्या विशेष स्वरूपाविषयी मतभेद आहेत. कारण सामान्य लोक व चार्वाक विचारसरणीचे लोक म्हणतात की देह हाच आत्मा आहे. काही इंद्रियांना आत्मा मानतात तर काही मनाला आत्मा मानतात. ही तिन्ही मते वेदबाह्य आहेत. बौद्धामध्ये काही क्षणिक विज्ञानाला आत्मा मानतात तर काही शून्यालाच

आत्मा मानतात. नैयायिक व मीमांसक म्हणतात की, देहादिकाहून भिन्न असणारा आत्मा हा संसारी, कर्ता व भोक्ता आहे. तर कपिलांचे सांख्यशास्त्र मानणारे लोक म्हणतात की आत्मा हा केवळ भोक्ता आहे, कर्ता नाही. योगी म्हणतात की, भोक्त्याहून निराळा, सर्वज्ञ व सर्वशक्तिमान ईश्वर आहे असे म्हणतात तर वेदान्ती म्हणतात की, तो ईश्वर म्हणजे भोक्त्या जीवाचे आत्मस्वरूप आहे. असा 'मतामतांचा गलबला' झालेला आहे. पुन्हा प्रत्येक जण स्वत:च्या मत समर्थनार्थ वेदाकडेच बोट दाखवतो. अशा स्थितीत एखादा मनुष्य जर विचार न करता एखाद्या पक्षाचा स्वीकार करेल तर तो मोक्षरूपी फळाला मुकेल. इतकेच नाही तर आत्म्याला विपरीत स्वरूपाने जाणल्यास प्राणी संसाररूपी अंधकूपात पडेल. 'अन्धं तम: प्रविशन्ति, असूर्या नाम ते लोका...' इत्यादि श्रुतिवचनेच याला प्रमाण आहेत. म्हणून मनुष्याला मुक्त व्हावे असे वाटत असेल तर त्याला खरा आत्मा कोण व त्याचे ज्ञान कसे होते ते समजले पाहिजे. असे सांगून आचार्यांनी 'जिज्ञासा- अधिकरण' संपवले आहे.

पहिल्या सूत्रात ब्रह्म जाणावे असे सांगितल्यावर त्या ब्रह्माचे स्वरूप कसे असावे अशी आकांक्षा निर्माण होते. म्हणून ब्रह्माचे स्वरूप सांगणारे दुसरे सूत्र आहे, 'जन्माद्यस्य यत:' या जगाचे उत्पत्ती, स्थिती व नाश ज्याच्यापासून, ज्याच्यामुळे व ज्यामध्ये होतात ते ब्रह्म असे या सूत्रात ब्रह्माचे स्वरूप सांगितले आहे, असे आचार्यांनी आपल्या भाष्यात स्पष्ट केले आहे.

जन्माद्यस्य यत: = जन्मादि + अस्य + यत: असे तीन शब्द या सूत्रात आहेत. त्यात जन्मादि हा तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि समास आहे. विग्रह आहे जन्म (उत्पत्ति:) आदि: अस्य इति । जन्म म्हणजे उत्पत्ती ज्याच्या आदि सुरुवातीला आहे तो जन्मादि. म्हणून जन्मादि शब्दाने उत्पत्ती, स्थिती व नाश या तिन्हींचा बोध होतो. येथे जन्म= उत्पत्तीचा प्रथम निर्देश केला ते वस्तुस्थितीला धरूनच आहे. प्रथम उत्पत्ती, मग स्थिती व नंतर नाश हा क्रम सर्वांच्या अनुभवाचा आहे व तैत्तरीय उपनिषदात सुद्धा असेच म्हटले आहे की 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते'. उत्पत्ती, स्थिती व नाश कोणाचे ते 'अस्य' या पदाने सांगितले आहे. अस्य = ह्याचे. ह्याचे या शब्दाने जगरूपी वस्तूचा निर्देश केला आहे. यत: हा शब्द कारणबोधक आहे. यत:= ज्यापासून. त्यामुळे सूत्राचा अर्थ असा होतो (यत:) ज्यापासून (अस्य) जगाची उत्पत्ती, ज्याच्यामुळे स्थिती व ज्यामध्ये लय होतो ते ब्रह्म आहे.

ब्रह्मजिज्ञासा करावी म्हटल्यावर या सूत्रात ब्रह्माचे स्वरूप सांगितले. यास्कांनी जे पदार्थाचे जन्म, अस्तित्त्व, परिणाम, वृद्धी, अपक्षय व विनाश हे सहा विकार सांगितले त्यांचा अंतर्भाव उत्पत्ती, स्थिती व लय तिघातच होतो हे स्पष्ट केल्यानंतर आचार्यांनी सूत्रात जे जगाचे कारण ब्रह्म आहे असे म्हटले आहे ते कोणत्या प्रमाणाच्या आधारे म्हटले आहे त्याची चर्चा केली आहे. आचार्य म्हणतात की, ही गोष्ट या सूत्रात अनुमानाने सांगितली नाही तर सूत्रकारांनी हे लक्षण श्रुतीला अनुसरून केले आहे. कारण वेदान्तवाक्यरूपी पुष्पे एकत्र गुंफणे हाच मुळात सूत्रांचा उद्देश आहे. तैत्तिरीय उपनिषदात सांगितले आहे की भृगूंना त्यांचे वडील वरुण यांनी उपदेश केला की ज्याच्यापासून ही सर्व भूते उत्पन्न होतात, ज्याच्या योगाने ते जिवंत राहतात व विनाशसमयी ज्याच्यात लीन होतात ते ब्रह्म. त्याच उपनिषदात पुढे म्हटले आहे की आनंदापासून ही सर्व भूते उत्पन्न होतात. उत्पन्न झालेली भूते आनंदानेच जिवंत राहतात व प्रलयसमयी आनंदात लीन होतात. अशाप्रकारे ब्रह्म हे शब्द प्रमाणानेच कळते. ते इंद्रियप्रत्यक्ष नसल्यामुळे अनुमानानेही कळणार नाही. श्रुतीने केलेल्या सिद्धांताला अनुमानाने बळकटी येत असेल तरच अनुमान ग्राह्य आहे असे श्रुतीनेच सांगितले आहे. दुसऱ्या सूत्रावरील आचार्यांच्या भाष्याचा असा भावार्थ आहे.

तिसरे सूत्र आहे शास्त्रयोनित्वात् ।

सूत्राचा अर्थ असा आहे की ब्रह्माला सर्वज्ञसदृश ऋग्वेदादि शास्त्रांचे योनित्व म्हणजे कारणत्व असल्यामुळे ते सर्वज्ञ आहे.

पहिल्या सूत्रात ब्रह्म जाणून घ्यावे असे सांगितले. दुसऱ्या सूत्रात ब्रह्माचे लक्षण सांगितले की जाणायचे ब्रह्म कोणते तर जगाची उत्पत्ती, स्थिती व नाश ज्यामध्ये होतो ते ब्रह्म व ते जाणून घ्यायचे आहे. या सूत्रात ब्रह्म हे जगाचे कारण आहे असे सांगितले होते. ब्रह्म हे कारण व जग हे त्याचे कार्य.

कारणे दोन प्रकारची असतात. १) उपादान कारण. २) निमित्त कारण. उदा. कुंभार मातीपासून मडके बनवतो. येथे मडके हे कार्य आहे. एखादी वस्तू ज्यापासून निर्माण होते व नाश पावल्यावर ज्यामध्ये लय पावते, त्याला उपादान कारण म्हणतात. म्हणून माती हे उपादान कारण आहे. कारण घट मातीतून निर्माण होतो व मातीतच लय पावतो. कुंभार हे घटाचे निमित्त कारण आहे. पण येथे जगद्रूपी कार्याच्या बाबतीत ब्रह्मच उपादान कारण व निमित्त कारण आहे. जग ब्रह्मामधूनच निर्माण होते, ब्रह्मामध्येच विलीन होते म्हणून ब्रह्म उपादान कारण तर ब्रह्मच जग निर्माण करते म्हणून ते निमित्त कारण सुद्धा आहे. यावरून ब्रह्म सर्वज्ञ आहे हेही स्पष्ट होते. कारण ब्रह्म चेतन आहे व कोणत्याही चेतनाची निर्मिती ही ज्ञानपूर्वक असते. उदा. कुंभार घट निर्माण करतो तेव्हा त्या घटाचा आकार कुंभार आधीच जाणत असतो व तो तसतशा आकाराचे घट बनवतो. चेतन ब्रह्म जगाचे कारण आहे. त्यामुळे तेही सर्वज्ञ आहे.

आता चेतन ब्रह्म, हे जगाचे कारण असणारे ब्रह्म सर्वज्ञ आहे. हे जरी दुसऱ्या सूत्रावरून कळत असले तरी तीच गोष्ट पुष्टिकरणासाठी या तिसऱ्या सूत्रात सांगितली आहे. ब्रह्म सर्वज्ञ आहे कारण ऋग्वेदादि शास्त्राचेही ते मूळ कारण आहे. वेदांना ग्रंथत: व अर्थत: सुद्धा मोठेपणा आहे. वेद हिताचा उपदेश करतो म्हणून त्याला शास्त्रत्व आहे. त्याला अनेक विद्यास्थानांचे साहाय्य आहे. वेदांमध्ये अबोधकत्व नाही. बोध करणे हा त्याचा धर्म आहे. त्यामुळे त्याचे प्रामाण्य प्रदीपवत् आहे. दिव्याप्रमाणे तो सर्व विषय प्रकाशित करतो. अशाप्रकारे सर्वार्थप्रकाशनसामर्थ्य त्याच्याकडे असल्यामुळे तो जवळ जवळ सर्वज्ञच आहे. येथे आचार्यांनी वेदाला सर्वज्ञकल्प हे विशेषण योजले आहे. सर्वज्ञकल्प = जवळ जवळ सर्वज्ञ. कारण वेद अचेतन आहे. अशा जवळ जवळ सर्वज्ञच असणाऱ्या वेदाची उत्पत्ती चेतन ब्रह्मापासून झाली आहे. 'अस्य महतो भूतस्य नि:श्वसितम् एतद् यद् ऋग्वेद:' असे बृहदारण्यक उपनिषदात म्हटले आहे. ऋग्वेद वगैरे या महापुरुषापासून झाले आहेत. या बृ. उपनिषदातील वाक्यावरून ब्रह्माकडे वेदांचे स्रष्टुत्व येते. त्यावरून ब्रह्माचे सर्वज्ञत्व व सर्वशक्तिमत्व सिद्ध होते.

ब्रह्म सर्वज्ञ आहे हे दुसऱ्या सूत्रामधून अनुमानाने कळले होते. ते आचार्यांनी तिसऱ्या सूत्राने सिद्ध करून दाखवले.

चतु:सूत्रीतील शेवटचे सूत्र आहे 'तत्तु समन्वयात्.'

सूत्राचा अर्थ असा आहे की ते ब्रह्म कशावरून अवगत होते असा जर प्रश्न असेल तर त्याचे या सूत्रात असे उत्तर दिले आहे की, वेदान्तशास्त्रावरून सर्व वेदान्ताचा तात्पर्याने ब्रह्मामध्येच अन्वय होतो, त्यावरून कळून येते की, ब्रह्म वेदान्तशास्त्रावरून कळून येते.

या सूत्रावर भाष्य लिहिताना आचार्यांनी या सूत्राच्या 'ब्रह्म वेदान्तशास्त्रावरून कळून येते' या सिद्धांतावर येणाऱ्या विविध आक्षेपांचे खंडन केले आहे.

मीमांसकांचा असा आक्षेप आहे की वेदाचा उद्देश हा कोणत्या तरी कर्माचे प्रतिपादन करणे हा आहे. ज्या वेदवाक्यात प्रत्यक्ष कर्माचे प्रतिपादन केलेले नसले तरी ती वाक्ये कर्माला अंगभूत कर्ता, देवता इत्यादि गोष्टींचे प्रतिपादन करतात. त्याप्रमाणे वेदवाक्यात जे ब्रह्माचे प्रतिपादन आलेले आहे ते ज्ञानरूपी कर्माला अंगभूत आहे असे मानले पाहिजे. ब्रह्माचे स्वतंत्ररीतीने प्रतिपादन केलेले नाही. ब्रह्म ही सिद्ध वस्तू आहे असे वेदान्ती म्हणतात तर मीमांसक विचारतो की सिद्ध वस्तू ही प्रत्यक्षादि प्रमाणांवरून अनुभवता येते. त्यामुळे सिद्ध वस्तूचे प्रतिपादन करण्याची आवश्यकताच नाही. त्यातूनही सिद्ध वस्तूचे प्रतिपादन करायचे असेल तर ती वस्तू स्वीकारावी किंवा तिचा त्याग करावा एवढ्या संदर्भातच प्रतिपादन करता येईल. पण आत्मा (ब्रह्म) हे प्रत्यक्षादि प्रमाणांवरून कळत नाही किंवा त्याचा स्वीकार अथवा त्याग सुद्धा संभवत नाही. म्हणून मीमांसकाला म्हणावयाचे आहे की वेदवाक्ये ही ब्रह्माचे स्वतंत्रपणे प्रतिपादन करत नाहीत तर ज्ञानरूपी कर्माला अंगभूत अशा रीतीने प्रतिपादन करतात. थोडक्यात ब्रह्माला शास्त्र प्रमाण नाही असे मीमांसकाचे मत आहे.

आचार्य याचे खंडन करताना म्हणतात की ही गोष्ट बरोबर नाही. जगाच्या उत्पत्तिस्थिती यांचे कारण व सर्वशक्तिमान असणारे ब्रह्म हे शास्त्रगम्यच आहे. कारण उपनिषदांत अशी अनेक वाक्ये आहेत की त्यामध्ये ब्रह्माचे स्वतंत्र रीतीने प्रतिपादन केलेले आहे. त्या वाक्यांचा कर्माशी कोणत्याही प्रकारचा संबंध नाही. उदा. छांदोग्य उपनिषद म्हणते, 'सदेव सोम्येदमग्र आसीत् । एकमेवाद्वितीयम् ।' म्हणजे, 'हे सोम्य पूर्वी हे एक सत्च होते आणि ते एक व अद्वितीय असे होते.' ऐतरेयोपनिषदात म्हटले आहे 'आत्मा वा इदमेक एकाग्र आसीत्' म्हणजे 'हे पूर्वी खरोखर एक आत्माच होता.' बृहदारण्याकात म्हटले आहे, 'अयमात्मा सर्वानुभू:' म्हणजे हा आत्मा म्हणजेच ब्रह्म सर्वसाक्षी आहे. अशी अनेक वाक्ये उपनिषदात आहेत की त्यांचा रोख ब्रह्माचे प्रतिपादन करण्याकडे आहे, कर्माचे प्रतिपादन करण्याकडे नाही. ब्रह्म ही सिद्ध वस्तू असली तरी ती प्रत्यक्षादि प्रमाणांचा विषय होत नाही. कारण छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे की, 'तत्त्वमसि' म्हणजे 'ते ब्रह्म तू आहेस.' ही गोष्ट प्रत्यक्षादि प्रमाणावरून कळणारच नाही तर शास्त्रावरूनच कळणार. 'ब्रह्म हा सर्वांचा आत्मा आहे' अशा ज्ञानाने सर्व क्लेशांचा नाश होऊन मोक्ष मिळतो. आणि 'सर्व काही ब्रह्म आहे' असे एकत्वाचे ज्ञान झाल्यावर द्वैताचा नाशच होतो, तर त्याज्य ग्राह्य या द्वैतातल्या क्रिया उरतीलच कशा? मथितार्थ असा की वेदान्तशास्त्र आत्मज्ञान करून मोक्षप्राप्ती करून घेण्यास सांगते व आत्मज्ञानाने मोक्ष मिळतो हे सिद्ध असताना ब्रह्माला शास्त्रप्रामाण्य आहे हे सिद्धच होते.

वृत्तिकारादिकांचा आक्षेप आहे की 'ब्रह्माला शास्त्रप्रामाण्य आहे, हे मान्य आहे. पण असा शास्त्रवचनात ज्ञानाचा विधी सांगितलेला असतो. उदा. स्वर्ग मिळवणाऱ्याने यज्ञ करावा तसे मोक्ष हवा असेल तर ब्रह्मज्ञान मिळवावे. म्हणजे ब्रह्मज्ञान हे एक साधन या स्वरूपात सांगितले आहे. आचार्य याचे खंडन करताना म्हणतात की, कर्मविद्या व ब्रह्मविद्या यांच्या फलातच मुळात फरक आहे. श्रुति अथवा स्मृति यांनी सांगितलेले कायिक, वाचिक, मानसिक अशा प्रकारचे जे कर्म त्याला धर्म म्हणतात आणि 'अथातो धर्म जिज्ञासा' या मीमांसा सूत्रात कर्माची मीमांसा केली आहे. त्या

शास्त्राने सांगितलेली हिताहितरूपी धर्माधर्माची सुख-दु:खे ही प्रत्यक्ष फले आहेत व ती मनुष्य कायावाचामनाने उपभोगतो. ती फले, विषय व इंद्रिये यांच्या संयोगातून निर्माण होतात. आणि या सर्व कर्मफलांचा भोग ब्रह्मदेवापासून स्थावर जंतूंपर्यंत सर्वांना भोगावा लागतो. वेदाध्ययन केलेला मनुष्य धर्मजिज्ञासेला पात्र ठरतो. अशी पात्रता ब्रह्मजिज्ञासेला आवश्यक नाही. कर्माकर्माची सुख-दु:खे प्राप्त होतात तर मोक्ष सुख-दु:खातीत आहे. अतिंद्रिय आहे. 'ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति' (जो मी ब्रह्म आहे असे जाणतो, तो ब्रह्मच होतो), क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे' (त्या ब्रह्माचे ज्ञान झाल्यावर त्याची सर्व कर्मे नष्ट होतात), तत्र को मोह: क: शोक: एकत्वमनुपश्यत:' (जो सर्व एक आहे असे पहातो त्याला शोक व मोह कोठून)' इत्यादि श्रुतींवरून ब्रह्मजिज्ञासेचे मोक्ष हे फळ दिसून येते. तेव्हा सिद्ध वस्तू जे ब्रह्म त्याचे प्रतिपादन वेदात स्वतंत्रपणे केलेले नाही असे म्हणणे योग्य नाही.

ब्रह्म जर कर्माला अंगभूत असते तर कर्माला अंगभूत अशा गोष्टींचा पूर्वमीमांसा शास्त्रातच विचार जैमिनीने केलेला आहे. मग त्यांना निराळी उत्तर मीमांसा रचण्याचे कारणच नव्हते. वेदात ज्ञान व कर्म अशा दोन वेगवेगळ्या शाखा आहेत. त्यातील कर्माचे विवेचन पूर्वमीमांसेने केले. ज्ञानाची मीमांसा करण्यासाठीच व्यासांनी उत्तरमीमांसा शास्त्र रचले व त्यात वेदांचा ब्रह्माचे ठिकाणी समन्वय दाखवून जीवब्रह्मैक्याच्या ज्ञानाने मोक्ष कसा मिळवायचा त्याचे मार्गदर्शन केले आहे.

**टीप** – (प्रस्तुत लेख हा केवळ ब्रह्मसूत्र व त्यातील चतु:सूत्रीवर आचार्यांनी कशा प्रकारचे विवेचन केले आहे याची सामान्य वाचकाला तोंडओळख व्हावी या दृष्टिकोनातून लिहिला आहे. अर्थातच यात चतु:सूत्रीतील भावार्थ दिला आहे. आचार्यांनी ज्या ज्या मतांचे खंडन केले आहे ती सर्व मते दिलेली नाहीत. काही मुख्य मते व एकूण संस्कृत साहित्यातील खंडन मंडनात्मक भाष्याचे स्वरूप कसे असते त्याची ओळख करून द्यावी एवढा या लेखामागील नम्र हेतू आहे.)

**– सौ. मनीषा भास्कर अभ्यंकर**
'राम-जानकी'- भोकरे कॉलनी, चंदनवाडी,
मिरज – ४१६४१०.
फोन (०२३३) २२११४९७
मोबा. ९४२२०९४२४५

# सर्ववेदांतसिद्धांत सारसंग्रह ज्ञानाच्या सात भूमिका

**प्रा. डॉ. के. वा. आपटे**

*शिवाजी विद्यापीठात एम्फिल व पीएचडी साठी मार्गदर्शक. मुंबई व शिवाजी विद्यापीठात पदव्युत्तर वर्गास संस्कृत व अर्धमागधी विषयांचे अध्यापन. उपनिषदे, ब्रह्मसूत्र, भगवद्‌गीता, शंकराचार्यांचे ग्रंथ इत्यादि अनेक विषयांवर ५० नियतकालिकांतून लेखन. या व्यतिरिक्त अनेक ग्रंथ प्रकाशित.*

आद्य शंकराचार्यांनी आपल्या केवलाद्वैतवेदांत मनाचे स्पष्टीकरण करण्यास काही उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि भगवद्‌गीता यांवर भाष्ये लिहिली. तसेच त्यासाठी त्यांनी अनेक लहानमोठे प्रकरण ग्रंथही रचले. त्यांच्या एकूण ग्रंथांची संख्या दोनशेपर्यंत आहे असे म्हणतात. त्यांच्या प्रकरण ग्रंथांमध्ये एका श्लोकापासून एक हजार श्लोकांपेक्षा अधिक श्लोक असणारे ग्रंथ आहेत. एक हजार सहाशे श्लोक असणारा त्यांचा सर्व वेदांत-सिद्धांत-सार-संग्रह असे नाव असणारा एक ग्रंथ आहे. हा ग्रंथ एक ब्रह्मसाक्षात्कारी गुरू आणि एक मुमुक्षु शिष्य यांच्या संवादाच्या चौकटीत बसविलेला आहे. त्यात अधूनमधून शिष्याचे काही प्रश्न येतात आणि गुरूने त्या प्रश्नांना दिलेली उत्तरे येतात.

या ग्रंथात केवलाद्वैत व वेदांताचे विवेचन जवळ-जवळ संपूर्ण झाल्यावर, सद्‌गुरूंच्या कृपेने आणि शिष्याच्या प्रयत्नाने शिष्य ब्रह्मस्वरूप होतो. (श्लोक ९२७), शिष्य हा नित्यानंद आत्मस्वरूप होतो (श्लोक ९३०) म्हणजे तो जीवन्मुक्त होतो असे या ग्रंथात सांगितले आहे. तथापि इतर मुमुक्षु लोकांना उपयोग व्हावा या दृष्टीने शिष्य गुरूला म्हणतो, ''जीवन्मुक्तस्य भगवन् अनुभूतेश्च लक्षणम्। विदेहमुक्तस्य च मे कृपया ब्रूहि तत्त्वतः।।'' (९३७) ''हे भगवान् गुरो, जीवन्मुक्त, (ब्रह्माचा) अनुभव आणि विदेहमुक्त यांचे स्वरूप मला कृपया सांगा' या विधानावर उत्तर देताना मुमुक्षु ज्या टप्प्यांतून जात जात शेवटी जीवन्मुक्त होतो, ते टप्पे गुरू कथन करतो व त्यांना तो ज्ञानभूमिका (श्लोक ९३८) असे म्हणतो. पुढे ज्ञानभूमिका या शब्दाऐवजी गुरू 'ज्ञानभूमी' (श्लोक ९३९), 'दशा' (श्लोक ९४५), 'भूमिका' (श्लोक ९४६-९४८), 'स्थिती' पाठभेदाने 'गती' (श्लोक ९४८) आणि 'अवस्था' (श्लोक ९५८) असेही शब्द वापरतो. गुरूने वापरलेल्या या शब्दांवरून एक लक्षात येते की, आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वी आणि झाल्यानंतर मुमुक्षूची जी मानसिक स्थिती अथवा अवस्था असते ती ज्ञानभूमिका या शब्दाने अभिप्रेत होते. शेवटची ज्ञान-भूमिका ही जीवन्मुक्ताची स्थिती अथवा अवस्था आहे.

आता यापुढे या ज्ञानभूमिका मांडणारे मूळ श्लोक, त्यांचे अर्थ, आणि त्यांचे स्पष्टीकरण दिले आहे. तसे करताना मूळ ग्रंथातील श्लोकांचे क्रमांक न देता, एक- दोन असे अनुक्रमांक दिले आहेत, हे लक्षात असावे.

**ज्ञानभूमिका : संहिता, भाषांतर व स्पष्टीकरण**

(१)

***वक्ष्ये तुभ्यं ज्ञान-भूमिकाया लक्षणमादितः ।***
***ज्ञाते यस्मिंस्त्वया सर्वं ज्ञातं स्यात् पृष्टमद्य यत् ।।१।।***

(अरे शिष्या) आता (अद्य) मी तुला प्रथमपासून (आदितः) ज्ञानाच्या भूमिकांचे लक्षण / स्वरूप सांगेन. ते कळून आल्यावर तू जे आता मला विचारले आहेस, ते सर्व तुला समजून येईल (१).

ज्ञानाच्या एकंदर सात भूमिका आहेत. येथे भूमिका म्हणजे मनाची विशिष्ट अवस्था हा वर सांगितलेला अर्थ लक्षात असावा.

आता यापुढील श्लोक २-३ मध्ये या सात भूमिकांचे परिगणन आणि त्यांची नावे दिलेली आहेत. त्यानंतर शंकराचार्य क्रमाने प्रत्येक भूमिकेचे स्वरूप संक्षिप्तपणे सांगतात.

(२)-(३)

***ज्ञान-भूमिः शुभेच्छा स्यात् प्रथमा समुदीरिता ।***
***विचारणा द्वितीया तु तृतीया तनुमानसी ।।२।।***
***सत्त्वापत्तिश्चतुर्थी स्यात् ततोऽसंसक्तिनामिका ।***
***पदार्थाभावनाषष्ठी सप्तमी तुर्यगा स्मृता ।।३।।***

शुभेच्छा ही पहिली ज्ञानभूमी । ज्ञानभूमिका आहे, असे म्हटले आहे. विचारणा ही दुसरी (ज्ञानभूमिका) आहे. तिसरी (ज्ञानभूमिका) ही तनुमानसी (हे नाव असणारी) आहे. (२) चौथी (ज्ञानभूमिका) ही सत्त्वापत्ति (= सत्त्व- आपत्ति असे नाव असणारी) आहे. त्यानंतर असंसक्ति हे नाव असणारी (पाचवी ज्ञानभूमिका) आहे. (नंतर) पदार्थाभावना (=पदार्थ- अभावना असे नाव असणारी) सहावी (ज्ञानभूमिका) आहे. आणि सातवी

तुर्यगा (नावाची ज्ञानभूमिका) आहे, असे सांगितलेले आहे (३).

या श्लोकात निर्देशिलेल्या ज्ञानभूमिकांच्या नावाने सर्वसाधारण स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे देता येईल. शुभेच्छा म्हणजे चांगली इच्छा, सदिच्छा. विचारणा म्हणजे विचार अथवा चिंतन. तनुमानसी म्हणजे मनाची विषयांपासूनची निवृत्ति. सत्त्वापत्ति म्हणजे मनात सत्त्व गुणाचा प्रकर्ष. असंसक्ति म्हणजे संसर्गाचा / संपर्काचा अभाव. पदार्थाभावना म्हणजे बाह्य तसेच आंतर विषयाविषयी विचारांचा अथवा भावनांचा अभाव. तुर्यगा म्हणजे तुर्या म्हणजे चौथी. माणसाच्या व्यावहारिक दैनंदिन जीवनात नेहमी येणाऱ्या जागृती, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांच्या पलिकडे असणारी चौथी अवस्था म्हणजे तुर्या. या तुर्या अवस्थेत ब्रह्मसाक्षात्कार होतो.

या प्रत्येक भूमिकेचे जे तांत्रिक अर्थ आहेत, ते आता क्रमाने शंकराचार्यांनी या पुढील श्लोकात सांगितले आहेत.

(४)

*स्थित: किं मूढ एवास्मि प्रेक्ष्योऽहं शास्त्र- सज्जनै: ।*
*वैराग्य-पूर्वमिच्छेति शुभेच्छा चोच्यते बुधै: ।।४।।*

(आत्मज्ञानाच्या संदर्भात काहीही न करता) मी स्वस्थ राहिलो आहे (स्थित), (तेव्हा मी काय) मूर्खच आहे? शास्त्र आणि सज्जन यांच्या द्वारा मी (आता) विचार करावयास हवा. (प्रेक्ष्य) अशाप्रकारे वैराग्यानंतर येणारी जी इच्छा तिला शहाणे लोक शुभेच्छा म्हणतात (४).

या श्लोकातील 'प्रेक्ष्योऽहं शास्त्रसज्जनै:' म्हणजे 'शास्त्र आणि सज्जन' लोक यांची दृष्टी माझ्यावर आहे, असा अर्थ घेण्यात काही औचित्य दिसत नाही.

व्यावहारिक जीवनातून पारमार्थिक/ आध्यात्मिक जीवनाकडे वळावयाचे असल्यास प्रथम नित्य काय आहे आणि अनित्य काय आहे याचा विचार व्हावयास हवा आणि अनित्य गोष्टींबद्दल नावड निर्माण व्हावयास हवी. त्यासाठी नित्यानित्य वस्तुविवेक आहे. नित्य एक ब्रह्म आहे, बाकी सर्व अनित्य आहे, हे लक्षात आल्यावर अनित्य वस्तूविषयी इच्छा रहात नाही. त्यामुळे वैराग्य येते. वैराग्याविना पुढे काही होणार नाही. हे वैराग्य म्हणजे 'इह-अमुत्र-फळ-भोग-विराग' आहे. इह म्हणजे हे जग. अमुत्र म्हणजे परलोक; दोन्ही ठिकाणी कर्मांचे फळ या स्वरूपात भोग मिळतात. पण ते सर्व अनित्य आहेत. त्यांच्या भोगाने सततचे सुख मिळणार नाही. हे पटल्यावर त्या भोगांच्या इच्छेचा अभाव होतो, हेच वैराग्य आहे. असे वैराग्य असेल तर शास्त्र आणि साक्षात्कारी साधुसंत हे नित्य असणाऱ्या ब्रह्माविषयी- आत्म्या- विषयी जे काही सांगतात तिकडे माणसाचे लक्ष जाणार. वैराग्य नसल्यास माणूस भोगातच गुंतून राहील. म्हणून 'प्रथम वैराग्य हवे' (वैराग्य-पूर्वक) असे येथे म्हटले आहे.

शास्त्र व साधुसंत सांगतात की संसारातील दु:खातून सुटका व्हावी असे वाटत असेल तर आत्मज्ञान करून घ्यावयास हवे. आत्मज्ञान / ब्रह्मज्ञान झाल्यास सदा असणारा असा अत्यानंद प्राप्त होतो. आता तिकडे लक्ष न देणारा माणूस म्हणेल ''मी मूर्ख माणूस स्वस्थ काय बसलो आहे? त्याचे म्हणण्याचा मी विचार करावयास हवा. 'सदानंद' देणारे आत्मज्ञान मी त्यांच्याकडून प्राप्त करून घ्यावयास हवे. तेव्हा आता मी त्यांच्या म्हणण्याचा विचार करून आत्मज्ञान मिळवीन.'' अशी इच्छा होणे हीच शुभेच्छा आहे. आत्मज्ञान- प्राप्तीची इच्छा ही कल्याणकारक असल्याने ती चांगली शुभ इच्छा आहे. संक्षेपाने सांगायचे झाल्यास 'भोगेच्छा' सोडून 'मोक्षेच्छा' बाळगणे ही शुभेच्छा आहे.

(५)

*शास्त्र- सज्जन- संपर्क- वैराग्याभ्यास- पूर्वकम् ।*
*सदाचार- प्रवृत्तिर्या चोच्यते सा विचारणा ।।५।।*

शास्त्र = (शास्त्राचे अध्ययन), सज्जनांची संगती, वैराग्य आणि अभ्यास यांच्यानंतर सदाचाराकडे जी प्रवृत्ति होते तिला विचारणा असे म्हटले जाते. (५)

प्रथम वैराग्य आले होते. त्यानंतर संत-सज्जनांची संगती केली. त्यांचा उपदेश ऐकला. त्यामुळे वाईट विचार आणि आचार थांबले. शास्त्रांचे अध्ययन केले, त्यांचा अभ्यास केला. या सर्वांचा परिपाक म्हणून माणसाची सदाचाराकडे प्रवृत्ति झाली. सदाचाराकडे झालेली ही प्रवृत्ति म्हणजेच विचारणा होय. सदाचार म्हणजे चांगला आचार हा अर्थ तर आहेच. त्याखेरीज 'सत्साठी आचार' असा सदाचारचा विग्रह केला तर 'सत् असणाऱ्या ब्रह्माकडे पोचण्यासाठी जो आचार आवश्यक आहे तो सदाचार' असाही अर्थ होईल.

येथे 'शास्त्र... भ्यास' असा द्वंद्व समास आहे. द्वंद्व समासाचे अंती असणारा शब्द त्या द्वंद्व समासात पूर्वी आलेल्या प्रत्येक पदाला जोडून घ्यावयाचा असतो, हा नियम लक्षात घेतला तर शास्त्राभ्यास, सज्जन- संपर्क- अभ्यास आणि वैराग्य- अभ्यास असा अर्थ होईल. अभ्यास म्हणजे एकच गोष्ट पुन: पुन: करणे. मग असा अर्थ होईल:- शास्त्राचे अध्ययन, पुन पुन: करणे, शास्त्राचे अध्ययन सोडून न देणे. सज्जनांच्या संगतीत पुन: पुन: राहाणे. वैराग्याचा अभ्यास म्हणजे असे:- मन हे चंचल आहे. गीता सांगते, 'चंचलं हि मन: कृष्ण' (६-३४). ते अधूनमधून विषयांकडे धावेल. त्याला विषयांतून परावृत्त करून वैराग्य कायम टिकवून धरावयास हवे. त्यासाठी वैराग्याचा अभ्यास हवा.

वैराग्यानंतर शास्त्राध्ययन व संतसंग यामुळे सदाचाराकडे होणारी प्रवृत्ति म्हणजेच विचारणा.

(६)

*विचारणा– शुभेच्छाभ्यामिंद्रियार्थेषु रक्तता।*
*यत्र सा तनुतामेति प्रोच्यते तनुमानसी ।।६।।*

ज्या अवस्थेत / भूमिकेत (यत्र) विचारणा आणि शुभेच्छा यांच्यामुळे इंद्रियांच्या विषयांच्या बाबतीत असणारी आसक्ति (रक्तता) कमी कमी होते त्या भूमिकेला तनुमानसी असे म्हटले जाते. (६)

कठ उपनिषदाने (२.१.१) असे सांगितले आहे की इंद्रियेही बहिर्मुख आहेत (परांचि रवानि व्यतृणत् स्वयंभू:।') साहजिकच माणसाची पाचही ज्ञानेंद्रिये ही आपापल्या शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या विषयांकडे धाव घेत असतात, आणि त्यातच गुंतून राहातात. इंद्रियांच्या या ओढीअंती मन हे सुद्धा इंद्रियांच्या द्वारा विषयांकडे धावते; मग मनाच्या या बहिर्मुख प्रवृत्तीने जीव हाही बाह्य विषयांत आसक्त होऊन राहतो. आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी विषयांकडची खेच ही कमी कमी होणे आवश्यक आहे. भगवद्गीतेने म्हटल्याप्रमाणे, 'श्रद्धावान् लभते ज्ञानं तत्पर: संयतेंद्रिय:' (४.३९), 'संयत-इंद्रियत्व' म्हणजे इंद्रिय- संयम हा ज्ञानासाठी आवश्यक आहे. इंद्रियसंयमामुळे इंद्रियांची विषयांकडची मनाची ओढ कमी होते. अशाप्रकारे मनाच्या ज्या अवस्थेत इंद्रिय- विषयांबद्दलची आसक्ती/ प्रेम कमी कमी होऊ लागते त्या अवस्थेला तनुमानसी असे नाव दिले जाते.

(७)

*भूमिका– त्रितयाभ्यासात् चित्तेऽर्थ– विरतेर्वशात् ।*
*सत्त्वात्मनि स्थितेशुद्धे सत्त्वापत्तिरुदाहृता ।।७।।*

(वर उल्लेखिलेल्या पहिल्या) तीन भूमिकांच्या अभ्यासामुळे चित्तामध्ये जे विषयांविषयीचे (अर्थ) (दृढ असे) वैराग्य (विरति) निर्माण होते, त्याच्या प्रभावामुळे (वशात्) सत्त्व (गुणा)च्या आधिक्याने भरलेले मन (आत्मनि) हे शुद्ध आणि स्थिर झाले असताना, सत्त्वापत्ति ही भूमिका प्राप्त होते, असे सांगितले गेले आहे (७).

भगवद्गीतेने म्हटल्याप्रमाणे या जगातील प्रत्येक पदार्थात/ प्राण्यात सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण असतातच. (न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुन:। सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभि: स्यात् त्रिभिर्गुणै: ।। १८.४०) हे गुण नेहमीच एकमेकांना दाबून टाकून स्वत: वरचढ होण्याचा प्रयत्न करीत असतात (रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत। रज: सत्त्वं तमश्चैव तम:सत्त्वं रजस्तथा।। भगवद्गीता, १४.१०). या संघर्षात तमोगुण प्रभावी झाला तर तो आळस, प्रमाद इत्यादि निर्माण करतो (प्रमाद- मोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च । भगवद्गीता, १४.१७, तसेच १४.१३). रजोगुण हा तृष्णा, संग यांतून निर्माण होतो आणि तो रागात्मक आहे (भगवद्गीता १४.७,१२). साहजिकच रजोगुण हा विषयात आसक्ति निर्माण करणारा आहे. आता, जेव्हा शुभेच्छा, विचारणा आणि तनुमानसी यांचा उत्कर्ष होतो तेव्हा रज आणि तम या दोन गुणांना खाली दाबून- त्यांचा प्रभाव नगण्य करून- मनामध्ये सत्त्वगुण हा उत्कर्ष पावतो आणि प्रभावी होतो. सत्त्वगुण हा ज्ञानाला अनुकूल आहे. भगवद्गीतेच्या मते तर, 'सत्त्व' (गुणा) पासून ज्ञान उत्पन्न होते (सत्त्वात् संजायते ज्ञानम् । १४.१७) मनामध्ये सत्त्वगुणाचा प्रकर्ष आणि प्रभाव असणारी ही जी मनाची विशिष्ट अवस्था/ भूमिका तिला सत्त्वापत्ति- सत्त्व + आपत्ति- असे म्हणतात. सत्त्व-आपत्ति म्हणजे सत्त्वगुणाच्या उत्कर्षाची प्राप्ती आहे.

(८)

*दशा–चतुष्टयाभ्यासाद् असंसर्ग– फला तु या ।*
*रूढ– सत्त्व– चमत्कारा प्रोक्तासंसक्तिनामिका ।।८।।*

(पहिल्या) चार दशांच्या / अवस्थांच्या समूहाची अभ्यासयुक्त स्थिर दशा प्राप्त झाल्यावर, (मनात) रूढ झालेल्या म्हणजे घट्टपणे बसलेल्या सत्त्वगुणाचा (जणू) चमत्कार या स्वरूपात असंसर्ग हे फळ देणारी जी भूमिका ती असंसक्ति नावाची भूमिका होय असे म्हटले जाते.

(८)

असंसक्ति ही पाचवी भूमिका आहे. तत्पूर्वी पहिल्या चार भूमिकांचा अभ्यास झाला आहे; म्हणजे त्या अवस्था स्थिर झालेल्या आहेत. चौथ्या अवस्थेत मनामध्ये सत्त्वगुणाचा प्रकर्ष झाला होता. सत्त्वगुणाचा हा प्रकर्ष मनात स्थिरता पावला की त्याचा एक चमत्कृतिपूर्ण परिणाम होतो. तो म्हणजे असंसर्ग. असंसर्ग म्हणजे बाह्य शब्द, स्पर्श इत्यादि विषय, त्यांची प्राप्ती, त्यांचे भोग, तसेच विषयासक्त आणि भोगासक्त माणसे इत्यादींचा संसर्ग / संपर्क नको अशी मनाची भूमिका तयार होते. वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास, सर्वांतून अलिप्त होण्याची आणि त्यात गुंतून न रहाण्याची जी भूमिका मनात येते, तिला असंसर्ग भूमिका असे म्हणतात.

संसर्ग म्हणजे आसक्ति असा अर्थ घेतला तर कोणत्याही प्रकारची आसक्ति नको अशी मनाची धारणा होते. असंसर्ग म्हणजे अनासक्ति.

(९)- (१०)

***भूमिका-पंचकाभ्यासात् स्वात्मारामतया-भृशम् ।***
***आभ्यंतराणां बाह्यानां पदार्थानामभावनात् ।।९।।***
***पर-प्रयुक्तेन चिरप्रयत्नेनावबोधनम् ।***
***पदार्थभावना नाम षष्ठी भवति भूमिका ।।१०।।***

(पूर्वी सांगितलेल्या) पाच भूमिकांच्या सूमहाचा भरपूर (भृशं) अभ्यास झाल्यामुळे म्हणजे त्यांच्या स्थिरतेमुळे, स्वत:च्या आत्म्याच्या / मनाच्या ठिकाणी आरामाची प्राप्ती होत असल्यामुळे (स्वात्मारामतया), आंतरिक आणि बाहेरील अशा (द्विविध) पदार्थांचा विचार / भावना (मनात) न आल्यामुळे (अभावनात्), दुसऱ्या कोणीतरी (पर) केलेल्या चिरकालीन प्रयत्नामुळे, जे ज्ञान होते / अवबोधन), ते ज्ञान ज्या भूमिकेत असते ती पदार्थाभावना- पदार्थ अभावना- नावाची सहावी भूमिका आहे (९-१०)

पहिल्या पाच भूमिका मनात स्थिर झाल्या. आता मुमुक्षु माणूस अंतर्मुख झाला असल्यामुळे, ज्यात विषयां-पासूनचा आनंद अशी एक आनंदाची विशिष्ट स्थिती मुमुक्षूच्या मनात उद्‌भूत होते, आणि त्याला आत्मानंदाची झुळूक प्राप्त होते. साहजिकच त्याला शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे बाह्यपदार्थ / विषय आणि काम, क्रोध, लोभ इत्यादि आंतर पदार्थ म्हणजे विकार यांची जाणीव त्याला होत नाही. ही विशिष्ट अवस्था प्राप्त झाल्यावर त्या मुमुक्षूला दुसऱ्या कोणीतरी प्रयत्नपूर्वक त्या त्या पदार्थाची जाणीव करून द्यावी लागते, मगच त्याला तो पदार्थ कळतो. याचा अर्थ इतकाच की तो आता स्वेच्छेने त्या त्या पदार्थाकडे वळत नाही. अशी जी भूमिका/ अवस्था तिला पदार्थाभावना (पदार्थ- अभावना) असे म्हणतात. संक्षेपाने पदार्थाभावना म्हणजे मुमुक्षूला स्वत:हून पदार्थांची जाणीव न होणे. (येथे हे लक्षात असावे की सर्वच मुमुक्षूंच्या बाबतीत ही पदार्थाभावना असेलच असे नाही. कारण काही मुमुक्षू हे देहधर्मानुसार स्वेच्छेने व्यवहाराकडे वळताना दिसून येतात.)

(११)

***षड्-भूमिका-चिराभ्यासाद् भेदस्यानु प्रलंभनात् ।***
***यत् स्व-भावैक-निष्ठत्वं सा ज्ञेया तुर्यगा गति: ।।११।।***

(पहिल्या) सहा भूमिकांच्या चिरकालीन अभ्यासामुळे- स्थिरतेमुळे - (मुमुक्षूला) भेदाचे ज्ञान होईनासे होते, त्यामुळे (भेदस्य अनुप्रलंभनात्) त्याला स्वत:च्या भावाशी जी एकनिष्ठा प्राप्त होते, ती म्हणजे तुर्यगा (ही सातवी) भूमिका (गति) आहे (११).

या श्लोकात 'गति:'चे स्थानी 'स्थिती' असा पाठभेद आहे. पहिल्या सहा भूमिकांचा अभ्यास- स्थिरता- झाल्यामुळे, त्या भूमिका/ अवस्था आता मुमुक्षूच्या स्थिरपणाने दृढ झाल्या आहेत. परिणामत: त्याचे भेदाचे ज्ञान संपते. याचा अर्थ असा की आत्म्याखेरीज अन्य काही आहे असे त्याला वाटत नाही. त्याला सर्वत्र आत्मदर्शन होऊ लागते. 'एतदात्म्यमिदं सर्वम्' = (हे सर्व आत्माच आहे) किंवा 'सर्वंखल्विदं ब्रह्म' = (हे सर्व विश्वब्रह्म आहे) अशी प्रचीती त्याला येऊ लागते.

श्लोकातील 'स्व-भाव' मध्ये स्व म्हणजे आत्मा आणि भाव म्हणजे अस्तित्व. स्वत:चा भाव म्हणजे आत्म्याचे अस्तित्व. आत्माच आहे आणि अन्य काही (त्याच्यापेक्षा वेगळे) नाही अशी त्या मुमुक्षूची ठाम भूमिका होते (एक-निष्ठत्व) म्हणजे आत्मा आहे, तोच सर्व काही आहे, आत्म्याखेरीज अन्य काही नाही अशी जी त्याची ठाम अवस्था ती म्हणजे तुर्यगा भूमिका होय.

तुर्यगा / तुर्या म्हणजे शब्दश: चौथी (अवस्था). या स्थितीला चौथी अवस्था म्हणण्याचे कारण असे, माणसाच्या नेहमीच्या व्यवहारात आणि जीवनात जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्था स्वाभाविकपणेच आलटून पालटून येत असतात. परमार्थात/ अध्यात्मात मुमुक्षूला या तीन अवस्थांच्या पलीकडील अवस्था प्राप्त होते. ती चौथी म्हणजे तुर्या अवस्था आहे.

ही तुर्या अवस्था कशी असते ते शंकराचार्य पुढील श्लोकात कथन करतात.

(१२)

***परब्रह्मवदाभाति निर्विकारैकरूपिणी ।***
***सर्वावस्थासु धारैका तुर्याख्या परिकीर्तिता ।।१२।।***

सर्व अवस्थांमध्ये परब्रह्माच्या स्वरूपाप्रमाणे असणारी अशी जी एकच (ज्ञानाची) धारा, ती तुर्या या नावाने ओळखली जाते (१२).

तुर्या या अवस्थेत केवळ परब्रह्म म्हणजे शुद्ध चैतन्य असते. वेदांतसार ग्रंथात म्हटल्याप्रमाणे, 'यदनुपहितं चैतन्यं तत् तुरीयं इति उच्यते' (उपाधिरहित शुद्ध चैतन्य हे तुरीय तुर्या, चौथे) म्हटले जाते. 'शिवं अद्‌वैतं चतुर्थं मन्यंते स आत्मा' असे मांडुक्य उपनिषदही (७) सांगते. या तुर्यावस्थेत मुमुक्षूचा तथाकथित जीव हा परब्रह्माशी एकरूप होऊन जातो. परिणामत: त्याला सर्व अवस्थांमध्ये परब्रह्माचीच जाणीव रहाते.

यानंतर समारोप करताना शंकराचार्य सांगतात,

***इत्यवस्था- समुल्लासं विमृशन् मुच्यते सुखी ।।१३।।***

अशाप्रकारे या भूमिकांचा - अवस्थांचा जो प्रकार/ विस्तार (समुल्लास) आहे, त्याचा जो मुमुक्षु विचार करतो (विमृशन्) म्हणजे अनुभव घेतो, तो सुखी होतो आणि तो (सहजपणे) प्रपंचाच्या-

संसाराच्या बंधनातून) मुक्त होतो. (१३)

तुर्या अवस्थेत मुमुक्षूचे ब्रह्माशी तादात्म्य होते. आता ब्रह्म हे आनंदरूप आहे. साहजिकच मुमुक्षूही ब्रह्मानंदरूप होतो. ब्रह्मानंद म्हणजे विषयनिरपेक्ष सुख. आणि हे सुख अखंड असते. म्हणून मुमुक्षु हा 'सदासुखी' होतो.

या मुमुक्षूचे ब्रह्माविषयीचे अज्ञान संपलेले आहे. साहजिकच अज्ञाना अंती होणारा अध्यास आणि त्या अध्यासा अंती येणारा संसार– जन्ममरणाचा फेरा, जन्ममरणाचा बंध– आता त्याला नाही. तो संसाराच्या बंधातून सुटून जाऊन मुक्त झाला आहे. तथापि प्रारब्ध कर्मामुळे आलेला देह आहे. तथापि त्या देहात राहून तो विद्यमान– जिवंत– असतानाच मुक्त झाला आहे. तो आता जीवन्मुक्त आहे.

ज्या अवस्थांतून जात जात मुमुक्षु शेवटी जीवन्मुक्त होतो त्या अवस्था शंकराचार्यांनी वरीलप्रमाणे सांगितल्या आहेत.

**– प्रा. डॉ. के. वा. आपटे**

यजुर्वेद अपार्टमेंट, एम्. टी. कॉलनी रोड, विश्रामबाग,

सांगली – ४१६४१५.

फोन नं. : ०२३३–२३०१६९९



## *तुझ्यात आहे ब्रह्म, सत्य बघ*

**शब्दरचना - सौ. शैला सुहास पटवर्धन**

*एम.ए.बीएड.*

*(सेवानिवृत्त शिक्षिका, पार्ले टिळक महाविद्यालय)*

('विवेकचूडामणि'तील उपसंहारात्मक श्लोकाधारे)

मरुभूमीतच भ्रमतो पांथिक,

ताप प्रखर दे, भास्कर दाहक,

तृषार्त शोधी इथे तिथे जल,

थकली गात्रे, चकवी मृगजल ।।

न मिळे पाणी चक्रावे तन,

हीच दुःस्थिती संसारी जन–

अनंतरूपे फसवी मोह,

फिरवी गरगर भ्रांति–डोह !

त्रिताप चटके असह्य तळमळ

कुठे सावली? अन् कुठले जल?

''का आक्रंदन? बघ रे शोधून–

तुझ्याच हाती उपाय अंतिम!''

तुझ्यात आहे ब्रह्मसत्य बघ–

चैतन्याचे महान द्योतक

अद्वय ब्रह्मचि शीतल छाया

शुद्ध शांति सत्याची माया!''

शंकरभारती अक्षय अमृत

जगदोद्धारक रक्षक शाश्वत ।।

।। ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।।

**सौ. शैला सुहास पटवर्धन**

१/१४ कर्वेनगर, डी–३ प्राजक्ता,

पुणे – ४११०५२

फोन नं. ६५२१८५३१

# शंकराचार्य आणि भारतीय संस्कृती

- डॉ. सौ. सरोजा भाटे

*एम.ए.पीएच.डी. (संस्कृत-व्याकरण) ऑनररी सेक्रेटरी- भांडारकर प्राच्यविद्या संशोधन केंद्र, पुणे. लेखन- संस्कृत सुभाषिते व व्याकरण यावर १० पुस्तके, ६० लेख. विश्व विद्यालय अनुदान आयोगातर्फे 'वेदव्यास' पुरस्कार प्रथम मानकरी, राष्ट्रपती पुरस्कार घोषित इ. अनेक विषयांवर पुरस्कारांनी सन्मानित.*

*यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत*
*अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।*

''भरतकुलोत्पन्ना अर्जुना, जेव्हा जेव्हा धर्म क्षीण होतो आणि अधर्म प्रबळ होतो तेव्हा तेव्हा मी स्वत: जन्म घेतो.''

श्रीमद्भगवद्गीतेतील हे भगवंताचे वचन उद्धृत करून स्वामी विवेकानंदांनी श्रीमच्छशंकराचार्यांना भगवंताचा अवतार म्हणून गौरवले आहे. आचार्यांच्या जीवनवृत्तांताकडे एक कटाक्ष टाकला तरी विवेकानंदांनी केलेला गौरव किती सार्थ आहे हे पटते. आचार्यांच्या अलौकिक कार्याचे मूल्यमापन अनेक विचारवंतांनी त्यांना वेगवेगळी बिरुदे बहाल करून केले आहे. कोणी त्यांना भारताच्या सांस्कृतिक पुनरुत्थानाचे अग्रदूत म्हटले आहे, तर कोणी त्यांची गणना जगातल्या पहिल्या दहा श्रेष्ठ विभूतींमध्ये केली आहे. मरगळलेल्या हिंदूधर्मामध्ये प्राणाची फुंकर घालणारा असामान्य धर्मवेत्ता असा त्यांचा सन्मान कुणी केला आहे, तर उपनिषदांच्या गूढगुंजनातून सोऽहम् चा नाद श्रवण केलेला जीवन्मुक्त असेही त्यांचे वर्णन कुणी केले आहे. केवळ बत्तीस वर्षांचे आयुष्य त्यांनी आपल्या लोकोत्तर कामगिरीने उजळून टाकले आणि भारतीय संस्कृतीच्या इतिहासावर आपल्या नावाची सुवर्णमुद्रा उमटवली. ७ व्या ८ व्या शतकात केरळात एका धार्मिक कुटुंबात जन्म, बालवयातच अंतिम सत्याच्या जिज्ञासेपोटी केरळातून दूर नर्मदातीरी गुरूच्या शोधात प्रयाण, गुरु गोविंदाचार्यांच्या मुखातून वेदांतसूत्रांच्या अद्वैतपर विवेचनाचे श्रवण, मनन आणि पुढे प्रस्थानत्रयीवर स्वत: भाष्याचे लेखन, आपल्या तत्त्वज्ञानाच्या प्रसारार्थ भारतभ्रमण, धर्मतत्त्वज्ञानाचा प्रचार, प्रसार आणि ३२ व्या वर्षी जीवितकार्य संपवून जगाचा घेतलेला निरोप असा त्यांचा जीवनपट थोडक्यात मांडता येईल. मात्र या पटावरच्या काही घटनांनी भारतीय संस्कृतीचे केवळ संवर्धन नव्हे तर उन्नयन झाले. शंकराचार्यांचे सारे जीवनच धर्म आणि संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाला वाहिले होते. भारतीय संस्कृतीचे मूलाधार असलेल्या वेदवाङ्मयापैकी उपनिषदे, गीता आणि औपनिषद तत्त्वज्ञानाचे सार सूत्ररूपात मांडणारी ब्रह्मसूत्रे या प्रस्थानत्रयीवर पांडित्यपूर्ण, तर्कशुद्ध विवेचन करणारे पण प्रसन्न भाष्य लिहिणारे अलौकिक बुद्धिमत्ता असलेले शास्त्रवेत्ते पंडित, तत्त्वज्ञ, धर्मसुधारक, सामाजिक कार्यकर्ते आणि विलक्षण प्रभावी नेतृत्व असणारे आचार्य अशा अनेकविध भूमिका आचार्यांनी वठवल्या. त्या वठवत असताना त्यांनी भारतीय संस्कृतीला एक आगळी झळाळी प्राप्त करून दिली.

आचार्य शंकर ज्या काळात होऊन गेले तो भारताच्या इतिहासातला अस्थैर्याचा, संभ्रमावस्थेचा काळ होता. जाती, धर्म, पंथ, उपपंथ अशा अनेक कातऱ्यांनी भारत चहूबाजूंनी कातरला गेला होता. भारतीय जनता बौद्धांच्या शून्यवादाच्या भोवऱ्यात भेलकांडत होती, तांत्रिकांच्या जादुटोण्यात गुरफटली होती, अंधश्रद्धेने ग्रासलेली होती आणि धर्माच्या नावाखाली चालणाऱ्या अनाचाराने गांजलेली होती. भारतीय संस्कृतीवर चढलेले हे मळभ दूर करण्याचे आव्हान या विशीतल्या युवकाने स्वीकारले. केवळ अद्वैताची ध्वजा खांद्यावर घेऊन, जातीपातींची, पंथोपंथांची कुंपणे मोडून काढीत भिन्न भिन्न विचारधारांना एकाच धाग्यात गोवून त्यांनी सनातन वैदिक धर्माची पुन्हा प्राणप्रतिष्ठा केली. हे काम अतिशय अवघड होते, परंतु असामान्य बुद्धिमत्तेला तीव्र सामाजिक जाणीव आणि प्रभावी नेतृत्वाची जोड मिळाल्यामुळे हे त्यांना साध्य झाले.

भारताचे दिवंगत राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन् शंकराचार्यांबद्दल म्हणतात की ते केवळ स्वप्नरंजनात रमणारे तत्त्ववेत्ते नव्हते तर क्रियाशील सामाजिक कार्यकर्ते होते. अंतिम सत्याकडे दृष्टी लावलेल्या तत्त्वचिंतनाच्या हस्तिदंती मनोऱ्याच्या पायऱ्या उतरून आचार्य जनता जनार्दनाशी एकरूप झाले. एकमेवाद्वितीय ब्रह्माचे किंवा आत्मब्रह्मैक्याचे ज्ञान हा दीर्घ ज्ञानोपासनेचा, खडतर साधनेचा आणि दैवायत्त अनुभूतीचा विषय असल्यामुळे जनसामान्याला पेलेल अशा सगुण ब्रह्माच्या उपासनेचाही त्यांनी पुरस्कार केला. एकीकडे अद्वैताच्या प्रखर किरणांच्या प्रकाशात तेजाळणारे त्यांचे

मन दुसरीकडे भक्तीच्या मधुर रसात चिंब झालेले होते. अध्यात्माच्या साम्राज्याचा हा अनभिषिक्त सम्राट सगुणोपासनेत लीन झालेला, ''कैवल्याच्या चांदण्याला भुकेला चकोर'' झालेला पाहून भारताचे दिवंगत पंतप्रधान पंडित नेहरू यांची उक्ती आठवते. शंकराचार्यांबद्दल ते म्हणतात की, त्यांच्या ठायी एकाच वेळी अनेक परस्परविरुद्ध गुण गुण्यागोविंदाने नांदत होते. या प्रखर ज्ञानभास्कराच्या तेजात भक्तीच्या चांदण्याची शीतलता होती.

आचार्य खऱ्या अर्थाने परिव्राजक होते. उभाआडवा देश पायाखाली घालत, जनमनाचा कानोसा घेत, मतमतांतरांच्या कोलाहलातही जाणवणारा एकसूर ऐकवीत, 'एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति'' हा मंत्र जपत त्यांनी भिन्न भिन्न विचारांच्या धाग्यांचा सुरेख गोफ विणला आणि विविधतेत एकता हे भारतीय संस्कृतीचे वैशिष्ट्य जनमानसावर ठसवले. विविध स्तोत्रांच्या आळवणीतून, पंचायतन पूजेसारख्या विधींच्या पुरस्कारातून त्यांनी समाजमने परस्परात गुंफली; समन्वयाचा विचार समाजात बिंबवला आणि सनातन वैदिक धर्माच्या नावाने विश्वधर्म प्रतिष्ठापित केला. एकीकडे वास्तवांशी हस्तांदोलन करीत दुसरीकडे मानवतेचे बोट धरून तिला शाश्वताच्या प्रवासाला नेण्याची असाधारण कामगिरी शंकराचार्यांनी केली.

अध्यात्म हे भारतीय संस्कृतीचे अधिष्ठान आहे आणि आत्मब्रह्मैक्य हे अध्यात्माचे अधिष्ठान आहे. उपनिषदांच्या मंथनातून हाती आलेले आत्मब्रह्मैक्य आचार्यांनी अध्यात्माचा परमोच्च बिंदू म्हणून स्थिर केले. त्यांच्या अद्वैतवादाचा अक्षयवट आज जगात सर्वदूर विस्तारला आहे. काही तत्त्ववेत्त्यांच्या मते अद्वैत हा तत्त्वचिंतनाचा पूर्णविराम आहे. जगाचे आध्यत्मिक नेतृत्व करणारी महाशक्ती ही भारताची आजची प्रतिमा शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानामुळे निर्माण झाली आहे.

अद्वैताचा प्रसार करण्याचे जीवनव्रत अंगिकारलेल्या आचार्यांनी संन्यस्त वृत्तीने ज्ञानयोगाची उपासना करीत असतानाच जनसामान्यांचे प्रबोधन करीत त्याला कर्मयोगाची जोड दिली आणि ज्ञानयोग व कर्मयोग यातील द्वैतही मिटवून टाकले. सगुणब्रह्माच्या उपासनेसाठी भक्तिरसाने ओथंबलेली देवदेवतांची स्तोत्रे रचून भक्तगणांना आळवण्यासाठी त्यांनी दिली. त्यामुळे गीतेतील ज्ञान, कर्म आणि भक्ती या तिन्ही योगांचा त्रिवेणीसंगम त्यांच्या ठायी एकटवला आहे.

विविधतेत सामावलेली एकता, विश्वबंधुत्व, सहिष्णुता, आचारशुचिता आणि लोकसंग्रह यासारख्या भारतीय संस्कृतीच्या आत्मभूत तत्त्वांचे आजीवन अनुष्ठान करीत शंकराचार्यांनी विश्वैक्याचा संदेश सर्वदूर पोचवला. त्यांच्या तेजस्वी बुद्धिवैभवाला लाभलेली परमकारुणिकतेची किनार हे त्यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. म्हणून म्हणावेसे वाटते,

***आचार्याः शंकराचार्याः सन्तु जन्मनि जन्मनि ।।***


**– डॉ. सौ. सरोजा भाटे**

१५/४६ निर्मल बाग, पर्वती पेठ,

पुणे ४११००९.

फोन नं. : २४२२६८५४




# श्रीमच्छंकराचार्यांच्या प्रकरणग्रंथातील अद्वैत

**डॉ. कांचन मांडे**

*एम.ए.पीएच.डी. (संस्कृत)*

*संस्कृत विभाग प्रमुख पुणे विद्यापीठ, आंतरराष्ट्रीय चर्चासत्रामध्ये सहभाग- ३ ग्रंथांचे लेखन*

**प्रस्तावना**

***नमो संसारतमसूर्या । अप्रतिमपरमवीर्या ।***
***तरुणतरतूर्या- । लालनलीला ।। ज्ञाने. १०.२***

ज्ञानदेवांनी केलेले हे सद्गुरुस्तवन ज्यांच्याबाबत यथार्थतेने सार्थ ठरते त्या श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या प्रकरणग्रंथातील अद्वैत या लेखामध्ये आपण बघणार आहोत. श्रीमदाद्यशंकराचार्य हे भारतीय तत्त्वज्ञानातील मेरुमणी आहेत. वैदिक धर्माच्या पुनरुत्थापनेसाठी त्यांचा अवतार झाला अशी श्रद्धाळूंची, भक्तांची श्रद्धा आहे. आपल्या उण्या-पुऱ्या बत्तीस वर्षांच्या आयुष्यात (इ.स. ७८८ ते ८२०) आचार्यांनी ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्डक, माण्डूक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य, बृहदारण्यक व श्वेताश्वतर या अकरा उपनिषदांवर बादरायणविरचित ब्रह्मसूत्रांवर व श्रीमद्भगवद्गीतेवर भाष्यरचना केली. या तेरा ग्रंथांवरील भाष्यरचनेखेरीज सुमारे ५०च्या आसपास स्तोत्ररचना तसेच सुमारे ३०च्या आसपास प्रकरणग्रंथ रचना केली. इतकेच करून आचार्य थांबले नाहीत, किंबहुना या रचना होत असतानाच आसेतुहिमाचल पायी प्रवास करून बदरी, द्वारका, श्रृंगेरी व पुरी या चार ठिकाणी मठस्थापना केली. या चारही पीठांचे मठाधिपती म्हणून आचार्यांनी तोटक, पद्मपाद, सुरेश्वर व हस्तामलक या आपल्या चार शिष्यांची नियुक्ती केली. आचार्यांचे हे सारेच चरित्र खऱ्या अर्थाने अलौकिक आहे. संत तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे 'उरलो उपकारापुरता' हा भाव अंतर्बाह्य प्रतीत होतो. लौकिक जीवनाचा वाराच त्यांना कुठे लागल्याचे दिसत नाही. याच अर्थाने त्यांचा 'अवतार झाला' अशी श्रद्धा असावी.

आचार्यांची सगळीच ग्रंथरचना शास्त्रपूत व तर्कशुद्ध आहे. वैचारिक गोंधळ किंवा रचनेचा भोंगळपणा याला कुठेच थारा नाही. वाचिक व्यवहार करूनही अद्वैताचे भान जराही सुटलेले नाही. कारण अद्वैत हा आचार्यांसाठी केवळ एक सिद्धांत किंवा वाद जिंकण्यासाठी स्वीकारलेले तत्त्व नव्हते, तर ती त्यांची अनुभूती होती. सहजच मनात येते की मग अशा सिद्धाला वाचिक व्यवहाराची गरज काय? तर ही गरज, त्यांची वैयक्तिक, त्यांना स्वत:ला सिद्ध करण्याची नसून, आपल्याला आकळलेले अद्वैत साऱ्या जीवांना आकळावे, तो ब्रह्माचा निर्विषय आनंद त्यांना उपभोगता यावा यासाठी केलेला हा वाणीचा प्रपंच आहे. संत तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे,

***'ऐशी कळवळ्याची रीती । करी लाभावीण प्रीती ।'***

या जातकुळीतील तो वाचिक व्यवहार आहे, ते सारे सांगणे आहे, ती ग्रंथरचना आहे.

त्या ग्रंथरचनेतही भाष्यरचना, स्तोत्ररचना व प्रकरणग्रंथरचना अशी त्रिविधता दिसते. जे सांगायचे ते एकदाच व एकाच रीतीने का नाही सांगितले, हा मनाला पडलेला दुसरा प्रश्न! उत्तर अगदी सोपे आहे की अद्वैताचा विषय एकदाच सांगून समजणारा एकतर आद्यशंकराचार्यच पाहिजे किंवा ज्ञानेश्वर! शास्त्रामध्ये एकच गोष्ट वारंवार सांगणे, पुनरुक्ती करणे हा दोष आहे. तो पत्करून श्रुती-उपनिषदेसुद्धा पुन्हा-पुन्हा अद्वैताचा विषय मांडतात, मग श्रुतीचा आधार घेणारे आचार्य याला अपवाद कसे असतील? कारण असे आहे की जन्म झाल्या क्षणापासून मृत्यूपर्यंत आपले सारे आयुष्य द्वैतामध्ये जात असते. जन्मल्याबरोबर आई हेच विश्व असणारे बाळ जसजसे मोठे होते तसतसे खरोखर विश्वातील अनेक गोष्टींशी स्वत:ला जोडते, त्यामुळे कोणतीही गोष्ट तू मी- विषय व विषयी याचरीतीने कळते. हेच तत्त्वज्ञानातील द्वैत. त्यामुळे जनसामान्यांना हे तत्त्वज्ञान समजावून देण्यासाठी आचार्यांना आधार घ्यावा लागतो तो द्वैताचा म्हणजे पर्यायाने वाणीचा.

दुसरा मुद्दा येतो तो रीतीचा- एकाच रीतीने का नाही सांगितले? भाष्य- स्तोत्र- प्रकरणग्रंथ अशी त्रिविध रचना कशासाठी? पुन्हा तुकारामांच्याच शब्दात 'अधिकार तैसा करू उपदेश।' प्रत्येक व्यक्तीची जाणीव- आकलनाची कुवत वेगवेगळी असते. एखाद्याला भाष्यग्रंथातील तर्कप्रधान रचना मानवेल, तर दुसरा भक्तीच्या अंगाने जाणे-स्तोत्र अधिक पसंत करेल. तर कोणी तत्त्वज्ञानाच्या एखाद्याच अंगाचा अधिक पाठपुरावा करण्यासाठी

प्रकरणग्रंथाचा आधार घेईल. या साऱ्यांना समजवायचे आहे अद्वैत, पण त्यांना कळेल अशा भाषेत, म्हणून हे रचनेतील वैविध्य!

**प्रकरण – रचनेचा एक आविष्कार**

संस्कृत भाषेमध्ये रचनेचा एक आविष्कार म्हणून प्रकरणग्रंथाचा विचार केला जातो. ग्रंथांचे दोन प्रकार मानले गेले आहेत– एक म्हणजे आकरग्रंथ व दुसरा प्रकरण ग्रंथ. आकर म्हणजे खाण– मूळ ग्रंथ. त्या मूळग्रंथावर आधारलेल्या ग्रंथाला प्रकरणग्रंथ असे म्हणतात. त्याचे पारंपरिक लक्षण असे सांगितले जाते की,

***शास्त्रैकदेशसम्बद्धं शास्त्रकार्यान्तरे स्थितम् ।***
***आहुः प्रकरणं नाम ग्रंथकृद्भिः विपश्चितैः ।।***

ग्रंथनिर्मिती करणाऱ्या विद्वानांनी शास्त्राच्या इतर गोष्टींमध्ये असलेल्या, एका गोष्टीशी संबद्ध (जोडलेल्या)असणाऱ्या ग्रंथाला प्रकरण असे म्हटले आहे. उदाहरणार्थ, उपनिषद हा आकरग्रंथ आहे. या ग्रंथामध्ये निरनिराळ्या विषयांची चर्चा आढळते जसे की, सृष्टिनिर्मिती, जीवाची निर्मिती, जीवाची गती, मोक्ष इत्यादी. काही प्रकरणग्रंथामध्ये यापैकी विश्वनिर्मितीचा विचार केला जातो, तर काही प्रकरणग्रंथांमध्ये मोक्षविचार आढळतो. काही प्रकरणग्रंथांचा मुख्यविषय अनात्म्याची निंदा आहे. अशाप्रकारे एखाद्या विषयाला प्राधान्य देऊन मांडणी केली जाते म्हणून त्याला प्रकरणग्रंथ असे म्हणतात.

**आद्यशंकराचार्यांचे प्रकरण ग्रंथ**

या पार्श्वभूमीवर आचार्यांच्या प्रकरणग्रंथांचा विचार करता त्यांची संख्या, वर उल्लेखिल्याप्रमाणे सुमारे तीसच्या आसपास आहे. आचार्यांच्या प्रकरणग्रंथांच्या बाबत ग्रंथ शब्दाचाही विचार करावा लागतो. कारण सामान्यतः ग्रंथ म्हटल्यावर आपल्यासमोर एखादे जाड-जूड पुस्तक येते, तर आचार्यांनी रचलेला एक प्रकरणग्रंथ आहे 'एक श्लोकी'– केवळ एक श्लोक 'याला ग्रंथ म्हणतात?' असे सहज आपल्याला वाटते. पण 'होय.' संस्कृतमध्ये ग्रंथ म्हणजे 'ग्रथ्नाति इति' जो बांधलेला आहे– विषयाच्या अनुरोधाने, विषयाच्या परिपूर्णतेने, तो आकाराने कितीही लहान असला तरी 'ग्रंथ' म्हटला जातो. याच अर्थाने हा 'एक श्लोकी' प्रकरणग्रंथ आहे. तो संपूर्ण श्लोक असा आहे–

***किं ज्योतिः तव, भानुमान् अहनि मे, रात्रौ प्रदीपादिकं***
***स्याद् एवं, रविदीपदर्शनविधौ किं ज्योतिः आख्याहि मे ।***
***चक्षुः, तस्य निमीलनादिसमये किं, धीः धियः दर्शने किं, तत्र***
***अहम्, अतः भवान् परमकं ज्योतिः, तदस्मि प्रभो।।***

गुरु-शिष्याचा संवाद आहे. गुरूने शिष्याला विचारले की, 'तुझा प्रकाश कोणता? म्हणजे कोणत्या प्रकाशात तुझे व्यवहार होतात?' शिष्याने उत्तर दिले, ''दिवसा सूर्य, तर रात्री दिवे वगैरे.'' गुरू म्हणाले, 'ठीक आहे. पण मला सांग सूर्य, दिवा इत्यादीना बघण्यासाठी तुझ्याकडे कोणता प्रकाश आहे?' शिष्य उत्तरला, 'डोळा.' गुरूनी प्रश्न केला, ''डोळे मिटल्यावर काय?'' शिष्य म्हणाला, ''बुद्धी.'' गुरूंनी पुन्हा विचारले, ''या बुद्धीचे दर्शन (बुद्धी आहे ही जाणीव) कशामुळे होते?'' शिष्य ताबडतोब म्हणाला, ''तिथे 'मी' आहे. गुरू म्हणाले, ''म्हणून तू श्रेष्ठ प्रकाश आहेस.'' शिष्याने ते मान्य केले व तो म्हणाला, ''होय प्रभू, ते मी आहे.''

कोणतीही वस्तू दिसण्यासाठी म्हणजे तिचे ज्ञान होण्यासाठी प्रकाशाची गरज असते. त्या अर्थाने ज्ञानाचे साधन म्हणून प्रकाश शब्द इथे वापरला आहे.

चार ओळींचा एक श्लोक, पण अद्वैताचा किती सुंदर आविष्कार आहे बघा. सुरुवात झाली ती ज्ञान कशामुळे होते– एखादी वस्तू कळायला तुझ्याकडे साधन काय? त्यामुळे शिष्याने स्वाभाविकच स्थूलापासून सुरुवात केली. सूर्य, दिवा या अगदी बाह्य व प्रकाशाची– ज्ञानाची साधने म्हणून सांगितल्या. याही वस्तू कशामुळे समजतात असे विचारल्यावर प्रथम स्थूल इंद्रियाचा उल्लेख केला की डोळे– डोळ्यामुळे सगळे दिसते. पण झोपल्यानंतर डोळे मिटलेले असतात व तरीही ज्ञान होतच असते. स्वप्नं पडतच राहतात, चांगल्या स्वप्नाने सुख– आनंद तर भयप्रद स्वप्नाने भीती वाटत राहते, म्हणजे डोळे बंद केले तरीही ज्ञान होते. मग हे ज्ञान कसे होते? त्याठिकाणी सूक्ष्म इंद्रियाचा उल्लेख आला की बुद्धीमुळे हे ज्ञान होते. मग गुरूंनी अतिशय गंभीर प्रश्न विचारला की, अरे, बुद्धीला ज्ञान झाले, हे तरी कळले कुणाला? अर्थात् उत्तर आले, 'मला– आपल्याला' अद्वैताचा विचार इतक्या तर्कसंगतरीतीने सोप्या भाषेत मांडणे हे अद्वैताची अनुभूती असलेल्यालाच शक्य आहे. व्यवहारातही ज्या वक्त्याला एखाद्या विषयाचे योग्य आकलन झाले असेल, तो वक्ता तो विषय अतिशय सोप्या भाषेत, तरीही तर्कसंगतपद्धतीने व थेट श्रोत्यांपर्यंत नेऊन पोचवतो याचा आपल्याला अनेकवेळा प्रत्यय येतो. त्याचप्रकारे आचार्य अद्वैताचा स्वानुभव या प्रकरणग्रंथांच्या माध्यमातून श्रोत्यांपर्यंत पोचवतात.

बाह्य आकाराचा– श्लोकसंख्येचा विचार केला तर मनीषापञ्चक, अद्वैतपञ्चरत्न, उपदेशपञ्चक, यतिपञ्चक, मायापञ्चक हे सारे ग्रंथ प्रत्येकी पाचच श्लोकांचे आहेत. मनीषापञ्चकामध्ये 'मनीषा मम'– अशी माझी धारणा आहे. हे शब्द ध्रुवपदाप्रमाणे वापरले आहेत. खरं तर या प्रत्येक पञ्चकाला काही ना काही ध्रुवपद आहे. 'शिवोऽहम्' ही पदे अद्वैतपञ्चरत्नाचे ध्रुवपद आहे. कौपीनवन्तः खलु भाग्यवन्तः– भगवी वस्त्रे धारण करणारे खरोखर

भाग्यवान आहेत. हे ध्रुवपद 'यतिपञ्चक' या प्रकरणग्रंथाचे आहे, तर 'अघटितघटनापटीयसी माया' हे प्रसिद्ध ध्रुवपद 'मायापञ्चका'चे आहे. या सगळ्या नामावलीत उपदेशपञ्चक हा ग्रंथही आहे. यातही ध्रुवपद आहे. पण ते शब्दाची पुनरुक्तिरूप नाही, तर प्रत्येक श्लोकाच्या शेवटचे क्रियापद कर्मणिरचनेत बांधलेले आहे, जसे की, (गृहात्तूर्णं) विनिर्गम्यताम्, (श्रुतिशिरोवाक्यं) समाकर्ण्यताम्, (बुधजनैर्वाद:) परित्यज्यताम्, (जनकृपानैष्ठुर्यम्) उत्सृज्यताम् व शेवटचे महत्त्वाचे क्रियापद (परब्रह्मात्मना) स्थीयताम्. यातून रचनेचे वैशिष्ट्य जसे लक्षात येते, त्याचप्रमाणे आचार्यांचे भाषासामर्थ्यही जाणवते. 'स्वरूपानुसन्धान' या नऊ श्लोकांच्या रचनेमध्येही 'परं ब्रह्मनित्यं तदेवाहमस्मि', हे ध्रुवपद येते. 'अनात्मश्रीविगर्हणप्रकरणा' मध्ये 'येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत' ही ध्रुवपदरचना आहे, तर 'दशश्लोकी'मध्ये 'तदेकोवशिष्ट: शिव: केवलोऽहम्' हे ध्रुवपद आहे. या ध्रुवपदांपैकी चार प्रकरणग्रंथांची ध्रुवपदे थेट अद्वैताचा निर्देश करतात असे आपल्या लक्षात येईल.

प्रत्येकच प्रकरण ग्रंथ हा स्वतंत्रपणे अभ्यासण्याचा, खरे तर आचरणाचा विषय आहे. पण प्रस्तुत लेखामध्ये आपण त्यांच्या वैशिष्ट्यांचा विचार करीत आहोत. 'सदाचारनुसन्धान' हा असाच एक प्रकरण ग्रंथ, ज्यामध्ये अद्वैताचा विचार मांडताना आचार्यांनी संन्यास, चित्त, ब्रह्मचर्यादी चार आश्रम यांचे रूढार्थापेक्षा निराळेच पण अत्यंत उचित अर्थ नोंदले आहेत.

सर्वसाधारणपणे संन्यासाचा संदर्भ भगव्या- काषाय- वस्त्राकडे जोडला जातो. विरक्तीचे प्रतीक म्हणून तो योग्यही आहे. पण दासगणू महाराजांचे सच्छिष्य वरदानंदभारती म्हणतात की, वस्त्रसंन्यासापेक्षा वृत्तिसंन्यास अधिक महत्त्वाचा आहे. कदाचित् आचार्यांनी 'सदाचारानुसंधाना'मध्ये सांगितलेल्या संन्यास शब्दाच्या लक्षणाच्या अभ्यासानेही वरदानंदभारतींना ते जाणवले असेल. 'सदाचारानुसंधाना'मध्ये आचार्यांनी म्हटले आहे,

***'देहाभ्यासो हि संन्यासो नैव काषायवाससा ।***
***नाहं देहोऽहमात्मेति निश्चयो न्यासलक्षणम् ।। सदा. १६***

संन्यास भगव्या वस्त्राने होत नाही, तर देहाचा अभ्यास म्हणजे संन्यास. पण देहाचा अभ्यास म्हणजे काय? तर आचार्य सांगतात की, मी देह नसून आत्मा आहे हा निश्चय होणे म्हणजे संन्यास.

देहाचा अभ्यास करायचा म्हणजे देह म्हणजे मी ही भ्रान्ती दूर करायची. देहाची नश्वरता जाणून घ्यायची. म्हणजे राहते काय तर अविनाशी- नित्य आत्मत्त्व- हे आकलन- ही अनुभूती म्हणजे संन्यास, मग तुम्ही वस्त्र कोणतेही वापरा. परंपरेची पूर्ण जाणीव व सार्थ अभिमान असूनही आचार्य वस्त्रसंन्यास म्हणजे संन्यास नव्हेच असे म्हणतात, तेव्हा त्यांच्यातील अद्वैती स्पष्टपणे दृग्गोचर होतो. आत्म्यावर जसा देहाचा अध्यास होतो, तसाच देहावर वस्त्राचा, त्यामुळे बाह्य अध्यास- वस्त्राध्यास दूर करणे जसे सहज शक्य आहे, तितक्याच सहजतेने देहाध्यास दूर झाला पाहिजे हा संन्यास, हे आचार्यांना सुचवायचे आहे.

याच प्रकरणग्रंथामध्ये आचार्यांनी असे म्हटले आहे की,

***चित्तं चिदिति जानीयात्तकाररहितं सदा ।। सदा. ३७***

चित्ताला (चित् + त) चिद् म्हणून जाणा, ते 'त'कार रहित आहे. आता 'त'कार म्हणजे काय? तर 'तकारो विषयाध्यासो- तकार म्हणजे विषयांचा अध्यास. चित्त शब्दामध्ये 'चित्' वर 'त' लावला जातो व चित्त शब्द तयार होतो, असाच या चैतन्यावर 'चित्'वर विषयांचा अध्यास घडतो व ते चित्त होते. एकदा का असा अध्यास घडला की त्या चित्ताला 'चित्' मध्ये स्थिर करण्यासाठी साधनेची गरज निर्माण होते.

'योगतारावली', 'अपरोक्षानुभूति' यासारख्या प्रकरणग्रंथामध्ये आचार्यांनी या साधनेचा विचार मांडला आहे. श्वास-प्रश्वास- गती, समाधी, अष्टाङ्गयोग या साधनांचा विचार या ग्रंथांमध्ये मांडून आचार्यांनी अद्वैताचा मार्ग खुला केला आहे.

'स्वात्मनिरूपणम्' नावाच्या प्रकरणग्रंथामध्ये

***अद्वैतमेव सत्यं तस्मिन्द्वैतं न सत्यम्, अध्यस्तम् ।***
***रजतमिव शुक्तिकायां मृगतृष्णायामिवोदकस्फुरणम् ।।***
***स्वात्म. ५१***

असे नि:संदिग्धपणे अद्वैतच सत्य असल्याचे प्रतिपादन केले आहे. पण त्याचबरोबर ते द्वैताला असत्य म्हणत नाहीत, हेसुद्धा लक्षात घेतले पाहिजे. आचार्य सांगतात, अद्वैत हेच सत्य आहे, त्यामध्ये असणारे द्वैत सत्य नाही, तर अध्यस्त आहे, ज्याप्रमाणे शिंपल्याच्या ठिकाणी चांदी किंवा मृगजळामध्ये पाण्याचा भास व्हावा.

आचार्य द्वैताला असत्य म्हणत नाहीत कारण केवल- अद्वैत- सिद्धान्तानुसार सशाचे शिंग, वंध्यासुत व आकाश- कुसुम या तीनच गोष्टी असत्य म्हणजे कधीही अनुभवाला न येणाऱ्या आहेत. बाकी सर्व गोष्टी अनुभवालाही येतात. पण त्याचबरोबर नष्टही होतात. म्हणून अध्यस्त- आरोपित किंवा मिथ्या आहेत. शब्दयोजनेच्या बाबतही आचार्य किती दक्ष आहेत हे यावरून लक्षात येते.

'प्रौढानुभूति', 'अद्वैतानुभूति' व 'अपरोक्षानुभूति' हे तीनही प्रकरणग्रंथ आपल्या शीर्षकातच अनुभूतीचा स्पष्ट निर्देश करणारे. एका अर्थाने तिन्ही ग्रंथांचा विषय एकच- अनुभूती. पण या तीनही ग्रंथांचे रचनावैशिष्ट्य बघण्यासारखे आहे. 'अद्वैतानुभूति' व

'अपरोक्षानुभूति' हे दोन्ही ग्रंथ अनुष्टुभ् छंदात आहेत. त्यातही अद्वैतानुभूतीमध्ये कोणतीही साधना सांगितली नाही, पण अपरोक्षानुभूतीमध्ये मात्र अष्टांगयोग, समाधीतील विघ्ने या साऱ्यांचा ऊहापोह आहे.

अद्वैतानुभूतीमध्ये अद्वैताचे मर्म आचार्यांनी नेमकेपणाने उलगडले आहे. ते म्हणतात–

*शिव एव सदा जीव: जीव एव सदा शिव: ।*
*वेत्ति ऐक्यम् अनयो: य: तु स आत्मज्ञ: न च इतर: ।।*
*अद्वैत ७४.*

शिव हाच नेहमी जीव आहे व जीव हाच सदा–शिव आहे. जो या दोघांमधील (शिव–जीव) ऐक्य जाणतो तो आत्मज्ञ, इतर कुणी नाही.

अपरोक्षानुभूतीमध्ये अष्टांगयोगाचा विचार असला तरीही अष्टांगांच्या पारंपरिक स्पष्टीकरणापेक्षा निराळे स्पष्टीकरण आचार्यांनी दिले आहे, उदाहरणार्थ–

*यत्र यत्र मनो याति ब्रह्मण: तत्र दर्शनात् ।*
*मनस: धारणायै एव धारणा सा परा मता ।।*
*अपरोक्ष १२२*

ज्या ज्या ठिकाणी मन जाते तेथे ब्रह्माचे दर्शन होत असल्यामुळे मनाच्या धारणेसाठी तीच श्रेष्ठ धारणा आहे.

'प्रौढानुभूति' हा ग्रंथ नावापासूनच स्वत:चे प्रौढत्व सिद्ध करतो. त्यासाठी आचार्यांनी वापरलेले वृत्तही आहे– शार्दूलविक्रीडित– वाघाची क्रीडा आहे ती. अनुभूती आहे ती अद्वैताची– तीही अतिशय सघन, पराकोटीची. एकाच उदाहरणावरून ती नेमकी लक्षात येईल. सहसा नमस्कार केला जातो तो परमेशाला– परब्रह्माला या ग्रंथामध्ये आचार्यांनी म्हटले आहे, 'मह्यं नम:'– मला नमस्कार असो. संपूर्ण श्लोक असा आहे,

*योऽहं पूर्वमित: प्रशान्तकलनाशुद्धोऽस्मि बुद्धोऽस्म्यहं*
*यस्मान्मत्त इदं समुत्थितमभूदेतन्मया धार्यते ।*
*मय्येव प्रलयं प्रयाति निरधिष्ठानाय तस्मै सदा ।*
*सत्यानन्दचिदात्मकाय विपुलप्रज्ञाय मह्यं नम: ।। प्रौढ. १५.*

जो मी पूर्वीपासून आलो आहे, अत्यंत शांत, शुद्ध आहे, सजग आहे, ज्या माझ्यापासून हे सर्व निर्माण झाले ते मी धारण करतो. ते माझ्यातच लय पावते. त्या अधिष्ठानरहित (दुसऱ्या कोणत्याही आधाराशिवाय असणाऱ्या), सत्य, आनंद व चित्स्वरूप अशा, अतिशय बुद्धिमान अशा मला नमस्कार असो.

'मला नमस्कार असो' म्हणजे ज्याला नमस्कार करायचा व ज्याने नमस्कार करायचा असे दोन्हीही मीच अशी वरवर पाहता विसंगत वाटणारी ही रचना. पण निखळ अद्वैताचीच अनुभूती येणाऱ्याला दुसरा कोण, कसा नमस्कार करणार? कारण मग अद्वैतच मोडेल. बरं, हा एकट्या आचार्यांचा अनुभव आहे असेही नाही, तर ज्ञानेश्वरादी साऱ्या संतांचा अनुभव याहून वेगळा नाही. म्हणून तर 'कानडाऊ विठ्ठलु' ला आळवताना ज्ञानदेव म्हणतात, 'क्षेम देऊ गेले तव मीची मी एकली'– त्या विठ्ठलाला आलिंगन द्यायला गेले तर तिथे होते कोण? मी एकटीच. कारण देव– आणि भक्त हा प्रेमाचा व्यवहार आहे, तत्त्वज्ञानात उरते ते केवळ– अद्वैत. आणि मग तोच एकमेव अनुभव असणारे आचार्य स्वाभाविकच 'मह्यं नम:' अशी इतरत्र कुठे न आढळणारी रचना लिहून जातात.

खरोखर वाणीचा विषय नसणाऱ्या अद्वैताचा विचार वाणीने करणे हे केवळ आचार्यांसारख्या संतसज्जनांनाच शक्य आहे.

'बुडती हे जन न देखवे डोळा'

एवढे एकच त्याला कारण आहे. म्हणूनच अद्वैताच्या बोधावर निर्वाणषट्कामध्ये 'गुरुर्नैव शिष्य:'– (निर्वाण.५)

'मला कुणी गुरुही नाही किंवा शिष्य नाही' असे परखड विधान करणारे आचार्य 'तत्त्वोपदेशा'मध्ये अतिशय गंभीरपणाने गुरुतत्त्वाचे श्रेष्ठत्व मान्य करून सांगतात–

*'भावाद्वैतं सदा कुर्यात् क्रियाद्वैतं न कर्हिचित् ।*
*अद्वैतं त्रिषु लोकेषु नाद्वैतं गुरुणा सह ।। तत्त्व ८७.*

अद्वैताचा भाव असावा, पण क्रिया करताना– कर्म करताना अद्वैत कधीच असू नये (व्यवहार व्यवहासारखाच व व्यवहार म्हणूनच करावा). तीनही लोकांमध्ये अद्वैत असावे. पण गुरुबरोबर अद्वैत असू नये.

तत्त्वज्ञानाच्या परम शिखरावर पोचूनही आचार्यांच्या ठिकाणची ही स्वाभाविक कोमलता जगन्नाथ पंडिताच्या प्रसिद्ध उक्तीची आठवण करून देते–

*शास्त्रेषु कर्कशधिय: वयमेव, नान्ये।*
*काव्येषु कोमलधिय: वयमेव, नान्ये ।*

शास्त्राविषयी अत्यंत तर्ककठोर बुद्धी असणारे आम्हीच, इतर कुणीही नाही, आणि काव्याच्या बाबतीत अत्यंत कोमल अंत:करण असणारेही आम्हीच, अन्य कुणीही नाही.

– **डॉ. कांचन मांडे**, पुणे.
संस्कृत प्राकृत भाषा विभाग, पुणे विद्यापीठ,
पुणे ४११००७.
फोन नं. : २५६०१३३५



# श्री आद्य शंकराचार्य : अद्वितीय कर्मयोगी

**- डॉ. अजित कुलकर्णी**

*बी.ए.एम.ए., पीएचडी. (श्रीमत् भगवद्गीता एक जीवनप्रणाली), रजिस्ट्रॉर- बी.एम.सीसी. कॉलेज, पुस्तके व लेखमाला प्रकाशित. गेली तीस वर्षे प्रवचन, व्याख्यान व कीर्तने (दासबोध, भागवत, ज्ञानेश्वरी, रामकृष्ण, परमहंस व स्वामी विवेकानंद यावर) पुरस्कार- शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, आदर्श शिक्षक व गौरव पदक पुणे महानगरपालिका, धर्मभूषण पदवी.*

श्री आद्य जगद्गुरु शंकराचार्यांचा जन्म केरळमधील कालटी या गावी झाला. अवघ्या बत्तीस वर्षांच्या जीवन कालावधीत त्यांनी अलौकिक असे कार्य केले. आचार्यांनी जरी संन्यास घेतला असला तरी लोककल्याणाची तळमळ त्यांना होती. भारतभ्रमण करून समाजजागृती त्यांनी केली.

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचे दोन भाग पडतात. एक पारमार्थिक बाजू, दुसरी व्यावहारिक बाजू. पारमार्थिक तत्त्वज्ञान सर्व शाखांना लागू आहे. अद्वैत तत्त्वज्ञान सांगून, मायावादाचा विचार मांडला. 'तत्वमसि' या महावाक्यानंतर स्वतंत्र मानसशास्त्राची जरूरी नाही हे सांगितले. यातच जीवाचे स्वरूप, इंद्रिय व ईश्वराशी आणि शरीराशी त्याचा संबंध विदित केला आहे. ज्ञानशास्त्रात ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीचा लय होतो. तसेच, ज्ञानाची उत्पत्ती व प्रामाण्य हे मांडले आहे. सत्ताशास्त्रात ब्रह्म हीच एक सद्वस्तू असून 'नेति-नेति' याशिवाय त्याच्याबद्दल काही बोलता येत नाही हे सांगितले. तसेच, ब्रह्माचे स्वरूप व त्याचा जीव जगताशी संबंध हे प्रतिपादित केले आहे. विश्वशास्त्रात सृष्टी नाही (शाश्वत दृष्टीने) व नामरूपात्मक जग अवस्तू आहे, तसेच सृष्टी व कारणता यांच्या समस्या हा विचार मांडला आहे.

व्यावहारिक बाजूच्या माध्यमातून आचार्यांनी कर्म, नीति, धर्मशास्त्र या गोष्टींचा समावेश केला आहे. नीतिशास्त्रात, ब्रह्म पाप-पुण्यातीत आहे ही संकल्पना मांडली. धर्मशास्त्रात ब्रह्मतादात्म्य व सायुज्य, याशिवाय काही बोलणे व्यर्थ आहे. कारण आत्मा ब्रह्मच असून सम्यकदर्शन झालेल्याला तादात्म्याची प्रचीती असते. धर्मशास्त्रात अविद्येकडून विद्येकडे जाणे व विद्याप्राप्तीनंतर ब्रह्मलोकांत जाणे याचा ऊहापोह केला आहे. नीतिशास्त्र दृष्टीने मोक्षसाधनेचे उपाय सांगितले आहेत.

कर्म विचारात दोन बाजूंचा विचार आहे. एक व्यक्तिगत उन्नतीच्या दृष्टीने व दुसरी बाजू समाजजीवन उन्नतीच्या दृष्टीने आहे.

**आचार्यकालीन सामाजिक स्थिती :**

शंकराचार्यांचे काळात समाजजीवन अत्यंत विस्कळीत झाले होते. धर्मातील कर्मकांड विषय विकोपाला गेला होता. भारतात राष्ट्रीय दृष्टीने व धार्मिक दृष्टीने संधिकाल उत्पन्न झाला होता. बौद्ध व जैन धर्माचा प्रभाव समाजमनावर पडत होता. समाजातील अनेक पंथ सांप्रदाय यात एकोपा नव्हता. भारतीय धर्म व संस्कृतीच्या दृष्टीने केवळ निरर्थक व हानिकारक रूप प्राप्त झाले होते. याने वैदिक धर्म निर्बल, उद्ध्वस्त आणि छिन्नविच्छिन्न झाला होता. नरबळी देण्याची पद्धती समाजात रूढ झाली होती. वैचारिक, भावनिक गोंधळ समाजात वाढला होता. धार्मिक, सांस्कृतिक व राजकीय जीवन धोक्यात आल्याची त्यांना कल्पना आली होती.

**भारतभ्रमण करून कार्याला प्रारंभ :**

आठव्या वर्षी संन्यासदीक्षा घेऊन ते भारतभ्रमणाला बाहेर पडले. समाजाचे सूक्ष्म निरीक्षण व परीक्षण करून लोक व समाजजागृतीचे कार्य केले. हे भ्रमण आसेतू ते हिमालय असे होते. एकदा त्रिवेंद्रम्च्या (तिरुअनंतपूरम्) मंदिरातील व्यवस्थापक आचार्यांना भेटले. त्यांनी आचार्यांना मंदिरात बोलविले. तेव्हा या व्यवस्थापकाने आचार्यांची व त्यांच्या शिष्यपरिवाराची व्यवस्था केली. त्यावेळी आचार्य या व्यवस्थापकांना म्हणाले, ''काय, मंदिरातील दैनंदिन व्यवहार कसे काय चालले आहेत? पूजेअर्चेशिवाय मंदिरात काही घडते की नाही?'' यावर व्यवस्थापक म्हणाले, ''गुरुदेव, या मंदिरात सर्व विधी यथायोग्य पार पडतात. त्यात काही खंड पडू दिलेला नाही. श्रीअनंतशयनाच्या कृपेने आम्हाला काही कमी नाही.''

हे ऐकून आचार्यांना धक्का बसला. ते म्हणाले, ''आपली मंदिरे ही धार्मिक चळवळीची केंद्रे आहेत. येथे काय, पूजा अर्चा हे होणे म्हणजे धार्मिक कार्य आहे काय? तेव्हा त्यांनी सांगितले की,

*जीवन् कर्मपरित्यागो य: करोति नराधम: ।*
*स मूढो नरकं याति यावदाभूतसंप्लव: ।।*

जो मनुष्य जगत असताना काहीही कार्य करीत नाही, असा नीच-मूर्ख मनुष्य या जगाचा नाश होईपर्यंत नरकातच पडून राहतो. (अनंत आनंदगिरीकृत: आचार्य विजय) तेव्हा मनुष्याने कार्यरत असावे. येथे कर्मयोगाच्या शिकवणुकीचा एक अनुबंध आहे.

तेव्हा मंदिराच्या आवारात एखाद्या विषयावर प्रवचने देऊन सामान्य लोकांना धार्मिक जीवन जगण्याची शिकवण दिली पाहिजे. सामान्य लोकांना जीवनात लहान मोठ्या अनेक अडचणी येतात. त्याप्रसंगी त्यांना मार्गदर्शन केले पाहिजे. धर्मविषयीच्या त्यांच्या मनातील शंका दूर केल्या पाहिजेत. त्यांना धर्माचे कल्याणकारी रूप दाखवून दिले पाहिजे.

मनुस्मृतीत सांगितले आहे की,

*ब्राह्मणेषु विद्वांस: विद्वत्सु कृतबुद्धय: ।*
*कृतबुद्धिषु कर्तार: कर्तृषु ब्रह्मवादिन: ।।*

ब्राह्मणामध्ये विद्वान श्रेष्ठ, विद्वानांमध्ये कार्य करण्याची बुद्धी असणारे श्रेष्ठ, कार्य करण्याची बुद्धी असणाऱ्यांमध्ये प्रत्यक्ष कार्य करणारे श्रेष्ठ, कार्य करणाऱ्यांमध्ये ब्रह्मज्ञान असणारे श्रेष्ठ.

तेव्हा धार्मिक क्षेत्रात, मंदिरात, धर्मकार्याबरोबर ज्ञान प्रबोधनाचे कार्य चालले पाहिजे हा विचार त्यांनी दिला आहे.

देशाटन करताना मंदिरे, मठ, संस्थांना भेटी देऊन, नष्टप्राय मंदिराना पुनरुज्जीवीत केले. तेथे मूर्ती स्थापन केल्या, कोठे मूर्तीचे मालिन्य नष्ट करून पुन:स्थापना केली. तेथे पूजा-अर्चादिची व्यवस्था करून धार्मिक चळवळीची केंद्रे निर्माण केली. यातून धर्मप्रचारक, प्रबोधनकार निर्माण करून समाजात लोकजागृती केली.

भारतदेशाच्या चार दिशांना चार प्रधान मठ स्थापन करून परकीय धार्मिक आक्रमणे थोपविली. पाचवे पीठ कांचीपुरम् केले. या मठांच्या अधिपत्याखाली अनेक उपपीठांची निर्मिती करून लोकसंग्रह जमविला. ते एकमेकांना जोडले. एक सुसंघटन निर्माण करून समाजात ऐक्य निर्माण केले.

धार्मिक विधीत पंचायतन पूजा सुनिश्चित करून सर्व पंथात समन्वय साधला. लोकांना शांती समाधानाचा मार्ग दाखविला. अशाप्रकारे आचार्यांनी आयुष्यभर कार्य केले. आयुष्यभर कार्य करावयाचे हे ध्येय ठेवूनच त्यांनी संन्यास घेतला होता. तथापि, कर्म करून अलिप्त कसे रहावे हे त्यांनी सांगितले. यासाठी त्यांनी एक उदा. दिले की,

ब्रह्म हे जगाला निर्माण करते. ही त्याची लीला आहे. पण या निर्मितीच्या कार्यापासून ते अलिप्त राहत असते. कारण त्याच्या ठिकाणी या निर्मितीमागे कसलीच इच्छा नाही. जगाच्या निर्मितीचे अधिष्ठान जे ब्रह्म आहे ते या जगापासून अलिप्त आहे. त्यामुळे त्याला निष्क्रिय मानले आहे. ब्रह्म जाणणारा ब्रह्ममय होतो, म्हणनूच तो आपल्या समाजबांधवांच्या कल्याणासाठी जरी कर्म करीत असला तरी त्या कर्माच्या बंधनापासून तो मुक्त व अलिप्त राहतो. असेच, कर्मयोगी आचार्य अलिप्त आहेत. समाजातील मानवधर्मा-विरुद्धच्या चालीरीती, परंपरा बंद केल्या. मानवधर्म श्रेष्ठ मानला.

**तत्त्वज्ञान क्षेत्रातील आचार्यांचे कार्य**

एकूण आचार्यांच्या कार्याची दिशा चौफेर होती. त्यांनी 'अद्वैत सिद्धांत' तत्त्वज्ञानात प्रस्थापित केला. श्रीमद्‌भगवद्‌गीतेला महाभारतातून काढून प्रमाणग्रंथ म्हणून स्वीकारले. यात उपनिषदे व ब्रह्मसूत्रे यांना प्रमाणग्रंथ स्वीकारले. त्याचप्रमाणे मुख्य दहा उपनिषदांवर टीका लिहिली. गीतेवर शांकरभाष्य म्हणून टीका लिहिली. तसेच, ब्रह्मसूत्रे, विवेकचूडामणि, योगतारावली, अपरोक्षानुभूति, उपदेशसाहस्री, शतश्लोकी, वगैरे ग्रंथ लिहून विचारांना नवीन दिशा दिली. तसेच अनेक अनेक भक्ती-स्तोत्रांच्या रचना केल्या. यातूनच त्यांच्या चौफेर बुद्धीचा प्रत्यय येतो. खंडण-मंडण पद्धती त्यांनी प्रस्थापित केली. या सर्वांतून त्यांच्या नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेची दिव्य प्रचीती येते. या माध्यमातून लोकजागृती केली.

अशाप्रकारे सनातन धर्माचा पाया सुदृढ केला. सनातन म्हणजे नित्य नूतन वाटणारा. अनेक महात्मे, धर्मप्रचारक उत्पन्न केले. अनेकांनी शंकराचार्यांकडूनच प्रेरणा घेतली. त्यांचे कार्य पुढे चालू ठेवले आहे. यामुळे वैदिक धर्माचे संरक्षण व संप्रसारण केले. यामुळेच आचार्यांचे जीवनकार्य म्हणजे सार्वभौम सनातन वैदिक धर्माचा दिग्दर्शनकारी प्रकाशस्तंभच आहे.

**शंकराचार्यांचे कर्माविषयी विचार**

कर्म अनादि आहे. जो जसे कर्म करील तो तसे फळ मिळवित असतो. माणसाला फळ मिळण्याची प्रक्रिया माणसावरच अवलंबून आहे. मनुष्य आपल्या स्वभावानुसार ते निर्माण करतो. 'जे पेराल ते उगवेल' या नियमाने हे जग चालत असते. हे विश्व परमेश्वराचे क्रीडांगण आहे. या क्रीडांगणावर खेळणाऱ्या प्रत्येक खेळाडूला खेळ खेळण्याचा अधिकार आहे. हा खेळ कसा खेळावा हे परमेश्वराने ठरविले नसून ते प्रत्येकाच्या मुक्त इच्छेवर आणि स्वभावावर अवलंबून आहे. प्रत्येकाला जीवनात आपल्या कर्माची फळे भोगत जीवन जगावे लागते. पूर्वजन्मी जे कर्म केले त्याचे त्याला या जन्मी भोगावे लागते. आणि मृत्यूच्या पूर्वी हे कर्मफळ

भोगायचे राहिले असते ते त्याला पुढील जन्मी भोगावेच लागते. प्रत्येकाला कर्माचे योग्य फळ मिळेल, याची काळजी तटस्थपणे परमेश्वर घेत असतो. मानवाचे भूलोकाचे जीवन जास्तीत जास्त सुखाचे व्हावे, यासाठी यात विविधता निर्माण केली आहे. परंतु मनुष्याने मात्र या विविधतेपलीकडील परमसत्य समजून घेणे आवश्यक आहे. यानुसार कर्माचे तीन भाग पडतात, प्रारब्ध, क्रियमाण व संचित हे होत.

शंकराचार्य वैदिक कर्मकांडाच्या विरुद्ध नव्हते परंतु त्याचा अतिरेक असू नये हा उद्देश होता. मनुष्य कर्मप्रवण होण्यासाठी त्यांनी त्याच्या मर्यादा स्पष्ट केल्या होत्या. अध्यात्मिक जीवनाची सुरुवातही कर्मातून होते व सत्यस्वरूप जाणल्यावर त्याचा अंत होतो, म्हणजेच त्याचे परिवर्तन निष्काम कर्मात होते. शुद्ध कर्मामुळे चित्तशुद्धी झाली पाहिजे. मानवी जीवनाची उच्च मूल्ये जाणून घेण्यासाठी जिज्ञासा निर्माण होणे आवश्यक आहे.

यासाठी शंकराचार्यांनी– पंचायतन पूजा सांगून, कर्माचे स्वातंत्र्य दिले. कोणी कोणत्याही उपास्य देवाची पूजा– उपासना– साधना करून अंतिम ब्रह्म जाणावे. या माध्यमातून मनुष्याच्या मनात आत्मविश्वास निर्माण केला. आत्मविश्वासामुळे मनुष्य आशावादी होऊन चांगले जीवन जगू शकतो. आपल्या शरीरशक्तीचा उपयोग धैर्याने समाज, राष्ट्र रक्षण्यासाठी झाला पाहिजे आणि अध्यात्मिक शक्तीचा उपयोग, मन, बुद्धी, सुदृढ होण्यासाठी, तसेच, याने सुसंपन्न व्यक्ती बनण्यासाठी केला पाहिजे. मनुष्य हा भावनाशील असल्याने सगुणाचे माध्यम स्वीकारून बुद्धिस्थ– परमेश्वरतत्त्व सहज अवगाहन होऊ शकते. या दृष्टीने आचार्यांचा कर्मयोग, विचार प्रवर्तक, चेतना, प्रेरणा, स्फूर्ती देणारा आहे.

**समारोप**

शंकराचार्य हे ईश्वरी कार्य करण्यासाठीच आले होते. हे एक अनादि जागृत चैतन्य होते. त्यामुळे अलौकिक बुद्धिमत्तेचे, विलक्षण कल्पनाशक्तीचे तसेच अगाध ज्ञानाचे एक वादपटू होते. खंडण– मंडण पद्धतीने समाजात विचार रुजविले होते. प्रकांड विद्वत्ता व सुस्पष्ट विवेचनाचा उत्तम संगम त्यांच्या कार्यातून व्यक्त होतो. अवैदिक धर्माच्या विचारांचा पराभव करून वैदिक धर्माची प्रतिष्ठापना त्यांनी केली. आचार्य तसे स्वत: अत्यंत नि:स्पृहपणे जीवन जगले व संन्यस्तवृत्तीने राहिले.

असे आचार्य अद्वितीय कर्मयोगी होते.

**– डॉ. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, नवीन मराठी शाळेसमोर, पुणे ४११०३०.
फोन : २४४८७०३०

# आत्मषट्क

**सौ. सुनंदा आनंद शाळिग्राम**

*एम.ए. मराठी, स्वामी सत्यदेवानंद यांच्या शिष्या.*
*श्रीगीता, श्रीज्ञानेश्वरी व भागवत यांची निरूपणसेवा*

मातेची अनुज्ञा आणि आशीर्वाद घेऊन श्री शंकराचार्यांची बालमूर्ती आठव्या वर्षी सद्गुरुशोधासाठी केरळ देशातून एकटीच पायी प्रवास करीत नर्मदाकाठी येऊन पोहोचली. ओंकारेश्वर पर्वताच्या एका गुहेत भगवत्पूज्यपाद गोविंदयती राहात असल्याचे त्यांना समजले होते. बालशंकर गुहेच्या दाराशी आले. दार अगदीच निमुळते वीत–दीडवीतीच्या झरोक्याप्रमाणे होते. बालशंकराने आत डोकावून श्री गोविंदयतींना भक्तिपूर्वक प्रणाम केला. श्री गोविंदयतींनी विचारले, 'तू कोण आहेस?' बालशंकराने उत्तर दिले, ''**चिदानंदरूप: शिवोऽहं शिवोऽहम् ।**'' सलग सहा श्लोकांनी त्यांनी जे उत्तर दिले, त्याच श्लोकांना 'आत्मषट्क' म्हणतात. हे उत्तर ऐकल्यावर श्री गोविंदयतींनी त्यांना दंडग्रहणदीक्षा देऊन उपदेश केला.

आचार्यांचं 'आत्मषट्क' स्तोत्र म्हणजे तत्त्वज्ञानाचा अमृत–कलश आहे. त्यांनी 'गागर में सागर' भरला आहे. त्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानाचे सार या स्तोत्रात एकवटले आहे. पण नुसतेच तत्त्वज्ञान नाही, तर तत्त्व आणि काव्य यांचा मधुर संगम झाला आहे. मध जसा सर्व फुलांतून ओतप्रोत भरलेला असतो, तसे आचार्यांच्या स्तोत्रांत एकमेव अद्वितीय सच्चिदानंदघन परमात्मतत्त्व ओतप्रोत भरलेले आढळते. पं. गोस्वामींनी म्हटल्याप्रमाणे ''आचार्यांची वेदान्तस्तोत्रे तर अगदी रसायनासारखी आहेत. रसायने ज्याप्रमाणे खावयास गोड असून ती परिणामी तुष्टि आणि पुष्टि देतात, त्याप्रमाणे आचार्यांची वेदान्तस्तोत्रे, वेदांतासारखा विषय रूक्ष व कंटाळवाणा असला तरी, ऐकायला व म्हणायला गोड लागतात. तसेच बुद्धीचा कायापालट करून त्या बुद्धीला आत्मसमाधानाचे दिव्य तेज व सामर्थ्य प्राप्त करून देतात. आचार्यांचे स्तोत्रवाङ्मय सर्वतोपरी मानवी जीवनाला उपकारक आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे 'आचार्यांच्या वाणीत कवित्व, रसिकत्व आणि परतत्त्व या तिन्ही गुणांचा साधकाला साक्षात्कार होतो.'

साक्षात्कारासाठी बुद्धि, भावना व कर्मशक्ती या तिन्ही शक्तींची वाढ व्हावी लागते. शिवाय प्रतिभेच्या विकासाशिवाय ईश्वरदर्शन अशक्य आहे. आचार्यांच्या स्तोत्रात भावनांबरोबर बुद्धी प्रगल्भ करण्याचीही योजना आहे. साधकाची तत्त्वज्ञानाची भूमिका सुदृढ करून त्याच्या बुद्धीतील गोंधळ स्तोत्रे दूर करतात. त्यांच्यामुळे भक्तिभावाचा विकास होतोच. स्तोत्रे तात्त्विक ग्रंथांप्रमाणे नुसती वाचली जात नाहीत. त्यांचे नित्य पठण होते. अर्थात नकळत त्यांचे सतत चिंतन होते व त्यामुळे त्यातील विचार अंत:करणात ठसून बुद्धी व भावना यांच्या विकासाला साह्य होते.

गुरुदेव रानडे म्हणतात, ''तत्त्वज्ञान हे परमार्थाच्या शेताला घातलेले कुंपण आहे. भ्रामक समजुतींची मोकाट गुरे त्या शेतात शिरू नयेत, म्हणून असे कुंपण अवश्य आहे.''

पुढे ते म्हणतात, ''ईश्वरावर प्रेम बसावे यासाठी त्याचे स्वरूप बुद्धीने निश्चित करून घेणे अवश्य आहे. यासाठी अध्यात्मविद्येचा अभ्यास केला पाहिजे.''

'आत्मषट्क' सारख्या वेदान्तपर स्तोत्रांमध्ये आचार्यांनी जीवाचे ब्रह्मत्त्वच अनेक प्रकारांनी वर्णिले आहे. ध्येयाचे स्वरूप सतत साधकाच्या अंतरी जागृत राहावे, हा त्याचा हेतू आहे. वेदान्ताच्या अभ्यासाने बुद्धीला आत्म्याचे स्वरूप समजते, प्रपंचाचे वैयर्थ्य अंत:करणात ठसते; नित्यानित्यविवेक दृढमूल होतो व ईश्वरप्राप्तीची ओढ लागते. वेदान्तज्ञानाचे मुख्यत्वे हे कार्य आहे. आचार्यांचा मुख्य भर 'ब्रह्माचे अर्थात आत्म्याचे सत्यस्वरूप स्पष्ट करून त्याच्या प्राप्तीचा प्रयत्न करा, इतर सर्वांचा त्याग करा; त्यावाचून नित्यानंद व शाश्वतशांती नाही' हे सांगण्यावर आहे. ज्याच्या प्राप्तीने जीवन धन्य, दिव्य व आनंदमय होईल, ते तत्त्वज्ञान श्रेष्ठ. असेच तत्त्वज्ञान ऋषींच्या व स्वत:च्या अनुभवाच्या भक्कम पायावर आचार्यांनी मांडले आहे. ईश्वरोन्मुखता जागृत करण्याचे सामर्थ्य त्यांच्या स्तोत्रात आहे. त्यांची स्तोत्रे म्हणजे 'परमार्थातील भावगीते' आहेत. साक्षात्कार हे ध्येय मनापुढे ठेवून ती सहजपणे उत्स्फूर्त झाली आहेत. प्रसन्न वैराग्य, अंहकारादि सर्व विकारांचा

नाश, पूर्ण समाधान, गाढ भक्ती, पूर्ण ज्ञान, परमानंद, शाश्वत शांती– ही साक्षात्कारी पुरुषाची सर्व लक्षणे त्यांच्या स्तोत्रांतून दृग्गोचर होतात. त्यांचे स्तोत्र चिंतनीय, मनोहर व स्फूर्तिदायक असते. जणू सगळा परमार्थमार्गच ते स्तोत्रातून संक्षिप्तरूपाने मांडतात. त्यांचा पिंड तत्त्वज्ञानी भक्ताचा असल्यामुळे शांती, प्रसन्नता, गांभीर्य, आत्मविश्वास हे त्यांच्या काव्याचे स्थायीभाव आहेत. आणि या सर्व भावांची उत्कृष्ट अभिव्यक्ती 'आत्मषट्का'त झालेली पहावयास मिळते.

श्री शंकराचार्य जसे श्रेष्ठ साक्षात्कारी पुरुष व तत्त्वज्ञानी आहेत, तसेच उच्च साहित्यिक व कवीही आहेत, याचा प्रत्यय त्यांची स्तोत्रे वाचताना आल्याशिवाय राहात नाही. त्यांच्या उदात्त अंत:करणाचाही आविष्कार त्यांच्या स्तोत्रांतून सहजरीतीने व्यक्त झाला आहे. नादमाधुर्य हे त्यांच्या स्तोत्रांचे एक वैशिष्ट्य आहे. स्तोत्र म्हणताना आपण स्वत:ला विसरून जातो, यातच या नादवाही रचनेचं यश आहे. स्तोत्र गुणगुणत असतानाच त्यातील वेदान्त सिद्धान्तांचे निदिध्यासन होत राहते व यानेच अध्यात्मिक प्रगती होत जाते. 'आत्मषट्क' हे खरंतर, **'निदिध्यासनाचे स्तोत्र'** आहे. सविकल्प समाधीकरिता 'दृश्यानुविद्ध' व 'शब्दानुविद्ध' अशा दोन प्रकारांनी अभ्यास करणे अवश्य असते. 'आत्मषट्क' या स्तोत्राचा वैखरी वाणीने उच्चार केला असता 'शब्दानुविद्ध' सविकल्प समाधीचा अभ्यास होतो आणि मनातल्या मनात या श्लोकांच्या साहाय्याने अभ्यास केल्यास तो 'दृश्यानुविद्ध' सविकल्प समाधीचा अभ्यास होतो. जिज्ञासू लोकांच्या चित्तात यथार्थ आत्मस्वरूपाचा आविष्कार होण्यास यातील श्लोक अत्यंत उपयुक्त आहेत. आत्मस्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार झाल्याबरोबर द्वैतप्रपंचाची मिथ्या कल्पना कशी मावळते व आपण शुद्ध सच्चिदानंद परब्रह्मस्वरूप असल्याचा दृढ निश्चय होऊन अंत:करणाला अद्वितीय समाधानाचा लाभ कसा होतो, याचे दर्शन या स्तोत्रातून घडते.

'वेदातील 'नेति नेति' इ. निषेधवाक्यांच्या अनुरोधाने जाणिवेत येणाऱ्या सर्व वस्तूंचा 'त्या आत्मा नव्हेत' असा निषेध केल्यानंतर **सर्व निषेधांचा अवधि** म्हणून जे शिल्लक राहते, तेच ब्रह्म होय. ते सर्व विश्वाचे अधिष्ठान असून अत्यंत शुद्ध व सच्चिदानंदस्वरूप आहे. ते शिव म्हणजे सुखस्वरूप, मंगलमय, आनंदमय आहे. त्यालाच आत्मा म्हणतात व तोच मी आहे. मी दुसरा कोणी नाही, असा दृढ निश्चय या 'आत्मषट्का'च्या मननाने साधकाला करून घेता येईल,'' असे पं. गोस्वामींना वाटते.

या स्तोत्राला 'निर्वाणषट्क' असेही म्हणतात. निर्वाण म्हणजे पूर्ण सुख, पूर्ण आनंद. या पूर्ण आनंदातच चित्ताला पूर्ण शांती मिळते. म्हणून निर्वाण म्हणजे 'पूर्ण शांती.' या स्तोत्रातील सहाही श्लोकांच्या अर्थाचे मनन केल्यास निश्चित पूर्ण शांतीचा लाभ होईल. पाहू या, ते सहा श्लोक नि त्यांचा अर्थ!

*''मनोबुद्ध्यहंकार चित्तानि नाहं*
*न च श्रोत्र जिह्वे न च घ्राणनेत्रे ।*
*न च व्योमभूमिर्न तेजो न वायु–*
*श्चिदानन्दरूप: शिवोऽहं शिवोऽहम् ।।१।।'*

मी कोण आहे? कल्पना करणारा? ते तर मन आहे.
विचार करणारा? ती तर बुद्धी आहे.
अभिमान बाळगणारा? तो तर अहंकार आहे.
चिंतन करणारा? ते तर चित्त आहे.

मग अंत:करण हे माझं स्वरूप नव्हे? तो तर आरसा आहे. परमात्म्यानं मला तो 'पाहावे आपणासी आपण' यासाठी दिला आहे. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश या पंचमहाभूतांनी मला अंतर्बाह्य वेढलं आहे. पण पंचमहाभूतांपासून बनलाय तो माझा देह; मी नव्हे! पांचभौतिक सगळं पंचत्वाला जाणारं आहे. देह जाईल, पण मी कसा नष्ट होईन? मी आहेच. 'असतुचि असे.' देहाला इंद्रिये आहेत. श्रोत्र, नेत्र इ. ज्ञानेंद्रिये विषयज्ञानाची करणे म्हणजे साधने आहेत. त्यांच्याविना मी बहिरा, आंधळा कसा? कारण मी अंधत्वाचा द्रष्टा आहे. अंधत्व– पटुत्व हे इंद्रियांचे धर्म आहेत. मी कोणत्याही ज्ञानाचं साधन नाही. तर ज्ञानस्वरूपच आहे. मी 'चिद्' आहे, चैतन्यस्वरूप आहे. म्हणूनच तर मला 'शिव' म्हणतात. ज्यात चैतन्य नाही, ते तर शव झाले; अमंगल झाले. मी मंगलमय शिव आहे. जिथे मंगल आहे, तिथे आनंद आहे. आनंदासाठी मला वणवण करायला नको. कारण मीच आनंदस्वरूप आहे आणि मला माझ्या या स्वरूपाची पक्की खात्री आहे. म्हणून मी पुन: पुन्हा सांगतो,

*'चिदानन्दरूप: शिवोऽहं शिवोऽहम् ।'*

*''न च प्राणसंज्ञो न वै पंचवायुर्*
*न वा सप्तधातुर्न वा पंचकोष: ।*
*न वाक् पाणिपादौ न चोपस्थपायु: ।*
*चिदानन्दरुप: शिवोऽहं शिवोऽहम् ।।२।।*

सामान्यत: स्थूलदृष्टीला प्राणाविना जिवंतपणा वाटत नाही. 'चिद्'चं एक रूप चैतन्याचं वायुरूप म्हणजे प्राण. प्राणानं सगळ्या चैतन्यसृष्टीला व्यापलं आहे. पण सृष्टीत चेतनाबरोबर जडही आहे. पाषाण जड आहे. त्यात प्राण नाही. तरीही पाषाण 'आहे!' कशाच्या आधारावर! योगीलोक समाधिस्थितीत प्राण ब्रह्मरंध्री लीन करतात;

तेव्हा ते देहपात न होता कसे राहतात? वाटतं, देहाला आधार प्राणाचा आहे. पण प्राणाला माध्यान्हकाळी आहुती मिळाली नाही, तर तो किती महिने राहील? ज्याचं अस्तित्वच अन्य गोष्टींवर अवलंबून आहे, तो दुसऱ्याचा आधार कसा होणार? प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे पंचवायू कार्यपरत्वे व स्थानपरत्वे वेगळे मानले असले तरी ते 'प्राण'च होत.

रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र हे शरीराची धारणा करतात, म्हणून त्यांना 'धातु' म्हणतात. ते 'दृश्य' आहेत म्हणजे बाह्येंद्रियांना कळणारे आहेत. आणि मी तर 'द्रष्टा' आहे. मग ते म्हणजे मी कसा असू शकेन?

आणि पंचकोश? अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय हे तर माझे कोश आहेत. माझं स्वरूप झाकणारे, प्रतीतीला येऊ न देणारे आहेत. ते ज्ञेय आहेत; पण मी ज्ञाता आहे. तलवारीला झाकणारी म्यान असावी, तसे हे आहेत; हे मी जाणतो तर, तेच मी कसा असेन?

मनुष्य ब्रह्म जरी झाला, तरी हात, पाय, तोंड, गुद, उपस्थ या पंच कर्मेन्द्रियांकडून किमान शारीरगोष्टी देह असेपर्यंत त्याच्या होतच राहतात. म्हणून का यांचा बडेजाव? त्या गरजा देहाच्या आहेत, त्या ते भागवताहेत. माझ्याशी काय संबंध? देहाचाच जिथं माझ्या शिवस्वरूपाला विटाळ होतो, तिथं यांची गोष्ट कशाला? मी तर शिव आहे!

*''न मे द्वेषरागौ न मे लोभमोहौ ।*
*मदो नैव मे नैव मात्सर्यभावः ।*
*न धर्मो न चार्थो न कामो न मोक्ष*
*श्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ।।३।।''*

राग-द्वेष, लोभ-मोह, मद-मत्सर इ. विकार माझ्या बाबतीत आता संभवतच नाहीत. मन असेल तर राग-द्वेष येणार ना? जिथे मन-बुद्धी-चित्ताचा प्रांत ओलांडून अहं शिवाशी एकरूप झाला, तिथं अंतःकरणात काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे षड्विकार कसे येतील? अविकारी असं हे शिवस्वरूप; म्हणून तर त्याला 'मंगल' म्हटलं. तो 'शिव' मी झालो-इतका व्यापक, सर्वव्यापक की, आता राग (आसक्ती) तरी कोणाचा नि द्वेष तरी कोणाचा? मीच सर्वत्र, सर्वगत असल्यामुळे मी माझा द्वेष कसा करीन? आता लोभ तरी कोणाचा धरणार? दुजं काहीच नाही. कोणाच्या मोहात पडणार? मत्सर तरी कोणाचा करणार? मीच एक आहे- या चराचरात भरून! आता मी निरपेक्ष झालो आहे. धर्म- अर्थ- काम- मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांची तरी मला काय गरज? मी बंधनातीत झालो आहे. आता मला काही मिळवायचं नाही. माझ्या निजस्वरूपाशी- शिवाशी- मी एकरूप झालो आहे, शिवरूप झालो आहे.

*''न पुण्यं न पापं न सौख्यं न दुःखं*
*न मन्त्रो न तीर्थं न वेदा न यज्ञाः।*
*अहं भोजनं नैव भोज्यं न भोक्ता*
*चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ।।४।।'*

हे पुण्य- हे पाप, हे सुख- हे दुःख, असं करण्यात अनंत जन्म गेले. आता ही अखिल द्वंद्वे मला सतावीत नाहीत. कारण मी द्वंद्वातीत झालो आहे; ऐक्यबोधावर आलो आहे. ब्रह्मच सत्य, बाकी सारं मिथ्या, या बोधावर मी स्थिर आहे. इतकंच काय, पण मीच ब्रह्म आहे, हेही मला उमगलं आहे. ब्रह्मप्राप्तीसाठी करावी लागणारी साधने- मंत्रजप, तीर्थाटन, वेदाध्ययन, यज्ञयाग- आता मला यातील काहीही करण्याची आवश्यकता राहिली नाही. हे सर्व करून जे साधायचं, ते मी साधलं. इतकंच काय; भोजन-भोज्य-भोक्त ही त्रिपुटीही माझ्यालेखी खरी नाही. देह असेपर्यंत भोजन घेताना दिसत असलो तरी मी भोक्ता नाही. कारण 'मी' आहे कुठे? मी तर शिव झालो आहे; शिवच आहे.

*''न मे मृत्युशंका न मे जातिभेदः।*
*पिता नैव मे नैव माता न जन्म ।*
*न बन्धुर्न मित्रं गुरुर्नैव शिष्य-*
*श्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ।।५।।''*

' 'अहं भोजनं नैव' असं म्हणताना तुला मृत्यूचं भय वाटत नाही?' अशी तुम्हाला शंका येईल, पण मंगलाला अमंगलाचं भय कसलं? जो कालाचाही काल, त्या शिवाला मृत्यूचं भय? मृत्यू कोणाचा होतो? जो जन्मला, त्याचा! मी अज आहे, म्हणून मी अमर आहे. जन्मच नसल्यामुळे पिता-माता-बंधू-मित्र ही ममत्वाची नातीगोतीही नाहीत. जन्मच नसल्यामुळे कोणत्या जातीत जन्मला, हा प्रश्नच येत नाही. एकजाति की द्विजाती? स्त्री जाति की पुरुष जाति?

इतकंच काय, पण जन्माला आलो, तर बद्ध आणि म्हणून मोक्षाची खटपट, त्यासाठी गुरुशिष्यसंबंध. पण अजच असल्यामुळे शिष्य होण्याचा प्रश्न नाही, गुरु करण्याचाही प्रश्न नाही. गुरु करायचे दुःखमुक्तीसाठी! पण मी तर आनंदस्वरूप आहे. दुःख कुठले?

*''अहं निर्विकल्पो निराकाररूपो*
*विभुर्व्याप्य सर्वत्र सर्वेन्द्रियाणि ।*
*सदा मे समत्वं न मुक्तिर्न बन्ध-*
*श्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ।।६।।''*

'निर्विकल्पासी कल्पिता, कल्पनेचि नये वार्ता।' असं माझं

होऊन गेलं आणि 'जयाची कल्पना निमाली, तो प्राप्त पुरुषु।।' तोच स्वयमेव निर्विकल्प झाला. असा मी झालो आहे. आकार घेतला, की दृश्यरूपाला आला, बंधनात अडकला, भू-भव झाला. संसाराला आला. आणि जो येतो, तो जातोही. हे आवागमन त्याच्या पाठीमागे लागतं. पण जो आकारालाच येत नाही, उपाधीत अडकत नाही, असा निरुपाधिक, निर्लेप, नि:संग आत्मा मी आहे. कारण मी सर्वव्यापी झालो आहे; सर्वत्र आहे; सगळ्याला व्यापून आहे. आता कुठे जाणार नि कुठे येणार? कारण सगळीकडे ओतप्रोत मीच आहे. 'चराचर आपण झालो' आहे. आणि मी सदैव आहे, सर्वत्र, सदा, सम मीच आहे. देशकाल वस्तु परिच्छिन्न असं माझं व्यापक स्वरूप आहे. बंध आणि मुक्ती हे शब्दही माझ्याबाबतीत आता तोकडे पडतात. मी सदैव समत्वावर असतो. विषमता मला माहीतच नाही. विषम असतात, ते गुण- त्रिगुण! पण मी आता त्रिगुणातीत झालो आहे. सम अशा परब्रह्माशी एकरूप झालो आहे; सच्चिदानंदरूप झालो आहे. शिवाशी एकरूप- शिवरूप- नव्हे; शिवच झालो आहे. मी शिवच आहे!''

श्री शंकराचार्यांचे हे स्तोत्र म्हणजे 'मी जीव, मज जन्ममरण' म्हणणाऱ्या मर्त्याला अमृत दिल्याप्रमाणे आहे. हे आत्मषट्क 'सत्यं शिवं सुंदरं' झाले आहे. प्रतिभा, प्रज्ञा आणि प्रसन्नता यांचा पावनसंगम यात झाला आहे. हे स्तोत्र म्हणजे शांकरतत्त्वज्ञानाचा संक्षिप्त आधारग्रंथच होय. अद्वैत तत्त्वज्ञानाची ही 'सूत्रे'च आहेत. यातून आचार्यांची विद्वत्ताच नव्हे; तर आत्मप्रत्ययकारिताही झंकारते आहे. श्री ज्ञानदेवांच्या शब्दात सांगायचे तर-

*''हे हिताते निववितीं ।*
*परिणामा ते जीवविती ।*
*सुखाची वाहती ।*
*लाखोली जीवा ।।'*

**- सौ. सुनंदा आनंद शाळिग्राम**
'विश्वनाथ स्मृति' फ्लॅट नं. ३, दत्तवाडी पोलिस चौकी
समोरील लेन, पुणे - ३०.
फोन नं. : २४३३४७५०.



# श्रीमत् शंकराचार्यकृत कालभैरवाष्टकम्

- डॉ. सौ. रजनी पतकी

*एम.ए.पीएच.डी. (संस्कृत), संस्कृत वाङ्मयातील उपासना. निरनिराळ्या परिषदांत शोधनिबंध वाचन, ३ पुस्तके व ८०हून जास्त लेखांचे प्रकाशन. आकाशवाणी व इतर ठिकाणी व्याख्याने. मोरयागोसावीन्यास चिंचवड व श्रीहरी कीर्तनोत्तेजक संस्थामध्ये सहभाग.*

केवळ बत्तीस वर्षांच्या आपल्या पृथ्वीतलावरील वास्तव्यात भारतभर भ्रमणयात्रा करून प्रकांड पंडितांबरोबर वादविवाद करून अद्वैत तत्त्वज्ञानाची पुन: सुप्रतिष्ठा करणारे भगवत्पूज्यपाद श्रीमत् शंकराचार्य हे एक अलौकिक महात्मा या भारतभूमीवर कार्य करून गेले; हे या देशाचे अपूर्व असे भाग्य होय. श्रीमत् शंकराचार्य प्रतिभावंत दार्शनिक, सत्यद्रष्टे, मंत्रज्ञ आचार्य होते. ते सर्वसामान्य लोकात वावरले. त्यांनी विद्वानांच्या सभेत शास्त्रचर्चा केली. त्यांनी आपल्या आईच्या जीवनाच्या अंतिमक्षणी तिच्याजवळ जाऊन तिला ईश्वराच्या सगुण रूपाचे साक्षात् दर्शन करून दिले. त्याचबरोबर बावीस भाष्ये, चोपन्न उपदेशादि प्रकरणे व पंचाहत्तर स्तोत्रे यांच्या रचना केल्या. असे अद्भुत जीवनचरित्र असणाऱ्या या महात्म्याबद्दल काही विचार व्यक्त करणे म्हणजे काजव्याने सूर्याविषयी विवेचन केल्यासारखे आहे. तथापि अशा महात्म्यांचे चिंतन करणे हीच एक उपासना आहे. संतचरित्रे ऐकावीत, सांगावीत म्हणजे अल्पांशाने का होईना, आपल्या जीवनात काही उदात्तता येईल; या भावनेने श्रीमत् शंकराचार्य लिखित कालभैरवाष्टक स्तोत्राचे अल्प विवेचन येथे केले जात आहे.

उपासना नित्यक्रमात श्रीमत् शंकराचार्यकृत नर्मदाष्टक, श्रीकृष्णाष्टक, श्रीयमुनाष्टक, रामाष्टक, भजगोविन्दम् इत्यादि स्तोत्रे म्हटली जातात. अनेकांनी ही स्तोत्रे मुखोद्गत केलेली आहेत. असेच एक शिव-उपासकांना परिचित असणारे स्तोत्र म्हणजे 'कालभैरवाष्टकम्' हे आहे. 'कालभैरव' हे कुलदैवत असणारी जी काही कुटुंबे आहेत त्यांच्या नित्यपाठात हे स्तोत्र असते. श्रीमत् शंकराचार्यांनी या अष्टकात कालभैरवाचे हृद्य वर्णन केले आहे. त्यांच्या या मनोज्ञ स्तोत्राचे चिंतन करताना प्रथम कालभैरव या देवतेची थोडक्यात माहिती घेऊ -

कालभैरव : भैरव हे भगवान शिवाचेच एक रौद्र रूप आहे. अशी कथा सांगितली जाते की, या भैरवाने शिवाज्ञेने ब्रह्मदेवाचे पाचवे डोके धडावेगळे केले. त्यामुळे त्याचे हातून ब्रह्मवधाचे पाप घडले. या पापाचे प्रायश्चित म्हणून त्याने ब्रह्मदेवाची कवटी हातात घेऊन बारा वर्षे भिक्षाटन केले. त्याने सप्तर्षींकडून मदत घेतली व तो या गुन्ह्यातून मुक्त झाला. ज्या ठिकाणी भैरव गुन्ह्यातून मुक्त झाला ती जागा काशी नगरीत आहे, त्यास भैरवक्षेत्र म्हणतात. या भैरवास काशीचा रक्षक अधिपती म्हणून नेमले. वाराणसीमध्ये भैरव हा कोतवाल आणि क्षेत्रपाल म्हणून पूजिला जातो. अलिकडच्या काळात परदेशी जाण्यासाठी जसे पारपत्र घ्यावे लागते तसे काशीत प्रवेश केल्यावर प्रथम भैरवाचे दर्शन घेऊन त्याची तेथे राहण्यासाठी अनुमती घ्यावी लागते; अशी काशीमध्ये प्रथा आहे. काशी रक्षणासाठी कालभैरवाचे आठ सहाय्यक आहेत ते असे: रुरु भैरव, चंड भैरव, असितांग भैरव, कपाल भैरव, क्रोधन भैरव, उन्मत्त भैरव, संहार भैरव, भीषण भैरव.

काशीमध्ये यमधर्माचा अधिकार भगवान शंकराने स्वत:कडे घेतला आहे. त्याने कालभैरवास मनुष्याच्या चांगल्या-वाईट कर्मांची नोंद करायचा आदेश दिला आहे. यानुसार कालभैरव काशीमध्ये मृत झालेल्यांच्या पाप-पुण्याचा हिशोब करून त्यांना शिक्षा देतो. या शिक्षा थोडा काळ पण तीव्र असतात. या शिक्षा भोगल्यावर मात्र त्या जीवास मोक्ष मिळतो. दण्डपाणि हा काळभैरवाचा सहाय्यक आहे. जे काशीत राहण्यास अथवा मृत होण्यास अयोग्य आहेत त्यांना काशीतून बाहेर पाठविण्याचे कार्य त्याच्याकडे आहे.

मार्गशीर्ष महिना काळभैरवाचे दर्शन घेण्यासाठी शुभ मानला आहे. या महिन्यातील अष्टमीस भैरवाष्टमी म्हणतात. त्या दिवशी काशीमध्ये कालभैरवाची विशेष पूजा केली जाते. कापालिक, अघोरी, कानफाटे योगी आणि नाथ हे कालभैरवाचे उपासक होत. यांनी भैरव रूपातील शिवाच्या उपासनेचा प्रसार केला.

श्रीमत् शंकराचार्य भारतभ्रमण करीत असता दोन वेळा काशीक्षेत्री त्यांचा निवास घडला होता. आचार्यांनी भारतातील तीर्थक्षेत्रामधील देव-देवतांचे दर्शन घेतले त्या वेळी त्या त्या देवतांची स्तुतिस्तोत्रे त्यांच्या मुखातून प्रस्फुटित झाली; असे लक्षात येते. (तथापि सर्व अष्टकस्तोत्रे ही आदिशंकराचार्यांची आहेत का,

यावर विद्वानांमध्ये मतभिन्नता आहे.)

**कालभैरवाष्टक :** काशीपुरीचे अधिपती भैरव रूपातील भगवान शंकर यांची स्तुती गाणारे हे अष्टक आहे. यास शेवटचा ९वा श्लोक फलश्रुतीचा म्हणून जोडला आहे; असे नऊ श्लोक यात आहेत.

**कालभैरवाष्टकाचे वृत्त –** संस्कृत भाषेतील काव्य हे छंदोबद्ध, वृत्तबद्ध असते तसेच शब्दालंकार वा अर्थालंकार यांचा साज त्यावर चढविलेला असतो. कालभैरवाष्टकही यास अपवाद नाही. कालभैरवाष्टक स्तोत्र हे पंचचामर वृतांत बांधले आहे. या वृत्तात एकूण अक्षरे सोळा असतात. यति आठ–आठ किंवा ४–४–४–४ अक्षरांवर पडतो. यातील गण– ज र ज र ज ग (गुरु) असे आहेत. शिवताण्डव स्तोत्र, नर्मदाष्टकम्, श्रीकृष्णाष्टकम्, श्रीयमुनाष्टकम्, रामाष्टकम्, महागणेशपञ्चरत्नस्तोत्रम् ही स्तोत्रे या वृत्ताचे उदाहरण म्हणून सांगता येतील.

प्रस्तुत स्तोत्रात आचार्यांनी कांही ओळीत एकच अक्षर अनेकवेळा वापरून अनुप्रास साधला आहे. उदाहरणार्थ,

१) नारदादियोगिवृन्दवन्दितं दिगम्बरम् – 'द'चा उपयोग. (श्लोक १)

२) भानुकोटिभास्वरं भवाब्धितारकं परम् – 'भ'चा उपयोग. (श्लोक २)

३) कालकालमम्बुजाक्षमक्षशूलमक्षरम् – 'क', 'ल', 'म', 'क्ष' यांचा उपयोग. (श्लोक २)

४) स्वर्णवर्णशेषपाशशोभिताङ्गमण्डलम् – 'ज', 'श' यांचा उपयोग. (श्लोक ५)

५) रत्नपादुकाप्रभाभिरामपादयुग्मकम् – 'र', 'प', 'भ', 'द' यांचा उपयोग. (श्लोक ६)

**कालभैरवाष्टकातील शिवाचे सगुण रूप –** श्रीमत् शंकराचार्यांनी स्तुती केलेला कालभैरव सगुण व निर्गुण असा उभयविध दिसत असला तरी अंततोगत्वा तो अद्वैत स्वरूपी एकमेवाद्वितीय आहे. कालभैरव ही काशीनगरीचा अधिनाथ आहे. सर्वाधिकारी आहे; त्यामुळे सगुण रूपातील त्याचे वर्णन शासन कर्त्याचे आहे. तरीदेखील तो भक्तावर कृपा करणारा आहे. त्यांच्यासाठी दयावान आहे. धर्माचे पालन करणाऱ्यांवर तो लक्ष ठेवणारा आहे. काशीनगरीमध्ये राहण्यास कोण योग्य व कोण अयोग्य याचा निर्णय करणारा आहे. तो शासक म्हणून उग्र असला तरी शास्त्रीय कर्माचरण करणाऱ्यांना श्रेयस् व प्रेयसाची प्राप्ती करून देणारा आहे.

कालभैरव रूपातील भगवान् शंकराने सर्प धारण केला आहे. यज्ञोपवीत घातले आहे. त्याच्या मस्तकावर चंद्रकोर शोभते आहे. तो दिगंबर आहे. त्याचा कंठ निळा आहे. तो त्रिलोचन असून त्याचे नेत्र कमलासमान आहेत. त्रिशूल, कुऱ्हाड, सुवर्णवर्णाच्या शेषनागाचा पाश, दण्ड ही आयुधे त्याने हातात घेतली आहेत. त्याने कमरेला लहानशा घंटा बांधल्या आहेत, त्यांचा किणकिण असा आवाज होत आहे. त्याचे पदकमल रत्नजडित पादुकांनी शोभून दिसत आहेत. त्याच्या दाढा भयंकर आहेत व हास्य उग्र आहे. त्याच्या गळ्यात कपालमाला व रुद्राक्षमाला आहे. त्याचा रंग शामल असून त्याची मूर्ती अतिशय आकर्षक दिसत आहे.

**कालभैरवाष्टकातील शिवाचे निर्गुण रूप –** निर्गुण स्वरूपातील कालभैरव हा ज्ञानस्वरूप आहे. तो जगताचे आदिकारण आहे, तो जगत्स्वरूपाने आहे, विश्वव्यापक आहे. तो नित्य, अद्वितीय, जगातील विभिन्न निर्मितीस्वरूपात म्हणजेच चराचरात असून अक्षर आहे, त्याच्या उपासनेने जसा पापाचा नाश होणार आहे; तसेच ब्रह्मज्ञान व मुक्तीही मिळणार आहे; असे आचार्य म्हणतात.

**कालभैरवाचा महिमा –** कालभैरव हा 'देवराज' आहे, ज्याची सेवा केली पाहिजे असा देव आहे. त्याचे पदकमल अत्यंत पावन आहेत. नारदादि योगीजन त्यास वंदन करतात. तो भवसिंधु पार करून नेणारा आहे. तो इच्छित ते प्राप्त करून देणारा आहे. तो काळाचा काळ, अक्षरतत्त्व, विश्वाचे आदिकारण आहे. तो निरामय, भुक्ति व मुक्ती देणारा असून अत्यंत पराक्रमी आहे, स्वामी आहे. त्यास तांडव नृत्य आवडते. तो धर्माचे नियम पाळणारा व अधर्म मार्गाचा नाश करणारा आहे. तो भक्तवत्सल आहे, स्थिर आहे, तो समस्त लोकरूपात (सप्तलोक रूपात) आहे, व्यापक आहे, भक्तांचे कर्मपाश सोडवणारा आहे. आनंददायक, नित्य, अद्वितीय, निष्कलंक आहे. इष्टदेव आहे. मृत्यूचा गर्वहरण करणारा, विभिन्न प्रकारच्या विश्वनिर्मितीच्या रूपात (विश्वात्मक) आहे. त्याच्या दृष्टिपाताने पाप नाहीसे होते. तो उग्र, कठोर शासक आहे. अष्टसिद्धींचा दाता आहे. तो भूतसंघाचा नायक असून भक्ताची कीर्ति वृद्धिंगत करणारा आहे. तो काशीमध्ये निवास करणाऱ्यांना पुण्यप्रदान करतो व त्यांच्या पापांचा नाश करतो. तो नीतिमार्ग निपुण, अनादि, जगताचा स्वामी आहे. त्याच्या उपासनेने प्रेयस् व श्रेयस् दोन्ही प्राप्त होतात.

सगुण रूपातील देवतेची उपासना बहुधा सकाम असते; तरी देखील ती ज्ञानदायक व मुक्तीदायक कशी होते; असा प्रश्न पडतो. यासाठी 'देव' या संज्ञेविषयी थोडे चिंतन करणे आवश्यक आहे.

**देव –** 'देव' या शब्दाची व्याख्या 'द्योतनात् देवः', दिवि

तिष्ठति इति देव:' अशी केली जाते. अर्थातच जे स्वयंप्रकाशी, प्रकाशरूप स्वर्गात राहणारे असतात त्यांना 'देव' असे म्हणतात. बृहदारण्यक उपनिषदात शकलपुत्र विदग्ध व याज्ञवल्क्य यांचा दीर्घ संवाद आहे. (बृहदा. ३- १ ते३). यामध्ये 'देव किती व कोणते' याची सविस्तर चर्चा आहे. ३००३, ३०३, ३३ पासून एकमेवाद्वितीय देव म्हणजे परब्रह्म तत्त्वापर्यंत येत येत शेवटी देव एकच म्हणजे परब्रह्म आहे व त्याच्या उपासनेने 'अहं ब्रह्मास्मि'ही अनुभूती कशी येते; येथपर्यंत ही चर्चा रंगली आहे. विश्वामध्ये विविध स्तरांवर कार्यरत असलेली ब्रह्माची शक्ती विविध नावांनी ओळखिली जाते. त्या त्या शक्तीला कार्यपरत्वे नावे दिली जातात व त्या त्या रूपात त्या त्या देवता जाणल्या जातात आणि त्यांची उपासना केली जाते.

*'इन्द्रं यमं वरुणाग्निमाहुरथो दिव्य: स सुपर्णो गुरुत्मान् ।*
*एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति अग्निं यमं मातरिश्वानमाहु:।।'*
*(ऋग्वेद १.१६४.४६)*

सत्य एकच आहे ते विविध नावांनी ओळखले जाते. तद्वत् 'रुद्र' हेही परमात्म्याचेच एक रूप आहे. वेदातील रुद्रसूक्ते सर्वांना परिचित आहेत. शंकराला रुद्रपठनाने अभिषेक केला जातो. रुद्र रूपात या विश्वात जे कार्य केले जाते त्यावरून रुद्रही अकरा सांगितले जातात. त्यांची नावे अशी- त्र्यंबक/भैरव, पिनाक, काल, कपाली, कपर्दी, हर, वृषभध्वज, धूर्जटी मार्तंड/मल्हारी, हनुमंत व महारुद्र. यावरून लक्षात येते की भैरव हेही भगवान् शंकराचेच एक रूप आहे, याचीच स्तुती श्रीमत् शंकराचार्यांनी केली आहे. ही भगवान शंकराची उपासना आहे.

**उपासना –** कालभैरव रूपातील भगवान शंकराची उपासना ही **'निदानवती'** उपासनेच्या अंतर्गत येते. सत्यवती, अंगवती, अन्यवती व निदानवती असे उपासनेचे चार प्रकार आहेत. वस्तुत: निर्गुण-निराकार परब्रह्म मूर्तीच्या स्वरूपात पाहता येत नाही. निर्गुण-निराकाराचे ज्ञान हेच फक्त त्यास जाणण्याचे साधन आहे. तथापि निर्गुणाचे निदर्शन करण्यासाठी काही मूर्त चिन्हे योजिली जातात; जसे ध्वज हे राष्ट्राचे निदर्शक चिन्ह आहे, काळा रंग दु:ख दर्शविण्यासाठी वापरला जातो, इत्यादि. तसे अत्रतत्र भटकणाऱ्या चित्तवृत्ती एकाजागी आणण्यासाठी परब्रह्माची उपासना विशिष्ट शक्तिनिदर्शक देवमूर्तींच्या विविध रूपात केली जाते. त्याला अनुसरून भगवान शंकरांचे रौद्र रूप 'कालभैरवाच्या' स्वरूपात पूजिले जाते. त्यामुळे कालभैरवाची उपासना 'निदानवती' उपासनेच्या अंतर्गत येते. त्याच्या अनुषंगाने भगवान शंकराचे निर्गुण-निराकार ब्रह्मस्वरूप जाणता येते. या उपासनेने लौकिक सुख तर प्राप्त होतेच पण शोक, मोह, लोभ, दैन्य, कोप व ताप यांचाही नाश होतो व ज्ञानप्राप्तीही होते, परमात्म्याशी एकत्व होते.

म्हणून फलश्रुतीच्या श्लोकात श्रीमत् शंकराचार्य म्हणतात,

***कालभैरवाष्टकं पठन्ति ये मनोहरम्***
***ज्ञानमुक्तिसाधनं विचित्रपुण्यवर्धनम्***
***शोकमोहलोभदैन्यकोपतापनाशनम्***
***ते प्रयान्ति कालभैरवाङ्घ्रिसंनिधिं ध्रुवम् ।।***

**संदर्भ ग्रंथ**


१) श्रीमदाद्यशंकराचार्यकृत सुबोध स्तोत्र संग्रह, मराठी अनुवाद आणि विवेचन भाग पहिला- ले. म.म.पं. पांडुरंगशास्त्री गोस्वामी.

2) Kashi - The City Luminous - K. Chandramouli- Publisher- Rupa and Co., Colcutta. 1995.

3) The concept of Upasana : Worship in Sanskrit Literature- Dr. Rajani Patki, Publishier - Sadguru Publications, Indian Books Centre- Delhi.



**– डॉ. सौ. रजनी पतकी**
१२, मधुबन बी, ३८/२, कर्वेनगर, पुणे ४११०५२
फोन नं. ०२०-२५४६०८१५

# जगद्‌गुरु श्रीशंकराचार्य

**श्री. अनंत कैतवाडे**

*सेवानिवृत्त अतिरिक्त अधीक्षक. चिन्मय मिशन इंदौर केंद्राचे सेवक, दैनिक भास्कर मधून आध्यात्मिक लेख प्रसिद्ध. विविध मनोरंजक पुस्तकांचे लिखाण. दासबोध परीक्षक.*

*शंकरं शंकराचार्यं केशवं बादरायणम् ।*
*सूत्र-भाष्य-कृतौ वन्दे भगवन्तौ पुनः पुनः ।।१।।*
*श्रुतिस्मृतिपुराणानामालयं करुणालयम् ।*
*नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम् ।।२।।*

अखिल विश्वाला वेदांतसूत्रे आणि त्यावरील भाष्य देणाऱ्या बादरायणस्वरूपी भगवान केशवाना आणि भगवत्पाद श्रीशंकराचार्यांच्या रूपाने प्रकट झालेल्या भगवान श्रीशंकरांना मी पुनः पुनः वंदन करतो. 'जेव्हा जेव्हा धर्माचा ऱ्हास होतो आणि अधर्म बोकाळातो तेव्हा तेव्हा मी अवतार घेतो.' भगवान श्रीकृष्णांनी श्रीमत् भगवद्‌गीतेत हे जे अभिवचन दिले आहे, त्याच्या पूर्ततेसाठीच आपल्या या पवित्र मातृभूमीत भारत वर्षात, विभिन्न काळी तेजस्वी ताऱ्यांसारख्या साधुसंतांची आणि ईश्वरी अवतारांची दैदीप्यमान मालिकाच उत्पन्न झाली.

कलियुगात कली आपले वर्चस्व कसे दाखविणार आहे हे आपण ऐकले आहे, वाचले आहे. कलियुगांत सर्वत्र कलहाचे वातावरण राहील, अधर्माचा बोलबाला राहील, शास्त्र व गुरूवचनांचा अनादर होऊन सर्वत्र अधर्म माजेल वगैरे वगैरे. अशा या बिकट परिस्थितीत एका अवतारी पुरुषाची आवश्यकता जाणवत होती. जो या परिस्थितीत सर्व दूषित दृष्टिकोण, धर्माची चुकीची व्याख्या आदींना व्यवस्थित एका अनुशासित रूपात सर्वांना मान्य अशा रूपांत प्रस्तुत करेल, काळाच्या अनुरूप दक्षिण भारतातील केरळ राज्यात पूर्णा नदीच्या तटवर्ती कालाडी ग्रामांत विद्वान आणि धर्मनिष्ठ ब्राह्मण श्रीशिवगुरुंच्या पत्नी श्रीसुभ्रदा मातेच्या पोटी वैशाख शुक्ल पंचमीच्या दिवशी श्रीशंकरांचा जन्म झाला. जन्मापूर्वी नंबुद्री दंपतीने मोठ्या श्रद्धाभक्तीने भगवान शंकराची आराधना करून पुत्रप्राप्तीची प्रार्थना केली होती. त्यांच्या आराधनेने प्रसन्न होऊन आशुतोष भगवान शंकर प्रसन्न झाले व त्यांनी सर्वगुणसंपन्न पुत्ररत्न प्राप्त होईल असे वरदान दिले होते. परिणामस्वरूप एक सर्वगुण संपन्नच नव्हे तर साक्षात भगवान शंकरच पुत्ररूपाने प्राप्त झाले. त्यांचे नावही शंकरच ठेवले गेले.

लहानपणापासूनच या बालकात महान विभूतीचा जन्म झाला आहे याचा साक्षात्कार होऊ लागला. एक वर्षाचे असताना बालक शंकर आपल्या मातृभाषेत आपले भाव प्रगट करू लागला. व वयाच्या दुसऱ्या वर्षी आईने सांगितलेल्या पुराणांतील कथा कंठस्थ करू लागला. तीन वर्षांचे असताना वडील स्वर्गवासी झाले. वयाच्या ५ व्या वर्षी यज्ञोपवीत झाल्यावर गुरुकुलात अध्ययनांसाठी गेले. आणि केवळ ७ व्या वर्षी वेद, वेदांताचे पूर्ण अध्ययन करून घरी परत आले. त्यांची असाधारण प्रतिभा अनेक पंडितवर्यांना आश्चर्यचकित करून गेली. अगदी कोवळ्या वयात, षड्‌दर्शनांचा सांगोपांग अभ्यास केला. मनामध्ये सर्व बाह्य वस्तूंविषयी अनासक्ती उत्पन्न झाली व संन्यास घेण्याचे ठरविले. त्यासाठी आईची आज्ञा घेण्यास गेले. परंतु आईने नकार दिला. युवा शंकर मातृभक्त होते व आईला कष्ट देऊन संन्यास घेणे योग्य वाटले नाही. आईची परवानगी कशी मिळाली त्याची एक छोटी कथा अशी आहे..

एक दिवस आईबरोबर नदीवर स्नान करण्यास गेले असता एका मगरीने शंकराला पकडून घेतले. हे पाहून आईचे भान उडाले. ती बैचेन होऊन आरडाओरड करू लागली. तेव्हा ते म्हणाले, ''आई, तू मला संन्यास घेण्याची परवानगी दे म्हणजे मगर मला लवकर सोडून देईल.'' हे ऐकून आईने 'हो' म्हटले आणि लागलीच मगरने पकडीतून शंकराला सोडले. याप्रमाणे आईची आज्ञा घेऊन आठव्या वर्षी घर सोडले. त्यापूर्वी त्यांनी आईला अभिवचन दिले, 'जरी संन्यासी होत असलो तरी तुझ्या अंतकाळी मी तुझ्याजवळ येईन.'

वैराग्याग्नीने धगधगलेल्या त्या शंकराने आसक्तीचा शेवटचा बंध तोडून पवित्र नर्मदा नदीच्या तटाकडे धाव घेतली. तेथे त्यांनी सुप्रसिद्ध श्री गौडपादाचार्यांचे परमशिष्य गुरू गोविंद भगवत्पादाचार्यांचे शिष्यत्व स्वीकारले. श्रीगुरुंनी त्याचे नाव भगवत् पूज्यपादाचार्य ठेवले. त्यांनी गुरूंच्या मार्गदर्शनाखाली अध्ययन साधना प्रारंभ केली व अल्पकाळातच योगसिद्ध महात्मा झाले. दीक्षाविधी झाल्यावर गुरुदेवांनी वेदव्यासांच्या वेदांतसूत्रांवर भाष्य लिहिण्याची आज्ञा केली. त्यासाठी ते काशीला आले. येथे आल्यावर

त्यांची ख्याति वृद्धींगत होऊ लागली. सर्व लोक आकर्षित होऊ लागले, व काहीनी शिष्यत्व ग्रहण केले. त्याचे प्रथम शिष्य सनन्दन, पुढे पद्मपादाचार्य नावाने प्रसिद्ध झाले. काशीत राहत असताना शिष्यांना शिकवीतही व ग्रंथलेखनही करीत असत. काशी नगरीत त्यांना भगवान विश्वनाथांनी चांडाळरूपात दर्शन दिले व ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहून धर्मप्रचार करण्याचा आदेश दिला अशी कथा आहे.

तसेच वेदांतसूत्रावर भाष्य लिहून झाल्यावर स्वत: भगवान् वेदव्यास ब्राह्मण रूपात येऊन त्यांच्याशी वाद-विवाद केला होता. वेदव्यासांनी त्यांना अद्वैतवादाचा प्रचार करण्याची आज्ञा दिली आणि त्यांची आयु सोळा वर्षांची बत्तीस वर्ष करून दिली.

त्यानंतर शंकराचार्यांनी दिग्विजयास प्रारंभ केला. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत आणि काश्मीरपासून आसामांतील कामरूपापर्यंत त्यांनी पायी प्रवास केला. ठिकठिकाणी वाद सभा झाल्या, प्रयागला कुमारिलभट्टांशी भेट झाली. त्यांच्या सांगण्यावरून माहिष्मती (नर्मदा किनारी असलेले महेश्वर क्षेत्री) येथे पंडितवर मण्डनमिश्र यांच्याशी शास्त्रार्थ केला. शास्त्रार्थ करताना गुरुपत्नि भारतीनेपण मध्यस्थी केली. त्या दोघांना शास्त्रार्थात पराभूत केले. शेवटी त्यांनी शंकराचार्यांचे शिष्यत्व स्वीकारले व त्यांचे नाव सुरेश्वराचार्य पडले. हा विजय सर्वांत असामान्य व मोठा होता. श्री शंकराचार्यांचे चार प्रमुख संन्यासी शिष्य आहेत. त्यात मंडनमिश्राची गणना आहे. पदमपाद्, तोटकाचार्य, हस्तामलक व सुरेश्वराचार्य (मंडनमिश्र) हे चार प्रमुख शिष्य.

तत्पश्चात् आचार्यांनी मठाची स्थापना केली आणि अद्वैतवाद, औपनिषद सिद्धांताचा प्रचार प्रसार केला. आजही हे मठ विद्येची महान केंद्रे आहेत. त्यांनी अनेक मंदिरे स्थापित केली, अनेकांना सन्मार्गावर लावले, कुमार्गाचे खंडन करून ईश्वराचे वास्तविक स्वरूप प्रगट केले. ब्रह्मसूत्रे, अकरा प्रमुख उपनिषदे आणि भगवद्गीता यावरील आपली सुप्रसिद्ध भाष्ये लिहून ते अमर झाले. त्यांनी लिहिलेल्या ग्रंथांची सूची फार मोठी आहे. ग्रंथ समजण्यासाठी अधिकारी पुरुषच पाहिजे. भारतवर्षात सर्व संप्रदायांचे लोक त्यांच्या सिद्धांतानी प्रभावित आहेत. शंकराचार्यांनी संन्यासांचे दहा प्रकार प्रस्थापित केले. ते पुढीलप्रमाणे आहेत- गिरी, पुरी, भारती, सरस्वती, तीर्थ, आश्रम, वन, अरण्य, पर्वत आणि सागर.

पश्चिमेला द्वारका मठ, उत्तरेला हिमालयात जोशी मठ (ज्योतिर्मठ), पूर्वेला गोवर्धन मठ आणि दक्षिणेला शृंगेरी मठ स्थापन केले. वैदिक धर्माच्या विभिन्न रूपांचा विरोध करणारे बौद्ध त्याकाळी शंकराचार्यांचे घोरतम विरोधी होते, परंतु त्या सर्वांचे तेज लोपले आणि अधिकतर लोक शंकराचार्यांचे शिष्य झाले. श्री शंकराचार्य वेदांतदर्शनाचे महानतम आचार्य होते. विवेकचूडामणि, अपरोक्षानुभूति, भजगोविन्दम्, दक्षिणामूर्ति स्तोत्र वगैरे अनेक प्रकरण ग्रंथावरून त्यांच्या अगाध ज्ञानाची आपल्याला कल्पना येते. ते जणू ज्ञानरत्नाची खाणच होते. आचार्यांचे हे ग्रंथ मुमुक्षुजनांचे उत्तम मार्गदर्शन करतात. प्रत्येक साधकाने ते वाचलेच पाहिजेत असे हे ग्रंथ आहेत.

श्री शंकराचार्य पूर्णत: अद्वैती होते, त्यांच्या अंत:करणात प्रगाढ भक्ती ओतप्रोत भरली होती. त्यांनी रचलेल्या स्तोत्रांत अद्भूत भक्तिरस व समर्पण भावना इतक्या उत्कटतेने प्रकट झाली आहे की ही स्तोत्रे वाचता वाचता अगदी पाषाणहृदयी माणसाचे मनसुद्धा विरघळून जाईल.

असा युगप्रवर्तक, धर्मसंस्थापक, श्रेष्ठ संन्यासी इसवी सन ८३० साली वयाच्या ३२ व्या वर्षी हिमालयात केदारनाथ येथे महासमाधीत विलीन झाला. परंतु त्यांनी केलेल्या प्रचंड कार्याची छाप आजही तितकीच प्रेरणादायी आहे. त्याचे विस्मरण होणे अशक्य आहे.

**- श्री. अनंत कैतवाडे**
ए-१०५ शिवकृपा, धन्वतरीनगर पोस्ट,
राजेंद्रनगर, इंदौर (मध्यप्रदेश) ४५२०१०.
फोन नं. : ०७३१-४०५८९६९

# भगवत्पाद श्री आद्यशंकराचार्य

**डॉ. त्रि. ना. धर्माधिकारी**

*एम.ओ.पीएच.डी. संस्कृत साहित्य विशारद, टि.म.वि., सचिव व संचालक वैदिक संशोधन मंडळ.*
*पुढील पुरस्कारांनी सन्मानित : १) राष्ट्रपती पुरस्कार, २) नानासाहेब पुरस्कार (पुणे),*
*३) गुरुगंगेश्वरानंद पुरस्कार, बंगलोर, ४) गुरुगंगेश्वरानंद पुरस्कार (नासिक), ५) महाराष्ट्र शासन पुरस्कार.*

श्रीमदाद्यशंकराचार्यांचा काळ सामान्यत: इसवीसनाच्या आठव्या शतकाचा उत्तरार्ध असा समजण्यात येतो. तथापि श्री. परमेश्वरनाथ मिश्र यांनी त्यांचा काळ इसवीपूर्व ५०७ ते ४७५ इतका प्राचीन ठरविला आहे. त्यासाठी त्यांनी अनेक आधारही दिले आहेत. त्यांस श्रीशंकराचार्य मठांच्या पीठाधीश आचार्यांच्या परंपरेचा प्रामुख्याने आधार आहे.

श्रीमदाद्यशंकराचार्यांनी प्रामुख्याने बौद्ध तत्त्वज्ञानाचा पराभव केला आहे. काही अभ्यासकांनी बुद्धाचा काळही खूप मागे नेला आहे.

श्रीमदाद्यशंकराचार्यांचा जन्म केरळात कालडी येथे नंबुदिरी ब्राह्मण दांपत्याचे पोटी झाल्याचे प्रसिद्ध आहे.

श्रीमदाद्यशंकराचार्यांनी चार पीठे स्थापन केली. त्यावर त्यांचे चार शिष्य बसविले. नंतर काञ्ची येथे सर्वज्ञपीठ स्थापन करून त्यावर ते स्वत: आरूढ झाल्याची एक परंपरा सांगते. तर चार पीठांच्या स्थापने-नंतर ते हिमालयात, त्यांच्या वयाच्या बत्तीसाव्या वर्षी निघून गेल्याचे, दुसरी परंपरा सांगते.

एवढे खरे की या बत्तीस वर्षांच्या आयुष्यात त्यांनी देशभर प्रवास करून वैदिक तत्त्वज्ञानाचा व धर्माचा प्रचार केला. अनेक सुमधुर स्तोत्रांबरोबरच त्यांनी प्रस्थानत्रयींवर- म्हणजे श्रीमद् भगवद्गीता, कृष्णद्वैपायन रचित वेदान्तसूत्रे आणि उपनिषदे यांवर संस्कृतांत विस्तृत भाष्ये लिहिली.

श्रीशंकराचार्यांच्या पूर्वीही प्रस्थानत्रयींवर भाष्ये लिहिली गेली. ती प्राधान्यत: ज्ञानकर्म समुच्चयवादी असावीत. श्रीशंकराचार्यांना मात्र ज्ञान कर्म समुच्चय मान्य नव्हता असे त्यांचे भाष्यावरून स्पष्ट होते.

वेदांचे कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड असे दोन भाग आहेत. वेदसंहिता, ब्राह्मण ग्रंथ आणि आरण्यके हा एक भाग यज्ञात्मक कर्मकाण्डाने व्यापलेला असून दुसरा उपनिषद् भाग आत्मज्ञानपर असल्याने ज्ञानकाण्ड म्हणून ओळखला जातो.

कर्मकाण्डावर भगवान जैमिनी यांनी सूत्रे लिहिली. ती पूर्वमीमांसाशास्त्राची आधार ठरली. उपनिषदे, व्यासरचित ब्रह्मसूत्रे आणि भगवद्गीता ज्ञानकाण्डाची पायाभूत रचना ठरली.

कर्मकाण्डांत प्रामुख्याने यज्ञविधींचा विस्तार सापडतो. तर ज्ञानकाण्डांत आत्मानात्मविवेक, जीव-ईश्वर संबंध आणि संसार निवृत्तीरूपी मोक्षमार्गाचा ऊहापोह मिळतो. कर्मकाण्डांतील यज्ञक्रियांमुळे स्वर्गादि फळे मिळतात आणि अन्य ऐहिक फळे प्राप्त होतात अशी धारणा आढळते. मात्र स्वर्गासह ही फळे कांही काळापुरती तात्पुरती मिळतात. नंतर पुन: संसारातील सुख-दु:खांना सामोरे जावे लागते. जीवाला संसारातून सुटका म्हणजे मोक्ष मिळत नाही.

श्रीमदाद्यशंकराचार्यांनी ज्ञान आणि कर्म यांचा परस्पर विरोध असल्याचे अनेक ठिकाणी स्पष्ट केले आहे.

ईशावास्योपनिषदातील पहिल्या मंत्राने संन्यासमार्गीयांसाठी ज्ञान, निष्ठा आणि संन्यासमार्ग स्वीकारण्यास अशक्त असलेल्यांसाठी कर्मनिष्ठा या उपनिषदाने सांगितली असल्याचे श्रीमच्छंकराचार्यांनी स्पष्ट केले. पुढे ते म्हणतात, 'ज्ञानकर्मणो: विरोधं पर्वतवद् अकम्प्यं न स्मरसि किम्?' ज्ञान आणि कर्म मार्गांचा एकमेकांशी विरोध पर्वताप्रमाणे अकम्प्य आहे, हे तुला स्मरत नाही का?

(आनन्दगिरी = सह अनवस्थानलक्षणं विरोधम्)

ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग यांच्या समुच्चयाने मोक्षप्राप्ती नाही हे भगवत्पादांनी भगवद्गीतेच्या पहिल्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकाच्या अवतरणिकेतही स्पष्ट केले आहे. ते म्हणतात, 'यदि बुद्धिकर्मणो: समुच्चय उक्त: स्यादर्जुनस्यापि स उक्त एवेति यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् (गीता ५.१) इति कथमुभयोरुपदेशे सति अन्यतरविषये एव प्रश्न: स्यात्? न हि पित्तप्रशमार्थिनो वैद्येन मधुरं शीतंच भोक्तव्यमित्युपदिष्टे तयोरन्यतरत् पित्तप्रशमनकारणं ब्रूहीति प्रश्न: संभवति ।'- म्हणजे ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा यांचा समुच्चय मोक्षास कारण असल्याचे भगवंतांनी अर्जुनास सांगितले

असेल तर त्या दोहोंपैकी एक साधन सांगा असा प्रश्न संभवत नाही. त्यास दृष्टांत देताना आचार्य सांगतात, 'पित्त शमविण्यासाठी वैद्याने मधुर आणि थंड पदार्थांचे सेवन करावे असे सांगितल्यानंतर त्यापैकी एक म्हणजे, मधुर की थंड ते सांग असा प्रश्न संभवत नाही.

शेवटी आचार्य सांगतात, 'तस्माद् गीताशास्त्रे ईषान्मात्रेणापि श्रौतेन स्मार्तेन वा कर्मणा आत्मज्ञानस्य समुच्चयो न केनचिद्दर्शयितुं शक्य- गीताशास्त्राने श्रौत किंवा स्मार्त कर्मांचा मोक्षप्राप्तीसाठी ज्ञानमार्गाशी समुच्चय किंचितही सांगितला नाही.

मुण्डकोपनिषदाच्या 'प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा:' या सातव्या मंत्राच्या भाष्यांत ज्ञानरहित कर्ममार्गाची निन्दा अभिप्रेत असल्याचे त्यांनी स्पष्ट केले आहे. ते म्हणतात, 'एतच्च ज्ञानरहितं कर्म एतावत्फलम् । अविद्या- काम- कर्म- कार्यम् । अत: असारं दु:खमूलम् इति निन्द्यते ।'

बृहदारण्यकाच्या त्यांच्या प्रस्तावनेत त्यांनी, कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड या दोहोंचा अंतर्भाव करणारी वेदांची व्याख्याच एकप्रकारे दिली आहे. ते म्हणतात, 'सर्वोऽप्ययं वेद. प्रत्यक्षानुमानाभ्याम् अनवगत- इष्टप्राप्ति- अनिष्ट परिहारोपायप्रकाशनपर: ।'

म्हणजे सर्व कर्मकाण्डात्मक किंवा ज्ञानकाण्डात्मक वेद- प्रत्यक्ष किंवा अनुमान या प्रमाणांनी जे कळू शकत नाही असे इष्टप्राप्तीचा आणि अनिष्ट निवारणाचे उपाय दाखवितात. पुढे कर्मकाण्डाबाबत ते म्हणतात, 'अस्ति आत्मा देहान्तरसबन्धीत्येवं प्रतिपत्तु: देहान्तरगत- इष्टानिष्ट- प्राप्ति परिहत्येपायविशेषार्थिन: तद् विशेष- ज्ञानाय कर्मकाण्डमारब्धम्'- वेदांचे कर्मकाण्ड हे जीवात्म्याच्या गतजन्मीच्या किंवा आगामी जन्माच्या संबंधी इष्ट प्राप्ती अथवा अनिष्ट परिहार, या संबंधी उपाय जाणून घेण्यासाठी आरंभिले आहे. ज्ञानकाण्डासंबंधी ते म्हणतात, 'विरक्तस्य अविद्या- निवृत्तये तद्विपरीतब्रह्मविद्याप्रतिपत्यर्था उपनिषद आरभ्यते । म्हणजे विरक्त पुरुषाची अविद्या म्हणजे आत्म्यासंबंधी अज्ञान घालवावे, यासाठी ब्रह्मविद्येची प्राप्ती व्हावी म्हणून उपनिषदरूपी ज्ञानकाण्ड आरंभिले आहे. अशी कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड यांची स्पष्ट सीमारेषा त्यांनी घालून दिली आहे.

या संदर्भात गीता (३.४)- 'न कर्मणामनारम्भात् नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति' या श्लोकावरील भाष्य मार्गदर्शक आणि त्यांच्या विलक्षण बुद्धिमत्तेची चमक दाखविणारे आहे. ते म्हणतात, ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा यांचा परस्पर विरोध असल्याने एक व्यक्ती एकाच वेळी या दोनही निष्ठांचा आश्रय घेऊ शकत नाही. तथापि अन्यनिरपेक्षपणे दोहोंपैकी प्रत्येक निष्ठा मोक्षरूपी पुरुषार्थाची प्राप्ती करून देऊ शकेल असा प्रश्न उपस्थित होऊ शकेल. नाहीतर वेदोक्त कर्मनिष्ठेला मोक्षरूपी पुरुषार्थप्राप्तीची संधीच नसल्याने ती अनवकाश होईल. आणि वेदांनी त्या निष्ठेचे केलेले विधान व्यर्थ ठरेल.

अशी आपत्ती पुढे आली असता श्रीमदाचार्यांनी या दोन निष्ठांचा समन्वय साधला आहे. ते म्हणतात, कर्मनिष्ठा ही ज्ञाननिष्ठा प्राप्तीसाठी कारण आहे. म्हणजेच ती ज्ञाननिष्ठेद्वारा मोक्षरूप पुरुषार्थ प्राप्त करून देते. स्वतंत्रपणे नाही. एवंच कर्मनिष्ठेचे वैयर्थ्यही संपते.

या श्लोकावरील भाष्यांत ते सांगतात- कर्मांचा आरंभ न केल्याने नैष्कर्म्य सिद्ध होत नाही. उलट कर्मांचा आरंभ केल्यानेच नैष्कर्म्य प्राप्त होते. कर्मांचा आरंभच नैष्कर्म्याचा उपाय होय. उपाय असल्याशिवाय उपेयसिद्धी नाही. नैष्कर्म्य हे स्वरूप असलेल्या ज्ञान योगास कर्मयोग हा उपाय आहे हे श्रुतींनीच सांगितले आहे- उदा. 'तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन-' (बृहदारण्यक उपनिषद् ४.४.२२) म्हणजे वेदांच्या वचनांनी आणि यज्ञांच्या आचरणाने ब्राह्मण त्या परमतत्त्वाला जाणू इच्छितात-' म्हणजेच वेदांनीच कर्मयोग हा ज्ञानयोगाचा उपाय म्हणून सांगितला आहे.

'संन्यासस्तु महाबाहो दु:खमाप्तुमयोगत:' (भगी ५.६) म्हणजे कर्मयोगाशिवाय कर्मसंन्यास प्राप्त होणे कठीण आहे. आणि ही वेदोक्त कर्मेही फलासक्ती सोडून आत्मशुद्धीसाठी करावीत- म्हणजे ती ज्ञाननिष्ठेचा उपाय ठरतात. गीता म्हणते, 'योगिन: कर्म कुर्वान्ति सङ्गं त्यक्त्वाऽत्मशुद्धये।'

वेदोक्त कर्मकाण्ड आणि ज्ञानकाण्ड यांची अशी अजोड सांगड वेदांच्या आधारांनीच भगवत्पादांनी घालून दिली आहे.

***'ईशा वास्यमिदं सर्वं यत् किंच जगत्यां जगत् ।***
***तेन त्यक्तेन भुञ्जीथा: मा गृध: कस्यस्वित् धनम्।।'***

हा ईशावास्योपनिषदांतील पहिला मंत्र. यावरील आचार्यांचे भाष्य त्यांच्या अतिसूक्ष्म बुद्धीचा प्रत्यय आणून देणारे आहे. हे सर्व जगतामध्ये असलेले चराचर परमात्म्याने आच्छादिले आहे. ते नामरूप कर्मादि विकाररूपी जगत्, परमसत्य रूपी आत्मभावनेने त्यागावे आणि आत्म्याचे पालन करावे. अशारीतीने एषणांचा त्याग केल्यानंतर कुणाच्याही धनाची तू हाव धरून नकोस. कारण ते मिथ्या आहे. आत्मज्ञानी पुरुषाने पुत्रादि एषणांचा संन्यास केला असल्याने ज्ञाननिष्ठेने आत्म्याचे पालन करावे. हे सर्व आत्माच (ईश्वरच) आहे अशा सर्वत्र ईश्वर-भावनेने सर्व जगताचा त्याग करावा. एवंच हा मंत्र ईश्वरनिष्ठांसाठी आहे.

येथे 'भुञ्जीथा'चा अर्थ सामान्यत: 'उपभोग घे' या अर्थी असू शकतो. पण तसा अर्थ न करता 'आत्म्याचे रक्षण कर' असा अर्थ आचार्यांनी केला आहे.

'भुञ्जीथा:' या क्रियापदामध्ये 'भुज्' असा धातू असून त्याचे 'पालन आणि अभ्यवहार (=उपभोग) असे दोन अर्थ आहेत. पाणिनीच्या 'भुजोऽनवने' (१.३.६६) या सूत्राने 'उपभोग' या अर्थी भुज् धातू आत्मनेपदी असतो आणि 'पालन' या अर्थी तो परस्मैपदी असतो.

वरील मंत्रात 'भुञ्जीथा:' हे भुज् धातूचे आत्मनेपदी विध्यर्थ द्वितीय पुरुषी एकवचनी रूप आहे. म्हणून त्याचा उपभोग असा अर्थ व्हावयास हवा. डॉ. राधाकृष्णन् यांनी त्यांच्या या मंत्राच्या इंग्रजी भाषांतरांत rejoice by renunciation असा अर्थ केला आहे.

येथे आचार्यांनी मात्र 'भुञ्जीथा:'चा अर्थ 'पालयेथा:' असा केला आहे. तो अत्यंत चपखल आहे. कारण, अशा रीतीने आत्म्याचे पालन न केल्यास 'परमात्मभावरूपी अद्वैत' न स्वीकारल्यास ते पुरुष 'आत्महन:' म्हणजे आत्मघातकी ठरतात. हे लक्षात घेतल्यास 'आत्महन:'च्या विरुद्ध 'आत्म्याचे रक्षण करणारे' हाच अर्थ 'भुञ्जीथा:' या शब्दाने स्वीकारणे योग्य ठरते. आचार्यांची सूक्ष्म दृष्टी ती हीच. आत्महन: हा शब्द पुढील तिसऱ्या मंत्रात आला आहे.

अशी सूक्ष्मदृष्टीची उदाहरणे आचार्यांच्या भाष्यात अनेक ठिकाणी आढळतात.

'ईशावास्यम्' या मंत्राने संन्यासमार्गीयांसाठी ज्ञाननिष्ठा आणि 'कुर्वन्नेवह कर्माणि' या मंत्राने एषणांचा त्याग न केल्याने संन्यासासाठी असमर्थ असलेल्यांसाठी या मंत्रात कर्म-निष्ठा, असा विपाय विभाग आचार्यांनी केलेला आहे. त्यासाठी 'न कर्म लिप्यते नरे' याचे विवेचन करताना 'एवं प्रकारे त्वयि जिजीविषति **नरे नरमात्राभि मानिनि,** इत: एतस्मादग्निहोत्रादीनि कर्माणि कुर्वतो वर्तमानात् प्रकारात् अन्यथा प्रकारान्तरं नास्ति, येन प्रकारेण **अशुभं** कर्म न लिप्यते'- अत: शास्त्रविहितानि कर्माणि अग्निहोत्रादीनि कुर्वन्नेव जिजीविषेत्' असे भाष्य केलेले आहे. यांत त्यांची सूक्ष्म दृष्टी प्रत्ययास येते.

**- डॉ. त्रि. ना. धर्माधिकारी**
आदिपर्ण बिल्डींग, दुसरा मजला,
युनायटेड वेस्टर्न सोसायटी, पुणे ४११०३८.
फोन नं. : २५४६१६७६



# *वटवृक्षाच्या तळी*

**सौ. शैला सुहास पटवर्धन**

('दक्षिणामूर्तिस्तोत्राधारे स्वैर अनुवाद)

अद्भुत काही पाहियले त्या वटवृक्षाच्या तळी
युवक गुरु अन् ज्येष्ठ शिष्यगण ऋत्विकजन मेळी ।।
ते भावरम्य चित्र गुरुशिष्य संगमाचे -
जणु शब्द हृदयस्पर्शी आचार्य शंकरांचे!
वाग्यज्ञस्तोत्र होते गुरु 'दक्षिणामूर्ति'चे
प्रतिबिंब तेच सत्य 'यति शंकरागुरु'चे!

परब्रह्म साक्षात्कारी झळकते तेज मुखी
अंतर्दृष्टिसम्पन्ना ती दृष्टि नेत्र झाकलेली -
करद्वयी ज्ञानमुद्रा स्वात्मारामी मग्न चित्त
आनंदस्वरूप मौनी तरीही प्रसन्नवदन

ब्रह्मनिष्ठ शिष्यगण परब्रह्मतत्त्वाकांक्षी
आदानप्रदान ज्ञान नि:संशय मौनभाषी
हृदयात ज्ञानदीप गुरुकृपे प्रज्वलित
तम अज्ञानाचे लोपे! ब्रह्मज्ञ शंकररूप

सारे संशय फिटले, साऱ्या शंकाही लोपल्या
असे भाग्यवंत शिष्य गुरुकृपालाभ झाला ।।

**सौ. शैला सुहास पटवर्धन**
१/१४ कर्वेनगर, डी-३ प्राजक्ता,
पुणे - ४११०५२
फोन नं. ६५२१८५३१

# श्रीमद् शंकराचार्यांचा समन्वयविचार

**डॉ. सौ. जयश्री साठे**

*संस्कृत- एम.ए.,पीएच.डी. पुणेविद्यापीठ (एम.ए.ला सुर्वणपदक), डेक्कन कॉलेज- संस्कृत विश्वकोश विभागामध्ये समन्वयक, संस्कृत व वेदविद्येच्या योगदानासाठी २००६च्या पंडित सातवळेकर पुरस्काराने सन्मानित.*

जगद्गुरू श्रीमद् आद्य शंकराचार्यांनी उपनिषदे, ब्रह्मसूत्र आणि भगवद्गीता या प्रस्थानत्रयींवर अत्यंत पाण्डित्यपूर्ण, तत्त्वनिष्ठ, तर्कशुद्ध अशी भाष्ये लिहिली आहेत. या रचनांमध्ये त्यांचा समन्वयविचार हा जणू मुख्य सूत्ररूपाने असून त्याभोवती भाष्यरूपी अलौकिक अशी प्रातिभ पुष्पे त्यांनी गुंफली आहेत असे प्रकर्षाने जाणवते. समन्वय म्हणजे 'सम्यक् अन्वय' अगदी यथार्थ, औचित्यपूर्ण, सुयोग्य असा संबंध किंवा मेळ किंवा संगती. तसेच 'सम् अन्वय' म्हणजे एकत्रितपणे अर्थातच एकमताने, एकविचाराने होणारा मेळ. समन्वय म्हणजे अखंड, नि:शंक तत्परता. ही तत्परता कोणाची आणि कोणाठायी? तर साऱ्या उपनिषद् वाक्यांची केवळ ब्रह्माठायी असणारी तत्परता, तदर्थता म्हणजे समन्वय.

ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद आणि अथर्ववेद अशा चारही वेदांची अनेक शाखांची अनेक उपनिषदे आहेत. त्या उपनिषदांतील काही वचने आपातत: परस्परविरोधी असल्यासारखी, तर काही अर्थदृष्ट्या संदिग्ध, अस्पष्ट भासतात. त्यांची योग्य व्यवस्था लावण्यासाठी महर्षि बादरायणाचार्यांनी 'अथातो ब्रह्मजिज्ञासा म्हणून ब्रह्मसूत्रात्मक ज्ञानकाण्डाची रचना केली आणि सर्व उपनिषद्वचने ही साक्षात् किंवा परंपरेने ब्रह्मपरच अर्थ प्रकाशित करतात असा 'ब्रह्मसमन्वय प्रस्थापित केला. ब्रह्मसूत्रांच्या पहिल्या अध्यायाला म्हणूनच 'समन्वयाध्याय', असे म्हटले जाते. या अध्यायातील पहिल्या चार सूत्रांना चतु:सूत्री असे म्हणतात. 'मोक्षाची इच्छा करणाऱ्याने ब्रह्माण्डाचे मूलकारण असणारे, ज्ञानस्वरूप असे ब्रह्म जाणून घ्यावे. उपनिषद्रूप वेदान्तशास्त्र हेच सर्वज्ञ ब्रह्माविषयी प्रमाण आहे कारण त्यातील सर्व वचनांचा तात्पर्याने ब्रह्मामध्येच समन्वय होतो'- या चतु:सूत्रीत अत्यंत संक्षेपाने वेदान्तशास्त्राचा प्रतिपाद्य विषय सांगितला आहे आणि पुढील बहुतेक संपूर्ण ग्रंथात आक्षेप- निरसन, साधन मार्गदर्शन, फल-निरूपण या द्वारे ब्रह्मसमन्वयच सिद्ध केला आहे. ज्यामुळे या शास्त्राला 'ब्रह्ममीमांसा' असे सार्थ अभिधान मिळाले आहे.

अत्यंत मोजक्या पण सारयुक्त शब्दांनी बद्ध अशा ब्रह्मसूत्रांवर शंकराचार्यांनी आपल्या अफाट बुद्धिकौशल्याने सुबोध असे भाष्य लिहून जिज्ञासू, मुमुक्षूंसाठी जणु ज्ञानाची कवाडे खुली केली आहेत. आचार्यांनी आपल्या भाष्यात कर्मवादी भाट्ट, प्राभाकर मीमांसक, नैयायिक, वैशेषिक, परमाणुवादी, सांख्यवादी, योगवादी वगैरे पूर्वसूरींच्या प्रचलित, प्रस्थापित मतांचे, पक्षोपक्षांचे अत्यंत चिकित्सकपणे पूर्णत: खण्डन केले. श्रुति, श्रुत्यनुसारी युक्ति आणि विद्वदनुभव यांच्या जोरावर इतरांचे विचारपूर्वक, तर्कमूल असे आक्षेपही त्यांनी पार निष्प्रभ ठरविले आहेत. पूर्वपक्षाची मांडणी ते इतक्या प्रभावीपणे करतात की त्यावर उत्तरच नाही असे क्षणभर वाटते. पण पुढे त्यातील प्रत्येक बारीक-सारीक मुद्दा ते आपल्या सूक्ष्म, तरल, चतुरस्र बुद्धीने तार्किक कौशल्याने खोडून काढतात आणि वादीला निरूत्तर करतात. त्यातही वैशिष्ट्य असे की हे खण्डन-मण्डन करताना इतरांच्या मतांविषयी अवास्तव तिरस्कार, तुच्छताही ते सूचित करत नाहीत किंवा अपशब्दही वापरत नाहीत. त्यांची भाषा, अत्यंत ओजस्वी, प्रासादिक, सुबोध असल्यामुळे त्यांच्या भाष्याची पारायणे म्हणजे जिज्ञासूंना बौद्धिक आनंदाची पर्वणी वाटते.

उपनिषद्वचने ही कर्मपर म्हणजे विधायक नसून ज्ञानपर म्हणजे बोधक आहेत, ब्रह्मप्रबोधक आहेत असा सिद्धान्त प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी ईश, केन, कठ वगैरे एकूण चौदा उपनिषदांतील वाक्यांची सखोल मीमांसा केली आहे. आवश्यक तिथे ऋग्वेद, अथर्ववेदातील मंत्र, भगवद्गीतेतील श्लोक, विविध न्याय उपोद्बलक म्हणून आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ म्हणून नोंदविले आहेत. श्रुति, लिङ्ग, वाक्य, प्रकरण, उपक्रम, उपसंहार, पूर्वोत्तर संबन्ध, अभ्यास, फल वगैरे विद्वन्मान्य व पारंपारिक कसोट्यांच्या, तत्त्वांच्या आधारावरच त्यांनी आपल्या भाष्याचा प्रपंच केला आहे. त्यामुळेच त्यांच्या भाष्यात तु, तस्मात्, अपि, च, न, एव यासारखे अव्ययशब्दही निरर्थक नसतातच तर उलट ते अपेक्षित अर्थसिद्धीची आणि त्यांच्या अनोख्या वादपटुत्वाची ग्वाही देतात.

आचार्यांच्या प्रस्थानत्रयींवरील भाष्यांपैकी 'ब्रह्मसूत्रांवरील भाष्य' हे विशेष आहे, त्यातही पहिल्या 'समन्वयाध्याया'वरील

भाष्य, त्यातही पहिल्या चतु:सूत्रीवरील भाष्य, त्यातही 'तत्तु समन्वयात्' या चौथ्या सूत्रावरील म्हणजेच 'समन्वयाधिकरणा' वरील भाष्य हे प्रतिपाद्यविषय, चिकित्सक तर्ककठोर मांडणी, चपखल दृष्टान्त वगैरे दृष्टींनी अतिविशिष्ट झाले आहे. त्याच्या प्रयत्नपूर्वक परिशीलनाने, सूक्ष्म अभ्यासाने आचार्यांच्या समन्वयदृष्टीची साक्षात् प्रचीती येते.

इतर अधिकरणांच्या तुलनेत या अधिकरणावर आचार्यांनी सर्वात विस्तृत असे भाष्य लिहिले आहे. त्यातील काही महत्त्वाच्या मुद्यांवर वादी आणि सिद्धान्ती यांच्यातील ऊहापोह समजून घेतल्यास उपनिषदांची ब्रह्मपर संगति लावणे या गोष्टींचे आणि ब्रह्ममीमांसाशास्त्राचे महत्त्व लक्षात येते. हा ऊहापोह विषय, संशय, पूर्वपक्ष, उपपत्ति आणि सिद्धान्त अशा पाच टप्पे किंवा पायऱ्यांनी पूर्ण होतो. आता काही मुद्यांचा भावार्थ समजून घेऊया. मुख्य आक्षेप असा की- पूर्वमीमांसाकार जैमिनीमुनींनी 'वेद हे क्रियेसाठी प्रवृत्त झाले आहेत त्यामुळे ज्या वेदभागांचा कर्माशी संबन्ध नाही ते निरर्थक होत' असा जो नियम सांगितला त्यासंदर्भात वेदान्तवाक्ये निरर्थक होतात हा विषय त्यामुळे मुमुक्षूची ब्रह्मविचारासाठी प्रवृत्ति होणे शक्य नाही हा संशय. किंवा वेदान्ताला निरर्थकत्व येऊ नये म्हणून कर्त्याचा, देवतेचा, फलाचा निर्देश करण्याच्या द्वारा वेदान्तवाक्येही विधीची अंगभूत मानावी हा पूर्वपक्ष. किंवा उपासना, श्रवण, मनन वगैरे मानसिक कर्माचे विधान करण्यासाठी ती प्रवृत्त झाली आहेत असे मानावे म्हणजे प्रकरणभेदाचाही दोष राहणार नाही. कारण प्रकरण वेदान्ताचे सुरू असल्यामुळे 'आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्य: निदिध्यासितव्य:' (बृहदारण्यकोपनिषत् २.४.५) अशा उपनिषद्वचनांमध्ये उपासनेचेच विधान दिसते- अशी उपपत्ति.

हे सारे मुद्दे खोडून काढणारा **सिद्धान्त** असा- परंतु १) सर्वज्ञ, सर्वशक्ति, जगज्जन्मस्थितिलयकारण असे ब्रह्म वेदान्तशास्त्रावरूनच समजते कारण सर्व उपनिषद्वचनांची यथार्थ, सुयोग्य संगति किंवा अन्वय केवळ त्या ब्रह्मामध्येच लागतो.

२) 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' (छान्दोग्योपनिषत् ६.२.१)

'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्' (ऐतरेयोपनिषत् १.१.१)

अशा असंख्य श्रुतींमध्ये आत्मा, सत्, ब्रह्म वगैरे स्पष्ट शब्दांनी ब्रह्मपर मथितार्थ, तात्पर्य व्यक्त होत असताना तो श्रुतार्थ, व्यक्तार्थ टाकून देऊन वेदान्तवाक्यांची जुंपणूक कर्माबरोबर करणे म्हणजे 'श्रुतहानि' व व्यक्त न होणाऱ्या भलत्याच अर्थाशी सांगड घालण्याचा 'अश्रुतकल्पना' असा दुहेरी दोष उत्पन्न होतो. त्यामुळे वेदान्तवाक्ये ही विधिपर आहेत किंवा देवता वगैरे कथनामुळे विधीला अंगभूत आहेत, अंगांची स्तुति करणाऱ्या अर्थवादांप्रमाणे आहेत असे म्हणणे योग्य नाही.

३) ''तत्केन कं पश्येत्' (बृहदारण्यकोपनिषत् २.४.१३)

तत् म्हणजे तेव्हा, जेव्हा खरे ज्ञान प्राप्त होते त्यावेळी ज्ञानी कर्ता, केन म्हणजे कोणत्या साधनाने, कम् म्हणजे कोणत्या विषयाला पाहणार?

असा अर्थ व्यक्त करणाऱ्या प्रत्येक अनेक श्रुति या कर्ता, (केन=) करण, (कम्=) कर्म आणि क्रियापद अशा क्रियासंबद्ध साऱ्या कारकांचा, कर्मफलाचा निरास करतात. त्यामुळे अशा वचनांचा कर्माशी दूरान्वयानेही संबन्ध जोडणे योग्य नाही.

४) ब्रह्मनास्तिक पूर्वपक्षी आक्षेप घेतो की, ब्रह्म हे जर सिद्ध वस्तू आहे तर घट वगैरे लौकिक सिद्ध वस्तूंप्रमाणे तेही प्रत्यक्ष वगैरे प्रमाणांनी जाणता येईल, त्यासाठी वेदान्ताची जरूर कशाला? त्यावर उत्तर असे की, ब्रह्म ही जरी सिद्धवस्तु असली तरी ती प्रत्यक्षादिकांचा विषय होऊ शकत नाही. कारण ब्रह्माचे स्वरूप परिनिष्ठित वस्तूचे म्हणजे परिपूर्ण ज्ञानाचे, अंतिम मोक्षाचे आहे.

५) पूर्वपक्षी म्हणतो की समजा वेदान्त ब्रह्माचा उपदेश करतात असे मान्य केले तरी ब्रह्म ही हेयोपादेयरहित म्हणजे ज्यातून काही टाकण्यासारखे नाही किंवा ज्यात काही घालण्याजोगे, स्वीकारण्याजोगे नाही अशी वस्तू असल्यामुळे त्याविषयीचा उपदेश निरर्थक आहे.

सिद्धान्ती त्यावर मत मांडतो की ब्रह्माचा उपदेश निरर्थक ठरू शकत नाही कारण 'ब्रह्म हाच आत्मा आहे' अशा यथार्थ ज्ञानाने सर्व क्लेशांचा नाश होणे' ही पुरुषार्थसिद्धी प्राप्त होते.

६) कट्टर कर्मवादी पूर्वपक्षी पुन्हा प्रश्न उपस्थित करतो की- प्राणविद्यावाक्ये व पञ्चाग्निविद्यावाक्यांवरून वेदान्त हेही उपासनापर म्हणजे कर्मपरच आहेत.

सिद्धान्ती त्यावर उत्तर देतो की, सर्व वेदान्तवाक्ये उपासनापर नाहीत. यथार्थ ज्ञान होण्यापूर्वी अध्यस्त गुणांनी युक्त असलेले सगुण ब्रह्म हे ध्येय होऊ शकते, उपासनेचे अंग ठरू शकते पण ज्ञानप्राप्तीनंतर निर्गुण असे ज्ञेय ब्रह्म व आत्मा यांचे एकत्व उमगले की सारा द्वैतभाव संपतो. द्वैतज्ञान, द्वैत उपासनाही संपुष्टात येते आणि 'अहं ब्रह्मास्मि' अशी साक्षात् ब्रह्मात्मैक्याची अनुभूति आल्यावर उपासनाच उरत नाही तर ब्रह्माला उपासनेचे अंगत्व कसे उरणार?

७) पूर्वपक्षी वेदान्त हे कर्मपरच आहेत हा मुद्दा तरीही सोडत नाही. 'आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्य:, निदिध्यासितव्य:' (बृहदारण्य-कोपनिषत् २.४.५) अशा वेदान्तवचनातील 'तव्य' प्रत्ययान्त शब्दांनी कर्माचाच बोध होतो. जैमिनी, शबरस्वामी वगैरे वृद्धमतांनुसार पुरुषाला एखाद्या विषयामध्ये प्रवृत्त करविणारे, किंवा

एखाद्या विषयापासून निवृत्त करविणारे शास्त्र अर्थवत् ठरते. वेदान्त हेही अशाप्रकारे सामान्य शास्त्रासारखे कर्मशास्त्रच माना म्हणजे त्याला अर्थवत्त्व येईल.

सिद्धान्ती स्पष्ट करतो की– धर्मजिज्ञासाकार जैमिनीमुनींनी विधिनिषेधरूप भाव्य धर्मप्रतिपादन करणारे धर्मकाण्ड रचले तर ब्रह्मजिज्ञासाकार बादरायणाचार्यांनी नित्य, सिद्ध ब्रह्माचे प्रतिपादन करणारे ब्रह्मकाण्ड रचले. जर त्या दोन्हींचाही अर्थ, प्रतिपाद्य विषय 'तुम्ही म्हणता तसा कर्म हा एकच असता तर शास्त्रकारांनी अशी वेगळ्या शास्त्रांची व्यवस्था केली नसती. वेदान्तशास्त्र कर्मपरच आहे असे म्हटल्यास मुक्ती हे कर्मफल आहे असे म्हणण्याचा प्रसंग येईल. दोन्हींचे फल एकसारखेच झाल्यास त्यांच्या जिज्ञास्यभेदाची, विषयभेदाची सिद्धी होणार नाही. उलट या आचार्यांनी वृथाच या दोन भिन्न शास्त्रांचा खटाटोप केला असे म्हणण्याचा दुरवस्था प्रसंग ओढवेल आणि म्हणूनच ही दोन स्वतंत्र शास्त्रे आहेत. वेदान्त हे केवळ वस्तुकथन करतात. 'ही दोरी आहे साप नव्हे' असे नुसते वस्तूचे कथनही भ्रममूलक भीती दूर करते, तसे सत्– चित्– आनंदस्वरूप, नित्यशुद्धबुद्धमुक्त स्वभाव अशा ब्रह्मस्वरूपाच्या कथनाने अविद्यामूलक संसारभ्रमाचा निरास होतो. संसार हा मिथ्या, असार, विनाशी असून केवळ एकमेवाद्वितीय ब्रह्म हेच अंतिम सत्य आहे असे ज्ञान होते.

८) पूर्वपक्षी यावरही शंका उपस्थित करतो की रज्जूचे यथार्थ ज्ञान झाल्यावर भीती नष्ट होते पण ब्रह्मस्वरूप श्रवणानंतर ही संसारित्व, सुखदुःखादि विकार पूर्वीसारखेच दिसतात. सिद्धान्ती उत्तर देतो की असे म्हणणे बरोबर नाही. कारण तत्त्वदर्शी, ज्ञानी पुरुषाचे ठिकाणी संसारित्व, सुखदुःखादि विकार असणेच शक्य नाही. मिथ्याज्ञानामुळे उत्पन्न झालेला देहाभिमान यथार्थ ज्ञानामुळे ज्याच्याबाबतीत पूर्णपणे गळून गेला आहे त्याला सुखदुःख कोठून? 'अशरीरं वा वसन्तं प्रियाप्रिये न स्पृशतः' (छान्दोग्योपनिषत् ८.१२.१) अशी श्रुतिवचनेही हाच आशय सांगत असतात.

शिवाय- ***'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति'*** (मुण्डकोपनिषत् २.२.९)

***'क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे'***

(मुण्डकोपनिषत् २.२.८)

अशी श्रुतिवचने सांगतात की, ज्ञानप्राप्तीनंतर लगोलग मोक्ष मिळतो. जीवावस्थेतहि अज्ञाननिवृत्ति झाल्यावर शरीराभिमान सुटून नश्वर देहात असूनही तो अशरीर असा जीवन्मुक्त होतो. वारुळावर टाकलेल्या कातीवर साप जसा ममत्व, अभिमान बाळगत नाही तसा जीवन्मुक्तही शरीरावर आत्मभावना करीत नाही. उलट असा जीवन्मुक्त पुरुष अमृत असतो, साक्षी असतो, ब्रह्म असतो आणि ज्ञानरूपही तोच असतो असे आग्रही प्रतिपादन अनेक श्रुतिवचने करतात. त्याहीपुढे जाऊन– ज्ञानप्राप्तीनंतर लगोलग मोक्ष मिळतो– 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' असेही वेदान्तवचने सांगतात. त्यामुळे तुम्ही म्हणता तसे मोक्ष 'हा विधीचे, कर्माचे फल मानले तर स्वर्गाप्रमाणे मरणोत्तर, कालान्तराने तो प्राप्त होईल पण वेगवेगळी वेदान्तवाक्ये याउलट ग्वाही मोठ्या प्रभावीपणे देताना दिसतात. जसे– *तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः'* (ईशावास्योपनिषत् ७)

ज्याने ब्रह्मैक्य जाणले त्याला मोह कशाचा अन् शोक कशाचा? म्हणूनच मोक्ष हा विधीचे फल नाही. मोक्षाचे प्रतिपादन करणारे वेदान्तशास्त्र हे कर्मपर नाही.

'अहं ब्रह्मास्मि', (बृहदारण्यकोपनिषत् १.४.१०)

'तत्त्वमसि' (छान्दोग्योपनिषत् ६.८.६)

ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः (शंकराचार्यकृत ब्रह्मज्ञानवल्ली)

अशा महावाक्यांनी त्या औपनिषद् पुरुषाचा उद्घोष करणाऱ्या श्रुतिवचनांची मीमांसा करणारे ते स्वतंत्रच शास्त्र आहे.

आचार्यांनी आपल्या भाष्यांमध्ये समन्वय दृष्टीने पारमार्थिक तत्त्वज्ञान आणि व्यावहारिक ज्ञानदायी विविध शास्त्रे यांच्यामध्येही समन्वय प्रस्थापित केला आहे. पारमार्थिक दृष्ट्या 'अहं ब्रह्मास्मि' व 'तत्त्वमसि' या महावाक्यांतील ज्ञानप्रतीतीनंतर मानसशास्त्राची गरज संपते, ज्ञानशास्त्रातील ज्ञाता–ज्ञेय–ज्ञान या त्रिपुटीचा लय होतो. सत्ताशास्त्रानुसार ब्रह्म हीच एकमेव सद्वस्तु असून 'नेति नेति' असे म्हणून शब्दशास्त्र त्यापुढे गतप्रभ होते. परब्रह्माठायी विश्वशास्त्रानुसार सृष्टी नाहीच, आणि नामरूपात्मक जग म्हणजे मायेचा मिथ्या आविष्कार अशी अवस्तु ठरते. नीतिशास्त्रानुसार पाप–पुण्य तर धर्मशास्त्रानुसार विधि–निषेध, धर्माधर्म, स्वर्ग–नरक या साऱ्या नश्वर द्वैतांचा त्याहून सर्वथा विलक्षण अशा ब्रह्मापुढे ऱ्हास होतो. आणि या पार्श्वभूमीवर अद्वैतज्ञानाची ध्वजा उंचावणारे वेदान्तशास्त्र औपनिषद् दर्शनानुसार परब्रह्म हेच अंतिम सत्य असून त्याचे स्वरूपज्ञान हाच मोक्ष आहे असा अविरत उद्घोष करते.

श्रुतिप्रामाण्याच्या चाकोरीत, शुद्ध तर्काच्या आधाराने आचार्यांनी उपनिषद्वचनांच्या समन्वयातून त्या औपनिषत् परात्पर पुरुषाचे ज्ञान प्रकाशित केले आहे ते शतकानुशतके मानवांना मुक्तीचा मार्ग दाखवत आले आहे आणि यावच्चन्द्रदिवाकरौ दाखवत राहील हेच परमसत्य!

**– डॉ. सौ. जयश्री साठे**

१७ ए, विजयश्री हौसिंग सोसायटी, कोथरूड,

पुणे ४११०३८. फोन नं. : ९०४९५ १६४८३

# विवेकचूडामणि-एक आध्यात्मिक प्रयोगशाळा

**प्रा. श्री. अवधूत हर्डीकर**

*एम.ए.(संस्कृत-) काव्यतीर्थ, पुणे आकाशवाणी केंद्र प्रमुख (निवृत्त). वेदविद्या, संस्कृत विद्याशाखा, अध्यात्मविद्या, योगविद्येत प्राविण्य. लो.टिळक शिष्यवृत्तिधारक. संज्ञापन शास्त्राचे पदव्युत्तर प्राध्यापक, मराठी, हिंदी, संस्कृत व इंग्रजी भाषांतून भाषणे व लेख प्रसिद्ध. ऑस्ट्रेलिया व अमेरिकेमध्ये अध्यात्मविद्या व योगविद्या यावर अभ्यासपूर्ण भाषणे.*

विवेक म्हणजे विचार नव्हे. आपल्या मनात येणारे वस्तूच्या बाबतीतले किंवा व्यक्तीच्या बाबतीतले विचार त्या त्या वस्तूबद्दलच्या किंवा व्यक्तीबद्दलच्या आपल्या पूर्व जाणीवाशी संबंधित असलेल्या मनाच्या कोठारातून येतात. म्हणूनच अनेकदा ते पूर्वग्रहदूषितच असतात. व्यक्ती, म्हणजे व्यक्तीचे मन! ते सदैव वेगाने बदलत राहते. व्यक्तीचे बाहेरचे शाब्दिक किंवा हावभावात्मक वर्तनप्रकार; व्यक्तीच्या या आतल्या, या बदलत्या मनाच्या तत्कालीन स्थितीशी अनुरूप असतात. ते मन सूक्ष्मस्तरावर असते. तशा मनाच्या त्या लहरी अनेकदा आपणाला बाहेर कळतही नाहीत. बाहेरून शांत दिसणाऱ्या व्यक्तीचे मन, आत अनंत प्रश्नांनी झाकोळलेले, व्यग्र असेल आणि बाहेरून उग्र वाटणारा चेहरा आतून शांतावलेल्या मनाचा ठेवाही असेल.

अशा मनातून आलेले विचार अनेकदा फसवे ठरतात. ते औपचारिकही असतात; वेळ सांभाळणारे असतात, सदैव बदलते असतात; विश्वासार्ह असतातच असे नाही. व्यक्तीच्या स्वत:च्या मनात येणारे विचारही व्यक्तीच्या अनेक पूर्वग्रहांच्या गाळण्यातून येत असल्यामुळे अनेकदा तेही फसवे असतात. म्हणूनच विचारांचे स्वरूप अनेक वेळेला चंचल, अस्थिर, परस्परांना छेद जाणारे, एकांगी, गोंधळात टाकणारे, तसेच अपरिपक्वही असते.

विवेकात निवड असते. एखाद्या घटनेबद्दल वा वस्तूबद्दल जेवढे म्हणून विचार येणे शक्य आहे, त्या सर्वांचा नीट मागोवा घेऊन, त्यावर वस्तुनिष्ठ, तर्कशुद्ध, नुकसान न करणारा, संबंध सांभाळणारा, घटनांचे व्यवस्थित आकलन झाल्यामुळे निर्णयाप्रत आलेला, स्वीकार्य म्हणून निवडलेला, सर्वथा श्रेयस्कर असा तो एक शुद्ध विमर्श असतो. त्यालाच 'विवेक' म्हणतात. अशा विमर्शरूपी चूडेवरचा एक अनमोल मणी, अनमोल रत्न असलेल्या; वेदान्तात आलेल्या विषयांचे सुसंगत, तर्कशुद्ध, परिणामकारक प्रतिपादन करणाऱ्या, 'उपनिषदे', 'बादरायणाची सूत्रे' आणि 'श्रीमद्‌भगवद्‌गीता' यांचे 'मनोहारी सार' म्हणून असलेल्या आद्य शंकराचार्यांच्या या ग्रंथाचे नाव आहे 'विवेक-चूडामणि!'

आताच उल्लेख केलेल्या या तिन्ही ग्रंथांना 'प्रस्थानत्रयी' असे म्हणतात. या सर्व ग्रंथांद्वारे, आशयाचा परिचय करून देणारे, स्पष्टीकरणात्मक भाष्य; जर एखाद्या परिणतप्रज्ञ व्यक्तीने लिहिले; आणि ते विद्वानांनी मान्य केले तर अशा व्यक्तीला 'आचार्य' या बहुमानदर्शक पदवीने गौरविण्यात येत असे. आदिशंकराचार्य, वल्लभाचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य, गौडपादाचार्य, असे काही ख्यातनाम आचार्य भारतात होऊन गेले. या सर्वांमध्ये आदि शंकराचार्यांनी प्रस्थापित केलेला 'अद्वैत- सिद्धांत;' स्वतंत्र बुद्धीच्या विद्वानांमध्ये, प्राज्ञ आणि ऊहा-पोहामध्ये प्राविण्य मिळविलेल्या खऱ्या बुद्धिमान लोकांमध्ये हा सिद्धान्त स्थिरपद झाला.

प्रस्थानत्रयीवर उत्तम भाष्य लिहूनही त्याच विषयावर एका स्वतंत्र ग्रंथाची निर्मिती करायला हवी; असे त्यांना प्रकर्षाने वाटले; तेव्हाच अशा ग्रंथाची निर्मिती झाली. प्रस्थानत्रयीचे सर्व ग्रंथ आणि विवेक चूडामणि यांचा तौलनिक अभ्यास केल्यानंतर, ही गरज होती; असे निश्चितपणे म्हणता येते. ही गरज पूर्णांशाने भागविणारा ग्रंथ त्यांनी निर्माण केला. हा ग्रंथ म्हणजे एक मोठी आध्यात्मिक प्रयोगशाळा आहे. एक भक्कम आध्यात्मिक विचारसरणी येथे आपल्याला गवसते. प्रयोगशील राहून स्वत:वरच, स्वत:च निरीक्षक होऊन, निरीक्ष्य वस्तूसुद्धा स्वत:लाच करून; एक निकोप, शुद्ध आध्यात्मिक विचार आपल्यामध्येच रुजला आहे हे नंतर लक्षात येते.

व्यावहारिक जीवनामध्ये व्यक्तीचा संबंध अनेकानेक वस्तूंशी व व्यक्तींशी येतो. त्या संबंधांमुळे वस्तुविषयींच्या इच्छा आणि व्यक्तीच्या बाबतीतल्या अपेक्षांना कधी जन्म मिळाला हेच कळत नाहीसे होते. आपल्या इच्छांप्रमाणे वस्तू मिळत गेल्या; तरी, जगातल्या सर्व वस्तू; तरतमभावातच असतात, हे कळायला उशीर होतो. वस्तू आणि व्यक्ती या दोन्हीमध्ये एक सामान्य गुणधर्म आहे. तो म्हणजे वस्तूला जसे उपयोगिता मूल्य असते; तसेच ते व्यक्तीलाही असते. म्हणून अनेक व्यक्ती व्यवहारांतली एक वस्तूच बनून जातात.

पण या वस्तूला (मानवी) मन असते. ते सदैव बदलले जाणारे असते. सख्ख्या मुलाचेच नव्हे तर आपलेही मन कधी, कसे बदलले; ते आपणालाही उमगत नाही. तीच गोष्ट आपल्या संबंधात असणाऱ्या सर्व माणसांची! व्यक्तीसंबंधीच्या आपल्या अपेक्षा, मोडकळीला आलेल्या जुन्या घरासारखे व्यक्तीचे स्वरूप आपल्यापुढे उभे करतात तेव्हा आपण हतप्रभ होतो; आणि अशा गोष्टी वारंवार झाल्या की, जीवनामध्ये व्यक्ती प्रतिदिनी, प्रतिक्षणी ढेपाळलेली, हताश, निराशाग्रस्त, झाकोळलेली होऊन जाते. प्रतिदिन बदलत जाणाऱ्या व्यावहारिक जीवनातल्या उग्र प्रश्नांच्या स्वरूपाशी 'जमवून घेणे' व्यक्तीला कठीण जाते. अशावेळी व्यक्ती पार कोलमडते.

अशा मोडकळीला आलेल्या अनेक व्यक्ती हेच समाजातल्या लबाडांचे, दुष्टतेचे व्रत घेतलेल्या धूर्तांचे, प्रसिद्धी मिळवलेल्या चलाख बुद्धिमानांचे चराऊ कुरण असते. यांतून अनेकानेक व्यक्तींचे, आधी मानसिक व नंतर शारीरिक स्वरूपाचे अनंत प्रश्न सतत निर्माण होत राहतात. अनेक वर्षांच्या सतत चालणाऱ्या या अशाच गोष्टींमुळे अपरिहार्य स्वरूपाचे सामाजिक व सांस्कृतिक असे एक मानसिक रसायन काही काळातच तयार होते; आणि या रसायनाच्या प्रतवारीवरच त्या त्या देशाचे, देशातील समाजाचे; सामाजिक व सांस्कृतिक स्तर अवलंबून असतात. देश म्हणजे देशातील व्यक्ती. त्याच जर अशा मनाने मोडकळीला आलेल्या लोकांची बहुसंख्या असलेल्या असतील; तर तो देशही मोडकळीला आलेला, आतून पोखरलेला, कमकुवत झालेला, पार ढेपाळलेला असतो. ज्या देशाच्या बुद्धिमान म्हणून समजल्या गेलेल्या व्यक्ती, दुसऱ्या कोणत्याही समाजाचे असे मानसिक खच्चीकरण करण्यात, निराशाग्रस्त जीवन जगायला लावण्यात, कळी उमलता उमलताच त्या खुडून टाकण्याकरिता आवश्यक असलेली हिंस्त्र मानसिकता हृदयात बाळगून असतात; अशा व्यक्तींचा समाज नीच समाज म्हणून गणला जायला हवा. सामाजिक, सांस्कृतिक क्षेत्रातला त्या देशाचा दर्जा या लोकांमुळेच खालावतो. कोणत्याही प्रकारच्या अभिनिवेशात न गुरफटलेली शुद्ध धार्मिकता, आणि व्यक्तीला मनाने सदैव कणखर ठेवणारी- आध्यात्मिकता; जर व्यक्तीच्या दैनंदिन जीवन व्यवहाराची मूळ बैठक झाली; आणि त्यात जर नाटकीपणा नसेल; तर अशा व्यक्तींनी बनलेला समाज, त्याची संस्कृति आणि त्याची स्वीकार्यता सदैव उच्च दर्जाची राहते.

आपला समाज असा विवेकसंपन्न, आध्यात्मिक विचारांनी श्रीमंत, खऱ्या मानवतेचे आदर्श निर्माण करणारी अभिनिवेश- विरहित सामाजिक- व धार्मिक वृत्ती- प्रवृत्ति जोपासणारा असा हवा. तसा तो करण्याची जबाबदारी- समाजातल्या खऱ्या- खुऱ्या क्रांतदर्शी- नेतृत्वाची असते. हे असे स्वयंभू नेतृत्व लाभलेले अस्सल विचारवंत प्राचीन काळात आपल्याकडे होऊन गेले. त्यामध्ये आदि शंकराचार्यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल.

त्यांनी जे तत्त्वज्ञान समाजापुढे मांडले, ते आमची लखलखीत परंपरा त्यांचेपर्यंत घेऊन आली होती. त्या परंपरेला, एका विशिष्ट लयीत, विशिष्ट शिस्तीत बसवलेले असे एक देखणे स्वरूप लाभले. लोकांच्या गृहीत कृत्यांवर त्यांनी काही सोडले नाही. प्रत्येक छोट्या छोट्या लौकिक शब्दांच्या व्याख्याही दिल्या व मगच त्यावर बोलले. सामाजिक परंपरांमधली शिस्त कमी झाली की, त्यामध्ये अनेक अवांछनीय गोष्टी शिरतात. अशावेळी अधिकारी व्यक्तीने 'ते करू नका; हे करा' असे निक्षून सांगावे लागते. पुराणातल्या अनेक गोष्टींचा स्वार्थासाठी वापर करणाऱ्या लोकांचे प्राबल्य झालेल्या समाजाला तर, याची प्रत्येक काळात गरज असते.

आरंभीच त्यांनी सांगितले की; स्नान, दान, प्राणायामासारख्या शेकडोशे गोष्टींचे अवडंबर केल्यामुळे आत्मबोध होणार नाही. मंत्रजप, पूजा-अर्चा, तप, ध्यान, आसक्ती, संन्यासाश्रमातलेही क्रियापटुत्व या सर्वांतून होणारी मानसिक- शारीरिक हिंसा, वाढणारा दंभ, खोटारडेपणा हे सर्व सोडून द्या. योगशास्त्रावरच्या दर्शनोपनिषदामध्ये सांगितलेय; की, 'अंत:करणच जर दुष्ट असेल तर बाहेरून तीर्थस्नान करूनही ते शुद्ध होत नाही. दारूचे भांडे पाण्याने शंभरवेळा धुतले तरी ते अशुद्धच असते.'

*'चित्तम् अन्तर्गतं दुष्टं तीर्थस्नानैर्न शुध्यति ।*
*शतशोऽपि जलैर्धोतं सुराभाण्डमिवाशुचि ।।*

– दर्शनोपानिषद ४-५४

अशीच दोषयुक्त माणसे अध्यात्म- योगविद्या यांचेवर बोलत असतात. बाहेर आचार वेगळा, वेष नटासारखा काळ वेळ बघून, अंत:करणात शुचित्वाचा अंशही नाही; हे समाजात अनुभवलेल्या शंकराचार्यांनी अध्यात्मविद्येची अधिकारी व्यक्ती कोणत्या गुणांनी युक्त हवी ते सांगितले. ते म्हणतात, तो बुद्धिमान हवा (मेधावी), स्वत:ची स्वतंत्र बुद्धी वापरणारा हवा. विद्वान् म्हणजे अनेक उपयुक्त शास्त्रांची माहिती करून घेतलेला हवाच. पण, तो तसा पढिक विद्वान् नको आहे. तर स्वत: ऊह आणि अपोह करण्यात तो वाकबगार हवा. तर्काच्या बळावर उत्तम गोष्टी स्वीकारणारा आणि अस्वीकार्य गोष्टींना दूर लोटण्याची बौद्धिक कुवत असलेला हवाय. हे सर्व काही असूनही- तो विवेकशील, स्वत:च्या इच्छा- अपेक्षा संपलेला म्हणजे वस्तू व व्यक्ती यातली आसक्ती संपलेला, शम- दम-तितिक्षा- उपरति, श्रद्धा- समाधान ही षट्गुण संपत्ती

स्वत:मध्ये बाणवलेला, मोक्ष मिळवण्याची तीव्र इच्छा असलेला असा हवाय. भक्तीही हवी आहे.

शंकराचार्यांनी 'भक्ती'ची व्याख्या दिली आहे. स्वत:च्या स्व-रूपाचा म्हणजे बाहेरचे दृश्य शरीर आतल्या ज्या मूळ कारण शरीरावर पूर्णपणे अवलंबून; त्या कारणस्वरूपाचा सतत मागोवा घेत रहाणे, आपल्या आत्मतत्त्वाचे पुन: पुन: अनुसंधान करीत राहणे म्हणजे भक्ती! भक्तीची ही व्याख्या- ज्ञानमार्गी शंकराचार्यांची- सर्वथा भिन्न- विचारसरणी दाखवून देते.

याकरिता गुरूची आवश्यकता आहे; पण तो कसा हवा?... 'उत्तम कुळातले उत्तम संस्कार लाभलेला, पापी विचारही मनात न येणारा, वासनांच्या आहारी न गेलेला, ब्रह्मज्ञानी लोकांमध्ये श्रेष्ठ असूनही, ब्रह्मामध्ये रममाण होणारा, इंधनाची गरज संपलेल्या अग्नीसारखा, दयेचा सागरच वाटावा असा,' या सर्वांमुळे शंकराचार्यांच्या डोळ्यांपुढे त्या काळातही याच्या विरुद्ध गुणधर्मांचे गुरुजन असावेत हे लक्षात येते.

'विवेकचूडामणि' हा गुरु-शिष्य संवाद आहे. पण या संवादाची शैली अशी आहे की, आपणच तो शिष्य कधी होतो आणि खुद्द शंकराचार्य आपले गुरू कधी होतात, हे आपणाला कळत नाही. या विशिष्ट शैलीमुळे आपण या ग्रंथरूपी वैचारिक प्रयोगशाळेत एक प्रयोगाची वस्तू होतो; आपण त्याचे साक्षीही आहोत, निरीक्षकही आहोत... या सर्वांची जाणीव होते.

शंकराचार्यांनी मोक्ष समजण्याकरिता बंधन कशाचे आहे, हे आधी समजावून घ्यायला सांगितले. मोक्ष म्हणजे बंधमुक्ती! पण हा बंध आपल्याच भ्रामक कल्पनांनी निर्माण केलेला, आपणच निर्माण केलेला एक मोठा गुंता असतो. आपणाला तो आपण गलितगात्र झाल्यावर समजून उपयोगाचा नाही. व्यक्तीच्या मनात सतत उत्पन्न होत राहणाऱ्या इच्छा, त्या फलद्रूप होण्यासाठी व्यक्तीचे कार्य, फळ मिळाले नाही आणि कमी मिळाले तर वाढणारे दु:ख, ज्याला मिळाले- त्याचेबद्दल मत्सर, द्वेष, असूया या सर्वांच्या मुळाशी असलेली अविद्या... या साऱ्या साऱ्या गोष्टी बंधनात टाकणाऱ्या असतात. यातून सुटका करून घेण्यासाठी सांख्य, योग, वेदान्त... वगैरे शास्त्रग्रंथ आहेत. पण ग्रंथांची केवळ पढिकता उपयोगाची नाही. त्यामुळे प्रवचने झोडून नांव-पैसा मिळविणे, यातून होणारा अहंकार जोजावणे; संप्रदाय वाढवणे, काल्पनिक, भ्रामक गोष्टी निर्माण करून भावनाशील व्यक्तींचे भरकटलेपण वाढवणे. या सर्व गोष्टी शेवटी स्वत:साठी, समाजासाठी, सांस्कृतिक जाणीवांसाठी... सर्वांसाठीच घातक ठरतात. यामुळे भाषणबाजी वाढते, बोलण्यातले कलात्मक कौशल्य वाढते, त्या बोलण्याला, बव्हंशी अज्ञजनांमध्ये, शास्त्रीय ग्रंथांवर अधिकार- वाणीने बोलणारा अशी प्रसिद्धीही मिळवता येते... थोड्या काळच्या मजेसाठी हे ठीक असले तरी त्यातून मोक्ष मिळत नाही. शब्दजंजाळामध्ये भाबड्या लोकांना पकडता येते, लोकांचे चित्र आपणाला अनुकूल होण्याच्या दृष्टीने चाळवता येते. पण हा अध्यात्माचा व्यवहारासाठी, स्वत:च्या नावासाठी, पैशांसाठी- दांभिक प्रतिष्ठेसाठी वापर झाला फक्त! खुद्द स्वत:ला या सर्व कौशल्यामुळे आत्मज्ञान झाले का? हा प्रश्न जर शेवटी उरत असेल, तर या सर्व दांभिक, दुष्ट- व्यवहाराला काहीही अर्थ उरत नाही. आत्मज्ञानाचा अनुभव स्वत:लाच आल्याशिवाय; ग्रंथ वाचून पोपट पंचीचे कमावलेले कसब, शब्दफेकीतली संपादित कला, माहितीचा ढीग, ती पसरून मांडण्याची कसरती सारखी कला... यांचा उपयोग लोकांच्या क्षणिक मन रंजनासाठी ठीक आहे. मुक्तीसाठी याचा उपयोग होत नाही. शंकराचार्यांचे यासंबंधीचे विवेचन तार्किक आणि अनुपमेय आहे. ते म्हणतात, 'परतत्त्व म्हणजे काय, हे कळलेले नसतानाच केवळ शास्त्राध्ययन करणे व्यर्थ आहे, आणि परतत्त्व कळलेले असेल तर शास्त्रग्रंथांचे अध्ययन व्यर्थ आहेच आहे.'

*''अविज्ञाते परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला ।*
*विज्ञातेऽपि- परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला ।।''*

अनित्य अशा वस्तुजाताला नित्य समजून चालणे, अपवित्र वस्तूला पवित्र समजणे, अंती दु:खकारक गोष्टींना सुखकारक समजून चालणे आणि ज्यामध्ये आत्मतत्त्वच नाही त्याला आत्मा समजणे' या चारांपैकी कोणत्याही गोष्टीला 'अविद्या' म्हणतात. सर्व मानवी क्लेशांचे मूळ या अविद्येमध्ये आहे. अविद्या, अस्मिता, आसक्ती, द्वेष आणि आपणाभोवती एखाद्या अवसमजाचे किंवा अपसमजाचे आवरण घेऊन त्यामध्येच शिरून राहणे हे सर्व काही अंती क्लेशकारक आहे- असते. षड्गुणांची संपत्ती हवीच, कशाबद्दलही हाव नको- चिकटलेपणा नको, आणि नेहमीच आत्मतत्त्वाबद्दलच श्रवण- मनन- चिंतन हवे.

आत्मतत्त्वातून भिन्न अशा शरीर-इंद्रिये-मन- बुद्धी वगैरे जडतत्त्वांचे वर्णन करून ते सर्व 'अनात्मा' असे ठासून सांगितल्यावर शंकराचार्य मायेचे वर्णन करतात.

'माया' ही परमेश्वरी शक्ती, ती अव्यक्त आहे. ती, सत्त्व- रज- तमो गुणांनी युक्त आहे. ती अविद्या आहे. अनादि म्हणजे जिचा प्रारंभ कधी झाला ते सांगता येत नाही. ती आहे म्हणावे तर मानवी ज्ञानेंद्रियांनी तिचा अनुभव घेता येत नाही. नाही म्हणावे तर मायेचा परिणाम दिसतो. एकाच वस्तूवर 'नाहीपण' आणि 'आहेपण' असे धर्म एकाच वेळी दिसत नाहीत म्हणून तिला तसेही

म्हणता येत नाही. ती ब्रह्माहून वेगळी मानली. तिचा रजोगुण व्यक्तीला कार्य करण्यात उद्युक्त करतो. त्यासाठी तमोगुण व्यक्तीच्या दृष्टीवर आवरण (झापड) आणतो. खरं आहे हे! अपत्य प्रेमाचेही झापड, अपत्याबाबत सर्व काही करायला लावते. झापड दूर झाल्यावर आपण त्या आवरणाखाली होतो एवढेच कळते. सत्त्वगुणाचे दोन प्रकार. रजोगुण व तमोगुण यापैकी कोणत्याही गुणाचे मिश्रण झाल्यामुळे 'मिश्रसत्त्व'- आणि हे मिश्रण नसताना असलेला विशुद्ध असा सत्त्वगुण! मिश्र सत्त्वगुणी लोक कृतिप्रवण दिसतात, पण ही कृति- चांगल्या उद्देशापोटी असते... भाबड्या लोकांच्या भक्ती-श्रद्धा यांचा फायदा घेऊन अध्यात्माचा व्यवहार करणारी मंडळीसुद्धा मिश्र सत्त्वगुणाचा अभिनय करीत असतात. पण खरे सत्त्व गुणी लोक त्यांचा स्वत:चा काहीही फायदा नसताना लोकांच्या हिताची कामेच करीत असतात. विशुद्ध गुणाची व्यक्ती प्रसन्न- शांत- दान्त अशी असते.

उत्तम देशसेवक, धर्माची अभिनिवेश विरहित खरी जाण असणारे महात्मे, उत्तम आचार-विचार यांचा हिरीरीने प्रचार करणारे लोक; मिश्र सत्त्व गुणीच असतात. यांचा उपयोग स्वार्थासाठी करून घेणारे चाणाक्ष- बुद्धिमान- लोकही समाजात असतात.

हे तिन्ही गुण = सत्त्व, रज, तम, ज्या वस्तूचे ती वस्तू म्हणजे माया. तिचे रूप नाही- स्वरूप कळत नाही.

जगामध्ये कोणत्याही गोष्टीचा गुण ज्ञानेंद्रियांनी ग्रहण केल्यावर, तो गुण ज्या वस्तूवर राहतो ती वस्तू लगेच समजते. सोनचाफ्याच्या फुलांचा गंध आल्याबरोबर सोनचाफ्याचे फूलच लक्षात येते. येथे तसे होत नाही. गुण समजतात परंतु, ते गुण ज्या वस्तूवर राहतात तो 'गुणी' मात्र समजत नाही. म्हणून 'माये'ला महा-अद्‌भुत, अवर्णनीया असे म्हणतात. गुणांचा वापर करून घेणारे लोक हुशार समजले जातात. हा वापर होऊनही हाताला काही लागत नाही. जगातली सर्व दु:खे मायेमुळे; सर्व क्लेश मायेमुळे; सर्व व्यथा, सर्व काळज्या, अपसमजुतींचे ढिगारे, द्वेष, दंभ, वरताण करण्याची वंशदत्त परंपरा, तुटकपणा, फसवेपणा, अज्ञान, भ्रष्टाचार, दुसऱ्या-संबंधीची तुच्छता, छिद्रान्वेषी- स्वभाव, वृत्तीतला मोकळेपणाचा अभाव, आरोप, मत्सर, असूया, घृणा, निंदा, माध्यमांच्या साहाय्याने गुणी व्यक्तीला खुडून टाकण्याचे, शक्यतो ती कळी असतानाच खुडण्याचे कार्य बेमालूमपणे करणारे चाणाक्ष बुद्धिमान... हे सर्व सर्व त्या मायेमुळेच स्वत:चे कार्य- करताना दिसतात.

शंकराचार्यांनी मिश्रसत्त्वामध्ये (अर्थात् ते नाटकीय मिश्रसत्त्व नसेल तर) आत्मबिंबाचे प्रतिबिंब पडलेले असते असे म्हटले आहे. हे त्यांचे विधान फारच लक्षणीय आहे. आपल्या शरीरातल्या जीवात्म्याला, परमात्म्याचे प्रतिबिंब अशी कल्पना शंकराचार्यांनी मांडलेली आहे. या प्रतिबिंबाचे प्रतिबिंब जिथे पडते तिथे परमात्मा जसा आहे तसाच दिसेल. प्रतिबिंब उलट दिसते; पण प्रतिबिंबाचे प्रतिबिंब सुलट दिसते. म्हणून सत्त्वशील व्यक्तीच्यामध्ये अनेकांना ईश्वरी तत्त्वाचा थोडा वेळ का होईना साक्षात्कार होतो. अशा लोकांकडे अनेक लोक आकर्षिले जातात. मग अशा लोकांसंबंधीचे व्यवहारवाद जपणाऱ्या चाणाक्ष व बुद्धिमान लोकांनी कोणतेही चित्र निर्माण केलेले असो! सार्वजनिक जीवनामध्ये जे एकप्रकारचे नेतृत्वासंबंधी निराशामय वातावरण दिसते- त्यामध्ये आपण सात्त्विक समजलेल्या लोकांचे ते सत्त्वगुणाचे नाटक होते; हे नंतर अनुभवामुळे समजल्यामुळे आलेला परिणाम असतो. म्हणूनच मिश्रसत्त्वगुणांचे नाटक करणारा कोण आणि खरे मिश्र सत्त्व असणारा कोण यांमधला फरक लोकांना झटकन समजायला हवा. म्हणजे निराशा उत्पन्न होणार नाही. सार्वजनिक जीवनात निराशा ही समाज स्वास्थ्याला घातक असते.

शंकराचार्यांची 'उपाधि' या कल्पनेसंबंधीची मांडणी शास्त्रशुद्ध आणि तर्कपूत आहे. 'उपाधि' हा वेदान्तामधला एक ग्रांथिक शब्द. उपाधि शब्दाचा मराठीतला अर्थ घ्यायचा नाही. एखादी वस्तू ज्या एका दुसऱ्या वस्तूमध्ये ठेवलेली असते ती दुसरी वस्तू या वस्तूची 'उपाधि' होते. पेटीमध्ये 'रत्न' ठेवले असेल; तर, पेटी ही त्या रत्नाची उपाधि. आणि रत्न हे 'उपाधेय!' वस्तूचे यथायोग्य ज्ञान न होण्याला वस्तूची उपाधि हेच कारण असते. उपाधीमध्ये वस्तूचे वस्तुत्व अडकलेले राहते. उपाधेय महत्त्वाचे, उपाधि नव्हे. उपाधीपासून उपाधेय, स्व-तंत्रच असते. 'मी विचारात आहे' असे आपण जेव्हा म्हणतो तेव्हा विचार हे त्या वेळी 'मी' ची उपाधीच असते. शरीर हे आत्मतत्त्वाची उपाधी!

'उपाधि-कल्पना' नीट जाणून घेतली तर व्यवहारी जीवनातले भाबडेपण दूर व्हायला मदत होईल. आपले आध्यात्मिक जीवनच नव्हे तर व्यावहारिक जीवनही अधिक सुरक्षित, शांत, अधिक सुंदर बनविता येईल. व्यक्ती-व्यक्तीतील संबंध अधिक स्वीकार्य, अधिक टिकाऊ होतील. वस्तूचा आकार म्हणजे वस्तुतत्त्व नव्हे- उपाधि नीट कळली; तर रंग-रूप- आकार- वजन- जात- वंश- घराणे- अवस्था- धर्म... यावरून आपण व्यक्तीविषयींचे अंदाज बांधत राहणार नाही. 'स्व-तत्त्वावगम' महत्त्वाचा असे शंकराचार्य सांगतात. ते 'अव-गम', 'अवबोध' असे शब्द वापरतात. हे तत्त्व, नीट, दीर्घप्रयत्नाने आपल्यामध्येच निरंतर प्रयोगशील राहून खाली (=अव) म्हणजे आपल्यातच शिरून जाणून घ्यावे लागते. आपला बोध करून घ्यावा लागतो. दीर्घकाळ, निरंतर, श्रद्धापूर्वक सतत

प्रयत्नशील राहूनच हा आत्मबोध आपणाला करून घेता येईल.

शंकराचार्यांची, वेदान्तामधल्या, 'अध्यास' या दुसऱ्या एका ग्रांथिक शब्दाची मांडणी सुद्धा अशीच वेधक आहे. व्यवहारी जीवन जगत असताना काही गोष्टी बाबतचेच नव्हे; बहुतेक सर्व गोष्टी– वस्तुजात यांबाबतचे आपले ग्रह पक्के होत असतात– झालेले असतात. एखाद्या व्यक्तीबद्दल किंवा वस्तूबद्दल आपले पूर्वग्रह (अधि+आस) पूर्व-संस्कार इतके भक्कम असतात की आपण त्या व्यक्तीचा किंवा वस्तूचा आपल्या समजापेक्षा आपल्या गृहीतकापेक्षा अन्य विचार करूच शकत नाही. व्यक्तीचे बाह्य वार्तनिक प्रकार व्यक्तीमध्ये असलेल्या 'मन'नावाच्या एका सूक्ष्म– गूढ अशा घटकावर अवलंबून असतात. हे मन सतत बदलत असते. योगविद्या सांगते, की दर श्वासागणिक एक विचार आपल्यामध्ये येतो. म्हणजे मिनिटाला पंधरा विचार आपल्यामध्ये येतात. व्यक्ती, ज्यावेळी 'ब' या विचाराने– युक्त असते त्यावेळी ती 'अ' या विचाराने युक्त नसते. आणि ती 'क' या विचाराने युक्त होते त्यावेळी ती 'ब' या विचाराने युक्त नसते. या सतत बदलत्या राहणाऱ्या मनाच्या अवस्थेमुळे आपणाला व्यक्ती ज्यावेळी, जशी आहे असे समजते; तशी ती सर्वच वेळी नसते. म्हणून कोणत्याही व्यक्तीबद्दल, ठामपणे, एकमेव, कायमचे असे मत बनवून ठेवणे योग्य नसते. बदल आणि सतत बदल हा व्यक्तीप्रमाणेच वस्तूचाही एक अपरिहार्य गुणधर्म आहे. काही पूर्वग्रह उपयुक्त आहेत. मिठाचा खारटपणा, साखरेचा गोडपणा, मिरचीचा तिखटपणा वगैरे गोष्टींप्रमाणे– गोविंद न्यायी आहे आणि अजय दयाळू आहे वगैरे गृहीतकृत्ये योग्य नसतात. म्हणून व्यक्तीबाबत आपल्या पूर्व– समजुती तेवढ्याच खऱ्या आहेत असे कधीही म्हणता यायचे नाही. तात्कालिक परिणामकारक कारणांमुळे व्यक्ती पूर्ण बदलूही शकते. याचमुळे व्यवहारांत मित्राचा जालीम शत्रू, नुकसान करणारा दुष्ट माणूस झाला तरी आश्चर्य वाटायला नको. एखादेवेळी मदत करणारा मित्रच तुमचा द्वेष करायला लागून कधी नुकसान करणारा शत्रू झालेला असतो ते तुम्हाला कळणारच नाही. सख्ख्या भावाच्या घरावर दगड मारण्यासाठी सुद्धा माणूस तयार झालेला दिसतो. जवळचे म्हणवले जाणारे नातेवाईक अनेकांचे गुप्तशत्रू असतात. आणि सकारात्मक बदलांपेक्षा नकारात्मक बदल लवकर घडून येतात. हा त्या बदलांमधला विशेष आपण लक्षात घ्यायला हवा. माणसानं नदीप्रवाहासारखे नित्य नूतन असावे. विचारांचा कोणताही साठा करायला गेलात की तिथे त्याचे डबके तयार होते. हळूहळू सुकत, आक्रसत जाणाऱ्या त्या डबक्यात रानटी डुकरं डुबकी मारण्यासाठी येतात झाले! म्हणून शंकराचार्य अध्यासाला दूर लोटायला सांगतात.

आध्यात्मिक क्षेत्रात खूप पुढे जाणाऱ्या व्यक्तीच्या बाबतीत सामान्य व्यक्तीचे नियम त्याला लावता येत नाहीत, हे इतर व्यक्तींनी लक्षात घ्यावे लागते. सामान्य माणसासारखाच त्याचाही संबंध अनेक वस्तू व अनेक व्यक्तींशी येतो. पण वस्तूसंबंधीची इच्छा आणि व्यक्तीसंबंधी काही 'अपेक्षा' अशा व्यक्तीमध्ये निर्माणच होणार नाहीत. कारण पूर्वग्रहांमुळे उत्पन्न होणाऱ्या वासना, याच्यामध्ये उत्पन्नच होत नाहीत. वस्तू किंवा व्यक्तीबाबत इच्छा– अपेक्षामुक्त विचार अशा व्यक्तीच्या मनात येतच नाहीत. मनातले विचार थांबलेले, वासना संपलेल्या आणि यामुळे व्यक्तीला क्रियाशील बनविण्यातला मुख्य कारण– घटक, जी वासना तीच नष्ट झाल्यामुळे अशा व्यक्तीची क्रियाशीलता थांबते. क्रिया करताना व्यक्तीला मुळात वासना लागतेच. कृतीची माहिती असावी लागते; आणि ती क्रिया घडवून आणण्यासाठी आवश्यक तेवढ्या प्रमाणातला 'अहंकार' जवळ बाळगावा लागतो. या तीन घटकांपैकी एखादा घटक जरी नसेल तरी क्रिया घडणार नाही. क्रिया घडण्याकरिता लागणारे 'वासना', 'माहिती' (म्हणजे माहितीची स्मृती) आणि 'अहंकार' हे तिन्ही घटक आध्यात्मिक जीवनाच्या विरोधातच असतात. व्यवहारी जीवनामध्ये क्रियेच्या फळासंबंधीची इच्छा जागी असते, सततचे विचार जे आपल्या पूर्वग्रहांमुळे बाळसं धरतात आणि जे नवनवीन इच्छांना जन्म देत राहतात ते मनाच्या अध्यासयुक्त म्हणजे कंडिशण्ड अवस्थेतून येतात. त्यामध्ये तोच– तोचपणा असतोच. व्यवहारासाठी कदाचित आवश्यक वाटणाऱ्या या सर्व गोष्टी आध्यात्मिक जीवनासाठी बाधक ठरतात. शंकराचार्य त्या दूर करायला सांगतात.

'अहंकार' हा ग्रांथिक शब्द 'उपाधि', 'अध्यास' यांचेइतकाच महत्त्वाचा. खऱ्या आत्मबोधाला बाधक असा आपल्यातला एक घटक म्हणजे आपला 'अहंकार!' 'अहंकार' हा माझ्या कल्पनेमधला, माझ्या विचारातला 'मी' असतो. 'कल्पना' किंवा 'विचार'– फार वेगाने बदलते असतात. म्हणून हा कल्पनेतला 'मी' सुद्धा सतत बदलता म्हणजे अनित्य असतो. अस्थिर असतो. जितकी व्यक्तीमध्ये तर्कशुद्ध विचारसरणी कमी असते; भावनेला शरण जाण्याचा स्वभाव झालेला असतो; अज्ञानाचे प्रमाण न संपणारे असते; तितका हा 'अहंकार' दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीचा वापर करून फेकून देण्याच्या लायकीचा जास्त असतो. असा अहंकार हा खरा 'आध्यात्मिक मी' नव्हे. तो खोटा असा व्यावहारिक मी असतो. या 'खोट्या मी' ला शक्यतो लवकर विसरायला हवे. 'खरा मी' म्हणजे आपले 'आत्मतत्त्व', आपला 'जीवात्मा' त्याला विसरणे म्हणजे प्रमादच आहे; असे शंकराचार्य म्हणतात.

'खऱ्या मी'ला माणूस विसरतो कारण बाह्य अशा शरीरासह सर्व गोष्टींशी त्याचे 'अनुसंधान' झालेले असते. 'बाह्यानुसंधान' हे 'मिथ्यानुसंधान' आहे. ते 'सत्यानुसंधान' हवे आणि 'सत्यानुसंधान' हे 'आत्मानुसंधाना'मुळेच येईल. 'अनु + सम + धा = एखादी सत्य गोष्ट कळल्यानंतर लगेच सर्वात्मना तिकडेच आपणाला सतत ठेऊन देणे एवढा त्याचा अर्थ! सतत नव- नवीन शब्दांची निर्मिती करून विषयाची योग्य ती चित्रमय जाणीव वाचकाला, श्रोत्याला करून देणे यामध्ये शंकराचार्य केवळ अजोड होते. ही एकच कसोटी लावून बघितले तर ते त्या काळातच नव्हे आजच्या काळातही प्र- प्रगत ठरतील. आजच्या काळातल्या अनेक बड्या लेखकांपेक्षाही ते प्रगत ठरतात. केवळ विवेक चूडामणीमध्येच असे योग्य अर्थवाही, परिणामकारक, व्युत्पन्न बुद्धिवैभवाची ओळख सहज करून देणारे सातशेहून जास्त अत्यंत चपखल शब्द त्यांनी वापरले आहेत.

'आत्मावबोध', 'आत्मनिष्ठा' ही वेळ मिळाला तर करायची गोष्ट नव्हे; हे सांगताना त्यांनी ध्यानाची 'अखंडरूपता', अनुसंधानाची आत्मैकरूपता सांगितली. 'अखंड- एकरूपता', 'अखण्ड-वृत्ति', 'प्रत्ययान्तरशून्य' हे त्यांचे एकेक- शब्द! या अशा शब्दांमुळेच कोणत्या व्यक्तीजवळ स्वत:चे अनुभव होते; आहेत आणि कोणती व्यक्ती उपजीव्य वृत्तीने राहून सुद्धा खोटा गर्व वहाणारी असते; ते लगेच कळते. परमताचा अनुवाद करून कोणती व्यक्ती केवळ नाव मिळविण्यासाठी त्याचा वापर करते हेही कळते. असे शब्द, वाक्यांश- व्यक्तीच्या त्या विषयातल्या ज्ञानाच्या खोलीचे दर्शन घडवतात. तिचे व्युत्पन्न- स्वयंभू पांडित्य- आणि अंतरंगाची उंची त्यामुळेच कळून येते.

'आत्मविद्या' हाच प्रधान विषय असलेल्या या ग्रंथात- 'मुक्तियुवती', 'मायामदिरा', 'पारोक्ष्य कथाभिधायी' 'कीटको भ्रमरं ध्यायन्' वगैरे अनेकानेक शब्द, वाक्यांशविन्यास त्यांनी केले. त्यामुळे या, स्वयंभू, विलक्षण, तेजोभास्कराची स्वतंत्र बुद्धी कळून येते. 'ग्रहण-काळात रवीचा ग्रास वगैरे झालेला नसतो- तसे लोकांना वाटते एवढेच! असे आठव्या शतकांत ठणकावून सांगणारा माणूस आपल्या देशात झालेला होता. त्यावेळच्या शास्त्रीय जगतामध्ये सुद्धा शंकराचार्य किती शतके जगाच्या पुढे होते हेच शोधावे लागेल.

हे सर्व जाणून घेण्याचे फळ म्हणजे परिपूर्ण अशा 'स्व'चे दर्शन = आत्मबोध! कोणत्याही गोष्टीकरिता व्यक्तीने बाहेर पहाणे थांबवायचे! स्वत:मध्ये; नव्हे, स्वत:च ब्रह्मा-विष्णू-महेश- प्रजापती वगैरे आहोत हे जाणायचे! ब्रह्म व मी यामध्ये काही फरकच नाहीये. याचे भान हवे. सततचे ध्यान आत्मतत्त्वाचेच ठेवायचे.

अशा आत्मबोधाचे फळ म्हणजे 'निर्वासन बोध!' विचाररहित मनाची अवस्था म्हणजे Thought lessness Condition of mind आणि निर्वासन बोध म्हणजे Choiceless Awareness हे दोन्ही वाक्यांश J. कृष्णमूर्तींचे! जणू शंकराचार्यांच्या वाक्यांशांचे इंग्लिश भाषांतर! J.K. यांनी विवेक चूडामणि वाचलेला नसावा, तरीही हे वैचारिक व सैद्धान्तिक असे एकाच कल्पनेचे, एकमताचे अवतरण मनोहारी आहे!

उपनिषदांमधून येणारा विचार अध्यात्मविद्येच्या अभ्यासाच्या पूर्वतयारीविषयी फार थोडेच बोलतो. उपनिषदांमधून एकदम आत्मतत्त्वासंबंधीच सांगायला सुरुवात होते. भगवद्गीतेमध्ये व्यावहारिक प्रश्नांना उत्तरे देण्याकरिता व्यवहारी जीवनाशी सांगड घालून आध्यात्मिक विचारांचे व्यवहारातले उपयोग व महत्त्व हा विचार आला. ब्रह्मसूत्रांमध्ये ब्रह्मासंबंधी सूत्रमय भाषेत विचार आला.

अध्यात्म विद्याच शिकण्याच्या उद्देशाने, ज्या व्यक्तीमध्ये आतूनच फार मोठी इच्छा उचंबळून आलेली आहे अशा व्यक्तीला त्या विद्येच्या सम्यक् प्राप्तीसाठी पूर्वतयारी करताना विवेकाने वागून प्रगती कशी करता येईल, जीवनाकडे बघण्याची दृष्टी कशी असावी. आध्यात्मिक जीवनात खऱ्या बुद्धीचे महत्त्व का, कसे, कोणते? या सर्व प्रश्नांकरिता सरळ, सोपा, सुटसुटीत, तर्कशुद्ध कल्पनांच्या गुंत्यात वाचकाला न अडकविता जिज्ञासू व्यक्तीच्या जिज्ञासेचे समाधान करणारा हा ग्रंथ आहे.

आपणापैकी कोणाला सर्व उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, श्रीमद्भगवद्गीता यांचा अभ्यास करता आला नाही, तर केवळ हा ग्रंथ एकदाच नीट अभ्यासावा. त्यातील अनेक श्लोकांचे अनुसरण सतत तुमच्या मनात होत राहील. यातले श्लोक दररोज वाचत रहावेत. असा हा ग्रंथ आहे. बाराशे वर्षांपूर्वी ज्या व्यक्तीमुळे शंकराचार्य या पदाला प्रतिष्ठा प्राप्त झाली; आणि जी आजवर तशीच राहिली अशा एकमेव व्यक्तीचा हा स्वतंत्र ग्रंथ! येथे स्वयंभू बुद्धीचा विलास दिसतो. विषयासंबंधीचे अनुपमेय ज्ञान दिसते. एका विशिष्ट प्रणालीमध्ये विषयांचे विवेचन दिसते. संवादात्मक शैली असल्यामुळे उपदेश अप्रत्यक्ष होताना दिसतो. म्हणून प्रतिक्रिया लुप्त होते. नव-नवीन शब्दांच्या अर्थपूर्ण विलासात आपण हरवतो. त्याचवेळी शास्त्रीय विचारांची बैठक आणि विषयाचा अनुस्यूत व्यापार सुटत नाही. या प्रतिभेला, प्रज्ञावैभवाला अन्य उपमा नाही. या विचारांचे सतत चिंतन आम्हाला घडो; हीच ईश्वराशी प्रार्थना!

**- अवधूत हर्डीकर**

१६ ए, गणेशकृपा सोसायटी, परमहंसनगर, पौड रोड,

पुणे ४११०३८. फोन नं. ०२०-२५३८०२०१

# चर्पटपंजरिका स्तोत्र- एक चिंतन

**सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे**

*बी.ए.बी.एड (संस्कृत स्पेशल) राष्ट्रभाषा पंडित, शिक्षक.*
*विविध मासिकांतून वैचारिक, चिंतनात्मक, कौटुंबिक लेखन, दैनिक प्रभातमध्ये संत जीवनावर अखंड लेखमाला*

***'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मै वपर:।'***

श्री आद्यशंकराचार्यांच्या तेजस्वी वाणीतून उतरलेले एक बोधप्रद महान सत्य!

***कल्पद्रुम: कल्पितमेव सूते । सा कामधुक् कामितमेव दोग्धि ।***
***चिंतामणि: चिन्तितं एव दत्ते । सताम् तु संङ्ग: सकलं प्रसूते ।***

कल्पवृक्ष आपण मनात आणलेली प्रत्येक इच्छा पुरवतो. कामधेनु तर इच्छित वांच्छा पुरविण्यासाठी तत्पर असते. चिन्तामणि रत्न आपण चिन्तिलेले देतो परंतु संतश्रेष्ठांचा सहवास सगळे काही म्हणजे ऐहिक आणि पारलौकिक कल्याण साधण्यास समर्थ असतो.

श्रीमत् जगद्गुरु आद्य शंकराचार्य हे पदनतांचे कल्पतरु, वैराग्याचे महामेरु आणि ज्ञाननभीचा जणू अपर दिनकर होते. सामान्य संसारी माणसाला भवसागर पार करून नेण्यास दिशा दाखवणारे सर्वतोपरी सहाय्य करणारे एक महामानव होते. त्यांचे वडील शिवगुरु आणि आई आर्याम्बा या दोघांचीही इच्छा होती त्यांनी वेदज्ञ व्हावे. ते उभयता धर्माचरणी सदाचरणी होते. आपल्या मुलाने वेद विद्यासंपन्न व्हावे ही इच्छा अगदी सहज अशी होती. परंतु निष्ठुर काळाने आचार्यांचे पितृछत्र हिरावून घेतले. आर्याम्बा छोट्या शंकराची आई तर पूर्ण खचून गेली. पण तिने कर्तव्याकरिता भावनेवर विजय मिळवला आणि आपल्या छोट्या बाळासाठी ती खंबीर बनली आणि कर्तव्यतत्पर झाली. अवघ्या पाच वर्षांच्या आपल्या मुलाला मोठ्या निर्धाराने वेदविद्या अध्ययनासाठी गुरु गोविंदयति यांच्या नर्मदातटाकी असलेल्या आश्रमात घातले.

सद्गुरूवाचूनि सापडेना सोय । धरावे ते पाय आधी आधी । गुरु माता पिता । गुरूची देवता । गुरु मुक्तिदाता । हे ती माऊली जाणून होती. बालशंकराजवळ विनयीवृत्ती, ज्ञानग्रहणाची शक्ती- गुरुवरील अपार भक्ती, सहाध्यायांबद्दल बंधुभाव हे सर्वच गुणविशेष होते- त्यामुळे तो गुरू आणि मित्र सर्वांनाच प्रिय झाला. सर्वांचा लाडका बनला. त्याचे शिक्षण अत्यंत वेगाने पार पडले. कारण अलौकिक ज्ञानग्रहण, धारण करण्याची स्वयंप्रज्ञा त्याच्याजवळ होती. जणु दुसरा बृहस्पती ।, ज्ञानतृष्णा गुरौ निष्ठा, सदा अध्ययन दक्षता ।, एकाग्रता महत्त्वेच्छा हे विद्यार्थ्याला आवश्यक असे गुणपंचक त्याच्याजवळ होते आणि म्हणून अवघ्या बाराव्या वर्षी तो वेदविद्यासंपन्न झाल्याने गुरूंनी त्याला इतर मुलांना पाठ देण्यास सांगितले आणि हा बाळ शंकर लहान वयातच आचार्य बनला.

वेदग्रंथातील गूढ तत्त्वज्ञान, ब्राह्मण ग्रंथातील- आचार विचारांचे विवेचन, उपनिषदातील सखोल तत्त्वविचार या सर्वांचे आकलन अत्यंत लहानवयात करून घेतल्याने हा बाळ जगतामध्ये लखलखत्या तेजाने तळपणारा ज्ञानसूर्यच होणार याची खात्री गुरूंना झाली. हा कोणी साधारण विद्यार्थी नाही. आपल्या महत् भाग्याने त्याचे गुरुपद भूषविण्याचे काम ईश्वराने आपल्यावर सोपवले आहे असे गोविंदयतींना जाणवले. हा साक्षात भूतलावर जनकल्याणाय अवतरलेला भगवान् शंकरच आहे हे त्यांनी ओळखले.

वेदविद्यासंपन्न झाल्यावर शंकराने आपल्या आईकडे संन्यासाश्रम स्वीकारण्याची परवानगी मागितली. पतिवियोग झालेली ती माऊली आपल्या मुलाच्या या निश्चयाने पूर्ण हादरली. आपण आता खरेच निराधार होऊ हे भय तिच्या मनात दाटून आले. तिच्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहू लागल्या. पण शंकराने आपल्या आईची हळूवारपणे समजूत घातली आणि जगाच्या पाठीवर कोठेही असलो तरी तुझ्या अंतसमयी मी मांडी देण्यास निश्चित येईन असे आश्वासन देऊन ते जगकल्याणासाठी प्रयाण करते झाले. सामान्य संसार करणे हे त्यांचे उद्दिष्ट नव्हतेच मुळी!

सम्राट हर्षवर्धनाने बौद्ध धर्माला दिलेले अवाजवी उत्तेजन पाहून आचार्यांचे चित्त दु:खीकष्टी झाले. हिंदूंचे शाक, कापालीक, कौलीक, पाशुपत आदि विविध उपपंथ निर्माण होऊन तंत्रमंत्र कर्मकांड यांचा अतिरेक झाला. साक्षात मुक्तीकडे नेणारा विशुद्ध धर्माचरणाचा मार्ग कोणता हे या सावळ्या गोंधळात समजत नव्हते. 'यदा यदाही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानं अधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् । या उक्तीप्रमाणे आचार्यांच्या रूपाने साक्षात भगवानच भूतलावर अवतरले.

मातेच्या अश्रूंनी न विरघळणारा- आईला पटवून देणारा की,

आई धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांपैकी अर्थ आणि काम या दोन पुरुषार्थांची शक्ती मी धर्म आणि मोक्ष यासाठी वापरणार आहे. शाश्वत धर्म सांगणारी हिंदुधर्म पताका भारतभर फडकवणार आहे. पूर्ण ज्ञान आणि प्रखर आत्मविश्वास याच्या बळावर ते आपले जीवित कार्य करण्यास सिद्ध झाले.

एका वैदिक वृद्ध ब्राह्मणाने त्यांना सांगितले की, 'तुम्ही कितीही विद्वान असलात तरी काश्मीरमधील ज्ञानपीठावर दक्षिण दरवाजाने जाऊन स्थानापन्न व्हा तरच जगत्गुरू हा किताब तुम्हाला मिळेल.' आचार्य म्हणाले, 'मला द्रव्य, सत्ता, मान, कीर्ति कशाचाच मोह नाही. पण सर्वांच्या खात्रीसाठी मी या शारदापीठावर आसनस्थ होतो.

प्रस्थानत्रयी, भगवत्गीतेवरील शांकरभाष्य अशा अनेक ग्रंथरचना केल्या पण त्यांचे कविहृदय स्वस्थ बसेना. त्यांच्या अंत:करणात योग्य मार्गदर्शनासाठी भाव भावनांच्या उर्मी उसळत होत्या. त्यांना काव्यरूपात प्रकट होण्याची त्वरा होती. आणि या भावुक मनातून इतर अनेक स्तोत्रांपैकी एक चर्पटपंजारिकास्तोत्र– आपोआप त्यांच्या वाणीतून बाहेर पडले.

त्याचा इतिहास असा सांगतात की, आचार्यांचा मुक्काम काशीस असताना ते एकदा पहाटे स्नानाकरिता गंगेस निघाले. इतक्यात त्यांच्या कानी आवाज आला. मोठमोठ्याने घोकंपट्टी चालली होती. 'डुकृञ करणे, डुकृञ करणे' हे शब्द आचार्यांनी ऐकले. तो आवाज घोगरा, कर्कश व रूक्ष होता. त्या आवाजात वार्धक्याची छटा व्यक्त होत होती. कोणीतरी वृद्ध व्याकरण शास्त्राचा अभ्यास करण्याच्या उद्देशाने धातुपाठ घोकीत असल्याचे आचार्यांच्या लक्षात आले. ऐंशीच्या घरातील ते आजोबा व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून काय मिळवणार? आचार्यांचे अंत:करण कळवळले आणि त्यांनी त्यांना गोड उपदेश केला तोच उपदेश म्हणजे चर्पटपंजरिका. चर्पट म्हणजे खमंग, खुसखुशीत व पंजरी म्हणजे एक खाद्य.

त्यांत गेयता आहे. पदलालित्य, अनुप्रास, यमके आदि काव्य गुण आहेत. साधी, सरळ, सोपी ओघवती भाषा म्हणून अत्यंत सुंदर चालीचे हे स्तोत्र आजही कित्येकांच्या ओठावर आहे.

ते स्तोत्र म्हणताना, Poetry is the spontaneous overflow of Powerful feelings हे मनोमन पटते.

*दिनयामिन्यौ सायं प्रात:*
*शिशिरवसन्तौ पुनरायात: ।*
*काल: क्रीडति गच्छत्यायु:*
*तदपि न मुञ्चत्याशावायु: ।।*
*भज गोविन्दं...।।१२।।*

*भज गोविंदं भज गोविंदं भज गोविंदं मूढमते ।*
*प्राप्ते संनिहिते मरणे न हि नहि रक्षति डुकृञ करणे ।*

या काव्यपंक्तीमध्ये प्रथम सतत गतिमान असणाऱ्या निसर्गचक्राचे सुंदर वर्णन आहे. दिवसामागून रात्र धावते सकाळ संध्याकाळ! चित्रकार तो कोण तयाचा? दिवस–रात्र– महिने– वर्ष नित्यनेमाने येणारे ऋतू सारखा काळ चालला पुढे । माणसाच्या आयुष्याचा गेलेला क्षण परत येत नाही. आपले जीवन नश्वर क्षणभंगूर आहे. मृत्यू जे मानवी जीवनाचे अंतिम सत्य आहे, अटळ असे सत्य आहे तरी माणसाची आयुष्य जगण्याची हाव संपतच नाही. नको नको मना गुंतू मायाजाळी। काळ आला जवळी ग्रासावया– त्यावेळी आपले रक्षण कोणी करूच शकणार नाही. वाचवेना कोणी देशीचा चौधरी– सेजेची कामीण दूर राहे. असे असूनही जीव संसारात गुंग असतो. जो खरा रक्षणकर्ता श्रीपती यालाच विसरतो, आपल्या आप्तांच्या सुखासाठी अटाआटी करीत राहतो, जी फुकट असते. काय करावे वेळची नाही (नामस्मरणाला) ऐसे म्हणवूनी चुकविसी पाही । यमासी कैसा चुकविसी रे । हे माणूस विसरूनच जातो. म्हणून हे मूर्ख माणसा अरे भज गोविंदम् भज गोविंदम् – तू सर्व व्याकरणसूत्रे मुखोद्गत केलीस तरी ती तुझा मृत्यू टाळू शकणार नाही.

*अमोलिक जाते वय । आता तरी धरी सोय*
*असा काय तर देह येईल पुन्हा बा*
*पांडुरंग श्रीरंग भजो रे मना बा ।*
*अग्रे वन्हि: पृष्ठे भानु:*
*रात्रौ चुबुकसमर्पितजानु: ।*
*करतलभिक्षातरुतलवास:*
*तदपि न मुञ्चत्याशापाश: ।।*
*भज गोविन्दं ।।१६।।*

सूर्याच्या तळपत्या उन्हात यज्ञयागादी कर्मे करीत राहून तळहातावर भिक्षा घेऊन खाणारा झाडाखाली निवास करणारा एखादा माणूस मी वासना रहीत झालो असा अहंभाव बाळगत असेल तर तो खरा नाही. वनी गेला वनिता चिंतू लागला.

एक ब्राह्मण संन्यास घेऊन वनात गेला. राहाण्यास पर्णकुटी बांधली, दूध हवे म्हणून बकऱ्या पाळल्या, त्यांना खायला हवे म्हणून गवत वाढवले. आणि मग वासना आवरेनात म्हणून एका गरीब मुलीशी लग्न केले.

*नाम स्मरे निरंतर । ते जाणावे पुण्यशरीर ।*

महादोषांचे गिरिवर राम नामे नासती–

पण हे लक्षात कोण घेतो? जीवन जगण्याची हाव मृत्यूने गाठेपर्यंत संपत नाही. एक वृद्ध लाकूडतोड्या मोठी जड लाकडाची

मोळी घेऊन भर उन्हातून चालला होता, भर दुपारच्या कडक उन्हाने घामाने चिंब झाला. तहानेने व्याकूळ झाला आणि वैतागून म्हणाला, बा मरणा ये रे ये लौकर ये- । आणि खरेच मृत्यू समोर येऊन म्हणाला, 'चल त्याग कर शरीराचा' लाकूडतोड्या घाई घाई म्हणाला, 'छे छे मी आपले उगीचच तुला हाक मारली- मला मरायचं नाही. माझ्या मुलीचं लग्न झाले आहे पण मला अजून नातू पहायचाय- नातवाला नोकरी लागायची आहे. तदपि न मुञ्चति आशापाशः - हे आचार्यांचे सांगणे त्रिवार सत्य नाही काय? एकदा एक श्रीमंत माणूस शेवटचा श्वास घेण्याच्या स्थितीत असतो. वाचा गेलेली असते. सर्व आप्त जमलेले असतात. शोकाकुल असतात. त्या वृद्धाचे ओठ हलू लागतात. तो हाताने दाखवून म्हणतो, 'अरे गाढवांनो, वासरू केरसुणी खाते आहे तिकडे लक्ष द्या ना!' मरणशय्येवरही मोह सुटत नाही.

***नका धरू काही आस । नाम जपा श्वासोश्वास***
***पंचपदी भजन करा । रामनाम दृढ धरा***

पण हे लक्षात कोण घेतो?

***यावद्वित्तोपार्जनसक्तः***
***तावन्निजपरिवारो रक्तः।***
***पश्चात् धावति जर्जरदेहे ।।***
***कोऽपि न पृच्छति वार्तां गेहे ।।***
***भज गोविन्दं... ।।५।।***

जोपर्यंत कुटुंबाच्या सर्व गरजा पैसा मिळवून तुम्ही भागवत आहात तो पर्यंत मुले बाळे बायको नातलग तुमची प्रेमाने विचारपूस करतील. पण वृद्ध होऊन निरुपयोगी झालात की कोणी ढुंकूनही पहाणार नाही. अंधेरात पडलेला गोळा त्यांच्या संसारात अडगळ ठरतो. केव्हा मरतो याची वाट बघतात. सगे-सोयरे साथी सुखाचे नाही जगती कोणी कोणाचे. हे चिरंतन सत्य आचार्य आपणास सांगत आहेत, आजचे निर्माण होणारे वृद्धाश्रम याची सत्यता पटवतात. जोवरी आहे पैसा तोवरी या बसा हा जगाचा नियम आहे पण हे कळेपर्यंत उशीर झालेला असतो.

***जटिलो मुण्डी लुञ्चितकेशः***
***काषायाम्बरबहुकृतवेषः।***
***पश्यन्नपि न पश्यति मूढः***
***उदरनिमित्तं बहुकृतवेषः।।***
***भज गोविन्दं...।।१४।।***

काही उदरभरण होत नाही म्हणून असहाय्य माणूस चित्रविचित्र पोषाख करून लक्ष जाईल असे रूप धारण करतो. कधी पूर्ण गोटा तर कधी केस वाढवून भगवी वस्त्रे धारण करून आपण ध्यानमग्न असल्याचे नाटक करतो. इच्छा असते भिक्षा मिळावी. पण या त्रैलोक्यपती परमेश्वराला आळवावे हे मात्र सुचत नाही. देव हा फक्त भावाचा भुकेला आहे. ये यथा मां प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम्।

असे भगवंत सांगतात. मूठभर पोह्यासाठी कुणी का दिली सुवर्णनगरी कोणी- हे सुदाम्याच्या पोह्याचे उदाहरण प्रसिद्धच आहे.

***बालस्तावत्क्रीडासक्तः***
***तरुणस्तावत्तरुणीरक्तः।***
***वृद्धस्तावच्चिन्तामक्तः***
***परते ब्रह्मणि कोऽपि न लग्नः ।।***
***भज गोविन्दं...।।७।।***

बाल्य, तारुण्य, वृद्धावस्था- जीवन नाट्याचे हे तीन प्रवेश अटळ आहेत. यात आपण त्या त्या विशिष्ट गोष्टीमध्ये गुंग असतो. शैशव खेळण्यामध्ये, तारुण्यात- तरुणीच्या मागे आणि वृद्धावस्थेत उरते फक्त चिंता-चिंता पण ब्रह्मतत्त्वाचा बोध करून घेण्याची बुद्धी व त्यासाठी प्रयत्न याची आठवणही आपल्याला होत नाही, लौकिकाची चाड मोठी । परमार्थासी आडकाठी । सुटेल कैसी मगरमिठी । माझा भवभार हलका करा हो। मजवरी झडकरी करुणा करा - अशी सद्गुरूंची आणि भगवंताची प्रार्थना करायला हवी ना हेच आचार्यांचे म्हणणे आहे.

***पुनरपि जननं पुनरपि मरणं***
***पुनरपि जननीजठरे शयनम् ।***
***इह संसारे बहुदुस्तारे***
***कृपयाऽपारे पाहि मुरारे ।।***
***भज गोविन्दं... ।।२१।।***

आईच्या गर्भवासातील बालकाचे दुःख वर्णन करताना,

बहु हिंपुटी होईजे माय पोटी । नको रे मना यातना तेचि मोठी। निरोधे पचे कोंडिले- गर्भवासी । अधोमूख रे दुःख त्या बाळकासी।। पुन्हा जन्म पुन्हा मरण- पुन्हा जन्म हे जन्म मरणाचे चक्र संपणार केव्हा? या कठीण अशा संसारसागरातून वाचवण्यास फक्त श्रीहरी समर्थ आहेत, तू ओळखून घे.

साहिरा हे संत म्हणतात- अरे माणसा! संसार सुखाच्या मोहात अडकून आंधळा होऊ नकोस- साहिरा म्हणे समज उमज अंतरीचा ज्ञानदिवा मालवू नको रे । हरिभजनावीण काळ घालवू नको रे ।

***पुनरपि रजनी पुनरपि दिवसः पुनरपि पक्षः पुनरपि मासः।***
***पुनरप्ययनं पुनरपि वर्षम् तदपि न मुञ्चत्याशामर्षम् ।।***

विषयांचे सुख द्वाड । इथे वाटे बहुगोड । पुढे आहे अवघड यमयातना । पांडुरंग श्रीरंग भजो रे मना बा । रात्रंदिन करीसी मजा । केव्हा येईल यमराजा । घेऊन जाईल प्राण तुझा निजसदना- पांडुरंग

श्रीरंग भजो रे मना बा । आचार्यांचे सांगणे हेच आहे. पुन:पुन: ते आपल्या मनावर ठसवीत आहे.

संत तुकाराम महाराज म्हणतात हरिचरण दृढ धरण्याखेरीज दुसरा उपायच नाही. त्या सर्वात्मक सर्वेश्वराला सर्वार्थभावाने संपूर्ण शरणागति पत्करलीस तरच तुझ्या चौऱ्यांशी लक्ष योनीमध्ये फिरण्याचे फेरे चुकतील हे ध्यानात ठेव.

***सत्सङ्गत्वे निस्सङ्गत्वं***
***निस्सङ्गत्वे निर्मोहत्वम् ।***
***निर्मोहत्वे निश्चलतत्त्वं***
***निश्चलतत्त्वे जीवन्मुक्तिः।।***
***भज गोविन्दं...।।९।।***

***वयसि गते कः कामविकारः***
***शुष्के नीरे कः कासारः ।***
***क्षीणे वित्ते कः परिवारो***
***ज्ञाते तत्त्वे कः संसारः ।।***
***भज गोविन्दं... ।।१०।।***

***मा कुरु धनजनयौवनगर्वं***
***हरति निमेषात्कालः सर्वम् ।***
***मायामयमिदमखिलं बुद्ध्वा***
***ब्रह्मपदं त्वं प्रविश विदित्वा ।।***
***भज गोविन्दं... ।।११।।***

या मध्ये परत तोच विचार सांगितलेला आहे. रात्र, दिवस, पक्ष, महिना, वर्ष सतत हे सृष्टिचक्र चालूच राहणार आहे. ग्रीष्म टाकीतो जाळूनी धरती । मुके जलाशय मनी तगमगती । मेघ ओतितो त्यांच्यावरती फिरूनी अमृत घडे, सारखा काळ चालला पुढे.

पद्य नं. १० मध्ये योग्य गोष्टीची योग्य वेळ निघून गेल्यावर पश्चाताप करणे योग्यही नाही. न हि कूपखननं युक्तं । अग्निना प्रदीप्ते गृहे । संपूर्ण द्रव्य गेल्यावर, परिवाराचा काय उपयोग, पाणी आटल्यावर सरोवराचा काय उपयोग, वय निघून गेल्यावर विषयोपभोग कोठून मिळणार? तसेच जर तुम्ही योग्य काळी, योग्य मार्गाने ब्रह्मणि लीन झालात तर मग– हा दृश्याभासरूपी संसार उरणारच नाही. एखाद्या तज्ञ शिक्षकाने अज्ञ बालकाला समजावून द्यावे तशी आचार्यांची भाषा आणि सहज सुंदर दृष्टान्तशैली आहे.

पद्य नं. ११ मध्ये स्त्री सौंदर्याचा मोह धरून त्यात गुंगणे व्यर्थ आहे. कारण ती स्त्री आणि तू दोघेही नश्वर आहात.

***घटका जाती पळे जाती तास वाजे ठणाणा ।***
***आयुष्याचा नाश होतो राम कारे म्हणाना ।***

या मनात उठणाऱ्या षड्विकारांवर पुन:पुन: तू विचार कर. अरे हा मांसाचा गोळा आहे रे. विनाशी आहे. मग त्याचा मोह का धरावा.

***कस्त्वं कोऽहं कुत आयातः***
***का मे जननी को मे तातः***
***इति परिभावय सर्वमसारं***
***विश्वं त्यक्त्वा स्वप्नविचारम् ।।***
***भज गोविन्दं.... ।।२३।।***

तू कोण? मी कोण? कोठून आलो? कोठे जाणार? काहीच माहीत नाही. सारे काही अज्ञान. या स्वप्नवत् संसाराचा मोह सोडून शाश्वत तत्त्वाचा विचार कर. श्रीपतेः पदयुगं स्मरणीयम् – सार सार को गही रहे चोथा देही उडाय ।

***गेयं गीतानामसहस्रं***
***ध्येयं श्रीपतिरूपमजस्रम् ।***
***नेयं सज्जनसङ्गे चित्तं***
***देयं दीनजनाय च वित्तम् ।।***
***भज गोविन्दं... ।।२७।।***

परमेश्वराचे हजारनाम स्मरण कर. विश्वात्मक विश्वेश्वराचे श्रीपतीरूपम् स्मरण कर. दीन लोकांना दान देत सज्जनसंगतीमध्ये रहा. सत्संगात् भवतिहि साधुता खलानाम् – परिसाच्या संगे लोह बिघडले. लोह बिघडले– लोह बिघडले, परीसची झाले.

***सुखतः क्रियते रामाभोगः***
***पश्चाद्धन्त शरीरे रोगः ।***
***यद्यपि लोके मरणं शरणं***
***तदपि न मुञ्चति पापाचरणम् ।।***
***भज गोविन्दं...।।२८।।***

***रथ्याचर्पटविरचितकन्थः***
***पुण्यापुण्यविवर्जितपन्थः।***
***योगी योगनियोजितचित्तो***
***रमते बालोन्मत्तवदेवं ।।***
***भज गोविन्दं....।।२९।।***

जोपर्यंत देहात जीव आहे, तोपर्यंत सर्व कुशल विचारतात. प्राण गेल्यावर प्रत्यक्ष पत्नीसुद्धा प्रेताला घाबरते. आचार्यांचे हे म्हणणे आपल्या प्रत्यक्षात अनुभवास येते. विषयोपभोग घेता घेता शरीर थकते. रोगग्रस्त होते. मृत्यू हे अटळ अंतिम सत्य असूनही तरी सुद्धा आपली संसाराची आसक्ती सुटत नाही. जीवन जगता जगता आपण कधीही नष्ट होऊ शकतो. हे सर्वच जग नाशिवंत आहे मग शोक करण्यात काय अर्थ आहे?

***कुरुते गङ्गासागरगमनं***
***व्रतपरिपालनमथवा दानम् ।***

*ज्ञानविहीनः सर्वमतेन*

*भजति न मुक्तिः जन्मशतेन ।।*

*भज गोविन्दं...।।१७।।*

गंगा, यमुना– तीर्थयात्रा करा, विविध व्रतांचे पालन करा. यथाशक्ती दान करा. पण सत्य वस्तु अर्थात् ब्रह्माचे ज्ञान झाल्याखेरीज तुम्हाला कधीही यथार्थ ज्ञान होणार नाही. आणि मग संसारपाशातून मुक्ती कशी मिळणार?

अखेर आचार्यांच्या स्तोत्राचे सार अत्यंत थोडक्यात

*कस्यचित् किमपि नो हरणीयम् ।*

*मर्मवाक्यमपि नोच्चरणीयम्*

*श्रीपतेः पदयुगं स्मरणीयम् ।*

*लीलया भवजलं तरणीयम् ।*

शेवटी जगद्‌गुरू आद्य शंकराचार्यांच्या चरणी नम्र होऊन मी म्हणते,

*माझे मन सदा तव पादपंकजी राहो ।*

*मुक्तीमार्ग दावूनी तुम्ही धन्य मज केले हो ।*

**– सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे**

१/१९ ब, श्रीमान सोसायटी, गजानन महाराज मठाच्या

पुढे, कर्वेनगर, पुणे – ४११०५२.

# साधनापञ्चकम् किंवा साधनापंचकम्

**श्री. सुनील चिंचोलकर**

*बी.कॉम., प्रवचनकार, १२ वर्षे सज्जनगड येथे व्यवस्थापन, ३२ पुस्तके प्रकाशित.
शिवचरित्र, श्रीज्ञानेश्वरी, श्रीदासबोध, श्रीगीता इत्यादींवर प्रवचने. समर्थ व्यासपीठाचा समर्थ पुरस्कार,
समर्थ संस्थानचा पुरस्कार, ओंकार ट्रस्टचा 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्कार इत्यादींनी सन्मानित.*

साधनापंचकम् हे पूज्यपाद शंकराचार्यांचे चिमुकले स्तोत्र आहे. याला मी साधकाचा चाळीस कलमी कार्यक्रम म्हणतो. या स्तोत्राचे केवळ पाच श्लोक आहेत. प्रत्येक श्लोकात शंकराचार्यांनी आठ साधना सांगितल्या आहेत. पाचही श्लोक मिळून साधकाला चाळीस प्रकारच्या सूचना प्राप्त होतात. हे सर्व मार्गदर्शन गृहस्थाश्रमी भक्त डोळ्यासमोर ठेवून केलेले आहे. याविषयावर श्रुतिसागर आश्रमाचे परमपूज्य स्वामी स्वरूपानंद सरस्वती यांचा 'साधनापंचकम्' नावाचा मौलिक ग्रंथ आहे. हा लेख लिहिताना या ग्रंथाचा फार उपयोग झाला. साधकांनी हा ग्रंथ मिळवावा, संग्रही ठेवावा आणि अनेकदा वाचन करून त्याचे मनन, चिंतन करावे. ईश्वरप्राप्तीसाठी आपण नेमके काय केले पाहिजे याचे सुंदर मार्गदर्शन क्रमश: या पाच श्लोकांचे संक्षिप्त चिंतन करताना होईल.

***वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्ठीयताम्
तेनेशस्य विधीयतामपचिति: काम्ये मतिस्त्यज्यताम्।
पापौघ: परिधूयतां भवसुखे दोषोनुसंधीयताम्
आत्मेच्छा व्यवसीयतां निजगृहात्तूर्णं विनिर्गम्यताम् ।।१।।***

(१) साधकाने वेदांचे नियमितपणे अध्ययन करावे. (२) वेदात सांगितलेल्या कर्माचे अनुष्ठान करावे. (३) त्या कर्मानेच भगवंताची विधिवत् पूजा करावी. (४) कर्मातील सकामता टाकून द्यावी. (५) सर्व पापे धुवून टाकावीत. (६) संसारातील क्षणिक सुखातून निर्माण होणाऱ्या दोषांचे भान ठेवावे. (७) आत्मप्राप्तीची दृढ इच्छा ठेवावी. (८) मनाने घराचा त्याग करावा.

शास्त्रानुसार सर्वांना वेदांचा अधिकार नाही तेव्हा येथे वेद हा शब्द व्यापक अर्थाने म्हणजे संत वाङ्मय या अर्थाने घ्यावा लागेल. गोंदवलेकर महाराज म्हणत की ज्ञानेश्वरी, दासबोध, नाथांचे भागवत आणि तुकोबांचा गाथा हे मराठी भाषेचे चार वेद आहेत. साधकाने यातील कोणत्याही एका ग्रंथाचे नियमितपणे अध्ययन म्हणजे वाचन, मनन आणि चिंतन करावे. या चिंतनातूनच आपल्याला विहित कर्माचा बोध होईल. मनात आले म्हणून कोणतेही कर्म करू नये. शास्त्राची आज्ञा आहे किंवा संतांनी सांगितले आहे म्हणून आपले विहित कर्म करावे. माऊलींच्या भाषेत सांगायचे झाल्यास 'संतांचे संगती मनोमार्ग गती । आकळावा श्रीपती येणे पंथे ।' कारण 'मनोमार्गे गेला तो येथे मुकला।' समर्थांचीही आज्ञा आहे की 'वेदविरहित टवाळी । करोचि नये ।'

हे विहित कर्म म्हणजेच ईश्वराचे सर्वश्रेष्ठ पूजन होय. नारदांनी भक्तिसूत्रात आपले प्रत्येक कर्म ईश्वराला अर्पण करायला सांगितले आहे. म्हणून गीतेने फलाशेचा त्याग करायला सांगितला. कर्म बंधनकारक नसते, फलाशा बंधनकारक असते. सकामतेमुळेच कर्मातून पाप आणि पुण्य जन्माला येते. निष्कामकर्माने पाप-पुण्याचा संचय होणार नाही आणि कर्म ईश्वराला अर्पण केल्यामुळे पूर्वीची काही पापे घडली असतील तर ती धुवून निघतील. गृहस्थाश्रमी माणसाला संसारात इच्छेने अथवा अनिच्छेने विषय सेवन करावे लागते. हे विषय सेवन कसे दु:ख पर्यवसानी आहे किंवा बंधनात टाकणारे आहे याची जाणीव ठेवल्यास सदोष विषयसेवन घडणार नाही. एकदा विषयातील दोष लक्षात आले म्हणजे आपोआपच मन आत्मप्राप्तीची इच्छा बाळगेल. सूर्यफूल जसे सूर्याभिमुख असते तसे आपले मन भगवंताभिमुख राहील. चित्ताच्या अशा अवस्थेत आपण संसारात असलो तरी मनाने संसाराचा त्याग केलेला असेल. ज्यांना शक्य असेल त्यांनी खरोखरच गृहत्याग करावा पण वर्तमान परिस्थितीच्या बंधनामुळे तसे शक्य नसल्यास निदान मनाने तरी संसाराचा त्याग करावा.

***संग: सत्सु विधीयतां भगवतो भक्तिर्दृढाऽऽधीयताम् ।
शान्त्यादि: परिचीयतां दृढतरं कर्माशु संत्यज्यताम् ।
सद्विद्वानुपसेव्यतामनुदिनं तत्पादुके सेव्यताम् ।
ब्रम्हैकाक्षरमर्थ्यतां श्रुतिशिरोवाक्यं समाकर्ण्यताम् ।।२।।***

(१) साधकाने आपले मन सत्संगात ठेवावे. (२) भगवंताची भक्ती दृढ करावी. (३) मन शांत ठेवावे. (४) हळूहळू कर्मनिवृत्ती स्वीकारावी. (५) त्यासाठी सद्‌गुरुची प्राप्ती करून घ्यावी.

(६) मनोभावे सद्गुरूंची रोज सेवा करावी. (७) एकाक्षर ब्रह्माची प्रार्थना करावी. (८) सद्गुरू श्रुतीचा भावार्थ सांगतील तो मनापासून ग्रहण करावा.

सत्संग हे सर्व परमार्थाचे रहस्य आहे. समर्थ रामदासांच्या मते परमार्थ अत्यंत सोपा आहे. केवळ सांसरिक माणसाच्या संगतीने आपल्याला तो दुर्गम झाला आहे. विषयी लोकांच्या सहवासात भगवंतावरील आपली भक्ती विचलित होण्याचा धोका असतो. मात्र ज्यांनी आपले सगळे जीवन भगवंताला अर्पण केले आहे अशा सद्गुरूंच्या सहवासात भगवत्प्राप्तीचा आपला निर्धार दृढ होतो. इंद्रियांची वखवख थांबते. राग, द्वेषाचा धुमाकूळ बंद होऊन मन शांत होते. रजोगुण माणसाला क्रियाशील बनवतो. सत्पुरुषांच्या सहवासात सत्त्वगुण उदित झाल्याने अनावश्यक कर्मे आपोआप टळतात.

साधक जसजसा परमार्थात मुरत जाईल तसतशी कर्माची उर्मी कमी होत जाईल. अमुक करायचे, तमुक करायचे हे नवनवीन संकल्प संपायला हवेत. समर्थ विचारतात, 'कर्मविगळे न व्हावे । तरी देवासी कासया भजावे।' ही अवस्था प्राप्त करून घेण्यासाठी सद्गुरूंची प्राप्ती आणि सद्गुरूंची सेवा आवश्यक आहे. साधकाला ज्ञानाची प्राप्ती केवळ ग्रंथांच्या वाचनाने होणार नाही. ग्रंथाध्ययनाने परोक्ष ज्ञान होईल पण सद्गुरूंच्या सेवेने अपरोक्ष अनुभूतीची प्राप्ती होईल. सत्पुरुष ब्रह्मविद्या देताना त्या शिष्याला तपासून घेतील. सेवेची पुण्याई असेल तरच तो अधिकार प्राप्त होईल. म्हणून शास्त्रात शिष्याने सद्गुरूजवळ ब्रह्मविद्येची याचना करावी लागते. संन्यास सुद्धा मागावा लागतो. संतांनी आपल्या नातलगांना ब्रह्मविद्येचा उपदेश केला नाही. शिष्याचा अधिकार पाहून सद्गुरु त्याला जीव–ब्रह्म ऐक्याचा मंत्र सांगतील किंवा श्रुतिवाक्यांचा बोध करतील. साधकाने ते अत्यंत काळजीपूर्वक आत्मसात करावे.

***वाक्यार्थश्च विचार्यतां श्रुतिशिर: पक्ष:समाश्रीयताम्***
***दुस्तर्कात्सुविरम्यतां श्रुतिमतस्तर्कोऽनुसंधीयताम्।***
***ब्रह्मास्मीति विभाव्यतामहरहर्गर्व: परित्यज्यताम्।***
***देहेऽहंमतिरुज्झ्यतां बुधजनैर्वादस्समुत्सृज्यताम् ।।३।।***

(१) सद्गुरुंनी सांगितलेल्या महावाक्याचा विचार करावा. (२) अद्वैत ग्रंथाचा अभिमानाने कैवार घ्यावा. (३) वेदांत विरोधी दुष्ट तर्कापासून दूर रहावे. (४) साधकाने श्रुतिसंमत तर्काचे अनुसंधान करावे. (५) मी देह नसून ब्रह्म आहे या वृत्तीचा अभ्यास करावा. (६) अहंकारजन्य 'मी मी'चे तुणतुणे बंद करावे. (७) देहबुद्धीचा पूर्ण त्याग करावा. (८) ज्ञानी लोकांबरोबर कधीही वितंडवाद घालू नये.

पूज्यपाद शंकराचार्य वेदांती असल्यामुळे या श्लोकात त्यांनी ज्ञानमार्गी साधकाला उपदेश केला आहे. अशा शिष्याला सद्गुरु महावाक्याचा उपदेश करतात. महावाक्याचा नुसता जप करायचा नसतो तर त्याचे चिंतन करायचे असते. आपण ब्रह्मच कसे आहोत याचा विचार करायचा असतो. त्यासाठी वेगवेगळ्या वेदांतग्रंथांचा आश्रय घ्यावा लागतो. उदाहरणार्थ– ब्रह्मसूत्र, उपनिषदे, भगवद्गीता वगैरे. प्राकृतात दासबोध, ज्ञानेश्वरी हे ग्रंथ देखील श्रुतिवाक्याला पूरकच आहेत. श्रुतिवाक्याचा संकेत सांगताना आचार्य म्हणतात,

***'श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभि: ।***
***ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापर: ।।'***

भोगवादी माणसे जग कसे खरे आहे यासंबंधी तर्क–कुतर्क करीत राहतात. साधकाने अशा ग्रंथांचा आश्रय अजिबात घेऊ नये. ज्या तर्काने ब्रह्मसत्यत्व सिद्ध होईल असा तर्क करायला हरकत नाही. साधकाच्या मनात देहबुद्धीमुळे संदेह निर्माण होतील. पण श्रद्धा आणि चिकित्सा यातून एकाची निवड करण्याची पाळी आल्यास त्याने चिकित्सेचा त्याग करावा आणि श्रद्धेचा आश्रय घ्यावा. 'अहं ब्रह्मास्मि' याचा बोध मनावर ठसावा म्हणून सोऽहं साधना सांगितली आहे. मी आनंदस्वरूप आहे, मी ज्ञानस्वरूप आहे, मी नित्यशुद्ध आहे, मी मुक्त आहे हे अनुसंधान चालेल. समर्थ म्हणतात, 'सत्याचा जो अभिमान । तो जाणावा निरभिमान।' अहं ब्रह्मास्मि मधील अहं अहंकाराचा नाही. आप्त, स्वकीय, घरदार, संपत्ती, जात, वर्ण, विद्वत्ता या संबंधीचा अहं हा गर्व वाढविणारा असतो. अभिमान असावा, गर्व नसावा. म्हणून साधकाने पूज्यपाद शंकराचार्यांनी निर्वाणषटकात सांगितल्याप्रमाणे देह, मन, बुद्धी, प्राण याबद्दलचे ममत्व टाकून द्यावे. ज्ञानी पुरुषाशी कधीही वितंडवाद घालू नये. संत कधी वादात पडत नाहीत. नारदाने सुद्धा भक्तिसूत्रात 'वादो नावलम्ब्यो:' असे सांगितले आहे.

***क्षुद्व्याधिश्च चिकित्स्यतामनुदिनं भिक्षौषधं भुज्यताम् ।***
***स्वाद्वन्नं न तु याच्यतां विधिवशात्प्राप्तेन संतुष्यताम् ।***
***औदासीन्यमभीप्स्यतां जनकृपा नैष्ठुर्यमुत्सृज्यताम् ।***
***शीतोष्णादि विषह्यतां न तु वृथा वाक्यं समुच्चार्यताम् ।।४।।***

(१) भूक हा एक आजार आहे हे लक्षात घ्यावे. (२) औषधाप्रमाणे रोज परिमित अन्न सेवन करावे. (३) स्वादिष्ट अन्नाची अपेक्षा बाळगू नये. (४) प्रारब्धानुसार जे ताटात वाढले असेल त्यात संतुष्टता असावी. (५) व्यवहारात तटस्थ वृत्तीने वागावे. (६) लोकांवर अवलंबूनही राहू नये आणि त्यांच्याशी निष्ठुरही होऊ नये. (७) थंडी आणि उकाडा ही द्वंद्वे सहन करावीत. (८) निरर्थक बडबड करू नये.

समर्थांनी 'आपण यथेष्ट जेवणे' ही मौलिक सूचना दिली. माणसे यथेच्छ जेवतात. आहार सात्त्विक आणि परिमित असावा.

खाण्यासाठी जगत आहोत की जगण्यासाठी खात आहोत याच्या सीमारेषा लक्षात ठेवाव्यात. साधकाने चवीने कधी भोजन करू नये. 'इंद्रिये नेणता भोगिजे' असे माऊली म्हणते. याचा अर्थ भोजन करताना इंद्रिये उत्तेजित होऊ नयेत. प्रकृतीच्या नियमानुसार जिभेवर लाळ तयार होऊ देत पण माणूस आणि पशू यांच्या खाण्याच्या पद्धतीत फरक असावा. प्रारब्धानुसार ताटात बासुंदी वाढली असेल तर घ्यावी पण बासुंदी खूप आवडली आहे आणि आणखी वाढावी अशी वासना मनात नसावी.

समाजात वावरताना आपली भूमिका नेहमी उदासीन किंवा तटस्थ असावी. साधकाने समाजाच्या प्रवाहात वहात जाऊ नये. 'माझा याच्याशी काहीही संबंध नाही' अशा उदासीनतेने जगात वावरावे. कोणत्याही घटनेचे मनावर खोलवर परिणाम होऊ देऊ नयेत. कोणाची बाजूही घेऊ नये आणि कोणाला विरोधही करू नये. साधकाला आत्मज्ञानाची साधना समाजात राहूनच करावी लागते तेव्हा लोकांशी फार निष्ठुर वागूनही चालत नाही. पण त्याचबरोबर लोकांकडून कशाची याचनाही करू नये. भगवद्गीतेच्या भाषेत सांगायचे झाल्यास,

*'अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।*
*निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ।।'*

म्हणून साधकाने थंडी, वारा, ऊन, पाऊस हे सारे सहन करावे असे सांगितले. आषाढी वारी म्हणजे तितिक्षेचा प्रशिक्षण वर्गच आहे. तिथे मुद्दाम संकटे ओढवून घ्यावी लागत नाहीत. प्रतिकूल परिस्थितीत अविचल राहण्याची साधना आपोआप घडते. अन्य वारकरी आपल्या सारखेच समदुःखी असल्यामुळे सहनशक्ती वाढायला मदत होते. श्लोकाच्या प्रारंभी आहाराच्या संयमाद्वारे जिभेवरील नियंत्रण सांगितले तर श्लोकाच्या शेवटी विनाकारण बोलू नये असे सांगून वाणीचा संयम सांगितला. ज्ञानदेवांचे बोलणे वाग्यज्ञ ठरले. गीतेच्या सतराव्या अध्यायात वाणीचे तप सांगताना भगवंत म्हणतात,

*अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।*
*स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ।।*

साधक बोलण्याद्वारे स्वतःला व्यक्त करीत असतो. म्हणून वाणीचा संयम फार महत्त्वाचा आहे.

***एकान्ते सुखमास्यतां परतरे चेतस्समाधीयताम्***
***पूर्णात्मा सुसमीक्ष्यतां जगदिदं तद्बाधितं दृश्यताम् ।***
***प्राक्कर्म प्रविलाप्यतां चितिबलान्नाप्युत्तरैः श्लिष्यताम्***
***प्रारब्धं त्विह भुज्यतामथ परब्रह्माऽऽत्मना स्थीयताम् ।।५।।***

(१) साधकाने एकांतात आत्मसुख भोगावे. (२) त्यासाठी चित्त आत्मस्वरूपामध्ये स्थिर करावे. (३) पूर्णत्वाचा साक्षात्कार होईपर्यंत आत्मचिंतन करीत रहावे. (४) भोवतालचे जग म्हणजे केवळ स्वप्न आहे असे समजावे. (५) ज्ञानाच्या बळावर भूतकाळातील शुभाशुभ कर्मे भस्मसात करावीत. (६) ज्ञानोत्तर कर्माचे बंधन तोडून टाकावे. (७) प्रारब्धानुसार आपल्या वाट्याला येणारी सुख-दुःखे शांतपणे भोगून संपवावीत. (८) मन परब्रह्मात स्थिर ठेवावे.

साधकाच्या जीवनात एकांताचे असाधारण महत्त्व आहे. सतत सांसारिक लोकांत मिसळल्याने चित्त मलिन होते. म्हणून सर्व संतांनी एकांतात साधना केली. एकान्त सुद्धा पचनी पडावा लागतो. एकांतात मन भूत-भविष्यात भरकटू शकते. म्हणून ते प्रयत्नपूर्वक आत्मस्वरूपावर ठेवावे लागते. मन शांत आणि स्थिर करण्याची ही प्रक्रिया आत्मसाक्षात्कार होईपर्यंत चालू ठेवावी लागते. मनाचे जगाचे आकर्षण जसजसे कमी होईल तसतसे ते आत्मस्वरूपावर स्थिर होईल. नारदांनी अशा भक्ताचे वर्णन 'न तेषु रमते बुधः' असे केले आहे.

आपण ब्रह्म असून भोवतालचे जग ही केवळ माया आहे. हे ज्ञान जसजसे दृढ होईल तसतसा आपला भूतकाळ संपुष्टात येईल. कारण ब्रह्माला भूतकाळ नाही अथवा भविष्यकाळ नाही. वर्तमानात जी कर्मे आपण ब्रह्मानुसंधानात करू त्यातून बंधन निर्माण होणार नाही. अशावेळी प्रारब्धानुसार जे सुख अथवा दुःख आपल्या वाट्याला येईल ते भोगताना मन विचलित होणार नाही. शरीर सुख-दुःख भोगत असेल आणि मन परब्रह्म चिंतनात लीन असेल. असा ज्ञानी मनुष्य संसारात कमलपत्रासारखा असतो. तो साक्षी भावाने जीव आणि जगत् यांच्याकडे पहात राहतो.

या पाच श्लोकातील चाळीस सूत्रात शंकराचार्यांनी साधक जीवनाचे मर्मच सांगितले आहे. साधकाने अंतर्मुख असावे बहिर्मुख नसावे. समर्थ म्हणतात,

***'अंतर्निष्ठ तितुके तरले । अंतर्भ्रष्ट तितुके बुडाले ।***
***बाह्याकारे भरंगळले । लोकाचारे ।।'***

भगवंत आपल्या आतच आहे. त्याला शोधण्यासाठी अन्यत्र भटकायला नको. ही अंतर्यात्रा कशी साधावी याचे चाळीस नियम शंकराचार्यांनी सांगितले. या प्रकरणाला 'उपदेशपंचक' असे देखील म्हणतात. ज्यांना हा विषय विस्तारपूर्वक समजावून घ्यावयाचा आहे, त्यांनी परमपूज्य स्वामी स्वरूपानंदांचे विवेचन अवश्य वाचावे. आणि त्यानुसार आपल्या जीवनाला आकार देऊन धन्य व्हावे.

**- सुनील चिंचोलकर**
अजिंक्यनगर, बी विंग, हिंगणे खुर्द, पुणे ४११०५१.
फोन नं. : २४३४८०७०

# 'सौंदर्य लहरी' या महान काव्याचे अध्वर्यु आद्य-शंकराचार्य

**ज्योतिर्भास्कर/ज्योतिर्भूषण पंडित हिंगे**

*निवृत्त सरकारी कर्मचारी, साहित्यविशारद, ज्योतिषविशारद, ज्योतिषपंडित, ज्योतिषभास्कर, होराकमलविशारद व ज्योतिषमहामहोपाध्याय (भारत) सामाजिक*

जगात आज अनेक धर्म विद्यमान आहेत. त्यांना आपण हिंदुधर्म, झरथुष्ट्रीधर्म, जैनधर्म, ज्यूधर्म, बुद्धधर्म, ख्रिश्चनधर्म, मुस्लीमधर्म व शीखधर्म या विविध नावाने संबोधतो. हे सर्व धर्म जगातील निरनिराळ्या देशात, भिन्न भिन्न काळी व वेगवेगळ्या श्रेष्ठ नररत्नांनीच- स्थापन केलेले आहेत. हिंदुधर्म केव्हा, कोणी व कोठे स्थापन केला याची विश्वसनीय अशी माहिती आपणास उपलब्ध नाही. तो व्यासांनी स्थापला असे हिंदुलोक म्हणतात. व्यास ही खरोखरी गादी आहे, त्या गादीवर जो सत्पुरुष अलीकडे बसलेला होता त्याला 'कृष्ण-द्वैपायन' असे नाव आहे, त्याने हिंदुधर्म स्थापला असल्यास तो कोठे स्थापला व किती हजार वर्षांपूर्वी स्थापन केला ते नक्की सांगता येणे आज शक्य नाही. हिंदुधर्म हा फार प्राचीन धर्म आहे. शिवाय ऐतिहासिक काळात त्याचे मूळ सापडत नाही एवढेच आपणास म्हणता येईल.

**हे जगत् सर्व ब्रह्म आहे.**

ईश्वर अस्तित्त्वात असून तो एकच आहे- याबाबत हिंदुधर्माचे बाबतीत ते म्हणतात, 'सदेव सौम्य इदमग्र आसीत एकमेवाद्वितीयम् (छांदोग्य ६, २, १ म्हणजे पूर्वी सत् होते, ते एक होते व त्याच्यासारखे दुसरे काहीच नव्हते) (२) एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति- (ऋग्वेद मंडळ पहिले १६४, ४६, म्हणजे ब्रह्म एक आहे, शहाणे लोक त्याला मात्र निरनिराळी नावे देतात. ईश्वराचे स्वरूप त्रिविध आहे, जनार्दन रूपी एकच ईश्वर- निर्माणकर्ता, पालनकर्ता व संहारकर्ता या त्रयींची ब्रह्मा, विष्णू, महेश अशी तीन रूपे घेऊन प्रकट होतो. निर्मिती, पालन व संहार याचे कारण तो आहे. (विष्णु पुराण १, २, ६२)- (२) हे जगत् सर्व ब्रह्म आहे, ते जन्मते- वाढते, व लय पावते. (छांदोग्य ३, १४, १- तज्जलानिति असे तेथे म्हटले आहे त्याचा अर्थ जायते, लीयते, अनिति असा आहे.) 'ममैवांशो जीवलोके जीवभूत: सनातन:।' (भगवद्गीता १५,७)

म्हणजे ईश्वराचा एक- अंश चिरकाल टिकणारा जीव बनून जीवसृष्टी मध्ये राहत असतो. (२) 'अंगुष्ठ मात्र:- पुरुषोन्तरात्मा सदा जनानां ह्रदये संनिविष्ट: ।' (श्वेताश्वतर उपनिषद ३, १३, म्हणजे हा- अंगुष्ठमात्र पुरुष जीव किंवा अंतरात्मा- बनून जनांच्या ह्रदयात सदा राहतो.

**अवतार म्हणजे काय?**

प्राकृत मानवाच्या पायरीपासून पुष्कळ प्रगती करून जी माणसे अधिकाधिक प्रमाणात ईश्वरासमान झाली त्यांना हिंदुधर्मात अवतार, ऋषि, देव वगैरे नांवे देण्यात येतात. राम, कृष्ण, गौतमबुद्ध वगैरेंना हिंदुधर्माने अवतारी पुरुष असे मानले आहे. सर्व धर्मात असले श्रेष्ठ पुरुष झालेले आहेत. (१) 'महर्षय: सप्त, पूर्वे चत्त्वार: मनवस्तथा । मद्भावा मानसा जाता: । (भगवद्गीता १०,६ म्हणजे सात महर्षि, पूर्वीचे चार कुमार, तसेच मनु हे मनाने माझ्यासारखे झाले आहेत.)

(२) बहुनां जन्मनामन्ते ज्ञानवानू मां प्रपद्यते ।- (भगवद्गीता ७,१९, म्हणजे पुष्कळ जन्म घेतल्यावर शेवटी माणूस ज्ञानी होऊन माझ्याप्रत म्हणजेच- ईश्वराप्रत येतो.) असे हिंदुधर्म संरक्षक आद्य- शंकराचार्य, ज्यांनी श्रीत्रिपुरसुंदरी ललिता देवीचे सखोल वर्णन करणारे 'सौंदर्य लहरी' हे महान काव्य इ.स. ८०० चे सुमारास, (श्री विद्येचे उपासक शंकर भगवत्पाद, म्हणजेच आद्यशंकराचार्य) लिहिले. त्यांची जन्मलग्न कुंडली या बाबत आपणास काही दाखवून देत आहे काय? याबाबतचे सविस्तर स्पष्टीकरणात्मक विवेचन या लेखात करण्याचा छोटासा प्रयत्न आहे.

**फलज्योतिषशास्त्र व परमार्थ विचार**

फलज्योतिष शास्त्रात चार त्रिकोणांचा विचार पुढे येतो, ते असे १) धर्म, २) अर्थ, ३) काम, ४) मोक्ष हे चारही त्रिकोण प्रथम, पंचम, नवम तसेच धन, षष्ठ, दशम, तसेच तृतीय, सप्तम, एकादश आणि मोक्ष त्रिकोणात- चतुर्थ, अष्टम आणि व्यय स्थाने येतात. चार त्रिकोणांपैकी धर्म त्रिकोणाला जास्त महत्त्व आहे. त्याचे मुख्य कारण म्हणजे हा त्रिकोण मात्र- प्रथम, पंचम आणि नवम् स्थानापासून बनतो. जन्मकुंडलीतील पंचमस्थान, त्यातील ग्रह तसेच त्या स्थानाचा स्वामीग्रह, यांचा परमार्थातील- उपासना, जपजाप्य, आन्हिक नित्योपासना या सर्व गोष्टींचा जवळचा संबंध असतो, कारण पंचम स्थानावरून श्रद्धा, भक्ती, उपासना यांचा विचार होतो. परमार्थ, भक्ती यांचा कारक ग्रह शुक्र तसेच भक्ती, तत्त्वज्ञान देणारा गुरू आणि

वैराग्यसंपन्न करणारे शनी, केतू हे परमार्थात पूर्णता देणारे आहेत.

**मोक्षप्राप्ती देणारे विशिष्ट ग्रहयोग**

पंचमस्थानी चंद्र, बुध, गुरू, शुक्र असताना नित्योपासना नामस्मरण यांच्या दृष्टीने मात्र उत्तम स्थानप्राप्ती, पंचमस्थानातील शुभग्रहसंबंध अध्यात्मास उत्तम तर महातपासाठी केतू फलदायी होतो. मंगळ, शुक्र, गुरू हे स्वराशीत असतील, रवि, चंद्र, बुध यांचे मात्र हर्षल, नेपच्यून, प्लुटो बरोबर होणारे शुभयोग- परमार्थात प्रगती देतात. केतू पाच, नऊ व बारा स्थानी असून त्यावर गुरू दृष्टी असता- अध्यात्मविद्येची प्राप्ती होते. पंचम आणि व्यय स्थानातून होणारे योग ईश्वरभक्तीची ओढ देतात. गुरू- शनी परस्पर दृष्टियोग अध्यात्म देवाण घेवाणास उत्तम. एक, पांच, नऊ आणि चार, आठ, बारा स्थाने अध्यात्म प्रगतीस- उत्तमच, गुरू शनी बरोबर केतू आवश्यकच! आत्माकारक रवि, मनकारक चंद्र, बुद्धिकारक बुध, उत्साह शक्तिकारक मंगळ, तपाचरण साथ तसेच पंचमावरून धर्म, मंत्रशास्त्र प्रगती, नवमस्थान धार्मिक आचार, दशमावरून कृती, तपाचरण तर व्ययस्थानावरून परलोक प्राप्ती, मोक्ष व ईश्वरोपासना पाहिली जाते. मोक्षप्राप्तीसाठी गुरू ग्रह पाया असला तरी कळसापर्यंत जाण्यास शनीची आवश्यकता असते.

**आद्य शंकराचार्यांची कुंडली**

ज्यांच्याकडे अध्यात्मातील अगाध ज्ञान होते, अलौकिक बुद्धिमत्ता होती, कवित्त्व, रसिकत्त्व, तसेच असाधारण वाक्यतत्त्व- प्रगाढ पांडित्य होते, असे हिंदुधर्म संरक्षक आद्य शंकराचार्य, यांच्या कुंडलीत कोणते विशेष ग्रहयोग होते, की ज्यांनी हिंदुधर्म रक्षणाबरोबरच श्रीत्रिपुरसुंदरी ललिता देवीचे वर्णन करणारे 'सौंदर्य लहरी' सारखे महान काव्य इ.स. ८०० चे सुमारास लिहिले. त्यांचे अनेक ग्रंथही आहेत, परंतु वरील काव्याने त्यांना अजरामर केलेले आहे.

**जन्मलग्न कुंडली**




(टीप : गोल कंसातील इंग्रजी आकडे अंशाचे आहेत.)

श्रीआद्य शंकराचार्य यांची जन्मकुंडली शके ५९२ विभवनाम संवत्सरे वैशाख शुद्ध पंचमी रविवार दि. ३१ मार्च ६७०, मध्यान्ही कलियुगात २५९३- मिथुन रास- पुनर्वसु नक्षत्र, जन्मस्थळ- कालटी अल्वाईजवळ.

वरील जन्मलग्न-कुंडलीमध्ये शनि-गुरूचा अन्योन्य योग झालेला आहे, (कारण शनीचे राशीत गुरू व शनि गुरूचे राशीत याला परिवर्तन योग- / लाभ योग म्हणतात. अशा योगात वैराग्य, वेदान्त अभ्यास व तत्त्वचिंतन चांगल्या प्रकारे होते. गुरू हा कुंभ या शनीचे राशीत असल्यामुळेच तत्त्वचिंतन/ वेदान्त अभ्यास आणि तत्त्वज्ञान अभ्यासास चांगली बैठक मिळाली.

मंगळ हा गुरूचे मीन राशीत- हर्षल बरोबर असल्यामुळे उपासना, संप्रदायाबद्दलची- देखील उत्तम फले मिळाली. आणि धर्माचा अभिमान दृढ राहिल्यामुळे हिंदुधर्म संरक्षणाचे उत्तम काम त्यांच्याकडून घडले गेले. तसेच धनेश तृतीयेश व्ययेश याचा अंशात्मक योग मंगळाचे मेष राशीत कर्मस्थानी झाल्यामुळे व तेथेच रवीचे युति योग लाभेश शुक्र असल्यामुळे कवित्त्व, रसिकत्त्व, प्रगाढ असे पांडित्य, प्रवास आणि विपुल असे लेखन त्यांचे हातून झाले. रवि शनीचे योगामुळे- वडिलांचे सौख्य कमी मिळाले, कारण त्यांच्या वयाच्या सहाव्या वर्षी वडिलांचे निधन झाले.

**हिंदुधर्म संरक्षणाचे कार्य**

रवि चंद्राच्या लाभयोगामुळे अध्यात्म क्षेत्रात प्रतिष्ठा मिळाली. मोकळ्या मनाने हिंदुधर्म संरक्षणाचे कार्य झाले. रवि हर्षलच्या अंशात्मक योगामुळे चिंतन, संशोधन आणि गूढ उकलून पाहण्यात आनंद वाटला. त्यामुळे ते तत्त्वचिंतक बनले, परंतु विवाह सुखाला हा योग अहितकारक ठरला. शिवाय सप्तमात पापग्रह वा रास, विवाह न होण्यास कारणीभूत होतात. शुक्र नेपच्यूनच्या शुभ योगामुळेच श्रीत्रिपुरसुंदरी ललिता देवीचे वर्णन करणारे 'सौंदर्य लहरी' सारखे महान काव्य त्यांच्या हातून लिहिले गेले. चंद्र बुधाच्या लाभ योगाने त्यांना उत्तम स्मरणशक्ती बरोबर आत्मचिंतन, धार्मिक वृत्ती व शास्त्र जाणण्याची कला दिली. चंद्र- मंगळाचे केंद्र योगाने त्यांना, शीघ्रकोपी, स्वकेंद्रित केले असले तरी ते उच्च कुळात जन्म घेतलेले होते. बुध शनि योगामुळे चिकित्सक, शास्त्रीय विषय अभ्यास लेखन तर बुध-गुरूच्या योगामुळे बुद्धिमत्तेबरोबरच ज्ञानक्षेत्रात नावलौकिक देखील मिळाला. अलौकिक बुद्धिमत्ता, अनुपम वैराग्य, उत्तम तर्कपद्धती हे सारे रवि-नेपच्यून, चंद्र-हर्षल, चंद्र नेप. या ग्रहांच्या योगामुळेच साध्य झाले. शनि हर्षलच्या केंद्र योगामुळेच धडाडी- चिकाटी होती. संशोधनाला लोकमान्यता देखील मिळाली, परन्तु आयुष्यात वयाच्या सहाव्या वर्षी,

वडिलांच्या सुखाला पोरके व्हावे लागले तर शनि चंद्र प्रतियोगाने परंपरेच्या विरुद्ध जाऊन आईचा अंत्यविधी करावा लागला. वरील योगाला हर्षल नेपच्यूनच्या योगाने- देखील साथ दिलीच! शनि-नेप/गुरू नेप या योगांनी ध्येयपूर्ती, इच्छाशक्ती प्रबळ करून 'सौंदर्य लहरी' सारख्या काव्य लेखनाला प्रवृत्त केले. अष्टमेश शनिचा षष्ठ स्थानामधून मंगळाशी होणाऱ्या केंद्र योगामुळे वयाच्या ३२ व्या वर्षी त्यांना समाधी घेण्याची उपरति झाली.

सौंदर्य लहरीतील प्रत्येक श्लोक मंत्ररूपच असून यात एकूण १०३ श्लोक असून पहिल्या ४१ श्लोकांचे समुच्चयास 'आनंद लहरी' व ४२ ते १०३ श्लोकांच्या समुच्चयास मात्र 'सौंदर्य लहरी' असे नाव आहे. यातील पहिले ४१ श्लोक नित्य उपासनेत ठेवल्यास साधकाची कुंडलिनीशक्ती जागृत होते. वरीलपैकी 'आनंद लहरी' या भागात मात्र त्रिपुरसुंदरीची आंतरयाग उपासना (म्हणजेच योगमार्गाने श्रीचक्र स्वत:चे शरीरात कल्पून- केलेली उपासना) तर 'सौंदर्य लहरी' भागात बहिर्याग उपासना (देवीची स्थापना यंत्रावर- शरीराचे बाहेर कल्पून केलेली उपासना, म्हणजे कौलमार्गी उपासना) दाखविलेली आहे. म्हणजेच एका बाजूने योगमार्गाने निर्विकल्प समाधीचा रस्ता दाखवून, दुसऱ्या बाजूने सगुणोपासनेद्वारा निर्विकल्प समाधीचाच रस्ता दाखवून शेवटी अंतिम उद्दिष्ट परमेश्वरप्राप्ती- असेच सूचित केलेले आहे. हे सर्व पहाता एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते की हिंदुधर्माचे संरक्षणासाठीच भगवंताने आद्य शंकराचार्यांना पृथ्वीतलावर पाठविले आणि त्यांच्या हातून 'सौंदर्य लहरी' सारख्या महान आणि लोकउपकारक काव्याची निर्मिती करून घेतली.

खरोखर हिंदुस्थानात राहणारे, जन्मणारे निश्चित भाग्यवंत आहेत, कारण या देशात संत, साक्षात्कारी, संशोधक, धार्मिक चिंतन करणारे, धर्मप्रचार करणारे, हिंदुसंप्रदाय जपणारे, त्याचप्रमाणे गूढशास्त्र, योगशास्त्र, औषधशास्त्र, शिल्पशास्त्र, प्रसिद्ध योगी, तत्त्वज्ञ यांची तर वानवा नाहीच हे आम्ही आमचे भाग्य समजतो. अध्यात्मयोगातील, त्या वाटेवरील सर्वच तत्त्वचिंतकांना नतमस्तक होऊन हा छोटासा लेख त्यांचे चरणी अर्पण करतो.

**ज्योतिर्भास्कर/ज्योतिर्भूषण पंडित हिंगे**
अमरबाग सोसायटी, ई/१३, गाडीतळ, हडपसर,
पुणे ४११०२८.
दूरभाष : ०२०-२६९९०४३५

# आदिशंकराचार्यांच्या चिंतनाचा आत्मा

**प्रा. डॉ. शं. ना. नवलगुंदकर**

*एम्.ए. पीएच.डी., माजी उपकुलगुरु- पुणे विद्यापीठ*
*एमफिल, पीएचडी गाईड. २०पेक्षा अधिक पुस्तकांचे लिखाण, दिल्लीच्या समाजविज्ञान संस्थेत केंद्र सरकारकडून नियुक्ती. विश्व भारती विद्यापीठ व शिलॉंग येथील उत्तर पूर्व विद्यापीठ येथे मा. राष्ट्रपतींचे प्रतिनिधि म्हणून नियुक्ती.*

*'धारणात् धर्ममित्याहुः धर्मो धारयते प्रजाः।'*

अशी धर्मसंकल्पना आहे. धर्मामुळे समाजाची व समाज घटकांची धारणा होते. धर्मातून व्यक्तीच्या कर्तव्याची अभिव्यक्ती होते. कर्तव्याला भौतिक व अध्यात्मिक स्वरूप असते. धर्म ही व्याप्त संकल्पना असून ती सनातन आहे. सनातन म्हणजे शाश्वत. असे असूनही सातव्या शतकाच्या पूर्व काळात सनातन धर्माला जबरदस्त धक्के बसले. एकप्रकारचे धार्मिक अराजक निर्माण झाले. धर्माच्या अंतर्गत कर्मकांडांचा अतिरेक झाला. सनातन धर्मावर अन्य धर्मांची आक्रमणे झाली. त्यामुळे धर्माला एकप्रकारची ग्लानी आली. जेव्हा जेव्हा धर्माला ग्लानी येते, कर्मकांडाचे स्तोम माजते, लोकांकडून अनाचार व अविवेक घडू लागतो तेव्हा तेव्हा प्रत्यक्ष भगवंत अवतार घेऊन धर्म रक्षणाचे कार्य करतात. ही गोष्ट भगवद्‌गीतेतून स्पष्ट होते. परमेश्वर धर्म रक्षणासाठी प्रत्यक्ष अवतार घेतात. किंवा संतांच्या रूपाने येऊन लोकांना सन्मार्गाला लावतात. आनंदमय जीवनासाठी मार्गदर्शन करतात. आदि शंकराचार्य हे महापुरुष धर्म रक्षणासाठी अवतरले.

आचार्यांचा जन्म कालडी येथे झाला. शिवगुरू हे त्यांचे वडील तर सती हे त्यांच्या आईचे नाव होते. शिवगुरू हे नंबूद्री ब्राह्मण होते. वयाच्या पाचव्या वर्षी आचार्यांनी संस्कृत भाषेवर प्रभुत्व मिळवले. मानवजातीच्या कल्याणासाठी आपला जन्म झाला आहे असे मानून ब्रह्मचारी अवस्थेत त्यांनी घर सोडून उत्तर भारताचा पायी प्रवास सुरू केला. गोविंद भगवत्पाद हे सिद्ध पुरुष नर्मदा नदीच्या काठावर तपश्चर्या करत होते. त्यांचे गुरू गौडपादाचार्य होते. त्यांनी अद्वैत विचार गोविंद भगवत्पाद यांना सांगितला होता. आचार्यांनी संन्यासदीक्षा घेऊन अद्वैत विचार समजून घेतला. त्यानंतर काशीला जाऊन विश्वनाथांचे दर्शन घेतले. हिमालय हा महर्षि व्यासांचा परिसर मानला जात असे. आचार्यांनी हिमालयाचा प्रवास सुरू केला. तेथे वेदव्यासांचे प्रत्यक्ष दर्शन झाले. ब्रह्मसूत्र, गीता आणि उपनिषदे या त्रयीवर चिंतन केले. नंतर कुमारील भट्ट यांची भेट झाली. त्यांचे शिष्य मंडनमिश्र हे वैदिक कर्मकांडाचे मोठे अभिमानी होते. शंकराचार्य आणि मंडनमिश्र यांच्यात महत्त्वाच्या वैदिक धर्मसूत्रावर चर्चा झाली. त्यात आचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानामुळे मंडनमिश्र प्रभावित झाले. अद्वैत विचार थोडक्यात समजून घेतला पाहिजे.

ब्रह्म हे एकच अंतिम सत्य आहे. जगाच्या रूपाने त्या ब्रह्माचा भास होत असतो. परमार्थी व्यक्तीने सत्य समजून घेतले पाहिजे. सत्य आणि मिथ्या यातील भेद जाणून घेतला पाहिजे. उदाहरणार्थ, समुद्रकाठी पडलेला शिंपला उन्हात चमकतो. तेव्हा तो चांदीच्या तुकड्यासारखा वाटतो. खरे तर तो केवळ शिंपलाच असतो. जगाची स्थिती अशीच आहे. सामान्य माणसाला जग हे सत्य वाटते. कारण ते ज्ञानेंद्रियांच्या कक्षेत मोडते. माणसाला जग दिसू शकले म्हणून ते सत्य वाटते. एकदा ब्रह्म काय आहे याची अनुभूती झाली की मग जगाचे खरे स्वरूप स्पष्ट होते. थोडक्यात, आत्मा हा ब्रह्म स्वरूप आहे. आत्मा अमर आहे. शरीराचा नाश होतो पण आत्म्याचा नाश होत नाही.

प्रत्येक व्यक्तीत अविनाशी आत्मा असतो. तो 'मी' या शब्दातून व्यक्त होतो. 'मी' या शब्दावर सर्वांचा विश्वास असतो. 'मी नाही' असे कोणीही म्हणणार नाही. 'मी' म्हणजे आत्मा आणि आत्मा म्हणजे ब्रह्म. म्हणून 'अहं ब्रह्मास्मि' असे म्हटले आहे. ब्रह्म हे निर्गुण, निराकार आहे. सामान्य माणसे 'मी' या संकल्पनेकडे भौतिक दृष्टीने बघतात. 'मी' म्हणजे विशिष्ठ शरीराची, विशिष्ट नाव असलेली व्यक्ती होय असे सामान्यतः मानले जाते. त्याचे कारण स्थूल दृष्टीने जीव आणि शरीर असे दोन भाग होतात. सूक्ष्म दृष्टीने मात्र केवळ जीवालाच अस्तित्व असते. असामान्य तत्त्वज्ञानी व्यक्तीच आत्मा जाणणारी असते. ब्रह्म हे सत्य, अनंत आणि ज्ञान स्वरूपात अनुभवण्यास मिळते. अनंत म्हणजे अती व्याप्त. ज्ञान म्हणजे चैतन्य. सत्य म्हणजे अबाधित तत्त्व होय. यावरून असे स्पष्ट होते की शरीर व जगत् हे माया स्वरूप आहे. शरीर बदलू

शकते. जग बदलू शकते. पण सत्य स्वरूप आत्मा कधीही बदलत नाही.

अशाप्रकारच्या अद्वैत तत्त्वज्ञानाच्या प्रसारामुळे शंकराचार्य यांनी अनेक गोष्टी साध्य केल्या आहेत. आत्म्याच्या अमरत्वाच्या तत्त्वाज्ञानामुळे सनातन विचार हा विश्व विचार ठरतो. विश्वातील मानवजातीत असंख्य भेद असले तरी त्यांच्या घटकांचा आत्मा मात्र अभेद्य आहे. त्यामुळे या तत्त्वज्ञानामुळे विश्व-कुटुंब ही संकल्पना साकारली जाऊ शकते. त्यातून विश्वबंधुत्वाची कल्पना प्रस्थापित होण्याचा मार्ग मोकळा होतो.

विश्व निर्माण कसे झाले हा प्रश्न मानव जातीसमोर आजही उभा आहे. विश्वाची निर्मिती हे आजही एक कोडे आहे. अद्वैत तत्त्वज्ञानातून या प्रश्नाचे उत्तर सापडते. विश्व हे ब्रह्मस्वरूपाचा आभास आहे. आचार्य जगाचे आभास स्वरूप किंवा माया स्वरूप सांगतात, तेव्हा ते जगाचे अस्तित्व नाकारतात असे नव्हे. सामान्य मनुष्य आणि पारमार्थिक मनुष्य यात फरक आहे. पारमार्थिक मनुष्य हा आत्मचिंतनातून आत्मज्ञानी होतो. आत्मज्ञान होईपर्यंत तो जगाला सत्यच मानतो व प्रपंचातील व्यवहार पूर्ण करीत असतो. आचार्यांच्या विचारात प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय साधला आहे. समर्थ रामदासांनी आचार्यांच्या पावलावर पाऊल टाकून 'प्रपंच करावा नेटका' असे म्हटले आहे. समर्थांच्या वचनातील 'नेटका' हा शब्द अर्थपूर्ण आहे. समर्थ पुढे म्हणतात की नेटका प्रपंच केल्यानंतर विवेकपूर्ण परमार्थ साधावा.

ज्ञान, भक्ती आणि कर्म हे परमार्थाचे तीन मार्ग आहेत. त्यातील ज्ञान हा मार्ग कठीण आहे. अध्यात्मिक वृत्ती असलेल्या थोर माणसाला ईश्वर विषयक ज्ञान प्राप्त होते. शंकराचार्यांनी ज्ञान मार्गाचा पुरस्कार केला आहे. अंत:शक्तीचा शोध लागणे म्हणजे ज्ञान होय. परमेश्वर आत्मा या स्वरूपात माणसातच सामावलेला आहे. सामान्य लोक मूर्ती स्वरूप देवदेवतांची पूजाअर्चा करतात. आचार्यांच्या दृष्टीने या भक्तीला दुय्यम स्थान आहे. एका बाजूला ईश्वर म्हणजे दिव्य तेज असे म्हटले जाते तर दुसऱ्या बाजूला त्याच्या समोर फिकट असणारा दिवा लावला जातो. एका बाजूला परमेश्वर सुगंधमय आहे असे म्हटले जाते. तर दुसऱ्या बाजूला त्याच्या समोर सामान्य उदबत्ती लावली जाते. एका बाजूला परमेश्वराला अनंत म्हणतात तर दुसऱ्या बाजूला त्याला प्रदक्षिणा घालून मर्यादित करतात. हा विरोधाभास आहे. पण तो अर्थपूर्ण आहे. साकार व सगुण परमेश्वराची निष्ठायुक्त भक्तीने उपासना करताना आत्मस्वरूपाच्या निर्गुण व निराकार परमेश्वराचे दर्शन होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

आचार्यांनी भक्तीमार्ग नाकारला नाही. याचा प्रत्यय त्यांच्या उत्तुंग प्रतिभेच्या काव्यरचनेतून येतो. विविध देव-देवतांची स्तुती असलेली आचार्यांची काव्यरचना आजही लोकप्रिय आहे. परमेश्वरावरील नितांत भक्तीसाठी काव्य हे एक उंचीचे अर्थपूर्ण माध्यम आहे. म्हणूनच ज्ञानदेव, तुकाराम, रामदास इत्यादी संतांनी काव्यातून आध्यात्माचा प्रसार केला. काव्यामुळे काही प्रमाणात चित्ताची एकाग्रता होण्यास मदत होते. भक्तीमार्गाला चित्ताची एकाग्रता आवश्यक असते. प्रापंचिक माणसाच्या बाबतीत चित्ताची एकाग्रता ही एक समस्या ठरते. एका बाजूला लक्ष परमेश्वरावर असते तर दुसऱ्या बाजूला लक्ष प्रापंचिक गोष्टीत असते. भक्ती ही एक अवघड साधना आहे. भक्तीतून संतांना झालेले परमेश्वराचे ज्ञान म्हणजे अंतर्ज्ञान होय.

आत्मा, ब्रह्म, अंतर्ज्ञान इत्यादी गोष्टी गूढ आहेत. त्यांचे सहजगत्या आकलन होत नाही. मात्र गूढ गोष्टींना आकार दिला की सामान्य माणसांना त्यांचे आकलन होऊ शकते. उदाहरणार्थ, परब्रह्म ही गूढ कल्पना अनाकलनीय आहे. पण सगुण, साकार पांडुरंग सहजपणे लक्षात येऊ शकतो. सगुण साकाराची भक्ती केल्यानंतर काही संत महात्म्यांना निर्गुण निराकाराची प्रचीती आली आहे. निर्गुण निराकार ब्रह्म स्वरूपाची अनुभूती येऊ शकते. ज्या संत महात्म्यांना ब्रह्म स्वरूपाची अनुभूती झाली अशांच्या अनुभूतीवर श्रद्धा ठेवावी लागते. प्रत्येक गोष्ट सिद्ध करता येत नाही- बुद्धी बरोबर श्रद्धेलाही महत्त्वाचे स्थान आहे. गॅलिलिओ, कोपरनिकस इत्यादी वैज्ञानिकांनी पृथ्वी सूर्याभोवती फिरते असा शोध लावला. ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या चौथ्या अध्यायातील एका ओवीत असे म्हटले आहे की, पृथ्वी सूर्याभोवती फिरते. सूर्य पृथ्वीभोवती फिरतो हा भास होत असतो. गॅलिलिओ व कोपरनिकस यांच्यावर आपण जसा विश्वास ठेवतो तसाच विश्वास ज्ञानदेवांवर ठेवावा लागेल. शंकराचार्यांच्या 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' यावर देखील विश्वास ठेवावा लागेल. श्रद्धा आणि बुद्धी या दोन्ही गोष्टींना मानवी जीवनात महत्त्वाचे स्थान आहे.

**- प्रा. डॉ. शं. ना. नवलगुंदकर**

'रेणुका' कांचनगंगा सोसायटी, कुमार पार्क जवळ,
बिबवेवाडी कोंढवा रोड, पुणे ४११०३७.
फोन नं. : २४२६१३१४



# सौंदर्यलहरी एक रसग्रहण

**डॉ. प्रमोद ग. लाळे**

*एम.ए.(हिंदी व संस्कृत), पीएच.डी., प्राध्यापक*
*भांडारकर प्राच्यविद्या संशोधन केंद्राचे नियामक मंडळ व कार्यकारी मंडळ यांचे सदस्य. मराठी, हिंदी, इंग्रजी, तेलगू व संस्कृत भाषांतून विपुल लेखन व संपादन. एकूण चार पुरस्कारांनी सन्मानित. राष्ट्रपती पुरस्कार २०००.*

देवतोपासनेचे जे विविध प्रकार भारतात रूढ झाले, त्यामध्ये देवतास्तुति अथवा स्तोत्र हा प्रकार फारच लोकप्रिय झाला आहे. देवतांचे गुणविशेष किंवा कार्यविशेष यांचे वर्णन करून त्यांची महात्मता वर्णन करणे व त्या देवतांना शरण जाऊन सर्व संकटांपासून मुक्त करण्यासाठी त्यांची प्रार्थना करणे ही दोन वैशिष्ट्ये जवळपास सर्वच स्तोत्रांत दिसून येतात.

किंबहुना, जगातील पहिली कविता स्तोत्ररूपानेच विनटलेली आहे. जागतिक सभ्यतेचा उष:काल म्हणजेच वैदिक काल. त्यातल्या त्यात ऋग्वेद हे सर्वात प्राचीन साहित्य. ऋग्वेद म्हणजे देवतास्तुतीचे संकलन आहे. त्या काळापासून आतापर्यंत संस्कृतमध्ये शेकडो स्तोत्रे रचिली गेली आहेत. त्यात विष्णू व त्याचे दहा अवतार, शिव, गणेश, देवी यांच्या स्तोत्रांना प्रमुख स्थान आहे. या स्तोत्रांत दैवत महिम्याचे वर्णन आहेच, पण त्या बरोबर भक्ताची शरणागती, मुमुक्षा, दैन्य, इत्यादि भावांचे आकर्षक वर्णन आहे. या सर्व स्तोत्रांनी भक्तीच्या प्रसारास व प्रचारास खूपच मदत केली आहे. स्तोत्रांची भाषाही लालित्यपूर्ण व मधुर असते व त्यामध्ये एक प्रकारची संगीतात्मक लय असते. त्यामुळे जवळजवळ सर्व स्तोत्रे कर्णामृत झाली असून ती म्हणणाऱ्याना तसेच ऐकणाऱ्यांना एक अलौकिक मानसिक आनंदाचा लाभ करून देत असतात. संस्कृतच्या अशा विपुल स्तोत्रात सौंदर्यलहरीचे स्थान फारच उच्च कोटींचे आहे.

सौंदर्यलहरी हे एक शंभर श्लोकांचे स्तोत्र असून त्यात देवीचे म्हणजे महात्रिपुरसुंदरीचे सौंदर्य व प्रभा यांचे मधुर वर्णन आहे. आद्य शंकराचार्यांनी हे स्तोत्र लिहिले आहे हे मत आता सर्वमान्य झाले आहे. देवीच्या किंवा आदिशक्ती उपासनेमध्ये हे स्तोत्र एक फलदायी व शक्तियुक्त आहे, असा सर्व देवीभक्तांचा विश्वास आहे. या स्तोत्राचे दोन अंश किंवा भाग आहेत. एक्केचाळीस श्लोकांच्या दुसऱ्या भागास सौंदर्यलहरी म्हटले जाते. पहिल्या अंशांत त्रिपुरसुंदरीच्या उपास्य रूपाचे वर्णन असून ते सामान्यपणे तंत्रशास्त्र किंवा शक्तिसंप्रदायास अनसुरून आहे. सौंदर्य लहरीत तिच्या दिव्य सगुण शरीराचे वर्णन आहे. तांत्रिक उपासना पद्धतीत बीजाक्षरे, मंत्र, षट्चक्रभेदन व कुंडलिनी यांना फार महत्त्व आहे. किंबहुना ऋग्वेदकालीन मंत्रांचा अभिनव अवतार म्हणजे मंत्रशास्त्रांतील बीजाक्षरयुक्त मंत्र होत असे म्हणता येईल. देवी ही शक्तिरूप आहे, त्रिगुणात्मक शक्तीच तिच्या विविध हविशेषांत निवास करून असते, असे तंत्रशास्त्राचे म्हणणे आहे. त्या देवीच्या उपासनेत मंत्रोच्चारण किंवा मंत्राचे पुरश्चरण हा एक फारच परिणामकारी मार्ग आहे असे समजले जाते. मंत्रशास्त्राच्या अनेक ग्रंथात देवी पूजाविधी, मंत्रमहिमा, बीजाक्षरांचे रहस्य, षटचक्रप्रधान शरीराचे योगशास्त्रदृष्ट्या वर्णन हे प्रमुख प्रतिपादित विषय आहेत. जे ब्रह्मांडी तेच पिंडी- या सिद्धान्तावर देवीतत्त्व आधारलेले आहे. ब्रह्मांडाला व्यापून राहणारी व सृष्टि स्थिती लयाच्या कार्यशक्तीचे विधानच अशी पराशक्ती शरीरात देखील वर्तमान असते, हा मंत्रांचा मुख्य सिद्धांत आहे. या सर्वांचे विस्तारपूर्वक विवेचन निरनिराळ्या तंत्रग्रंथात आले आहे. पण तंत्रशास्त्र, मंत्रशास्त्र, योगशास्त्र, शक्तिसिद्धांत देवीचे शरीरसौष्ठव या सर्वांचे एक सुंदर समन्वयात्मक विवेचन जर कुठे असेल तर सौंदर्यलहरीतच. या स्तोत्रांत तंत्रसागरावर शब्दसौंदर्याचे तरंग उत्पन्न होत असल्याची वाचकांना प्रचीती येते. गूढ रहस्यात्मक तंत्रशास्त्रीय सिद्धान्तांचे इतके मनोहर वर्णन इतरत्र क्वचितच आढळेल. स्तोत्राची रचना काव्याच्या सर्व गुणांनी बहरली आहे. ज्ञानेश्वरांचे एक कथन या स्तोत्रांस अक्षरश: लागू पडते.

***वाचे बरवे कवित्व । कवित्वातहि रसिकत्व ।***
***रसिकत्वी परतत्व । स्पर्शु जैसा ।। ज्ञाने.***

सुंदर शब्दरचनेबरोबरच सर्व श्लोकांत शांत, श्रृंगार, करूण, अद्भुत आणि शांत यांचे सौंदर्यलहरी माहेरघरच आहे. या स्तोत्रांत ओज आहे, कारण ते पराशक्तीचेच वर्णन आहे. प्रसाद आहे, कारण ती शंकराचार्यांची रचना आहे, माधुर्य आहे, कारण त्या स्तोत्रांत

देवीच्या सुरम्य देहसौष्ठवाचे वर्णन आहे. निरनिराळ्या अलंकारांची पर्वणीच आहे. या स्तोत्रांवर अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत. एका स्तोत्रग्रंथावर इतक्या टीका कोठेच दिसून येत नाहीत. स्तोत्रांतील प्रत्येक श्लोक मंत्रस्वरूप आहे. प्रत्येक श्लोकाचा एक स्वतंत्र मंत्र आहे. श्री विद्योपासकांना हे स्तोत्र म्हणजे एक वरदानच आहे.

संपूर्ण स्तोत्राची विद्या **श्रीविद्या** आहे. आनंदलहरीच्या अंशात श्रीचक्राचे निरूपण आहे. त्यामध्ये असे सांगितले आहे की मनुष्यदेह म्हणजेच एक श्रीचक्र आहे व त्यात षटचक्रांचा अंतर्भाव आहे.

अशा या शक्तिदेवतेने शिव किंवा शंकर यास पतिरूपाने वरले आहे. शिव व शक्ती हे अनादि- अनंत असे दांपत्य आहे. या शक्तीचेच अंश इतर देवतांतही असतात. या शक्तीच्या सहाय्याने शिव, ब्रह्मा, विष्णू आदि देव आपापले कार्य करण्यास समर्थ होत असतात.

प्रलय झाल्यानंतर सर्व कार्य समूह नाहीसा होतो व सर्वत्र पंचमहाभूते परमाणुरूपानेच रहातात. त्यावेळी आदिमातेकडून ब्रह्मदेवास सृष्टी निर्माण करण्याची प्रेरणा मिळते व सूक्ष्म पंच-महाभूतांपासून स्थूल शरीरांची रचना होते. ब्रह्मदेव देवीच्या चरणरज:कणापासूनच चराचर सृष्टी निर्माण करू शकतो. शंकर देखील प्रलयकाळी आदिशक्तीच्या चरणकमलातील रजकणालाच भस्म म्हणून धारण करीत असतात. एका श्लोकात असे सांगितले आहे की देवीच्या चरणांवरचा धूलिकण अज्ञान्यांच्या अंत:करणातील अंधाराचा नाश करणाऱ्या सूर्याची नगरी आहे. जडबुद्धीच्या लोकांसाठी चैतन्यपुण्यांच्या गुच्छातून सतत वाहणारा असा पुष्परसाचा किंवा मधाचा झरा आहे, दरिद्री लोकांच्या इच्छा पूर्ण करणारी, चिंतामणि रत्नांची एक माळा आहे व तो रजकण म्हणजे भवसागरात बुडणाऱ्या लोकांना वर काढणारी विष्णूस्वरूप वराहाची दाढच आहे.

इतकेच काय तर सर्व जगांवर आपले स्वामित्व गाजवणारा अनंत किंवा मदन हाही देवीचा उपासक आहे. कोमल आयुधांनी तो स्त्रीपुरुषांवर कठोरपणे आघात करीत असतो. त्यानंतर आचार्यांनी देवीच्या सगुण रूपांतील ऐश्वर्याचे वर्णन केले आहे.

अमृताच्या महासागरात निरनिराळ्या रत्नांचे एक तेजस्वी बेट आहे. त्यांत देवांना अत्यंत प्रिय असलेले असे अनेक वृक्ष आहेत. यात कदंबवृक्षाची एक बाग आहे. त्यात चिन्तामणी रत्नांनी ज्याच्या भिंती जडविल्या आहेत, असे एक मंदिर आहे. त्याच्या मधोमध असलेल्या सिंहासनावर सदाशिव विराजमान झाले आहेत. त्यांच्या डाव्या मांडीवर ललितामहा त्रिपुर सुंदरी विराजमान झाली आहे. साधक आपल्या ध्यानाच्या व उपासनेच्या बळावर तेथपर्यंत गेला, तर त्याच्या अंत:करणात चिदानन्दलहरी उसळतात. काही टीकाकारांनी ८ व्या श्लोकाचा अर्थ श्रीचक्रालाही लावून दाखविला आहे.

पांडुरंगशास्त्री गोस्वामी यांनी ही कल्पना सुबोध भाषेत विशद केली आहे. श्रीचक्रांत खालची चार चक्रे, शिवाची वरची पाच चक्रे शक्तीची मानली जातात. शिवचक्रे आणि शक्तिचक्रे यांच्यामध्ये असलेल्या जागेस सुधासिंधु असे म्हटलेले आहे. भुपुर, भिवलय, षोडशदलकमल आणि अष्टादाशकमल हा परिसर ओलांडून आपण पुढे गेलो की शक्तिचक्रांना आरंभ होतो. त्यांच्या आसपासचा परिसर सुधासिंधूचाच आहे. त्या सुधासिंधूत चौदा त्रिकोणीचे एक चक्र, दहा-दहा त्रिकोणांची दोन चक्रे आणि आठ त्रिकोणीचे एक चक्र असे एकूण बेचाळीस त्रिकोण आहेत. त्यांत कल्पवृक्षांच्या बागा आहेत. त्या त्रिकोणांत मध्यवर्ती असलेल्या त्रिकोणालाच चिंतामणि मंदिर असे म्हटले आहे. त्याच्या बाहेरच्या बेचाळीस त्रिकोण असलेल्या चक्रांचेच मणिद्वीप बनले आहे. त्या त्रिकोणांच्या रेषा जणू काही त्या मणिद्वीपांतील कदम्बवृक्षच होत. कदंबवृक्ष हे महात्रिपुर सुन्दरीचे आवडते वृक्ष आहेत. मुख्य त्रिकोणालाच ८ व्या श्लोकांत चिंतामणिगृह असे म्हटले आहे. त्यातील बिंदू हा शिवाकार पर्यंक म्हणजे पलंग आहे. त्यावर अधिष्ठित असलेले प्रकाशस्वरूप परमशिवतत्त्व म्हणजेच सदाशिव त्यांची अर्धांगिनी विमर्शरूप महाशक्ती श्रीत्रिपुरसुंदरी. तीच चिदानन्दलहरी.

९ व्या श्लोकात सहा चक्रांचा उल्लेख आहे. शरीरात राहणारी शक्ती कुंडलिनी आहे. ललितामहात्रिपुरसुंदरी सर्व चक्रांची अधिष्ठात्री देवता आहे. मुलाधाराम्बुजारूढा, स्वाधिष्ठानाम्बुजगता, मणिपूराब्जनिलया, अनाहताम्बजनिलया, विशुद्धिचक्रनिलया, आज्ञाचक्राब्जनिलया, सहस्रदलपद्मस्था इत्यादि वर्णनावरून चक्ररूपी कमलांत त्या देवीचे वास्तव्य असते, हे स्पष्ट होते. प्रत्येक चक्र एकेका महाभूताचे स्थान आहे.

मूलाधारचक्र हे पृथ्वीतलाचे, स्वाधिष्ठान अग्नितत्त्वाचे, त्यावरील अनाहत चक्र वायुतत्त्वाचे, कंठस्थानीय विशुधिचक्र आकाश तत्त्वाचे, दोन भुवयामध्ये असलेले आज्ञाचक्र मनस्तत्वाचे अधिष्ठान आहे. त्यानंतर त्रिपुरसुंदरी हजार पाकळ्या असलेल्या कमलात प्रवेश करते व तेथे असणाऱ्या माया, शुद्धविद्या, महेश्वर आणि सदाशिव या तत्त्वांशी निगडित होते. माया- विशिष्ट महेश्वर म्हणजे जीव, तर शुद्धविद्या विशिष्ट सदाशिव हे परमशिवपद आहे. याच कमळात असलेल्या चंद्रमंडळात देवी परमशिवतत्त्वाशी समरस

होऊन विहार करीत असते. हाच शिवशक्ती संगम व हाच परमरस होय. ही परमानंद अवस्था प्राप्त करण्यासाठी कुण्डलिनी सुषुम्नीमार्गाने सहा चक्रांचा भेद करून साधकाच्या समाधिबलाने सहस्रदल-प्रवेश करते व तेथील चन्द्रमंडळात सच्चिदानन्दरूप परमशिवतत्त्वाशी समरस होते. म्हणजे सहचक्रभेदन ही शिवशक्ति सामरस्याची एक अद्‌भुत प्रक्रिया आहे. हिच्यात सिद्धि मिळविण्यासाठी साधकाला विविध आसने, प्राणायाम, धारणा आणि ध्यान यांत कुशलता प्राप्त करून घ्यावी लागते.

९ व्या श्लोकानंतर २१व्या श्लोकापर्यंत देवीचे चरण, तिचा अरूण वर्ण, तिची तरूण- तरणि श्री सरणि 'ई' या बीजाक्षराने नटलेला देवीच्या ध्यानाचा महिमा, साही कमळांच्या वर असलेली देवीची शुद्ध सच्चिदानंदरूप कला, इत्यादींचे वर्णन आहे. केव्हा केव्हा ही वर्णने चमत्कारयुक्त झालेली आहेत.

२२ व्या श्लोकात आचार्यांनी एक शब्दचमत्कार दाखविला आहे. ते म्हणतात,

*भवानि त्वं दासे मयि वितर दृष्टिं सकरुणा*
*मिति स्तोतुं वाञ्छन् कथयति भवानि त्वमिति य: ।*
*तदेव त्वं तस्मै दिशसि निजसायुज्यपदवीं*
*मुकुन्दं ब्रह्मेन्द्रस्फुटमुकुटनीराजितपदाम् ।।*

'त्वं भवानि' तूच मी व्हावे अशी साधकाने इच्छा व्यक्त करताच म्हणजे त्याने अहंग्रहोपासना सुरू करताच, तू त्या साधकाला निज-सायुज्य पदवी देतेस. अर्थात केमुनिकन्यायाने, सालोक्य वा सारुप्य किंवा सामीप्य प्राप्त होईल यात काय संशय? देवी शिवस्वरूपिणी असल्यामुळे साधकाला शिवसायुज्य मिळाल्या सारखेच आहे. आचार्य आणखी एका श्लोकात सांगतात की चारही वेद देवीच्या पादपीठाजवळ हात जोडून उभे असतात. ते जेव्हा आपले हात मुकुटाला लावून नम्रभावाने देवीला नमस्कार करतात, त्यावेळी त्यांचे मुकुट तुरे लावल्याप्रमाणे दिसतात. सर्व देवतांमध्ये केवळ शिवच असे आहेत की ते कल्पांताच्या वेळी देखील देवी बरोबर आनंदाने विहार करीत असतात.

आचार्य दीनतेने देवीला विचारतात, 'आई, मी तुझी पूजा काय करणार? कारण माझ्या निसर्गाने किंवा इच्छेने होणाऱ्या हालचाली तेच सर्व पूजाद्रव्य रूपानेच तुझ्या चरणी अर्पित होतात.

*जपो जल्प: शिल्पं सकलमपि मुद्राविरचना*
*गति: प्राद्याक्षिण्यक्रमणमशनाद्याहुतिविधि:।*
*प्रणाम: संवेश: सुखमखिलमात्मार्पणदृशा ।*
*सपर्यापर्यायस्तव भवतु यन्मे विलसितम् ।।*

या ठिकाणी महादेवी वर्मांच्या क्या पूजा क्या अर्चन रे । आदि पंक्तींची आठवण येणे स्वाभाविक आहे. आणखी एका लेखात आचार्य म्हणतात की, देवीची तादात्म्य भावनेने उपासना केली, तर साधक 'चिन्मयसमृद्धि' देखील कस्पटासमान मानतो. आणि कल्पान्त काळाचा प्रलयाग्नि देखील त्याची आरती ओवाळतो. या स्तोत्रांतील ३२ वा श्लोक महत्त्वाचा आहे. त्यामध्ये एका प्रसिद्ध मंत्राची अक्षरे मोठ्या कौशल्याने गुंफली आहेत. देवता ही मंत्रमय आहे, असा मंत्रशास्त्राचा सिद्धांत आहे. मंत्र हा रहस्यमय व गोपनीय आहे; त्यामुळे त्याचा उल्लेख परोक्षरूपाने या श्लोकांत केला आहे. संप्रदाय पद्धतीनुसार श्रीविद्या मंत्राचे अनेक भेद आहेत. त्या मंत्रांची अक्षरे मिळून एक विद्या होते. उदाहरणार्थ पंचदशीविद्या म्हणजे पंधरा बीजाक्षरांचा एक मंत्र तसेच षोडशीविद्या. त्याच्या पहिल्या अक्षरावरून कादिविद्या किंवा हदिविद्या अशी ही नावे आहेत. तो श्लोक असा आहे,

*शिव: शक्ति: काम: क्षितिरथ रवि: शीतकिरण:*
*स्मरो हंस: शक्रस्तदनु च परामार हरय: ।*
*अमी हृल्लेखाभिस्तिसृभिरवसानेषु घटिता:*
*भजन्ते वर्णास्ते तव जननि नामावयवताम्*

पंचदशीमंत्राचे विवरण असे आहे.

शिव - क
शक्ति - ए अग्निखंड
काम - ई वाग्भवकूट
क्षिति - ल रूद्रग्रन्थि
हीं

रवि - ह
शीतकिरण- स सूर्यखण्ड.
स्मर- क कामराजमकूट
हंस- ह
शक्र- ल
हवीं विष्णुग्रन्थि

परा - चन्द्रकला - स
भार - -- - क सोमखंड किंवा शक्तिकूट
हरि - इन्द्र - ल चन्द्रखंड
हीम् ब्रह्मग्रन्थि
गुंफ अक्षर- चन्द्रकलाखंड

यामध्ये हीं हे बीजाक्षर फार महत्त्वाचे आहे. या बीजामुळेच मंत्रामध्ये सामर्थ्य किंवा चैतन्य येते. या बीजालाच 'हृलेखा' असे म्हटले जाते. यांत एक गुप्त अक्षर जोडले की षोडशी विद्या होते.

चन्द्रकलाखंड हे चौर्य गुणभयातीत, कूरत्रयातीत आहे. ते 'चिदेकरस' आहे. त्या चन्द्रकलेचेच लौकिक नाव महात्रिपुरसुंदरी आहे. भगवान शंकरांना 'नवात्मा' म्हणतात. तंत्र शास्त्रांत आनंदभैरव रूप शिवाची नऊ रूपे मानलेली आहेत. प्रत्येक रूपाला व्यूह म्हणतात.

*कालव्यूहः कुलव्यूहो नामव्यूहस्तथैव च ।*
*ज्ञानव्यूहस्तथा चित्तव्यूहः स्यात्तदनन्तरम् ।*
*नादव्यूहस्तथा । बिन्दुव्यूहः स्यात्तदनन्तरम् ।*
*कलाव्यूहस्तथा जीवव्यूहः स्यादिति ते नव ।।*

त्रिपुरसुंदरी देवी देखील 'नवात्मा' आहे, कारण श्रीचक्र हे नवखंडात्मक आहे. अ वर्ग, क वर्ग, च वर्ग, ट वर्ग, त वर्ग, प वर्ग, य वर्ग, श वर्ग आणि क्षघ– हे वर्ण राशीचे नऊ विभाग आहेत व सर्व वर्णसमूह देवीचीच रूपे आहेत म्हणून शंकर–शंकरी, आनंदभैरव– आनंदभैरवी आदि नामसादृश्य दोघांमध्ये दिसून येते.

सौंदर्य लहरीच्या ३६ ते ४१ श्लोकांपर्यंत आपल्या शरीरातील मूलाधार इत्यादि षट्चक्रांमध्ये शिवशक्ति स्वरूप देवीचे निरनिराळ्या रूपाने वास्तव्य असल्याचे वर्णन केले आहे. उदाहरणार्थ आज्ञा चक्रांत असलेल्या संवित्कमलातील मकरंदाचा आस्वाद हंस शिव व पार्वती घेत आहेत. त्यांच्या साध्या बोलण्यातून अनेक शास्त्रे निर्माण झाली आहेत.

*यदालापादष्टादशगुणिताविद्यापरिणति–*
*यदादत्ते दोषाद् गुणमखिलमद्भ्यः पय इव ।*

संवित्कमलामध्ये असणाऱ्या अग्निलेखेसारखी दिसणारी जी सुषुम्ना नाडी आहे, तिच्यातच परमसत्याचा साक्षात्कार होत असतो.

त्या नंतरच्या काही श्लोकात देवीच्या दिव्य अवयवांचे वर्णन आहे. देवीचा किरीट, चिकुरनिकुसम्ब, तिची सीमनासरणी म्हणजे केसांचा भांग, काळ्याभोर केसांनी व्यापलेले मुख भुवनभयभंग व्यसनिनी देवीच्या राक्षसांना भिववून सोडणाऱ्या भुवया, देवीचे त्रिनेत्र, यांचे वर्णन फारच आकर्षक आहे. ४३ व्या श्लोकांत देवीच्या दृष्टीचे वर्णन फारच मनोहर आहे. त्या श्लोकांतील विशेषणे श्लिष्ट आहेत, म्हणजे देवीची दृष्टि व प्रमुख पवित्र नगरी असे दोन्ही अर्थ एका विशेषणातून प्रतीत होतात.

*विशाला कल्याणी स्फुटरुचिरयोध्या कुवलयैः*
*कृपाधाराऽऽधारा किमपि मधुराऽऽभोगवतिका ।*
*अवन्ती दृष्टिस्ते बहुनगरविस्तारविजया*
*ध्रुवं तत्तन्नामव्यवहरणयोग्या विजयते ।।*

दृष्टीचे वर्णन खालील कोष्टकांवरून अधिक स्पष्ट होईल :

| दृष्टि | अर्थ | नगरी | कार्य |
|---|---|---|---|
| विशाला | विकसिता | बदरीनाथनगरी | संक्षोभण |
| कल्याणी | विस्मिता | कल्याण | आकर्षण |
| अयोध्या | स्मेरक्नीतिका | रामजन्मभूमि अयोध्या | द्रावण |
| धारा | कृपेचा आधार, नित्य करुणापूर्ण अलस्य | धारानगरी | उन्मादन |
| मधुरा | वलि विलासिता | मधुरा | वशीकरण |
| भोगवतिका | स्निग्धा | अमरावती | उच्चाटण |
| अवन्ती | मुग्धा | उज्जयिनी | विश्लेषण |
| विजया | आकेकरा | विजयनगर | भार |

देवीच्या दृष्टीच्या वर्णनात अमुख रसांचा उल्लेख करून आचार्यांनी एक सुंदर स्वभावोक्ति रंगविली आहे.

*शिवे शृङ्गरार्द्रा तदितरजने कुत्सनपरा*
*सरोषा गङ्गायां गिरिशचरिते विस्मयवती ।*
*हराहिम्यो भोता सरसिरुहसौभाग्यजननी*
*सरवीषुस्मेरा ते माये जननी दृष्टिस्सकरुणा ।।*

देवीचे कटाक्ष – बाणाच्या टोकाप्रमाणे तीक्ष्ण असून ते शंकरांच्या वैराग्यमूलक शांतरसाचा भेद करणारे आहेत. आचार्यांनी देवींच्या नयनांचे वर्णन करून अलंकाराचा फारच कौशल्याने उपयोग केला आहे. देवीच्या डोळ्यांत शुक्ल नील वर्णांच्या छटा आहेत– का?

पुनः स्रष्टुं देवान् द्रुहिण हरि रुद्रानुपरतान् –

किंवा तिच्या नयनांत गंगा, यमुना, शोण यांचा अद्भुत संगम झाला आहे असे वाटते; जगाचे संरक्षण करण्यासाठीच देवीच्या पापण्यांची उघडझाक होत नाही ना? देवी निर्मिमेषरीतीने जगाच्या कल्याणात दक्ष असते. कानातील कर्णभूषणांचे प्रतिबिंब देवीच्या गालांवर पडल्यामुळे देवीचे मुखकमल हे जणू काही चार चाके असलेला कामदेवाचा रथच आहे असे एक मजेदार वर्णन केले आहे. देवीच्या दंतपंक्तीचे वर्णन करताना निदर्शनेचे एक सुंदर उदाहरण आचार्यांनी दिले आहे.

आकाशातील चंद्रापेक्षा देवीच्या मुखचंद्राचे आस्वायत अधिक आहे हे सांगताना आचार्यांनी व्यतिरेकाचे एक रथ उदाहरण दिले आहे. चकोरपक्षी देवीच्या मुखाचे 'स्मितज्योत्स्नाजाल' नित्य पीत असतात. त्या माधुर्यातिरेकाने त्यांच्या तोंडात जडत्व येते. त्यांना काहीतरी आंबट खावेसे वाटते. तेव्हा ते चंद्राच्या चांदण्याचे ते आंबट कांजी आहे असे समजून सेवन करीत असतात.

अशाच तऱ्हेच्या चमत्कृति आपल्याला नासिका हनु, तांबूल,

कंठ, इत्यादींच्या वर्णनात दिसून येतात. एका श्लोकांत आचार्यांनी सामुद्रिकशास्त्र व संगीतशास्त्र यांतील पारिभाषिक शब्दांचा उपयोग करून देवीच्या नादरूपाचे आकर्षक दर्शन घडविले आहे. देवीच्या कंठस्थानीय रेखांचे वर्णन करताना आचार्य म्हणतात,

*गले रेखास्तिस्रो गतिगमकगीतैकनिपुणे*
*विवाहव्यानद्धगुणगुणसंख्याप्रतिभुवः ।*
*विराजन्ते नानाविधमधुररागाकरभुवां*
*त्रयाणां ग्रामाणां स्थितिनियमसीमान इव ते ।।*

देवी, तू गति, जनक आणि गीत म्हणजे संगीतातले प्रकार, स्वरभेद आणि गायन यामध्ये अत्यंत निपुण आहेस. तुझ्या कंठावरील तीन वळ्या म्हणजे लग्नाच्या वेळी शंकरानी जे प्रगुणगुण म्हणजे अनेक मांगल्यसूचक सूत्रांचे जे मंगळसूत्र बांधले त्यांच्या 'प्रतिभू'- म्हणजे साक्ष देणाऱ्या आहेत की काय, असे वाटते. देवी, तुझ्या कंठावरील रेखा षडज, मध्यम आणि गांधार या तानांच्या म्हणजे स्वरसमूहांच्या सीमा दाखविणाऱ्या किंवा तीन पानांची पृथक् व्यवस्था करणाऱ्या आहेत.

*रञ्जकः स्वरसन्दर्भो गीतमित्यभिधीयते ।*
*स्वरस्य क चो गमकः श्रोतृचित्तसुखावहः।*

गती म्हणजे संगीताचे प्रकार- मार्ग व देशी असे मुख्य दोन भेद आहेत.

देवीचे वक्ष हे जणू काही अमृत रसाने भरलेल्या माणिक रत्नाच्या कुप्याच आहेत.

देवीच्या उदरावरील रोमराजीचे वर्णन करताना देखील आचार्यांनी अनुपम कल्पनावैभव दाखविले आहे. ते म्हणतात देवीची नाभि सरोवराप्रमाणे खोल आहे. कामदेव आपल्या शिवाग्नि दग्ध शरीरास शक्ती देण्यासाठी म्हणून की काय, तिचा आश्रय करून राहिला आहे. आग बुझल्यानंतर धूपरेखा उठतात. नाभितून निघणाऱ्या धूपरेखानाच लोक रोमलेखा समजतात. तुझ्या विशाल स्तनांच्या मध्ये आपल्यास जागा मिळणे कठीण आहे, असा विचार करून आकाश तुझ्या गंभीर अशा नाभिविवरांत प्रवेश करीत असल्यासारखे दिसते. आकाश हे मूर्त व नीलवर्ण आहे अशी सर्व सामान्य कल्पना आहे. देवीचे नाभिकुहर म्हणजे जणू काही गंगेतील भोवराच आहे; अथवा रोमलतेचे ते आळेच! असावे. देवीची कमर त्रुटित नटिनी चिरतरुणा समावस्थास्ये... आहे. देवीला नितम्ब माग्भार हे हिमालयाकडून अंदण म्हणून मिळाले आहे. देवीच्या मांड्यांनी हत्तीच्या शुंडादंडांना जिंकले आहे तसेच त्यांनी सोन्याच्या केळीच्या खांबांच्या समूहालाही जिंकलेले आहे. दोन्ही गुडघ्यांनी आपल्या काठिन्याने देवांच्या हत्तींच्या दोन्ही गंडस्थळांना जिंकले आहे. त्यांच्या खालच्या जंघा म्हणजे पिंढऱ्या इतक्या सुंदर आहेत, की जणू काही शंकरांचा पराभव करण्याकरता मदनाने बाणाचे भातेच निर्माण केले आहेत. कामदेवाचे बाण जरी पाच असले तरी या दोन भात्यांत त्याने दहा बाण ठेवले असावेत, असे वाटते. त्या दहा बाणांची पुढची दहा पाती दोन्ही पायांच्या नखाग्राच्या खुणा स्पष्ट दिसून येत आहेत.

देवीचे दोन्ही चरण लाक्षारसामुळे रक्तवर्ण झाले आहेत. प्रमदवनकंकेलित म्हणजे अशोकवृक्ष फुलाफळांचा बहर यावा या इच्छेने तुझ्या चरणाच्या आघाताची नेहमी आकांक्षा बाळगून असतो. त्यामुळे शंकर त्या अशोक वृक्षाची फारच असूया करतात, हेवा करतात.

एका श्लोकात शंकराने चुकून गंगेचे नाव घेतले. शंकराला देवीच्या पादप्रहाराचा प्रसाद लाभला व त्यामुळे मदनाला आनंदाच्या उकळ्या फुटल्या असे गमतीचे वर्णन आले आहे.

*मृषा कृत्वा गोत्रस्खलनमथ वैलक्ष्यनमितं*
*ललाटे भर्तारं चरणकमले ताडयति ते ।*
*चिरादन्तश्शल्यं दहनकृतमुन्मूलितवता*
*तुलाकोटिक्वाणैः किलिकिलितमीशाननिपुणा ।।*

साध्या कमळात आणि देवीच्या चरणकमळांत किती फरक आहे, त्याचे वर्णन आचार्यांनी सूक्ष्म दृष्टीने केले आहे. निसर्ग कमलांना थंडी सहन होत नाही तर तुझे चरण हिमालयात निवास करतात. निसर्ग कमळे रात्री मिटून जातात तर तुझे चरण अहोरात्र प्रसन्न असतात. साध्या कमळात फक्त लक्ष्मीच वास करते. पण निष्ठेने उपासना करणाऱ्या 'समयी' जनांना तुझे चरण लक्ष्मी किंवा अतिस्पृहणीय निजानंदरूपी ऐश्वर्य समर्पित करतात. देवांगना ज्यावेळी तुझ्या चरणांना नमस्कार करतात, त्यावेळी त्यांची करकमळे कळ्यांसारखी मुकुलित होतात.

खरेच आहे, दिनविकासी कमळांवर चंद्रकिरणे पडली, की ती मिटणारच. असा महिमा असणारे तुझे चरण कल्पवृक्षांना पाहून हसतात. कल्पवृक्ष स्वर्गात राहणाऱ्या देवांचीच इच्छा पूर्ण करतो पण तुझी चरणकमळे पृथ्वीवरच्या दरिद्री लोकांना देखील रात्रंदिवस समृद्धि देत असतात. तुझे चरण रत्नखचित नुपूरानी सुशोभित झाले आहेत. त्यांची छुमछुम म्हणजे राजहंसांना सुन्दर चालीचे धडे देत असताना त्यानी केलेला मधुर ध्वनीच होय ।

श्लोकात आचार्यांनी शरीरसौष्ठवाची सर्व लक्षणे एकत्र वर्णिली आहेत.

*अराला केशेषु प्रकृतिसरला मन्दहसिते*
*शिरीसाभा चित्ते दृषदुपलशोभा कुचतटे ।*

*भृशं तन्वी मध्ये पृथुसरसिजारोहविषये ।*
*जगत्यातुं शम्भोर्जयति करुणा काचिदरुणा ।*

यात परस्पर विरोधी विशेषणे आहेत. पण देवीच्या शरीरात ती सर्व अलंकारभूतच आहेत, असे वर्णन आहे.

आचार्यांनी चंद्राचा देवीशी कसा अद्भुत संबंध जोडला आहे पहा. चंद्र हा एक पाचूचा करंडा आहे त्यांत देवी आपली प्रसाधने ठेवीत असते. चंद्राचा कलंक ही कस्तूरी, जलांश म्हणजे गुलाबजल, पांढरा कलात्मक भाग हा कापूर आहे. जेव्हा देवी त्या वस्तूंचा उपयोग करते, तेव्हा त्या कमी होत जातात, म्हणजे कृष्ण पक्षात चंद्रकलांचा क्षय होतो. ब्रह्मदेव पुन: तो भरतो व शुक्लपक्षांतील चंद्राच्या कलांची वृद्धि होत जाते.

शेवटी आचार्य म्हणतात की, देवी जरी ब्रह्मदेवाची पत्नी सरस्वती, विष्णूची पत्नी लक्ष्मी व रूद्राची सहचारिणी पार्वती असली तरी तिचे यथार्थ स्वरूप या तिन्ही देवतांच्या पलीकडचे आहे. तर ती कोण आहे?

*तुरीया काऽपि त्वं दुरधिगमनि:सीममहिमा ।*

अशा पराशक्तीची सेवा करणारा भक्त इतका भाग्यवान होतो की ब्रह्मा, विष्णू, शिव देखील याचा हेवा करतात कारण–

*चिरं जीवन्नेवं क्षपितपशुपाशव्यतिकर:*
*परानन्दामिख्यं रसयति– रसं त्वद्भजनवान् ।*

हे देवी, तुझ्या चरणकमलांचे तीर्थ सेवन करण्याचे भाग्य मला केव्हा लाभेल?

*प्रकृत्या मूकानामपि च कविताकारणतया*
*कदा धत्ते वाणी मुखकमलताम्बूलरसताम ।*

अशी प्रार्थना करून आचार्यांनी हे ललित मधुर असे जगज्जननीचे स्तोत्र समाप्त केले आहे.

तंत्रासारख्या गूढ शास्त्रीय विद्या देवीच्या स्तुतिरूपाने आचार्यांनी एक सुबोध आणि अमर आकृति तयार केली आहे. त्या आकृतीस रूपक, उपमा, उत्प्रेक्षा या अलंकारांनी नटविले आहे. देवीच्या अलौकिक सौंदर्यांची प्रतीति जाणून देण्याचे दुष्कर काम आचार्यांनी केले आहे. या स्तोत्रांतील सौंदर्यभावना जरी शारीरिक किंवा लौकिक असली तरी देवीच्या पार्श्वभूमीवर तिला एक उच्च आध्यात्मिक समाधानता मिळाली आहे. ब्रह्मसूत्रे, उपनिषदे आदि सैद्धान्तिक ग्रंथावर भाष्य लिहिणारे व तर्ककर्कश भाषेने प्रतिपक्षाचा धुव्वा उडविणारे शंकराचार्य इतके मधुर, अलंकारप्रचुर श्लोक लिहू शकतात यावर सहजासहजी विश्वास बसत नाही. आचार्यांची प्रत्येक पंक्ती 'रमणीयार्थप्रतिपादक' आहे. अन्त:सत्ता ज्यावेळी वर्ण्य विषयाशी एकाकार होते. त्यावेळी एक विशेष सौंदर्याची अनुभूती सहृदयाला होते. हीच रसानुभूति होय, असे स्थूलपणे म्हणावयास हरकत नाही. देवीच्या स्तोत्राच्या मार्गाने उत्कृष्ट रसानुभूति करून देणारे हे स्तोत्र वाचीत असताना सौंदर्याच्या लाटावर विहार करणारे आपण राजहंसच आहोत असे प्रत्येक रसिकास वाटणे, साहजिक आहे.


**– डॉ. प्रमोद ग. लाळे**
६, कमलापार्क सोसायटी, गणेशनगर,
पुणे ४११०३८.
फोन नं. : २५४३४४०७




# शंकराचार्यांचा भक्तियोग

**डॉ. शंकर रा. तळघट्टी**

*एम.ए. पीएच.डी., तत्त्वज्ञानाचे निवृत्त प्राध्यापक, पुणे विद्यापीठ. अनेक इंग्रजी, मराठी लेख प्रकाशित. भारतीय तत्त्वज्ञान व विशेषत: संत वाङ्मयाच्या अभ्यासाची आवड- त्यावर व्याख्याने व व्याख्यानमाला. पीएच्.डी.साठीअनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. प्रकाशित पुस्तके- श्री. ज्ञानदेव विचारदर्शन, चांगदेव पासष्ठी, इंग्रजी भाषांतर व टीपा,* The concept of Moral Obligation *वगैरे.*

***नमस्तस्मै भगवते शंकराचार्यरूपिणे ।***
***येन वेदान्तविद्येयमुद्धृता वेदसागरात् ।। (विद्यारण्य)***

१) वैदिक वाङ्मयाचा अंतिम भाग या अर्थाने उपनिषदांना वेदान्त असे म्हटले जाते. परंतु त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे सनातन वैदिक धर्माला अधिष्ठानभूत असलेल्या वैदिक तत्त्वज्ञानाची परिणती औपनिषद दर्शनात होऊन तत्त्वचिंतनाचे शिखर (अंत) त्यात गाठले असल्याने 'वेदान्त' ही संज्ञा त्यांच्या बाबतीत विशेषत्वे सार्थ ठरते. उपनिषदांमधील तत्वचिंतन हे मुक्त आहे. त्याची तर्कशुद्ध प्रणाली स्वरूपात मांडणी करून 'वेदान्तदर्शन' निर्मिण्याचे श्रेय भगवान व्यासांच्या 'ब्रह्मसूत्रां'ना द्यावे लागते. मात्र हे तर्कप्रधान तत्त्वज्ञान सर्वसामान्य लोकांच्या आकलनाच्या आवाक्यात यावे आणि ते त्यांच्या जीवनाचे अधिष्ठान व्हावे यादृष्टीने एका समग्र जीवनदृष्टीच्या रूपात वेदान्ताची मांडणी केली आहे ती श्रीमद् भगवद्गीतेत. गीता ही 'समस्तवेदार्थसारसंग्रहभूत' आहे असे शंकराचार्य स्वत: सांगतात; तर ''एवं वेदाचे मूळसूत्र । सर्वाधिकारैक पवित्र । श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रगट केलें ।।'' (१८.१४२६), असे ज्ञानेश्वर म्हणतात. तात्पर्य, वेदान्तदर्शनाचे तीन आधारभूत ग्रंथ म्हणून उपनिषदे, ब्रह्मसूत्र आणि भगवद्गीता यांना प्रस्थानत्रयी असे म्हटले जाते. ही जरी वेदान्तदर्शनाची प्रस्थानत्रयी असली तरी वेदान्तदर्शन हे संपूर्ण वैदिक तत्त्वज्ञानाचे परिणत स्वरूप असल्याने तिला भारतीय हिंदू- तत्त्वज्ञानाची प्रस्थानत्रयी मानणे अनुचित होणार नाही. या औपनिषदिक तत्त्वज्ञानाच्या पायावरच भारतीय संस्कृतीची उभारणी झाल्याचे दिसून येते. श्री अरविंदांचे या संबंधातील एक विधान महत्त्वाचे आहे; ते असे- "The Philosophy of the Upanisads is the basis of all Indian religion and morals and to a cosiderable extent of Hindu politics, legislation and Society." (The Philosophy of the Upanisahads, P.1) ही संस्कृती पुरुषार्थ प्रधान आहे. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या पुरुषार्थ चतुष्ट्याच्या रूपातील अभ्युदय- नि:श्रेयस सिद्धीसाठी सर्व दृष्टीने अनुकूल अशी तिची जडणघडण सनातन वैदिक धर्मानुसार करून ऋषि-मुनी, साधु-संत आणि आचार्यादी थोर तत्त्वचिंतकांनी केवळ भारतीयांनाच नव्हे तर मानवमात्राला, आदर्श अशा व्यक्तिगत व सामाजिक जीवनाचा मार्ग दाखवून दिला. म्हणनूच ते आत्मविश्वासाने म्हणू शकले की- ''एतद्देशप्रसूतस्य सकाशात् अग्रजन्मन: । स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्व मानवा: ।।''

२) भारतीय जीवनदर्शनात जरी धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चारही पुरुषार्थांचा स्वीकार केलेला असला तरी मोक्ष हाच परम पुरुषार्थ, अर्थात, जीवनाचे परम-श्रेष्ठ- प्राप्तव्य मानला आहे. त्यालाच नि:श्रेयस म्हणतात. अन्य तीन पुरुषार्थांचा संबंध 'अभ्युदय' या भौतिक सुख स्वरूप जीवन-ध्येयाशी आहे. त्यापैकी 'अर्थ' आणि 'धर्म' हे पुरुषार्थ साधनरूप आहेत तर 'काम' (इच्छापूर्तीचे सुख) हा साध्य आहे. माणूस हा रात्रंदिवस सुखासाठीच तळमळत व धडपडत असतो. मात्र तो विषयसुखालाच सर्वस्व मानून चालतो. पण ते सोपाधिक, परावलंबी आणि नाशिवंत आहे. आणि मुख्य म्हणजे कामना किंवा वासना यांची पूर्णपणे तृप्ती कधीच होत नाही. त्यामुळे वाट्याला शेवटी दु:खच येते. याउलट मोक्ष म्हणजे शाश्वत आणि दु:खलेश रहित आनंद! त्यातच समाधान व शांती लाभते. खरे तर सर्वांना असाच आनंद हवा असतो. परंतु अज्ञानामुळे माणूस सुखासाठी इंद्रियाधीन होऊन दु:खाच्याच वाटेने जातो. निरपेक्ष व निखळ सुख हे मोक्षाचे स्वरूप असल्याने त्याला परम पुरुषार्थ म्हटले आहे. प्रत्येक पुरुषार्थाची मीमांसा करण्यासाठी स्वतंत्र शास्त्र भारतीय विचारवंतांनी निर्माण केले आहे. त्यात मोक्षशास्त्राला श्रेष्ठत्व प्राप्त होणे साहजिक आहे. त्यालाच अध्यात्मशास्त्र किंवा अध्यात्मविद्या म्हटले जाते. उपनिषदात तिला पराविद्या व अन्य सर्व विद्यांना अपराविद्या म्हटले आहे. ''द्वेविद्ये वेदितव्ये-पराचैवापराच । अथ परा यया तद् अक्षरं अधिगम्यते ।'' असे मुंडकोपनिषदात सांगितले आहे. या शाश्वत आनंद स्वरूप मोक्षालाच 'अमृत' ही औपनिषद संज्ञा आहे. ब्रह्म, आत्मा, ईश्वर या शब्दांनी वेदान्तात सच्चिदानंदस्वरूप अक्षर तत्त्वाचाच निर्देश

केला जातो आणि त्याचा साक्षात्कार हेच जीवनाचे परम प्राप्तव्य- मोक्ष असल्याचे सांगून त्याच्या प्राप्तीच्या साधनमार्गाची चर्चा केली जाते. भगवत्पाद शंकराचार्यांनी दशोपनिषदे, ब्रह्मसूत्र आणि भगवद्गीता या वेदान्ताच्या तीनहि प्रस्थानांवर प्रसन्न- गंभीर असे विस्तृत भाष्य लिहून अध्यात्मविद्येचे यथार्थ स्वरूप विशद केले आहे. आत्म्याच्या सत्य स्वरूपाची ओळख करून देणारी, त्याचा साक्षात्कार घडविणारी विद्या म्हणून तिला 'अध्यात्म (आत्मानं अधिकृत्य) विद्या असे म्हटले जाते. 'आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्य:।' असे याज्ञवल्क्य सांगतात. या आत्मज्ञानाची गरज काय हा प्रश्न महत्त्वाचा आहे, कारण त्याचा संबंध परम प्राप्तव्य मोक्षाशी आहे. त्याचे उत्तर असे की आत्म्याविषयीच्या- आपल्या स्वरूपासंबंधीच्या- भ्रांत धारणेमुळेच माणसाला सर्व दु:खे भोगावी लागतात. त्यापासून मुक्ती मिळविण्यासाठी अर्थातच आत्मज्ञानाची नितान्त गरज आहे. 'ज्ञानान्मोक्ष:।' किंवा 'ज्ञानादेव तु-कैवल्यम् ।' हा वेदान्ताचा एतद्विषयक सिद्धान्त आहे. त्यासाठी आत्मानात्मविवेक करणे आवश्यक आहे. मिथ्याज्ञानाला 'अध्यास' अशी आचार्यांची पारिभाषिक संज्ञा आहे. तोच सर्व अनर्थांचे मूळ असल्याने तो समूळ नाहीसा करून आत्म्याच्या एकमेवाद्वितीयत्वाचे यथार्थ ज्ञान करून देण्यासाठीच सर्व उपनिषदे प्रवृत्त झाली आहेत असे शंकराचार्य मानतात - ''अस्यानर्थहेतो: प्रहाणाय आत्मैकत्वविद्या प्रतिपत्तये सर्वे वेदान्ता आरभ्यन्ते ।'' असे ते अध्यासभाष्याच्या अखेरीस म्हणतात. ज्ञानेश्वरही अशाच प्रकारे सांगतात की, ''तैसा आत्मदर्शनी आडळ । असे अविद्येचा जो मळ । तो शास्त्र नाशी, येर निर्मळ । मी प्रकाशे स्वयें ।।'' (ज्ञा. १८-१२३२) तात्पर्य, आत्मा- अनात्मा, किंवा सार-असार यांचा विवेक (समर्थांच्या शब्दांत 'शाश्वत- अशाश्वत यांचा निवाडा) करून शाश्वत, सारभूत अशा आत्म्याचा (परमात्म्याचा) साक्षात्कार करून घेणे हेच मोक्षाचे साक्षात साधन होय. योगाच्या भाषेत या मोक्षमार्गास 'ज्ञानयोग' असे म्हणतात. भगवद्गीतेत ज्ञानयोगाप्रमाणेच कर्मयोग, भक्तियोग आणि राजयोग (ध्यानयोग) यांचीही मोक्षमार्ग या दृष्टीने चर्चा केली आहे. त्यापैकी भक्तियोगाचा पुरस्कार रामानुज, मध्व, वल्लभ, चैतन्य, निंबार्क या आचार्यांनी व ज्ञानेश्वरादी सर्व संतांनी केल्याचे दिसून येते. एक शंकराचार्यच असे आहेत की त्यांनी केवल अद्वैती शुद्ध ज्ञानमार्गाचा पुरस्कार केला आहे. इतर आचार्य हे वेदान्ती असले तरी ते भक्तियोगी आहेत. म्हणूनच त्यांच्या तत्त्वज्ञानाचे विवेचन करणाऱ्या आपल्या ग्रंथाला रामकृष्ण मठाचे स्वामी तपस्यानंद यांनी 'भक्ति स्कूल्स ऑफ वेदान्त' असे नाव दिले आहे. शंकराचार्यांची ज्ञाननिष्ठा सुप्रतिष्ठित आणि सुप्रसिद्ध आहे. तसेच ते केवलाद्वैती वेदान्त तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते म्हणून सर्वज्ञात आहेत. त्यामुळे त्यांच्या तत्त्वज्ञानात भक्तीला काही स्थान आहे का व असल्यास त्याचे स्वरूप काय, हे जाणणे महत्त्वाचे व उपयुक्त आहे. त्यादृष्टीने आपण पुढील विवेचनाकडे वळू.

३) प्रथमत: हे लक्षात घ्यायला पाहिजे की शंकराचार्यांची प्रस्थानत्रयीवरील भाष्ये प्रसिद्ध असली तरी त्यांनी लिहिलेले प्रकरण ग्रंथ व स्तोत्रवाङ्मयही बरेच आहेत व ते त्यांची तात्त्विक भूमिका समजून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. अपरोक्षानुभूति, शतश्लोकी, विवेकचूडामणि, उपदेश-साहस्री, प्रबोधसुधाकर इत्यादी प्रकरणे आणि निर्वाणदशक, उपदेशपंचक, दक्षिणामूर्तिस्तोत्र, हस्तामलक इत्यादी वेदान्तस्तोत्रे व पांडुरंगाष्टक, षट्पदी, कृष्णाष्टक, शिवमानसपूजा इत्यादी भक्तिस्तोत्रे या भाष्येतर वाङ्मयातून आचार्यांचे विचार तर अभिव्यक्त झाले आहेतच, पण त्याचबरोबरच त्यांच्या काव्यप्रतिभेचा सौंदर्यविलासही हृदयंगम स्वरूपात आविष्कृत झाला आहे. त्यांच्या वाङ्मयासंबंधातील विनोबाजींचे एक विधान मार्मिक आहे. त्यांच्या 'गुरुबोधा'च्या प्रस्तावनेत ते म्हणतात, ''शंकराचार्यांनी प्रस्थानत्रयीवरील आपली सुप्रसिद्ध भाष्ये लिहिली नसती तर ते आचार्य झाले नसते. पण त्यांनी ही लघुकाव्ये रचली नसती तर लोकदृष्टीने ते शंकरच झाले नसते.'' (पृ. २) ''नमामि भगवत्पादं- शंकरं लोकशंकरम् । '' या वन्दनेतील 'लोकशंकर' या पदवीला उद्देशून विनोबांचे हे मार्मिक विधान आहे, हे स्पष्ट आहे.

दुसरी गोष्ट म्हणजे, ज्ञानमार्गाचा पुरस्कार करणे याचा अर्थ कर्म, भक्ती आणि योग (ध्यान/आत्मसंयम) यांचे साधना मार्गातील स्थान व महत्त्व नाकारणे नव्हे. विनोबांनीच म्हटल्याप्रमाणे साधनेच्या कल्पनेबाबत शंकर विचारात कुठेही संकुचितता आढळत नाही. तसेच कोणत्याही साधनेचे आचार्य ओझे होऊ देत नाहीत. कारण आत्मसाक्षात्काराच्या सर्वोच्च अवस्थेत सर्वच साधने विलीन होऊन जातात. ज्ञानेश्वरांच्या शब्दांत, त्यांची ती 'विश्राम भूमिका' होय. विचारशीलता किंवा बुद्धी हे माणसाचे व्यवच्छेदक लक्षण असले तरी तो केवळ बुद्धीमान नाही; तो भावनाशील व आचारवानही आहे. विचार, भावना आणि कर्मप्रेरणा ही मानसशास्त्रदृष्ट्या मानवी व्यक्तिमत्त्वाची महत्त्वपूर्ण अंगे आहेत. त्यांच्या सामंजस्यातूनच एकसंध व्यक्तिमत्त्व साकारतं. हीच गोष्ट त्यांच्याशी संबंधित असलेल्या ज्ञान, भक्ती व कर्म या योगांना आणि या सर्वात विहित असलेल्या आत्मसंयम योगाला लागू पडते. या सर्व साधनभूत योगांमध्ये आंतरिक असे अभेद्य नाते आहे. थोडक्यात

हे योग परस्पर व्यावर्तक नसून परस्पर पूरक आहेत.

अद्वैत वेदान्ताचा साधनविचार समजून घेण्यासाठी साध्याचे स्वरूपही ध्यानात घेणे आवश्यक आहे. मोक्षप्राप्ती हे साध्य असल्याचे आपण स्थूलमानाने पाहिले. पण त्याचे स्वरूप काहीशा तपशीलात जाऊन पाहाणे गरजेचे आहे. मोक्ष किंवा मुक्ती म्हणजे बंधनापासून मुक्ती. बंधनाला ग्रंथी (गाठ) म्हणतात. चित्स्वरूप आत्मा आणि जड देह यांची गाठ पडते; हीच चित् जडग्रंथी. देह म्हणजे आत्मा अशी देहात्मबुद्धी हे तिचे स्वरूप. देहाच्या माध्यमातूनच आत्मा साऱ्या दृश्य विश्वाशी बांधला जातो. हेच संसारबंधन दु:खाला कारणीभूत होत असल्याने आनंदप्राप्तीसाठी ते तोडणे आवश्यक ठरते. दृश्य विश्व हे देश, काल आणि वस्तू सापेक्ष, सोपाधिक आणि परिच्छिन्न व सान्त आहे, नश्वर आहे. आणि सुख हा केवळ अनन्त, अक्षर, स्वयंपूर्ण, निरपेक्ष, निरुपाधिक, सजातीय- विजातीय- स्वगत भेद शून्य अशा अपरिच्छिन्न सर्वव्यापक- भूमास्वरूप- तत्त्वाचा स्वभाव आहे. त्यालाच ब्रह्म म्हटले आहे. अर्थात ब्रह्म हे सच्चिदानंद स्वरूप आहे. आत्माही स्वरूपत: ब्रह्मच आहे- ''आत्मा च ब्रह्म।'' म्हणूनच अज्ञानजन्य देहतादात्म्याने जीवभाव धारण करून दु:ख भोगणाऱ्या आत्म्याला आपल्या आनंदस्वरूपाची ओढ असते.खरे तर आनंद हे आत्म्याचे स्वरूपच असल्याने तो कोठून बाहेरून मिळवायचा नसून नित्यप्राप्त असतो. परंतु स्व-रूपाची ओळख विसरून देहादि-विश्वपर्यंत समस्त अनात्म जगताशी मी-माझे या विपरीत धारणेने स्वत:ला बद्ध मानून जीवात्मा दु:ख ओढवून घेतो. यालाच शंकराचार्य 'अनर्थ' म्हणतात आणि त्याचे कारण अज्ञान (आवरण) आणि विपरीत ज्ञान (विक्षेप) स्वरूपाची अविद्या हे मानतात. तात्पर्य, अज्ञानमूलक विपरीतज्ञान (भ्रम) हाच बंध, तर साक्षात्कारस्वरूप- आत्मबोध किंवा आत्मज्ञान हाच मोक्ष- ''ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति।''; किंवा शंकराचार्यांच्या रसाळ शब्दात- ''चिदानन्दरूप: शिवोऽहं शिवोऽहम् ।'' याचा अर्थ आत्मज्ञानाने मोक्ष मिळतो असे म्हणण्यापेक्षा आत्मज्ञान (आत्मानुभूति) म्हणजेच मोक्ष असे म्हणणे अधिक उचित होईल. यालाच आत्मसाक्षात्कार, ब्रह्मसाक्षात्कार व ईश्वरसाक्षात्कार असे म्हटले जाते. आत्म्याच्या ब्रह्मत्वाचा साक्षात्कार असे त्याचे स्वरूप आहे. अक्षरतत्त्व एकच आहे; परंतु शरीराच्या उपाधीच्या उपेक्षेने आत्मा, विश्वकारणतेच्या उपाधीच्या उपेक्षेने ईश्वर आणि निरुपाधिक, गुणातीत स्वरूपदृष्ट्या ब्रह्म असा त्याचा निर्देश केला जातो. श्रीमद् भागवत हा भक्तिदर्शनाचा आधारभूत ग्रंथ आहे. त्यातही या अंतिम सत् तत्त्वाविषयी असेच सांगितले आहे- ''वदन्ति तत् तत्त्वविदस्तत्त्वं यज्ज्ञानमद्वयम् । ब्रह्मेति परमात्मेति भगवानितिशब्द्यते ।।'' (१-२-११) अर्थात, जे एक अद्वय ज्ञानस्वरूप तत्त्व आहे त्याचाच निर्देश तत्त्वज्ञ लोक ब्रह्म, परमात्मा व भगवान या शब्दांनी करतात. आता, साधनांच्या दृष्टीने विचार केला तर वस्तुत: अद्वैत तत्त्व हे कधी साधनाने साध्य होणारे असू शकत नाही, कारण साध्य-साधन-साधक असा त्रिपुटीचा व्यवहार त्याच्या संबंधात होऊ शकत नाही. तीच गोष्ट ज्ञान- व्यवहारालाही लागू आहे, व अन्य कोणत्याही द्वैती व्यवहाराला लागू आहे. अस्तित्व, ज्ञान आणि आनंद या तीनही बाबतीत हे तत्त्व स्वयंपूर्ण किंवा परिपूर्ण आहे व नित्यप्राप्त आहे. ज्ञानाने ते प्राप्त होत नाही तर 'प्राप्त नाही' हा भ्रम नाहीसा होतो. असे जर असेल तर मग शास्त्रात साधनमार्गांची जी मोठ्या प्रमाणावर चर्चा केलेली आहे तिचे प्रयोजन काय असा प्रश्न निर्माण होतो; त्याचे उत्तर जाणणे आवश्यक आहे.

४) ब्रह्मात्मैक्यबोध अंतकरणात किंवा चित्तात सुस्थिर होणे, म्हणजेच- आत्म्याच्या ब्रह्मत्वाचा साक्षात्कार हे मुमुक्षूचे अंतिम प्राप्तव्य असल्याचे आपण पाहिले. परंतु त्यासाठी चित्त (अंत:करण) अत्यंत शुद्ध असणे आवश्यक आहे. मनुष्यमात्राच्या अंत:करणात तीन प्रकारचे दोष असतात ते म्हणजे मल, विक्षेप आणि आवरण. दुष्कर्म आणि दुष्कर्माची वासना यानी चित्त कलुषित होते, मलिन होते. हाच मल-दोष. चित्त, मन, हे अत्यंत चंचल व अस्थिर असते. इच्छा, वासना, विचार इत्यादी प्रबळ मनोवृत्तींमुळे ते एकाग्र किंवा सुस्थिर राहू शकत नाही. यालाच विक्षेप म्हणतात. आणि आवरण म्हणजे स्व-रूपाचे अज्ञान. जोपर्यंत या त्रिदोषांचे निमूर्लन होऊन चित्त चैतन्यात विलीन होत नाही तोपर्यंत आत्मज्ञानाची आशा नाही. यापैकी अज्ञान या मूलभूत दोषाची निवृत्ती ही केवळ ज्ञानानेच होऊ शकते. परंतु मल आणि विक्षेप हे दोष धुवून काढून चित्त शुद्ध करण्यासाठी कर्म, उपासना आणि योग या साधनांची आवश्यकता असते. अद्वैतवेदान्त दर्शनात चार प्रकारच्या साधनांचा स्वीकार आणि विचार केला आहे. ते म्हणजे, अ) कर्मशोधक, ब) करण शोधक, क) पदार्थ शोधक आणि ड) साक्षात. यांनाच अनुक्रमे परंपरा साधन, बहिरंग साधन, अंतरंग साधन आणि साक्षात साधन अशीही नावे आहेत. आचार, भावना आणि विचार या व्यक्तिमत्त्वाच्या तीनही अंगांची शुद्धी करून मुमुक्षूमध्ये ब्रह्मज्ञान योग्यता निर्माण करणे हे पहिल्या तीन प्रकारच्या साधनांचे उद्दिष्ट आहे. अशी योग्यता निर्माण झाली म्हणजे तो साधक ब्रह्म (आत्म) ज्ञानाचा अधिकारी होतो, आणि श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा सद्गुरूंकडून महावाक्यांच्या स्वरूपाचे प्रथम श्रवण, मनन करून परोक्ष ज्ञान प्राप्त करतो आणि निदिध्यासन द्वारा अंती ब्रह्मात्मैक्याची

अपरोक्ष अनुभूती घेऊन सच्चिदानंद स्वरूपी अवस्थित होतो. मुमुक्षू अधिकारी असेल तर केवळ 'श्रवणा' ने तो मोक्षप्राप्त करतो असे काही शास्त्रकार मानतात. शंकराचार्यांनी हा साधनमार्ग आपल्या प्रकरण ग्रंथांमधून व शास्त्राच्या 'अधिकारी' चर्चेमधून स्पष्टपणे मांडला आहे. सद्विचार, सद्भावना आणि सदाचार या तीनही अंगांनी नैतिक चारित्र्यसंपन्न होणे, निष्काम बुद्धीने विहित कर्तव्यकर्मे करून ती ईश्वरार्पण करणे, थोडक्यात 'यज्ञार्थ' कर्मे करून त्यांचे बंधकत्व निर्मूल करणे- ही साधन सोपानाची पहिली पायरी आहे. हे धर्माचरण होय. गीतेची कर्मयोगाची शिकवण ही पायाभूत आहे हे यावरून ध्यानात येईल. त्याचे फलित चित्तशुद्धी हे आहे. शंकराचार्य सांगतात- ''चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये । वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित् कर्मकोटिभिः ।।'' (वि.चू. ११). अर्थात कर्मयोग व धर्म हे परंपरासाधन आहे. उपासना व योगसाधना हे कर्मापेक्षा अधिक अंतरंग व सूक्ष्म साधन आहे. कारण त्यांचा आधार मन हे आहे. तरीही त्यांचा अंतर्भाव परंपरा- साधनातच होतो. धर्मा (कर्मा)पेक्षा उपासना, व उपासनेपेक्षा योग हे अधिकाधिक अंतरंग असले तरी सामान्यपणे ते क्रियारूप असल्याने त्यांना परंपरा साधन मानले आहे.

साधनचतुष्टय म्हणून अधिकारी संबंधात ज्यांची चर्चा केली जाते ते परंपरासाधनापेक्षा अधिक अंतरंग असले तरी श्रवण- मनन- निदिध्यासन या अंतरंग औपनिषद साधनाच्या तुलनेत बहिरंगच म्हणावे लागतात. ते म्हणजे विवेक, वैराग्य, शमदमादि षट्संपत्ति आणि मुमुक्षुत्व. शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान- याना षट्संपत्ती म्हटले जाते. मात्र अज्ञानाची (आवरणदोष) पूर्ण निवृत्ती करणारे साक्षात साधन ज्ञानच आहे. आत्मज्ञान हे सर्व साधनांचे फल आहे.

आत्म्याचे ब्रह्मत्व सांगणाऱ्या, 'तत्त्वमसि', 'अहं ब्रह्मास्मि', 'प्रज्ञानंब्रह्म', आणि अयमात्मा ब्रह्म' या महावाक्यांचा अखण्डार्थ धारण करणारी विकल्परहित बुद्धी हीच आत्मबोधाचे साक्षात साधन होय. ''बोधोऽन्यसाधनेभ्यो हि साक्षान्मोक्षकैसाधनम् ।'' (आत्मबोध -२)

'उपदेशपंचकम्' या प्रकरणात आचार्यांनी संपूर्ण साधनमार्ग क्रमवार मांडून दाखविला आहे. उदाहरणार्थ त्याचा प्रथम श्लोकच पाहा-

*''वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्ठीयताम् ।*
*तेनेशस्य विधीयतामपचितिः काम्ये मतिस् त्यज्यताम् ।*
*पापौघः परिधूयतां भवसुखे दोषोऽनुसंधीयताम् ।*
*आत्मेच्छा व्यवसीयतां निजगृहात् तूर्णं विनिर्गम्यताम् ।।*

आधी 'कर्म', नंतर (किंवा त्याचबरोबर) 'उपासना' आणि शेवटी साक्षात साधन 'ज्ञान' असा हा साधनक्रम आहे. हा क्रम स्पष्टपणे मांडणारी समर्थ रामदासांची एक ओवी महत्त्वाची आहे. ते म्हणतात, ''आधीं तें करावे कर्म । कर्ममार्गे उपासना । उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्षचि पावणें ।।'' (मानपंचक ३-१) ज्ञानेश्वरांनीही 'ज्ञानात् मोक्षः' हे तत्त्व स्वीकारले आहे. ते गीतेविषयी सांगतात, ''एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । यां दोहीं केवळ । साधन ज्ञान ।।'' (ज्ञा. १८-१२४३). परंतु ज्ञान हे साक्षात साधन असले तरी ते धारण करण्याची पात्रता येण्यासाठी मन शुद्ध व्हायला हवे हेही ते आवर्जून सांगतात. ''तैसे मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाही आन । परि तेंचि धारे ऐसें मन । शुद्ध होआवे।।'' (१५-३५). सर्व बहिरंग, अंतरंग व परंपरा साधनांचे प्रयोजन 'ज्ञानधारे ऐसें मन शुद्ध होआवे' हे आहे हे यावरून दिसून येते व शंकराचार्य व मराठी संत यांच्या तत्त्वज्ञानात एकवाक्यता असल्याचेही स्पष्ट होते.

५) शंकराचार्यांना अभिप्रेत असलेल्या व्यापक मोक्षसाधन मीमांसेची येथवर जी मी सविस्तर चर्चा केली तिचा हेतू त्यांच्या भक्तिमीमांसेची भूमिका स्पष्टपणे मांडावी हा आहे. विनोबाजींनी म्हटल्याप्रमाणे आचार्यांची साधन- संकल्पना अत्यंत व्यापक आहे, त्यात यत् किंचितही संकुचितता नाही, हेही त्यावरून दिसून येते. तसेच ज्ञान, भक्ती, कर्म आणि (अष्टांग) योग या चारही योगमार्गांमधील परस्पर संबंधांवरही त्यामुळे प्रकाश पडतो असे मला वाटते. या पार्श्वभूमीवर आचार्यांचा भक्तियोग उठून दिसतो. त्याचे स्वरूप आता पाहू. मुख्यतः त्यांच्या प्रकरणग्रंथांतून व स्तोत्रवाङ्मयातून त्यांचे भक्तिदर्शन विशेषत्वे प्रगट झाले आहे.

भक्तीचे स्वरूप व महत्त्व सांगणारा आचार्यांचा 'विवेक चूडामणि' मधील श्लोक प्रसिद्ध आहे; तो असा- ''मोक्षकारणसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी । स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते ।।' (३२) तिलाच काहीजण 'स्वात्मतत्त्वानुसंधान' म्हणतात. ते पुढे सांगतात- ''स्वात्मतत्त्वानुसंधानं' भक्तिरित्यपरे जगुः।'' (३३) सर्व मोक्षसाधनांमध्ये भक्ती ही श्रेष्ठ आहे; आणि तिचे लक्षण- 'स्वस्वरूपानुसंधान' असे ते करतात. 'स्व'चे किंवा आत्म्याचे स्वरूप 'ब्रह्म' आहे. 'तत् त्वं असि ।' या महावाक्यात ते सांगितले आहे. थोडक्यात- 'अहं ब्रह्मास्मि' चे अखंड अनुसंधान- निदिध्यासन- हे भक्तीचे स्वरूप आहे. त्यामुळे ती सर्व 'मोक्षकारण सामग्री'मध्ये श्रेष्ठ असणे स्वाभाविकच आहे. रामदासांनीही भक्तीची अशीच व्याख्या दिली आहे 'ओवी शतका'त ते सांगतात-

''स्वरूपीं आसक्ति याचे नांव भक्ती । पाहातां विभक्ति जेथें नाहीं ।।' (४-४८). पतंजली मुनीनीही योगाचे फलित म्हणून याच स्थितीचा निर्देश केला आहे- ''तदा द्रष्टुः स्वरूपे अवस्थानम् ।'' (१-३) हेच ज्ञानी माणसाचे 'आत्मदर्शन' होय. याचा अर्थ ज्ञान, भक्ती आणि योग यांचे अंततो गत्वा 'आत्मसंस्थिती' हे स्वरूप समानच आहे. रमणमहर्षी हेच सांगतात- ''हृत्स्थले मन: स्वस्थता, क्रिया । भक्तियोग बोधाश्च निश्चितम् ।।' (उपदेशसार १०)

भक्तीच्या संबंधात एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो तो म्हणजे सद्‌वस्तू ही सगुण आहे की निर्गुण. ज्ञानी आणि भक्त या सर्वांनीच कमी अधिक प्रमाणात परमात्मा हा स्वरूपत: निर्गुण असल्याचे सांगितले आहे. मात्र जगत्कारण स्वरूपात तो सगुण असल्याचेही सांगतात. भक्ती साधनेच्या दृष्टीने उपास्य स्वरूपात तर तो साकारही मानला आहे. ईश्वर- संकल्पना हा चर्चेचा स्वतंत्र विषय आहे. प्रस्तुत चर्चेच्या संदर्भात असे म्हणता येईल की, निर्गुणाची भक्ती होऊ शकत नाही, ते केवळ ज्ञानगम्य आहे. भक्तीसाठी सगुणच स्वीकारावे लागते. आता, भक्तीचेही प्रमुख दोन प्रकार आहेत- गौणी भक्ती आणि परा भक्ती. त्यानाच साधनभक्ती व साध्यभक्ती असेही म्हणतात. पराभक्तीचेही दोन प्रकार भक्तिशास्त्रात सांगितले आहेत- प्रेमलक्षणा व ज्ञानलक्षणा. देवर्षी नारद व शांडिल्यऋषी यांनी आपापल्या भक्तिसूत्रात प्रेमलक्षणा भक्तीची मीमांसा केली आहे. ''सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा'' अशी नारदांनी, तर ''सा परानुरक्तिरीश्वरे'' अशी शांडिल्यांनी भक्तीची व्याख्या केली आहे. शंकराचार्यांनी व माझ्या समजुतीप्रमाणे सर्व मराठी संतांनी, ज्ञानलक्षणा भक्तीची मांडणी आणि मीमांसा केली आहे. जिज्ञासूंनी माझे 'श्रीमद् भागवत आणि मराठी संत' हे पुस्तक अवश्य पाहावे. (पद्मगंधा प्रकाशन, २००६.) भक्ती म्हणजे स्वस्वरूपानुसंधान ही आचार्यांची व्याख्या आपण पाहिलीच आहे. ''पैं माझिये सहजस्थिती । भक्तिनाम ।।'' असे ज्ञानेश्वरही सांगतात. आचार्यांचे गीताभाष्यातील भक्तीचे सर्व विवेचन- हे ज्ञानलक्षणा पराभक्तीचे आहे, आणि तेहि अद्वैतीज्ञानभक्तीचे! गीतेच्या अठराव्या अध्यायातील ''ब्रह्मभूत: प्रसन्नात्मा... '' आणि विशेषत:, ''भक्त्या माम् अभिजानाति...'' या ५४, ५५ व्या श्लोकांवरील शांकरभाष्य आणि ज्ञानेश्वरांची विस्तृत टीका यामध्ये अद्वैती ज्ञानभक्तीचे उत्कृष्ट विवेचन केले आहे. शंकराचार्य सांगतात, ''एवंभूतो ज्ञाननिष्ठो, मद्‌भक्तिं मयि परमेश्वरे भक्तिं, भजनं परां उत्तमां ज्ञानलक्षणां चतुर्थीं लभते, 'चतुर्विधा भजन्ते मां' इति हि उक्तम् ।'' (१८-५४) ज्ञानेश्वरही सागंतात- ''इया ज्ञानभक्ति सहज । भक्त एकवटला मज । तो मीचि केवळ हे तुज । श्रुतही आहे ।।' (ज्ञा. १८.११३०). येथे आचार्यांनी केलेल्या सातव्या अध्यायातील 'चार प्रकारच्या भक्तांचा उल्लेख व ज्ञानेश्वरांनी ११३१ व्या ओवीत स्पष्टपणे केलेला ज्ञानभक्तीचा उल्लेख महत्त्वाचा आहे. ''जे उभवूनिया भुजा । ज्ञानिया आत्मा माझा । हे बोलिलो कपिध्वजा । सप्तमाध्यायीं ।।' पराभक्तीचे वैशिष्ट्य असे की तिच्यात ज्ञान आणि प्रेम एकरूप होतात. ईश्वर हा सर्वांच्या हृदयात आत्मरूपाने वसतो आणि तोच प्रियतम आहे. ''आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ।'' हा औपनिषद सिद्धान्तच आहे. त्यामुळे ईश्वराचे प्रेम म्हणजे चराचर विश्वाच्या अंतर्यामी सर्वात्मैक्याने निवास करणाऱ्या आत्मारामाचे प्रेम हीच भक्ती. येथे एक गोष्ट ध्यानात घेणे आवश्यक आहे, ती म्हणजे 'परमप्रेम' ही सामान्य भाववृत्ती नव्हे, आणि 'परमज्ञान' हे वृत्तिज्ञान (ज्ञानवृत्ति) नव्हे. ते एकाच स्वरूप- स्थितीचे द्योतक आहेत. 'ज्ञान'-संकल्पनेत सच्चिदानंद स्वरूप ब्रह्माच्या / परमात्म्याच्या 'चित्' स्वरूपाला प्राधान्य आहे, तर भक्ति संकल्पनेत प्रिय 'आनंद' स्वरूपाला. सत् हे चिदानंद स्वरूप असल्याने त्यांच्यात भेद नाही. म्हणून आचार्य म्हणतात- ''सेयं ज्ञाननिष्ठा आर्तादि भक्तीत्रयापेक्षया परा चतुर्थी भक्तिरित्युक्ता । (१८-५५) ''स भगवद्‌भक्तियोगो अधुना स्तूयते--।'' येथे 'भक्तियोग' असा स्पष्ट उल्लेखही त्यांनी केला आहे.

(६) अद्वैती ज्ञानभक्तीचा हा आदर्श सामान्य संसारी जनांच्या आवाक्यात सहजी येणार नाही याची पूर्ण जाणीव आचार्यांना आहे. त्यांच्यासाठी त्यानी साधनभूत अशा अर्चनादि अपरा भक्तिप्रकारांचाही पुरस्कार करून अत्यंत रसाळ व भावपूर्ण असे स्तोत्रवाङ्मय निर्माण केले आहे. मुळातच शंकराचार्य हे समन्वयवादी होते. भाष्यांतून त्यांनी दार्शनिक विचारांचा समन्वयच साधला. तद्वत समाजात प्रचलित असलेल्या आचार व उपासना पद्धतींचाही समन्वय साधून सनातन वैदिक धर्माच्या ध्वजाखाली भारतीय समाजाला संघटित केले. त्यासाठी, स्वत: निर्गुणवादी ज्ञानमार्गी असूनही, सगुणालाच नव्हे तर साकारालाही अद्वैत भक्तीत सामावून घेतले व पंचायतन पूजा रूढ केली. शिव, शक्ती, गोविंद, पांडुरंग, सद्‌गुरु इत्यादींची स्तोत्रे- अष्टके म्हणजे हिंदूंच्या स्तोत्रवाङ्मयाचे मुकुटमणी होते.

सर्व संतांप्रमाणेच त्यानीही ''भज गोविन्दं भज गोविन्दं'' असाच संदेश दिला आहे. त्यांच्या संतत्वाची प्रचिती त्यांच्या उदार व 'सर्वभूतहितेरत' अशा चरित्रावरून येते. आचार्य हे मंत्रशास्त्रवेत्ते, श्रेष्ठ योगी होते. तसे तंत्रज्ञ पण होते. आचार्य बलदेव उपाध्याय यांच्या कथनानुसार ते भगवती त्रिपुरा देवीचे अनन्य उपासक होते. पहा- (''श्री शंकराचार्य'' आचार्य बलदेव उपाध्याय. पृ. २९३.)

शांकरमठातून  आजही श्रीविद्यानुकूल देवीची पूजा परंपरेने चालत आलेली दिसते. आचार्यांचे 'सौंदर्यलहरी' हे स्तोत्र त्यासाठीच प्रसिद्ध आहे. भक्ती ही सारी सगुण- साकाराच्या उपासनेच्या स्वरूपाची आहे; त्यामुळे तिला देव-भक्त या द्वैताची अपेक्षा आहे असे मानले जाते. आचार्यांनी त्याचीही थोडी सोय आपल्या 'षट्पदी' या स्तोत्रात केली आहे. ते म्हणतात,

*''सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वं ।*
*सामुद्रो हि तरंग: क्वचन समुद्रो न तारंग: ।।*

'देव आणि भक्त' यांच्यामधील 'समुद्र आणि तरंग' या सम असलेल्या स्वरूप संबंधाचा येथील उल्लेख 'अद्वैता'ची शोभा वाढविणारा आहे यात संशय नाही. याच अर्थाच्या ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवातील एका सुरेख ओवीचे येथे अपरिहार्यपणे स्मरण होते. ती ओवी अशी,

*''अहो ऐक्याचे मुदल न ढळे ।*
*आणि साजिरेपणाचा लाभु मिळे ।*
*तरी स्वतरंगांची मुकुळें । तुरंबु कां पाणी ।। (१-५१)*

आचार्यांच्या स्तोत्रांमधील  ज्ञान-भक्ती-कर्म-योग या चारही मोक्षमार्गांना कवेत घेऊन झालेला भावाविष्कार इतका हृदयंगम व आनंददायी आहे की त्याचे वर्णन शब्दात करणे शक्य नाही; त्याचा आस्वादच घ्यायला पाहिजे.

शंकराचार्यांचे भक्तीविषयक विचार एकत्रित असे क्वचित आढळतात. याला एक अपवाद आहे तो 'प्रबोधसुधाकर' या प्रकरण ग्रंथाचा. त्यातील भक्तिदर्शनाचा थोडक्यात परिचय करून घेऊ. चित्त पूर्णतया शुद्ध झाल्याशिवाय आत्मबोधाचा उदयही होत नाही व तो अंत:करणात सुस्थिरही होत नाही, आणि चित्तशुद्धी हरिभक्तीविना होत नाही- ''शुध्यति हि नान्तरात्मा  कृष्णपदांभोज भक्तिमृते ।'' (१६७) ही भक्ती दोन प्रकारची आहे. स्थूला आणि सूक्ष्मा. स्थूल भक्ती केल्याने फलत: सूक्ष्म भक्ती निर्माण होते- ''स्थूला सूक्ष्मा चेति द्वेधा हरिभक्तिरुद्दिष्टा।'' (१७१)  आणि- ''एवं कुर्वति भक्तिं कृष्णकथानुग्रहोत्पन्ना । समुदेति सूक्ष्मभक्तिर् यस्या हरिरंतराविशति ।। (१७५). ब्रह्माची मूर्त आणि अमूर्त अशी दोन रूपे आहेत असे श्रुतिवचन आहे. त्याना अनुसरून सगुण-निर्गुण ईश्वर आणि त्याची स्थूला- सूक्ष्मा भक्ती यांचे विवरण शास्त्रात केले आहे. 'प्रबोधसुधाकर' प्रकरणात श्रीकृष्णभक्ती व कृष्णचरित्र यांचा विशेषत्वे उल्लेख आहे. तेथे आचार्य सांगतात की जो गुणातीत परात्मा आहे तोच स्वमायाशक्तीने सगुण-साकार होऊन अलौकिक लीला करतो. ''भूतेष्वंतर्यामी ज्ञानमय: सच्चिदानंद: । प्रकृते: पर: परात्मा यदुकुलतिलक: स एवायम् ।।'' (१९५). ''सगुण निर्गुण एकु गोविंदु रे!'' हाच त्याचा आशय. त्याला पाहण्यासाठी- जाणण्यासाठी- ज्ञानदृष्टी हवी, दिव्यचक्षू हवेत. ईश्वराच्या विश्वात्मकतेचे ज्ञान हीच खरी सूक्ष्म भक्ती- ''सत्यं समस्त जंतुषु कृष्णस्य आवि: स्थितेर्ज्ञानम् ।''(१७७). ज्ञानेश्वरांच्या शब्दात- ''हें समस्तहि श्रीवासुदेव । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भाव । म्हणोनि भक्तामाजीं राव । आणि ज्ञानिया तोचि ।।'' (७-१३६) कारण अद्वेष्टादि सर्व भक्त लक्षणे या सर्वात्मज्ञान दृष्टीतूनच निष्पन्न होतात. शंकराचार्यांच्या भक्तियोगाचे सारहि 'सर्वं खलु इदं ब्रह्म' या परमार्थसत्याचा साक्षात्कार हेच आहे. श्रेष्ठ भक्ताचे लक्षण आचार्य सांगतात-

*''जंतुषु भगवद्भावं भगवति भूतानि पश्यति क्रमश: ।*
*एतादृशी दशा चेत् तदैव हरिदासवर्य: स्यात् ।।'' (१८३)*

तात्पर्य, जीव आणि जगत यांना व्यापून उरणाऱ्या परब्रह्म परमेश्वराचा आत्मत्वाने आनंदस्वरूप साक्षात्कार म्हणजे पराभक्ती. हीच अद्वैती ज्ञानभक्ती. आचार्यांच्या भक्तियोगाचे स्वरूप हे असे सर्वंकष, सर्वयोगसमन्वित आहे. आचार्यांच्या विचारातच नव्हे तर एकूणच जीवनात ज्ञान- भक्ती- कर्म- योग हे सर्वच एकासनी विराजमान झालेले दिसतात. असे जीवनच खऱ्या अर्थाने 'महायोग पीठ' होय. या महायोग पीठावरच परब्रह्मलिंग व आनन्दकन्द असा पांडुरंग सम(त्व)-चरण ठेवून सत्- चित् करांनी आत्मानंदरूपी कटी दृढ धरून नित्य उभा असतो. त्याच्या दर्शनसुखाचा- साक्षात्काराचा- लाभ सर्व मुमुक्षु- साधक भक्तांना व्हावा यासाठी शंकराचार्यांनी अक्षर-वाङ्मय निर्माण करून व स्वत:च्या चरित्राने आदर्श ज्ञानभक्ताच्या जीवनाचा वस्तुपाठ देऊन 'लोकशंकर' ही पदवी सार्थ केली व  ते भगवत्पाद म्हणून मान्यता पावले. 'श्रुति स्मृति पुराणानां आलयं करुणालयं' तर ते होतेच. म्हणून त्यांच्या वन्दनेच्या प्रसिद्ध श्लोक मंत्राने ही शब्दपुष्पांजली मी त्यांच्या चरणी अर्पण करतो-

*''श्रुतिस्मृतिपुराणानां आलयं करुणालयम् ।*
*नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम् ।।''*

इति शम् ।

**प्रा. डॉ. शंकर रामचंद्र तळघट्टी**
'चैतन्य', प्लॉट २, गणंजय सोसायटी, युनिट १,
कोथरूड, पुणे - ४११०३८.
फोन : २५३८०००२



# आद्य शंकराचार्य आणि अद्वैतवाद

(ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापर:)

**श्री. शाम रघुनाथ साखरे**

*बी.कॉम., हिंदी प्रवीण, निवृत्त राष्ट्रीयीकृत बँक अधिकारी.*
*निरनिराळ्या विषयांवर व्याख्याने, प्रवचने. शुकताल, नैमिष्यारण्य, पुष्कर, वृंदावन, मथुरा येथे भागवत पारायणासाठी भक्तांना घेऊन जातात. १९९६ साली मिरज येथे दासबोध मंडळाची स्थापना*

आद्य शंकराचार्य हे भारतीय तत्त्वज्ञान क्षेत्रातील महान अध्वर्यू होत. ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापर: । (ब्रह्म हेच अंतिम सत्य आहे, जग हे मिथ्या (म्हणजे अंतिम सत्य नसलेले ) आहे आणि जीव हा ब्रह्माहून भिन्न नाही. अर्थात् जीवात्मा व परमात्मा यांचे अद्वैत आहे असा ठाम सिद्धांत मांडणारे, प्रतिपादन करणारे ते श्रेष्ठ आचार्य आहेत.

इसवी सन आठव्या शतकात त्यांचा अवतार झाला. केरळ राज्यात अळवाई नदीच्या काठावर असलेल्या निसर्गरम्य अशा कालडी गावात त्यांनी धर्मज्ञ, सुसंस्कृत असलेल्या शिवगुरू आणि विशिष्ठादेवी या माता-पित्यांच्या पोटी जन्म घेतला. हा शंकराचार्यांचाच अवतार होता. कारण यांचे सर्व ज्ञान स्वयंभूच होते. वयाच्या तिसऱ्या वर्षीच पुराणे, महाभारत, रामायण अनेक धर्मग्रंथ याचा त्यांनी सखोल अभ्यास केला. याच लहान वयात वडील शिवगुरू यांचे निधन झाले आणि शंकराचार्य पितृसुखाला पारखे झाले.

पुढच्या दोन वर्षात त्यांनी चार वेद, उपनिषदे, सहा शास्त्रे, धर्मशास्त्र अशा अनेक शास्त्रांचा सर्वांगीण अभ्यास करून पूर्ण ज्ञानप्राप्ती करून घेतली. श्री शिवशंकराचा अवतार असल्यामुळे प्रतिभा संपन्नता, विवेक विवेचनशक्ती, विचारशक्ती त्यांना प्राप्त झाली होतीच.

अत्यंत ज्ञानसंपन्न असल्यामुळे प्राप्त झालेले ज्ञान सर्वसामान्यांपर्यंत पोहचवून धर्मजागृती करण्यासाठी त्यांना संसारात अडकून पडणे मान्य नव्हते. संन्यासग्रहण करून धर्मप्रसार करण्याच्या तयारीत असताना त्यांना मातृहृदय परवानगी देत नव्हते. पण अळवाई नदीत मगराने आपला पाय धरला याचा फायदा घेऊन, संन्यास ग्रहणास आईची परवानगी घेऊन आपला पाय अलगद मगराचे मुखातून सोडवून घेतला. व संन्यास ग्रहण केला. त्यावेळी त्यांचे वय सहा वर्षांचे होते.

संन्यासग्रहण करून, आपली कुलदेवता केशवदेव यांचे मनोभावे दर्शन घेऊन, आईचा, अन्य सुहृदांचा निरोप घेऊन शंकराचार्य धर्मप्रसारासाठी कालडीचा निरोप घेऊन उत्तरेचा मार्ग चालू लागले. पायी चालत बारा ज्योतिर्लिंगापैकी नर्मदाकाठी असलेल्या ओंकारनाथ क्षेत्रात आले. तेथून जवळच असलेल्या एका गुहेत प.पू. गोविंदपादाचार्य ध्यान जप तप करीत अनेक वर्षे रहात होते. त्या गुहेत जाऊन समाधी अवस्थेमध्ये असलेल्या प.पू. गोविंदपादाचार्यांचे दर्शन शंकराचार्यांनी घेतले आणि त्यांच्या चरणी पूर्ण शरणागती पत्करली. शंकराचार्य धन्य धन्य झाले. प. पू. गोविंदपादाचार्यांनी या लहान बालकाला प्रेमाने छातीशी धरले आणि दीक्षा दिली. अनुग्रह दिला. ज्येष्ठ गुरू आणि श्रेष्ठ शिष्य यांचे सुंदर मनोमीलन झाले. गोविंदपादाचार्यांकडून थोड्याच अवधीत शंकराचार्यांनी हठयोग, राजयोग, ज्ञानयोग, कर्मयोग, भक्तीयोग तसेच परमार्थ मार्गातील सर्व विद्या शिकून त्यात ते पारंगत झाले.

आपल्या या शिष्याची एवढ्या लहान वयातील ही प्रगती पाहून प.पू. गोविंदपादाचार्य प्रसन्न झाले आणि त्यांनी शंकराचार्यांना आज्ञा केली की, वैदिक धर्माच्या पुनस्स्थापनेसाठी तुझा अवतार झाला आहे. आज धर्माला जी अवकळा प्राप्त झाली आहे त्याला उर्जितावस्था आणून अद्वैतब्रह्मज्ञानाच्या मार्गावर सर्व समाजाला आणून सोड. वेदव्यासांच्या ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहून अद्वैत वेदांताला तू वैभव प्राप्त करून दे. गुरूआज्ञा शिरोधार्य मानून शंकराचार्यांनी आपल्या कार्यास सुरुवात केली.

इसवी सन आठव्या शतकात ज्यावेळी शंकराचार्यांचा अवतार झाला त्यावेळी वैदिकधर्माला अवकळा प्राप्त झाली होती. बौद्ध धर्माचा सर्वत्र प्रसार व प्रचार झाला होता. मतामताचा गोंधळ होऊन जिकडे तिकडे प्रचंड गडबड चालू होती. याचवेळी भारतात इस्लामच्या अनुयायांचे सशक्त आणि सावेश आक्रमण सुरू होते. याला थांबवण्याची, प्रतिकार करण्याची शक्ती बौद्ध अनुयायात बिलकूल नव्हती. वेदविद्या, पुराणे, उपनिषदांची परंपरा नष्ट होण्याच्या मार्गावर होती. वैदिक धर्मातील अनेक संप्रदाय आपले

स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करण्याचा नेटाने प्रयत्न करीत होतेच. पण वैदिकधर्मापासून फटकून वागत होते. गणेशसांप्रदाय, शैव सांप्रदाय, वैष्णवसांप्रदाय, नाथसांप्रदाय, दत्तसांप्रदाय, देवीसांप्रदाय एकमेकांत स्पर्धा, भांडणे, वैरभाव करून आपल्या मातृधर्माची, हिंदुधर्माची शक्ती कमी करीत होते. हिंदुधर्माची दुर्दशा झाली होती.

या सर्व गोष्टींचा अभ्यास करण्यासाठी, हिंदुधर्माला पुन: प्रतिष्ठित करण्यासाठी शंकराचार्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. आणि या लहानवयातच त्यांनी भारतभ्रमण करण्यास सुरुवात केली. भारतभ्रमण काळात काशी क्षेत्रात आले असताना प्रत्यक्ष काशी विश्वेश्वराचे त्यांना दर्शन झाले. आणि ''सर्वं खत्विदं ब्रह्म' याची अनुभूती आली. त्याचवेळी 'महादेवमेकं स्मरामि, स्मरामि' या स्तोत्राची त्यांच्याकडून उत्स्फूर्तपणे रचना झाली.

त्या काळातील अत्यंत अवघड अशा उत्तर प्रदेशातील आणि हिमालयातील यात्रा त्यांनी पूर्ण केल्या.

यात्रा काळातच ब्रह्मसूत्रे, बारा उपनिषदे, विष्णुसहस्रनाम अशा पंधरा-सोळा ग्रंथांवरील भाष्यं त्यांनी अभ्यासली. उत्तर काशीत त्यांचा मुक्काम असताना प्रत्यक्ष व्यासमुनींनी त्यांना दर्शन दिले.

शिष्यपरिवार वाढवणे, मठ स्थापन करणे, अद्वैताचा प्रचार वाढविण्यासाठी पूर्व-पश्चिम-दक्षिण-उत्तर अशी भारतयात्रा पूर्ण केली. यात्रा करीत असताना आई मृत्यूशय्येवर आहे हे त्यांनी अंर्तज्ञानाने जाणले आणि घरी येऊन मातेला दर्शन दिले. मातेने जगाचा निरोप घेतला. ते सर्व कार्य उरकून शंकराचार्य परत धर्मकार्यासाठी बाहेर पडले.

भारताची यात्रा करताना पंचायतन पूजा, पंचमहायज्ञ, हिंदुधर्माची महती समाजाला सांगून धर्माची सर्वद्वारे त्यांच्यासाठी मुक्त करून हिंदू एकात्मतेचा पाया घातला. शिवाय हिंदुधर्माची पताका उंच उभारून धरली यात संशय नाही. भारतभ्रमण काळात त्यांनी शैव, शाक्त, वामाचारी, यमोपासक अशांचा वादात पराभव केला. आणि अद्वैत वेदांताचा सर्वत्र प्रसार केला.

बौद्ध, जैन धर्म त्यावेळी भारतात पसरला होता. त्यांचा संपूर्ण पराभव करून शुद्ध आत्मज्ञान आणि आत्मानुभाव यांचा उपदेश करून हिंदुधर्माची पुन्हा नव्याने खरी ओळख समाजाला करून दिली. या महान कार्यामुळे भारतातील पवित्र नद्यांचे काठ, मठ, मंदिरे, सामान्य जनता 'ब्रह्म सत्यंच्या' खऱ्या विचाराने भारावून गेली.

नारायण, ब्रह्मा, वसिष्ठ, शक्ती, पराशर, व्यास, शुकदेव, गौडपादाचार्य, गोविंदपादाचार्य अशी परंपरा लाभलेल्या शंकराचार्यांनी अद्वैत प्रसाराचे कार्य चिरस्थायी व्हावे म्हणून भारतात व भारताच्या चारी बाजूस मठांची स्थापना केली आणि शिष्य परंपरा चालू केली. सांप्रदायाशिवाय कोणत्याही विद्येला अथवा साधनेला स्थायीरूप प्राप्त होत नाही. वेदांतसाधनेचा आदर्श सगळ्या जगाचे संपूर्ण कल्याण करणारा आदर्श आहे. म्हणून तो या जगात सुप्रतिष्ठत करणे आणि लोकांत, जनसामान्यात रुजवणे अत्यंत महत्त्वाचे आहे असे त्यांचे ठाम मत होते.

**अद्वैत तत्त्वज्ञान**

अद्वैत तत्त्वज्ञान शंकराचार्यांनी स्वत: निर्माण केले नाही किंवा शोधून काढले नाही. अद्वैत वेदांत हे मत अतिप्राचीन आहे. शंकराचार्यांना ते गुरुपरंपरेने मिळाले. त्याचा त्यांनी प्रसार व प्रचार केला. अद्वैत तत्त्वज्ञान किंवा वेदांत म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाचा प्राण आहे. वैदिक कालखंडापासून आजपर्यंत अद्वैत तत्त्वज्ञानाचा अन्वयार्थ लावणारी आचार्य व संतांची अखंड परंपरा भारत देशांत चालत आलेली आहे. या पुढेही चालणार आहे. मात्र शंकराचार्यांनी अद्वैताची ध्वजा अशी काही उंच उभारून धरली की, अद्वैत तत्त्वज्ञान म्हणजे आद्य शंकराचार्य आणि आद्यशंकराचार्य म्हणजे, अद्वैत तत्त्वज्ञान असे समीकरणच सर्वत्र प्रस्थापित झाले. आचार्य शंकराचार्यांनी वेदांतधर्माला विज्ञानाच्या आणि तर्काच्या सुदृढ पायावर उभे केले आहे.

महर्षि बादरायण व्यासांनी ब्रह्मसूत्राची रचना करून अद्वैतवादाला एक दर्शन म्हणून सुप्रतिष्ठित केले. नंतर त्यांनी आपल्या पुत्राला, शुकदेवांना त्याची शिकवण दिली. शुकदेवांनी ते सर्वज्ञान आपला शिष्य गौडपादाचार्य यांना दिले. गौडपादाचार्यांनी ते गोविंदपाचार्यांना दिले. गोविंदपादाचार्यांनी ते शंकराचार्यांना दिले. शंकराचार्यांचा अवतारच अद्वैत ब्रह्मज्ञानाचा प्रचार जगभर करण्यासाठी होता.

नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभाव, सत्यज्ञानानंदात्मक निर्गुण निष्क्रिय ब्रह्म हीच एकमात्र सत्य वस्तू आहे. बाकीचे सगळे भासमय, (भ्रामक) माया आहे. ब्रह्मावाचून जे काही दिसते ते खोटे आहे. ही भ्रमात्मक अवस्था मोठी अद्भूत आहे. ती सत्यही नाही आणि असत्यही नाही. ती अनिर्वचनीय भगवत्भक्ती आहे.

ब्रह्म कसे आहे यांचे समर्थ रामदासस्वामी वर्णन करतात. ते निर्गुण, निराकार, निर्विकार, निरवयव, निरंजन, निर्विकल्प, निराभास, निष्प्रपंच, निराधार, निरामय, निरुपाधिक, नित्संग, नि:शब्द, निर्दोष, निष्कर्ष, निर्लेप, अनात्म, अजन्म, अनंत, अप्रत्यक्ष, अगणित, अरूप, अलक्ष, अपार, अढळ, अतर्क्य, अद्वैत, अच्युत, अच्छेद, अदृश्य, अक्लेद असे आहे. आत्मा हे एक अंतिम तत्त्व आहे. त्यालाच परमात्मा, परपुरुष, ब्रह्म अशा नावाने संबोधले जाते. थोडक्यात ब्रह्म हे मानवी कल्पनेच्या पलिकडे

आहे. त्याचे स्वरूप आत्मप्रचीतीच्या प्रकाशातच समजते. त्याची अनुभूती यावी लागते, घ्यावी लागते.

आचार्य शंकराचार्यांनी अद्वैतमताचा प्रचार, प्रसार करताना प्रतिपादन केले की ब्रह्मज्ञानाने बुद्धी सम झाल्यावर त्याचे हातून कोणतेच पाप घडणे शक्य नाही असा भगवद्‌गीतेचा सिद्धांत आहे. मी, तू किंवा डोळ्यास दिसणारे जगत् म्हणजेच सृष्टीतील अनेक पदार्थ खरे नसून या सर्वात एकच शुद्ध व नित्य परब्रह्म भरलेले आहे. आणि त्याच्या मायेने मनुष्याच्या इंद्रियास नानात्वाचा भास होत असतो. तसेच मनुष्याचा आत्माही मुळात परब्रह्मरूपीच असतो. आत्म्याच्या व परब्रह्माच्या या ऐक्याचे पूर्ण ज्ञान म्हणजे 'अद्वैतवाद' असे म्हणतात.

एका शुद्ध, बुद्ध, नित्य व मुक्त परब्रह्माखेरीज दुसरी कोणतीही स्वतंत्र व सत्य वस्तू नाही. डोळ्यांना दिसणारी विविध दृश्ये हा मानवी दृष्टीचा भ्रम आहे किंवा मायेच्या उपाधीमुळे होणारा आभास आहे. माया ही दुसरी खरी व स्वतंत्र वस्तू नाही. ती मिथ्या आहे असे या सिद्धांताचे तात्पर्य आहे.

डोळ्यांना दिसते तेवढेच सत्य हे सत्याचे लौकिक व सापेक्ष लक्षण खरे न मानता, जे अविनाशी म्हणजे इतर गोष्टी नाहीशा झाल्या तरी जे कधीच नाहीसे होत नाही तेच सत्य किंवा ब्रह्म होय **(सर्वोपनिषद)**

***सत्यं नामाऽव्ययं नित्यमविकारि तथैवच ।***

जे अव्यक्त म्हणजे कधीही नाश न पावणारे, नित्य म्हणजे कायम राहणारे आणि अविकारी म्हणजे ज्याचे स्वरूप कधीही पालटत नाही तेच सत्य होय. असे सत्याचे लक्षण महाभारतात दिले आहे **(महाभा.शां. १६२.१०)** डोळ्यांना दिसले तरी क्षणोक्षणी बदलणारे नामरूप खोटे व त्यांनी आच्छादिलेले व त्यांच्या बुडाशी सदैव एकसारखे राहणारे अमृततत्त्व (ब्रह्म) तेवढेच (डोळ्यांना न दिसले तरी) खरे सत्य होय असे म्हणणे भाग पडते. भगवद्‌गीतेत 'य: स सर्वेषु भुतेषु नश्यत्सु न विनश्यति' (८-२०)

सर्व पदार्थ अर्थात सर्व पदार्थांची नामरूपात्मक शरीरे नाहीशी झाली तरी जे नाहीसे होत नाही ते अक्षर ब्रह्म होय. पिंडी व ब्रह्मांडी मिळून सर्वत्र तेच भरून राहिलेले आहे असा अद्वैत सिद्धांत आहे.

***सर्वं खल्विदं ब्रह्म ।*** (सर्व जग हे ब्रह्म आहे)

अद्वैतानुभूती ही सर्व साधनांची अंतिम अवस्था आहे. त्यामुळे त्या अवस्थेचा मार्ग शंकराचार्यांनी सुलभ केलाच परंतु मुख्य म्हणजे सर्व भावमय वैदिक धर्माची त्यांनी पुन:स्थापना केली. अद्वैत ब्रह्मज्ञानाचे अधिकारी फार थोडे लोक असतात. तो अधिकार मिळविण्यासाठी मन विशुद्ध आणि निर्मळ करावे लागते. हे शुद्धीकरण भगवंताची विविध रूपे, भाव आणि शक्ती प्रगट करणाऱ्या देवदेवतांचे पूजन केल्याने घडते. अशा परिशुद्ध आणि पवित्र मनातच अद्वैत ब्रह्मतत्त्व प्रतिबिंबित होते. ही प्रक्रिया घडविण्यासाठी शास्त्रात पूजाअर्चा, द्वैतभाव वगैरे गोष्टी वर्णिल्या आहेत. हे सर्व लक्षात घेऊन शंकराचार्यांनी लोककल्याणासाठी भ्रष्ट तीर्थस्थानांना शुद्ध केले. त्यांना संस्कारक्षम बनवले. त्यांनी स्वत: विभिन्न तीर्थक्षेत्री जाऊन योग्य ती धर्मकर्मे केली आणि स्थानमहिमा वाढविला. त्यांनी अगणित स्त्रिया-पुरुषांना देवपूजेचे महत्त्व समजावून सांगितले आणि त्यांच्या मनात पूजाअर्चेविषयी श्रद्धा निर्माण केली.

शंकराचार्य अद्वैतमतवादी होते पण त्यांच्यासाठी कोणत्याही प्रकारची संकीर्णता नव्हती आणि दुराग्रह तर मुळीच नव्हता. अद्वैत तत्त्व सर्वांना रूचू पचू शकत नाही, ते येरा गबाळ्याचे काम नाही याची त्यांना पूर्ण कल्पना होती. म्हणूनच लोकांच्या ठिकाणी तो अधिकार येण्यासाठी ते सर्व सामान्यांना पूजा, उपासना, जप-तप यासाठी प्रोत्साहीत करीत असत. आचार्यांनी वेदांची हरवलेली प्रतिष्ठा पुन्हा मिळवून दिली. हिंदुधर्मात शिरलेले दोष त्यांनी काढून टाकले. सर्व पंथांना त्यांनी सुसंस्कारित केले. त्यांनी सर्वांना खऱ्या अर्थाने वेदानुयायी बनवले.

सगुण ब्रह्माची उपासना व विविध मतानुसार करावयाच्या साधना साधकाने शास्त्रानुसार कशा केल्या पाहिजेत, सकाम भावनेने त्याचे अनुष्ठान केल्यास कामनेप्रमाणे विविध लोकांची फलप्राप्ती कशी होते आणि तेच काम निष्काम भावनेने केल्यास चित्तशुद्धी कशी होते वगैरेसंबंधी त्यांनी विस्तृत विवेचन केले. शुद्ध चित्त साधकाच्या अंत:करणात सच्चिदानंदरूप अद्वैत ब्रह्माचा परमप्रकाश उदित होतो तेव्हा विभिन्न मतानुसार केली जाणारी साधना म्हणजे अद्वैत ज्ञानाप्रत पोहोचवणारी एक प्रकारची शिडीच आहे.

**मूळ मायेचा विचार**

मायेची संकल्पना प्राचीन असून वैदिक वाङ्मयात मायेचे सर्वत्र उल्लेख आहेत. 'माया' या संज्ञेचा कर्ता म्हणून नाव कुणाचे घेतले जाते. परंतु ते योग्य नाही. गूढ व अव्याख्येय शक्ती या अर्थाने ऋग्वेदात माया शब्द आला आहे. 'मायां तु प्रकृति विद्यान्मायिनं तु महेश्वरम् । तस्यावयवभूतैस्तुव्याप्त सर्वामिदं जगत् । (श्वे. ३-४.१०) असा मायेचा स्पष्ट उल्लेख श्वेताश्वतर उपनिषदात आला आहे. त्याचेच प्रतिपादन शंकराचार्य करतात. माया ही प्रकृती असून मायापती ईश्वरच आहे. ईश्वराची सर्जकशक्ती म्हणजे माया होय.

माया ही ब्रह्माची शक्ती होय. ती भौतिक व जड आहे. माया अनादी असली तरी सत्य मात्र नाही. ती अज्ञान आणि विपरीत ज्ञान अशी दोन्ही आहे. ती अवर्णनीय आहे. ती सत्यही नाही आणि

असत् ही नाही. म्हणजेच ती 'सद्सद्निर्वचनीय' आहे. ती भासरूप आहे. त्यामुळे ती केवळ व्यावहारिक वा सापेक्ष सत्ता आहे. ती अध्यासरूप आहे. दोरीचे ज्ञान होताच दोरीच्या जागी दिसणारा सर्प नाहीसा होतो. त्याप्रमाणे विद्येच्या उदयाने माया नाश पावते.

ही स्थूल, सूक्ष्म सृष्टी उत्पन्न करणारी जी शक्ती तिला अव्यक्त असे नाव आहे. हीच परमेश्वराची शक्ती होय (शक्ती म्हटली की शक्तिमान हा आलाच म्हणून येथे ही शक्ती परमेश्वराची शक्ती असे सांगितले आहे.) हिलाच 'अनादि अविद्या' असे म्हणतात. हिचे घटक सत्त्व, रज, तम हे तीन गुण आहेत. ही मनुष्याच्या आकलना पलीकडील आहे, पण प्रत्यक्ष कार्य जे झालेले दिसते त्यावरून तिचे अनुमान बुद्धिमान पुरुषाला करता येते. या माया शक्तीनेच सर्व जग निर्माण केले आहे.

माया सत्य नाही, असत्य नाही किंवा उभयरूप नाही. ती ब्रह्मापासून वेगळी नाही. ती सावयव नाही तशीच निरवयवही नाही किंवा सावयव व निरवयव अशी उभयरूप नाही. तिचे रूप अत्यंत अद्‌भूत असून ते शब्दात सांगता येण्यासारखे नाही. (विवेकचूडामणी १०९)

जी तात्कालिक आणि भासमान असते, जी सान्त आहे ती माया अशी मायेची नामव्युत्पत्ती. मायपंचक स्तोत्रात मायेचे स्वरूप अशा प्रकारे उलगडले आहे. शुद्ध सच्चिदानंदस्वरूप आत्म्याच्या ठिकाणी जीवात्मा, परमात्मा आणि जग असा भेदभाव जी घडवून आणते तीच ही अघटीत घटना घडवून आणण्यात कुशल असलेली माया होय.

शेकडो वेदग्रंथाचे आणि वेदांताचे संशोधन करण्यात निष्णात असलेल्या मोठमोठ्या विद्वानांनाही वित्तवैभवाचे प्रलोभन दाखवून त्यांची बुद्धीही ती ताबडतोब कलुषित करते आणि त्यांना पशू बनवते. आणि पशूप्रमाणे विद्वानांनाही धनिकांच्या येथे जी राबावयास लावते तीच माया होय.

आत्मा हा तत्त्वत: नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त स्वभावाचा आहे. पण असे असूनही त्या आत्म्याच्या ठिकाणी हा ब्राह्मण, हा क्षत्रिय, हा वैश्य, हा शूद्र, हा विद्वान हा मूर्ख हा श्रीमान हा दरिद्री असा भेदभाव जी निर्माण करते तीच माया होय. ही माझी बायको, ही माझी मुले, हे माझे घर, शेत असा मोहही या आत्म्याच्या ठिकाणी माया निर्माण करते. जिचा थांगपत्ता काहीच लागत नाही. पण अकल्पित घटना आपल्यापुढे आणून जी उभी करते तीच माया होय.

माया म्हणजेच अविद्या किंवा अज्ञान आहे पण ब्रह्म जर एकमेव अंतिम सत्य असेल तर अनेकत्व प्रत्ययाला येणाऱ्या जगाचे काय असा प्रश्न निर्माण होतो. याचे उत्तरही लगेच दिले आहे.

ब्रह्म हे एकच परमार्थसत्य आहे. जीव, जगत व ईश्वर या तीनही कल्पना सापेक्ष असून मिथ्या आहेत. त्याचबरोबर माया व अविद्या या उक्तीही मिथ्या आहेत. माया अथवा अविद्या ही असत्य असल्यामुळे बंध व मोक्ष हे दोन्हीही खोटे आहेत. तत् पदार्थ म्हणजे परमेश्वर असून सर्व विश्व म्हणजे समष्टी हे त्याचे शरीर होय. मूळ प्रकृती महामाया ही त्याची विश्व म्हणजे निर्माण करणारी शक्ती आहे. तिलाच महाकारण असेही म्हणतात. ब्रह्माच्या ठिकाणी असलेली ही महामाया ब्रह्माहून भिन्न का अभिन्न याचा निर्णय तर्काने शक्य होत नाही म्हणून मायेला 'अर्निवचनीय' समजावे. शंकराचार्य पुढे म्हणतात तत्पदार्थ म्हणजे परमेश्वर व त्वं पदार्थ म्हणजे जीवात्मा होय. शांकरअद्वैताचा मुख्य सिद्धांत असा आहे की, ब्रह्म साक्षात्काराने म्हणजेच तत्त्वज्ञानाने मोक्षप्राप्ती होते. संतकवी मुकुंदराजाने विवेकसिंधु ग्रंथात म्हटले आहे की,

*''शांकरोत्कीवरी । मिया बोलीली ही वैखरी ।*

श्रीमद् शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रावरील अभ्यास या ग्रंथात मायावाद सुंदर रीतीने समजावून सांगितला आहे. माया व मायिक जगत अनिर्वचनिय आहे असे ते वारंवार सांगतात. दिसणारे जगत अज्ञान असे पर्यंत सत्य भासते, ते ईश्वराच्या स्वाधीन असते व त्याच्याच आज्ञेवरून चालते.

ज्ञान झाल्यावर जगत दिसावयाचे जरी थांबत नसले तरी ते भासमय आहे. नश्वर आहे याचा प्रत्यय येतो. जीव हा ब्रह्मरूपच आहे. केवळ शरीराच्या उपाधीमुळे, बुद्धीच्या भिन्नतेमुळे आणि अज्ञान असल्यामुळे 'मी देह आहे' असे जीवाला वाटते.

शंकराचार्य म्हणतात,

*सन्नाण्य सन्नाण्युभयात्मिका नो ।*
*भिन्नाण्य भिन्नाण्युभयात्मिकानो ।।*
*सांङ्गाय्यनउगाह्युभयात्मिकानो ।*
*महाद्भुताऽनिर्वचनीय रूपा ।।१०९।। विवेकचुडा.*

माया शब्दात सांगणे कठीण आहे. ती अस्तित्वात नाही आणि तिचे अस्तित्व तर भासते. तिचे भागही करता येत नाहीत म्हणून ती अनिर्वचनीयरूप आहे.

**- शाम रघुनाथ साखरे**
सुमन निवास खणीवरील विठ्ठल मंदिर, ब्राह्मणपुरी,
मिरज ४१६४१०.
फोन नं. (०२३३) २२२३८४३) मोबा. ९८५०३८०५३८

संदर्भ : श्री शंकराचार्य चरित्र- स्वामी अपूर्वानंद, भक्तीकोश- भारतीय आचार्य- श्रीशंकर वासुदेव अभ्यंकर. जीवनविकास- अंक, दासबोध- के. वि. बेलसरे, सज्जनगड अंक

# श्रीशंकराचार्य व दार्शनिक विचार

**डॉ. श्रीपाद भट**

*एम.ए.पीएच.डी. (संस्कृत), विभाग प्रमुख बालमुकुंद लोहिया संस्कृत महाविद्यालय.*
*नाशिक प्राच्यविद्यापीठातर्फे 'विद्या निपुण' पुरस्कार, लायन्स क्लब, सदाशिव पेठ, पुणे तर्फे 'आदर्श शिक्षक' पुरस्कार.*
*विपुल लेखन- पुस्तके ६, संशोधन निबंध ३०, इतर लेख ३०.*

***अष्टवर्षे चतुर्वेदी द्वादशे सर्वशास्त्रवित् ।***
***षोडशे कृतवान् भाष्यं द्वात्रिंशे मुनिरभ्यगात् ।।***

केरळ राज्यातील कालडी नावाच्या गावात इ.स. ७७८ मध्ये शंकराचार्यांचा जन्म झाला. वयाच्या बाराव्या वर्षी शंकराचे सर्व वेदवेदांगांचे संपूर्ण अध्ययन समाप्त झाले. 'श्रीमद्गोविंद भगवत्पूज्यपाद- शिष्य' या नावाने त्यांनी आपल्या कृतींमध्ये आपल्या गुरूंचा नामनिर्देश केला आहे. अध्ययन समाप्त झाल्यावर वेदविरोधी मतांचे खण्डन करण्यासाठी शंकराचार्यांनी भारतात सर्वत्र संचार केला. ब्रह्मसूत्रे, भगवद्गीता आणि उपनिषदांवर अलौकिक असे भाष्यग्रंथ लिहून आपले सिद्धांत प्रस्थापित केले. दक्षिणेस शृंगेरी, पश्चिमेस द्वारका, उत्तरेत बदरीनारायण व पूर्वेला जगन्नाथपुरी या चार ठिकाणी आपल्या वैदिक धर्ममठांची स्थापना करून तेथील पीठावर पद्मपादाचार्य, सुरेश्वराचार्य, तोटकाचार्य व हस्तामलकाचार्य या आपल्या चार शिष्यांची त्यांनी स्थापना केली होती. आपापल्या क्षेत्रामध्ये हे पीठाधिपती वैदिक धर्मीयांचे मार्गदर्शन करीत होते. या शांकरपीठांच्या अधिपतींचे धर्मनिर्णय समग्र हिंदू समाज प्रमाण मानीत होते.

यज्ञप्रधान धर्माच्या ऱ्हासकाळी, औपनिषद, बौद्ध, जैन, शैव, भागवत इत्यादी मते उदयास आली. यापैकी बौद्धमताला राजाश्रय मिळाल्यामुळे व भिक्षुसंघाच्या प्रचारकार्यामुळे बौद्धसंप्रदायाचा प्रसार सर्वत्र वाढला. पुढे बौद्धसंप्रदायाचा ऱ्हासकाळ आल्यावर शैव, कापालिक, वैष्णव या संप्रदायांना ठिकठिकाणी प्रभावी सत्पुरुष लाभल्याने देशाच्या निरनिराळ्या भागात हे संप्रदाय पंथोपपंथांच्या द्वारे वाढीस लागले. हे सर्व संप्रदाय आस्तिकतेचा पुरस्कार करीत होते. परंतु त्यांचा क्लिष्ट आचार तसेच अवैदिक आचार्यांनी प्रतिपादन केलेली तर्ककर्कश मतमतांतरे खोडून काढणारा पुरुष समाजाला हवा होता, तो शंकराचार्यांच्या रूपाने लाभला असे म्हणावे लागेल. वेदांचे प्रामाण्य स्थापन करणे, श्रुतिस्मृति पुराणोक्त आचारधर्माची व वर्णाश्रमांची नीट घडी बसविणे, निरनिराळ्या देवतांची उपासना करणाऱ्या लोकांमधील विरोध पंचायतनपूजा पद्धतीने शमविणे व तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील सर्व मतांमधील वैचारिक विसंगती उघडकीस आणून अद्वैत वेदांताची स्थापना करणे इत्यादी विलक्षण पण महत्कार्य केवळ बत्तीस वर्षांच्या आयुष्यात श्रीशंकराचार्यांनी केले.

अद्वैतवेदांत अतिप्राचीन आहे. शंकराचार्यांनी गुरुपरंपरेने प्राप्त झालेल्या अद्वैतवेदांताचा प्रचार केला. महर्षि बादरायण व्यासांनी ब्रह्मसूत्रांची रचना करून अद्वैतमताला दर्शनाचे स्थान मिळवून दिले. त्यानंतर त्यांच्या मुलाला या मताचे शिक्षण दिले. त्यांच्या (बादरायणांचा) मुलगा शुकदेवाने त्यांचा शिष्य गौडपादाला, गौडपादाने त्यांचा शिष्य गोविंदपादाला या अद्वैतवादाचा उपदेश केला. अशा गुरुपरंपरेने प्राप्त विद्येला शंकराचार्यांनी आत्मसात केले. सांप्रदायिक गुरुपरंपरेत हीच नावे थोड्याबहुत फरकाने आढळतात. शिव, विष्णू, ब्रह्मा, वसिष्ठ, शक्ती, पराशर, व्यास, शुक, गौडपाद व गोविंदयति असे दहा पूर्वाचार्य झाल्यानंतर अकरावे शंकराचार्य झाले. अशी सांप्रदायिक प्रसिद्धी खालील श्लोकांमधून व्यक्त होते.

***शिवं ज्ञानोपदेष्टारं विष्णुं धर्मोपदेशकम् ।***
***विधिं वेदप्रवक्तारं गुरुमूर्तित्रयं भजे ।।***
***वसिष्ठं ब्रह्मविच्छ्रेष्ठं शक्तिं योगविदां वरम् ।***
***पराशरं पुराणज्ञं प्रणतोऽस्मि मुनित्रयम् ।।***
***व्यासं वेदान्तसूत्राणां वक्तारं बादरायणम् ।***
***श्रीशुकं सूत्रकारं च भजे वेदान्तदेशिकौ ।।***
***श्रीमद्गौडपदाचार्यमद्वैतार्थप्रबोधकम् ।***
***गोविन्दभगवत्पादमद्वैताचार्यमाश्रये ।।***
***अद्वैतस्थापनाचार्यं शंकरं लोकसद्गुरुम् ।***
***प्रस्थानत्रयभाष्यादि ग्रन्थकारं नमाम्यहम् ।।***

शंकराचार्यांना जशी गुरुपरंपरा प्राप्त झाली होती तशी शिष्यपरंपरादेखील प्राप्त झालेली होती. पद्मपादाचार्य, सुरेश्वराचार्य, हस्तामलक आणि तोटकाचार्य हे आचार्यांचे शिष्यचतुष्टय म्हणून

प्रसिद्ध झाले.

आचार्यांच्या ग्रंथसंपदामध्ये 'प्रस्थानत्रयी' वरील भाष्ये प्रसिद्ध आहेत. 'प्रस्थानत्रयी' म्हणजे उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि भगवद्‌गीता हे आपल्या धर्माचा मुख्य आधार असलेले तीन ग्रंथ. उपनिषदे ही वेदाच्या शेवटचा भाग असून, त्यात भारतीय परंपरेतील जुन्यात जुन्या काळी मांडले गेलेले अत्यंत श्रेष्ठ विचार आहेत. ब्रह्मसूत्रात महर्षी बादरायणांनी उपनिषदातील विचारांची संगती सूत्ररूपाने लावण्याचा प्रयत्न केला आहे. भगवद्‌गीतेमध्ये आपल्या सर्वश्रेष्ठ धर्मविचारांचे एकजीव रसायन आहे. उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि गीता यांचे एवढे अनन्यसाधारण महत्त्व असल्यामुळे त्या ग्रंथातील विचारांचे स्पष्टीकरण करणे हे महत्त्वाचे कार्य होते. आचार्यांनी हे कार्य केल्यामुळे भारतातील अनेक पंडितांचे गैरसमज दूर झाले. त्यांना वैदिक परंपरेतील विचारांचे सुसंगत ज्ञान झाले. आचार्यांची संस्कृतभाषा तर्कशुद्ध आहे. अत्यंत गहन व गंभीर तत्त्वविचारसुद्धा अत्यंत प्रसन्न शैलीत मांडून लोकांना समजावून देण्याची आचार्यांची हातोटी विलक्षण होती.

तर्कशुद्धविचारसरणी आणि सुगम भाषा यामुळे त्यांच्या ग्रंथांना लोकमान्यता मिळाली. प्रस्थानत्रयीवरील भाष्यांशिवाय सर्वसाधारण शिक्षितांसाठी वैचारिक आणि भक्तिपर असे प्रचंड साहित्य आचार्यांनी लिहिले आहे. अनेक टीका ग्रंथांची रचना केली. प्रकरण ग्रंथ लिहिले. अमृतमधुर अशी स्तोत्रांची रचना केली. त्यांचे प्रकरणग्रंथ आणि स्तोत्रे भारतात सर्वसाधारण जाणत्या समाजात अत्यंत प्रिय झालेली आहेत; तर त्यांची प्रस्थानत्रयीवरील भाष्ये जगन्मान्यता मिळविलेली आहेत.

इसवी सनाचे आठवे शतक म्हणजे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने क्रांतिकारक होते असे म्हणावे लागेल. भरतखंडात जैन व बौद्धांच्या उत्कर्षाची सीमा होऊन कर्मकांडी वैदिकांची व त्यांची झटापट सुरू झाली होती. कांची, नालंद, धान्यकटक, काश्मीर, विक्रमशिला या प्रसिद्ध विद्यापीठांतून अनेक पंडित निर्माण होत होते. दिङ्नाग, धर्मकीर्ती, भर्तृहरी यांसारखे बौद्ध, समंतभद्र अकलंकासारखे जैन; कुमारिल, प्रभाकरासारखे मीमांसक; उद्योतकर, प्रशस्तपादासारखे नैयायिक, शाकटायन, चंद्रासारखे वैयाकरण; सुबंधु, बाण व भवभूतीसारखे कवी यांनी लोकांच्या बुद्धीला मनस्वी चालना देऊन तुंबळ युद्ध लावले होते. सर्वत्र तत्त्वशोधनाविषयी प्रबल जिज्ञासा उत्पन्न झाली होती. शंकराचार्यांचे अद्वैत मत ग्रहण करण्यास लोकांची मनाची योग्य स्थिती झाली होती. बौद्ध, जैन, नैयायिक, मीमांसक वगैरे परस्परविरोधी तार्किकांच्या शाब्दिक कोट्यांमुळे सर्वच तर्कवितर्क अप्रतिष्ठित व निर्मूल वाटू लागले होते. केवळ भक्तीने बुद्धीचे समाधान होणार नाही व केवळ तर्कप्रपंचाने सत्य सापडणार नाही अशा संभ्रमावस्थेतील चित्ताला 'तत्त्वमसि' या महावाक्याने अंतर्मुख करून 'अहं ब्रह्मास्मि' असा आत्मसाक्षात्कार करविला व श्रुत्युक्त ब्रह्मज्ञानाने स्थैर्य दिले, हेच शंकराचार्यांनी केलेले महत्कार्य होय.

कर्मयोग कितीही व्यवहारोपयोगी असला तरी समाजातील सांसारिक वासनांना उत्तेजन देऊन बुद्धिभेद व कलह वाढवितो आणि ज्ञानयोग सर्व वासनांचा नाश करून चित्तस्थैर्य आणतो हा अनुभवसिद्ध सिद्धांत आहे. तात्कालिक फल मिळवू पाहणाऱ्याला कर्मयोग ठीक आहे; पण आत्यंतिक मोक्षाला ज्ञानच पाहिजे, हा धर्माचा खरा सिद्धांत शंकराचार्यांनी सनातनधर्मी लोकांचे अनुभवास आणून दिला. 'सर्वधर्मांचे मूळ आत्मज्ञान होय' हा जो सिद्धांत शंकराचार्यांनी मांडला तो सर्वांनी स्वीकारला. जेव्हा केवळ तर्कशक्तीने धर्मज्ञान होणे अशक्य वाटू लागले तेव्हा मीमांसकांची पुन्हा शब्दप्रमाणाकडे प्रवृत्ती झाली. पूर्वमीमांसेने शब्दप्रमाणाचे नियम घालून दिले व शंकराचार्यांनी या नियमांना अनुसरून वेदान्तशास्त्र तयार केले 'तत्तु समन्वयात्' (ब्र.सू. १.१.४) आणि 'शास्त्रयोनित्वात्' (ब्र.सू. १.१.३) ही दोन सूत्रे वेदांत शास्त्राचा पाया आहेत. तर्कशक्ती अप्रतिष्ठित– म्हणजे अनिश्चित असल्यामुळे सर्व ब्रह्मज्ञानाचा मुख्य आधार शास्त्र म्हणजे उपनिषदे, आणि त्या उपनिषदातील वाक्यांचा 'समन्वय' करणे हाच ब्रह्मज्ञानाचा मार्ग. या सनातन धर्माची स्थापना करून शंकराचार्यांनी केवळ तार्किक वादविवादांनी चंचल झालेली लोकांची बुद्धी स्थिर केली.

ज्ञानातूनच मोक्ष सिद्ध होईल असे प्रतिपादन करताना शंकराचार्यांना इतर दार्शनिकांचे मतखण्डन करावे लागले. हे काम तर अत्यंत कठीण, असे काम शंकराचार्यांनी केले. पूर्वपक्ष म्हणून इतर दार्शनिकांचे मत घेतले आणि सिद्धांतामध्ये स्वमत स्थापित केले. सांख्यांनी प्रकृतीपासून महत् (बुद्धी) आणि महत् पासून अहंकार आणि अहंकारापासून ५ ज्ञानेंद्रिय, ५ कर्मेंद्रिय, मन व ५ तन्मात्र आणि ५ तन्मात्रांपासून ५ महाभूते अशी सृष्टीची निर्मिती दाखविली. महदादि कार्य पाहून कारणाचे म्हणजे प्रकृतीचे अनुमान करतात. आणि पुन्हा 'अजामेकां लोहितशुक्ल– कृष्णां बह्वी: प्रजाः सृजमानां सरूपा:' (श्वे. ४.५) शंकराचार्य याचे खंडन करतात की या जगाचे कारण मानलेल्या प्रकृतीला साक्षात् श्रुतीदेखील प्रमाण ठरत नाही. कारण, 'यदग्ने रोहितं रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्य' (छान्दोग्य ६.४.१) इथेही प्रकृतीचे लोहित (लाल), शुक्ल (पांढरा), कृष्ण (काळा) रूप दाखविले तरी ही वैदिक प्रत्यभिज्ञा आहे. सांख्यांनी लोहितादि शब्दांचा मुख्यार्थाला सोडून लक्षणार्थाचा

स्वीकार केला आहे. पण मुख्यार्थ संभवत असताना लक्षणार्थाचा स्वीकार का करावा लागतो? त्यामुळे श्रुतीचा (छा. ६.४.१) अर्थ, तेज, जल व अन्नरूपी प्रकृतीच जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज या चार जीवसमूहाला कारण आहे. त्यामुळे श्रुती (श्वे. ४.५) देखील प्रकृतीचे प्रतिपादन करू शकत नाही. असेच, सांख्यांच्या परिणामवादाचे देखिल आचार्यांनी खंडन केलेले आहे.

चैतन्यविशिष्ट देह म्हणजे आत्मा म्हणून चार्वाक सांगतात. काहींनी इंद्रिय म्हणजे आत्मा असे म्हटलेले आहे. आणखीन काहीजण अंत:करणालाच आत्मा म्हणतात. क्षणभङ्गुर विज्ञान म्हणजे आत्मा असे बौद्धांचे मत आहे. आत्मा देहपरिमाण आहे असे जैन लोक म्हणतात. कर्तृत्वविशिष्ट मात्र परमेश्वराहून भिन्न जीवात्मा आहे असे नैयायिक सांगतात. आत्मा केवळ भोक्ता आहे कर्ता नव्हे असे सांख्यलोक सांगतात. अशी आत्म्याविषयी **विप्रतिपत्ती** दिसल्यामुळे शंकराचार्य सर्वांचे मतखंडन करतात आणि प्रतिपादन करतात की, 'अस्ति आत्मा जीवाख्य: शरीरेन्द्रियपञ्जराध्यक्ष: कर्मफलसम्बन्धी।' (ब्र.सू.शां.भा. २.३.३) शरीर आणि इंद्रिय यांचा स्वामी आणि कर्मफल भोगणारा आत्माच जीव आहे. जीव म्हणजे ब्रह्मच होय. जीवात्मा सच्चिदानंद ब्रह्मापेक्षा भिन्न नसून 'अविद्या' या उपाधीने युक्त असल्यामुळे स्वस्वरूपाची विस्मृती पावून मायाधीन होऊन मिथ्याज्ञानाने 'अहमस्मि'- मी आहे, 'ममेदम्'- हे माझे असे सहजपणे लोकव्यवहार करतो. ज्याप्रमाणे चंद्र एकच असला तरी पाणी असलेल्या वेगवेगळ्या भांड्यांमध्ये प्रतिबिंबित होऊन अनेक चंद्र आहेत असा भास होतो त्याप्रमाणे अविकारी ब्रह्म अविद्येच्या संबंधाने जीवभाव प्राप्त करून अनेक जीवात्मा आहेत असा भास होतो. तसेच, आकाश एकच असले तरी घट, गृह इत्यादी उपाधी भेदांमुळे घटाकाश, गृहाकाश इत्यादी व्यवहार दिसतात त्याप्रमाणे ब्रह्म एकच असून 'अविद्या' या उपाधीमुळे वेगवेगळा जीवात्मा असा व्यवहार केला जातो.

आत्मचैतन्य जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ती अशा तीन अवस्थांमध्ये आणि तसेच, अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय अशा पाच कोशांमध्ये उपलब्ध होते. पण आत्म्याचे शुद्ध चैतन्य यासर्वांपासून भिन्न आहे असे ज्ञान तुरीयावस्थेत अनुभवास येते. जीवात्म्याला तीन अवस्थांना अनुसरून तीन नावे आहेत. जाग्रदवस्थेत संचित आणि प्रारब्धकर्माचे अनुसरण करणाऱ्या जीवास 'विश्व', स्वप्नावस्थेतील भोक्तृजीवाला 'तैजस'; सुषुप्ती अवस्थेतील विश्रांतीचे सुख भोगणाऱ्या जीवाला 'प्राज्ञ' असे म्हणतात. जीवाला स्थूल, सूक्ष्म आणि कारण अशी तीन शरीरे आहेत. अनेक अवयवांनी युक्त, प्रत्यक्ष प्रमाणाला विषय असून सर्व इंद्रियांना आश्रय देणारे शरीर म्हणजे स्थूल देह. पाच प्राण, दहा इंद्रिये, मन व बुद्धी याचा संघात असलेला शरीर म्हणजे सूक्ष्म देह. सुषुप्तीच्या वेळी सर्व कार्य आणि कारण स्वताच्या ठिकाणी लपवून घेणारी सूक्ष्मरूप प्रकृतीच कारणदेह.

ब्रह्मस्वरूपच जीव असले तरी, नानारूपांनी भासत असले तरी त्या भास होणाऱ्या स्थितीतसुद्धा ब्रह्म स्वताचे निजस्वरूप सोडत नाही. ज्याप्रमाणे निर्मळ आकाश ढगाने परिवृत झाले तरी स्व-रूप सोडत नाही त्याप्रमाणे. पारमार्थिक दृष्टीने जीव आणि ब्रह्म अभिन्नच आहे. 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म', 'विज्ञानमानन्दं ब्रह्म' इत्यादी श्रुतिवाक्ये ब्रह्माचे स्वरूपलक्षण सांगतात. ब्रह्माचे तात्त्विकस्वरूप सांगण्यास मदत करतात म्हणून 'तटस्थलक्षण' असेही म्हणतात. 'शाखाग्रे चन्द्र:' तसेच, 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत्प्रयन्त्यभिसंविशन्तीति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्म ।' हे निर्विशेष ब्रह्माचे 'तटस्थ लक्षण' आहे. पारमार्थिक दृष्टीने ब्रह्म निर्गुण, निर्विशेष, उपनिषद् वाक्य 'नेति नेति' शब्दाने सूचित करते. अमूर्त, अग्राह्य, अप्रमेय, प्रमाणातीत, निराकार, निर्गुण, सजातीय-विजातीय- स्वगतभेद इत्यादी लक्षणातीत असून 'एकमेवाद्वितीय' असलेले ब्रह्मच परमार्थत: सत्य आहे असे प्रतिपादन शंकराचार्यांनी केले आहे. हेच ब्रह्म जेव्हा मायेने युक्त असते, तेव्हा 'सगुणब्रह्म', 'अपरब्रह्म', 'ईश्वर' असे म्हटले जाते. हे तर 'मायां तु प्रकृतिं विद्यात् मायिनं तु महेश्वरम्' या उपनिषद् वाक्याने देखिल समजते.

मोक्षाबद्दलही दार्शनिकांमध्ये मतभेद आहे. सर्व दर्शनांचे अंतिम ध्येय मोक्ष मिळवणे असे असले तरी एका मार्गाचे अवलंबन मात्र करीत नाही. शंकराचार्यांनी मात्र 'नान्य: पन्था विद्यतेऽयनाय' या श्रुतिवाक्याला अनुसरून ब्रह्मज्ञानानेच मोक्ष मिळतो असे प्रतिपादन केलेले आहे. मोक्ष म्हणजे नवीन प्राप्त होणारी स्थिती नाही. ते आत्म्याचे सहजसिद्ध स्वरूपच आहे. स्वभावत: जीव नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव आहे. मुक्ती प्राप्य किंवा उत्पाद्य नाही. 'तत्त्वमसि' इत्यादी महावाक्याने जीवाचे अज्ञान निवृत्त होऊन जीव स्वत: 'ब्रह्मापेक्षा भिन्न नाही' असे समजून स्वस्वरूप पावतो. सहज स्वरूपाला आवरण असलेल्या अज्ञानाची निवृत्ती होणे वेदांताचे ध्येय आहे असे शंकराचार्य म्हणतात.

ब्रह्माचे अपरोक्षज्ञान मोक्षाचे साधन आहे. श्रवणाने उत्पन्न झालेले ब्रह्मज्ञान अनुभवात पर्यवसान पावते. त्यामुळे श्रुती आणि अनुभव ब्रह्मासंबंधी विचारात प्रमाण ठरतात. सगुण ब्रह्माची उपासना, धार्मिक कर्मांचे अनुष्ठान, चित्तशुद्धी, विवेक, वैराग्य ही

ज्ञानसाधने आहेत. साधकाला नित्यानित्यवस्तुविवेक, इहामुत्रफलभोगविराग, शमादिषट्कसंपत् व मुमुक्षुत्व हे साधनचतुष्टय अत्यावश्यक आहे. ''आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निधिध्यासितव्यः'' हे उपनिषद्वाक्य आत्मदर्शनाला श्रवण, मनन आणि निदिध्यासन ही साधने आहेत असे म्हटले आहे. हे सर्व 'अंतरंग साधन' म्हणून प्रसिद्ध आहे. 'अहं ब्रह्मास्मि' असा अनुभव पावलेला जीवन्मुक्त अंतर्मुखी असो बहिर्मुखी असो, दृश्य जगत् त्याला भ्रमिष्ट करत नाही. प्रारब्धकर्म संपताक्षणी शरीर लय पावून ब्रह्म जाणणारा ब्रह्मच होऊन स्व-स्वरूप पावतो. हीच विदेह मुक्ती.

अशाप्रकारे शंकराचार्यांनी तत्त्वज्ञानाचे प्रतिपादन केले. भरतखंडात संचार करून सर्व दिग्गज दार्शनिकेतरांना हरवून 'जगद्गुरु' पद मिळविले. त्यांच्या अशाप्रकारच्या कार्यामुळेच अद्वैतवेदांताला तत्त्वज्ञानात परमोच्च, अद्वितीय, अनुपम असे स्थान मिळाले.

संदर्भग्रंथः १) आचार्य शंकर, अपूर्वानंद स्वामी, श्रीरामकृष्णाश्रम, नागपूर, तृतीय संस्करण.

२) तेजस्वी धर्मोद्धारक, रा. चिं. ढेरे, वोरा ॲण्ड कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., मुंबई २.

३) भारतीय धर्म व तत्त्वज्ञान, श्री. भा. वर्णेकर, श्रीलेखन वाचन भांडार, पुणे. १९७५.

४) भारतीय दर्शन, कर्नाटक सरकार, बंगलूर

५) ब्रह्मसूत्रशांकरभाष्यम्, सं. आचार्य जगदीशशास्त्री, मोतिलाल बनारसीदास, दिल्ली, पुनः संस्करण १९८८.

६) श्रीमदाद्य शंकराचार्य यांचे चरित्र, वा. ग. मुळगुंद, चित्रशाला प्रकाशन, पुणे, १९५३.

७) श्रीशंकराचार्य व त्यांचा संप्रदाय, म. रा. बोडस, मुंबई १९२३.

८) सर्वदर्शनसंग्रह, सं. उमा शंकर ऋषी, चौखंबा विद्याभवन, वाराणसी १९८४.

**- डॉ. श्रीपाद भट**

विभागप्रमुख, श्रीबालमुकुंद लोहिया संस्कृत आणि
भारतीय विद्या अध्ययन केंद्र, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ,
१२४२, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.
फोन नं. : २४४३३२९०.

# आद्य शंकराचार्यांची स्तोत्र रचना

**प्रा. डॉ. अजित कुलकर्णी**

*बी.ए.एम.ए., पीएच.डी. (श्रीमत् भगवतगीता एक जीवनप्रणाली), रजिस्ट्रॉर- बी.एम.सीसी. कॉलेज, पुस्तके व लेखमाला प्रकाशित. गेली तीस वर्षे प्रवचन, व्याख्यान व कीर्तने (दासबोध, भागवत, ज्ञानेश्वरी, रामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद यावर) पुरस्कार- शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, आदर्श शिक्षक व गौरव पदक पुणे महानगरपालिका, धर्मभूषण पदवी.*

ॐ

श्रीमद् शंकराचार्यांचे कार्य अद्‌भुत व अद्वितीय आहे. त्यांनी समाजाला कर्मशील बनविले. भारतात मठस्थापना करून धर्मपीठे निर्माण केलीत. समाजात भक्ती- प्रेम- ज्ञान- वैराग्याचा प्रवाह राहावा, म्हणून आपल्या ओघवत्या, ओजस्वी व रसाळ भाषेत स्तोत्ररचना, अष्टके निर्माण केली. या रचना म्हणजे नित्य नवीन व निर्मळ गंगेप्रमाणे मानवाला स्फूर्ती, चैतन्य देणारा झरा वाटतो. यातून मानसिक बळ व आत्मबळ निर्माण होते. जीवाला शांत, आनंद व समाधान वाटू लागते. यातील भाषा काव्यमय, यमक, अनुप्रास अलंकारांनी नटलेली असून यात एक गेयता आहे. यातील काही स्तोत्रांचा वा रचनांचा आढावा घेऊ या.

ॐ

**।। श्रीकृष्णाष्टकम् ।।**

शंकराचार्यांच्या मातोश्री आर्यांबा यांना आचार्यांनी संन्यास घेण्याची मान्यता देताना वचन दिले होते ते असे,

***अहन्यम्ब रात्रिसमये समयान्तरे च***
***संचित स्ववरागोऽवशगोऽथवा मां ।***
***एष्यामि तत्समयं स्वकलं विहाय***
***विश्वासमाप्नुहि मृतापि संस्करिष्ये ।।***

हे माते, रात्र असो, दिवस असो की अन्य कोणतीही वेळ असो, तू माझे भावस्मरण कर अथवा निरोप पाठव, मी हातातील कार्य टाकून तुझ्याकडे धावत येईन. मी तुला वचन देतो की तुझे अत्यंसंस्कार मी करेन.

मातेच्या इच्छेनुसार आणि मानवधर्माला तसेच, मातेवरील प्रेमामुळे त्यांनी, संन्यासग्रहणानंतरही तिच्यावर संस्कार करण्याचे तिला वचन दिले होते. वास्तविक, संन्यास घेणाऱ्या व्यक्तीने पूर्वाश्रमीचे सर्व संबंध तुटत असूनही हे वचन दिले होते. तथापि, स्कंदपुराणात एक वचन आहे,

***संन्यस्याखिलकर्मापि पिता वन्द्य:***
***सर्ववन्देन यतिना प्रासुर्वन्धा प्रयत्नत: ।।***

सर्व कर्माचा संन्यास घेतल्यावर सुद्धा त्याचा पिता वंदनीय असतो. सर्वांना वंदनीय असणाऱ्या यतीने संन्यासाने जन्मदात्रीला वंद्य मानावे, प्रयत्नपूर्वक वंद्य मानावे.

यानुसार आचार्यांनी मातेला वचन दिले. त्यानंतर आचार्य हे बदरिकाश्रमात असताना त्यांना भावस्मरणाने समजले, तसेच त्यांचा शिष्य अग्निशर्माकडून निरोप मिळाला, ''बाळा, आता माझा जीवनप्रवास संपण्याची वेळ आली आहे. तेव्हा तू त्वरित मजकडे यावेस.'' आचार्य त्वरेने कालाटी गावी मातेजवळ आले. शिवभक्त आर्याम्बांना आनंद वाटला. आचार्यांना पाहून पूर्व घटनांचे त्यांना स्मरण झाले. गोड स्मृती जाग्या झाल्या. तेव्हा माता त्यांना म्हणाली,

''तुझे कर्तृत्व, बुद्धिमत्ता याची सर्वत्र कीर्ति मी ऐकून, धन्यता वाटली. पण काय रे, ''अद्वैत म्हणजे काय? आणि त्याच्याशी आपलं ऐक्य कसं जाणून घ्यावयाचं? '' त्यावर आचार्य म्हणाले, ''हे माते, अद्वैत म्हणजे दुसरे काही नाही. या विश्वाचा निर्माता एकच परमेश्वर आहे. हे संपूर्ण विश्व त्याच्यापासून निर्माण झाले आहे. आणि आपण सारे त्याचेच अंश आहोत. हे जाणणे महत्त्वाचे आहे.

हे जाणून घेण्याचा मार्ग म्हणजे 'साधन चतुष्टय' हे त्यांनी सांगितले. म्हणजे (१) 'नित्य- अनित्य- वस्तु- विवेक, (२) इह अमुत्र फलभोग विराग, (३) शमदमादि- संपत्ती, (४) मुमुक्षुत्व हे मार्ग सांगितले.

आर्यांबा या कोणी सामान्य स्त्री नव्हत्या. त्या मोठ्या शिवभक्त होत्या. त्यांनी शंकराचार्यांना प्रार्थना केली. ''बाळा, तुला ज्या परमेश्वराचे दर्शन झाले, ते मला तू घडव.'' त्यावेळी त्यांनी 'अच्युताष्टक' म्हणावयास सुरुवात केली.

*अच्युतं केशवं रामनारायणं*
*कृष्ण दामोदरं वासुदेवं हरिम् ।*
*श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं*
*जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥१॥*

या स्तोत्रात परमेश्वराने दुःखसागरातून आपणास बाहेर काढावे अशी प्रार्थना केली आहे. त्यानंतर आचार्यांनी विष्णुभुजंगाष्टकाचे पठण केले. त्यावेळी अंत्यकाळ जवळ आला. शिवभक्त असल्याने शिवदूत त्यांना नेण्यासाठी आले. त्यावेळी त्या त्या दूतांबरोबर गेल्या. परंतु परत काही वेळानी त्या जागृत झाल्या, आणि आचार्यांना म्हणाल्या, ''हे बाळा, मी या शिवदूतांबरोबर जाणार नाही. मी श्रीहरि बरोबरच जाईन. कृष्णा बरोबर जाईन.'' त्यावेळी मातेच्या इच्छेनुसार त्यांनी श्रीकृष्णाला प्रार्थना केली ते हे एक कृष्णाष्टक होय. त्यात आठ कडवी असून आचार्यांच्या मुखातून शब्द प्रकट झाले,

*''शरण्यो लोकेशस्तव भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥'*

हे या अष्टकाचे पालुपद आहे.

या जगताचा स्वामी सर्वांचा आधार असलेला श्रीकृष्ण तुझ्या डोळ्यांना दिसो. जो शरणागताचे आश्रयस्थान व सर्वलोकपती आहे, असा भगवान कृष्ण मला प्रत्यक्ष डोळ्यांनी दिसावा.

हा श्रीकृष्ण सर्वव्यापी असून, ही सर्व स्थावर जंगम सृष्टी हे ज्याचे शरीर आहे. याचे ज्ञान वेदांमुळे होत असून हा सर्वांच्या बुद्धीचा साक्षी आहे. हा सर्व दोषरहित असून भक्तजनांचे दुःख हरण करणारा आहे. याची अंगकांती सुस्थिर असून त्याने शंख, चक्र, गदा, पद्म धारण केले आहे.

या श्रीकृष्णापासून सर्व चराचर सृष्टी निर्माण झाली आहे. उत्पत्ति, स्थिति, लय हा करतो. यातच तो विलीन होतो.

यम नियमादि साधनांनी, लोक चित्ताचे नियंत्रण करतात आणि हा निर्गुण आत्मरूप आहे. हा मायेच्या साहाय्याने लीलाशरीर धारण करतो.

हा पृथ्वीवर व्यापून असून, हा पृथ्वीचे नियंत्रण करतो. पण पृथ्वीला हे माहित नसते असे वेद म्हणतो. असा हा जगताचा स्वामी निर्मल आहे. हा ध्यानास योग्य आहे, तसेच, देवांना व मानवाला मोक्ष देणारा आहे.

श्रीकृष्णाच्या सामर्थ्यावरच इंद्रादि देवांसह सर्वजण जय मिळवितात. तसे पाहता कर्माचे स्वातंत्र्य कोणालाही नाही. कवित्व असो, रणांगणाचे शौर्य, याच्याशिवाय काहीही घडू शकत नाही.

श्रीकृष्णाशी एकरूप होण्यासाठी ध्यान करावे, अन्यथा, मनुष्याला मनुष्येतर जीवयोनी मिळते आणि त्यामुळे जीवाला जन्ममरणाच्या फेऱ्यात पडावे लागते.

हा श्रीकृष्ण माणसाला छळणाऱ्या राक्षसांचा नाश करतो. आणि शरणागतांचे रक्षण करतो. हा अत्यंत सुंदर असून तो घननील आहे. हा गोपाळांचा मित्र आहे, अर्जुनाचा सखा आहे. हा सर्वांचा जनक असून योग्य आचरण करणाऱ्यांना सुख देत असतो. असा हा अनादि, सत्य, नित्य आहे. याला सर्वांनी शरण जावे.

जेव्हा समाजात अस्थिरता येते तेव्हा अजन्मा असूनही हा प्रकट होतो. धर्ममर्यादा स्थिर करतो. सज्जनांचे रक्षण करतो. असा हा ज्याचे गुणगान हे वेदांनी केले असून गोकुळ वृंदावनाचा हा अधिपती आहे. असा हा श्रीकृष्ण प्रकट होऊन मला माझ्या डोळ्यांना दिसू दे.

यात ९ वा श्लोक आहे. वास्तविक हा नंतर कोण्या शिष्याने रचलेला दिसतो.

अशी आचार्यांनी प्रार्थना केल्यावर श्रीकृष्ण शंख, चक्र, कमल हातात घेऊन प्रकट झाले. मातेला परमसुख देऊन श्रीकृष्ण स्वस्वरूपात मातेला घेऊन गेले. असे उत्तम दर्शन आचार्यांनाही झाले आहे. असे हे सुंदर स्तोत्र आचार्यांच्या मंजुळ वाणीतून बाहेर पडले. श्रीकृष्ण प्रकट झाले. परमेश्वराचे रूप डोळ्यात साठवत आर्यांबेला परमोच्च आनंद झाला. तिने श्रीकृष्णाला हात जोडले. तिची ती भक्ती आणि शारीरिक अवस्था पाहून आचार्यांनी तिचे डोके आपल्या मांडीवर घेतले. दोघांची नजरानजर झाली. समाधी अवस्थेत आर्यांबाचे दुबळे हात किंचित वर उचलले गेले. आणि क्षीण आवाजात शब्द उमटला 'विजयी भव' सारं सारं शांत झालं. आर्यांबाच्या डोळ्यातून अश्रूधारा वाहू लागल्या. त्या म्हणजे एक मातेची धारा व दुसरी धारा श्रीकृष्णाने मातेचा केलेला स्वीकार!

असे हे हृदय हेलावणारे स्तोत्र आचार्यानी गायलं!

**कृष्णाष्टक दुसरे**

आचार्य मातेच्या निधनानंतर जेव्हा वृंदावनात गेले तेथे त्यांनी त्या श्रीकृष्णाचे हे दुसरे अष्टक रचले आहे. यात कृष्णस्तुती असून जणू यात तू मातेला मुक्त केले, ह्याबद्दल भाव आहेत. हे अष्टक अतिशय गोड आहे. यमक, अनुप्रास आदि काव्यालंकारांनी नटलेले स्तोत्र आहे. दोन दोन श्लोकांचे एक एक कडवे असून यात आठ कडवी आहेत. या अष्टकात आचार्य म्हणतात,

हा कृष्ण, वृंदावनाचे एकमेव भूषण आहे. सर्व पापहर, भक्त जनांचे रंजन करणारा, नंदनंदन मोरपिसांचा मुकुट धारण करणारा, मधुर नाद करणारा, मुरलीधर, कामदेवाप्रमाणे अत्यंत सुंदर आहे.

हा मदनगर्वहरण करणारा असून याचे डोळे विशाल आहेत, गोपगार्यींचा शोकहरण करणारा, कमलनयनी असून करकमलांनी

गोवधर्न उचलणारा आहे. याचे मुखावरचे हास्य विलोभनीय आहे. परंतु इंद्राचा गर्वहरण करणारा जो कृष्ण त्याला मी नमस्कार करतो.

या कृष्णाच्या कानात फुलांची कुंडले आहेत. त्याचे गालही सुंदर आहेत. अशा या गोपीजनप्रिय कृष्णाचे दर्शन अभक्तांना दुर्लभ आहे. हा यशोदा नंद- गोप यासह सर्वांना सुखच देणारा आहे. त्याला नमस्कार असो.

या माझ्या मानससरोवरात ज्याने आपली चरण कमले नेहमीच रुजविली आहेत, ज्या नंदबालकाचे केस कुरळे आहेत, जो सर्व अपराधांचे निरसन करतो, जो सर्व लोकांचे पोषण करतो, तसेच सर्व गोपजनांचे मानसमंदिर व जो सर्वांच्या अंत:करणात प्रेम निर्माण करतो अशा कृष्णास मी वंदन करतो.

हा श्रीकृष्ण दुष्टांचा संहार करून भूभार हरण करतो. त्याचे नेत्रकटाक्ष सुंदर असून तो दुष्टांकडे त्याच कटुतेने पाहतो. विश्वात नवनवीन स्वरूप व्यक्त करतो.

तथापि, हा सर्व गुणांचे आगर असून हा सुखसागर, दैत्यसंहारक, गोपगोपीप्रिय, खेळातील एक सवंगडी असून याने विद्युल्लतेप्रमाणे चमकणारा पितांबर धारण केला आहे.

हा कृष्ण सर्वांना आनंद देणारा असून माध्यान्हीच्या सूर्याप्रमाणे हा प्रसन्न व दीप्तिमान आहे. सर्वांचे मनोरथ पूर्ण करणारा आहे. हा मुरलीवर मधुर गाणे गात असतो. असा हा कुंजवनाचा अधिनायक आहे.

गोपीच्या अंत:करणस्वरूपी कोमल शय्येवर शयन करणारा हा असून कुंजवनातील दावाग्निही हा प्राशन करतो. असा जो कृष्ण आहे त्याची कथा माझ्या मुखाने सदैव गायली जावो व मजवर सदैव तुझी कृपा असावी, ही माझी विनंती.

असे हे अतिशय उत्तम स्तोत्र आचार्यांनी रचलेले आहे.

**।। श्री गंगाष्टकम् ।।**

हे स्तोत्र, अष्टक, गंगोत्रीच्या स्थानी आचार्यांनी रचले असावे असे वाटते. यात आठ कडवी असून नववे कडवे हे फलश्रुती म्हणून गायले आहे. या अष्टकात आचार्य म्हणतात,

हे वैभवसंपन्न गंगे, तू ऐश्वर्यवती असून भगवान शंकरांनी तुला धारण केले आहे. तुझ्या जलाच्या केवळ तुषारांनी नुसता स्पर्श केला तरी या कलियुगात जीव पापापासून मुक्त होतात. तू ब्रह्मांड भेदन करून या भूतलावर आली आहेस. तू सर्वांना टवटवीत करीत असून भूतलावर पर्वतावरून, खाली आली आहेस. तुझ्या या प्रवासात हत्तींचे कळप स्नान करतात तसेच, सिद्ध चारण, विद्याधर गंधर्वांच्या स्त्रियांही स्नान करतात. त्यांच्या अंगाला केशराची उटी असते ती तुझ्या पाण्यात मिसळलली असते. तेथे ऋषी मुनी संध्यावंदन करतात. ब्रह्मदेव तुझ्या पाण्याने नित्यकर्म करतात. शेष भगवानाच्या पायाचा तुला स्पर्श असल्याने तुला तीर्थत्व प्राप्त झाले आहे. पुढे जहनु महर्षिंच्या पोटी कन्या म्हणून जन्म प्राप्त होऊन तू जान्हवी म्हणून झालीस तसेच, हिमालयाच्या कुशीत जन्म असल्याने (उगम असल्याने) या पर्वतावरून तू अवखळपणे, सर्पाप्रमाणे वळणावळणाने वाहत असतेस. नंतर श्रीक्षेत्र काशीत आल्हाद निर्माण करून तू विजय-स्वामिनी झाली आहेस. तुझे नुसते दर्शन झाले तर पाप नष्ट होते. तुला तीर्थ म्हणून प्राशन केले तर विष्णुलोक प्राप्त होतो. परंतु तुझ्या प्रवाहात मृत्यू आला तर ते इंद्रपदापेक्षाही श्रेष्ठ असते. तुझे वैशिष्ट्य असे की, तुझे पाणी पिऊन मी राहिलो. त्यामुळे माझी विषयासक्ती संपून गेली. श्रीकृष्णाविषयी प्रेम वाटले. तुझ्या स्नानाने पाप नष्ट होऊन स्वर्गप्राप्ती सोपी झाली आहे. तुला शंकरांचा संग आहे. तेव्हा तुझ्या तीरावर मृत्यूची वेळ आल्यास श्रीविष्णूंच्या चरणांचे स्मरण घडू दे. या स्मरणात श्रीशंकर व श्रीविष्णु ऐक्याची अनुभूती येऊन मलाही जीव शिव ऐक्याचा अनुभव येऊ दे. तुझे जलतीर्थ प्राशन करणे यातच जीवनाचे सार्थक आहे. तुझी खऱ्या अर्थाने स्तुती करणेही अशक्य आहे. तेव्हा मजवर कृपा कर. मजवर प्रसन्न रहा. हे अष्टक जो म्हणेल त्याचे पाप नष्ट होऊन विष्णुलोक प्राप्त होईल असे आचार्य सांगत आहेत.

**।। श्री गंगास्तोत्रम् ।।**

आचार्यांनी हे गंगेचे स्तोत्र काशीक्षेत्रात लिहिले असावे, असे वाटते. एकूण १३ कडवी पज्झरिध वृत्तांत व १४ वे कडवे हे फलश्रुतीचे आहे. या स्तोत्रात आचार्य म्हणतात,

हे देवी गंगे, तू सर्व देवांची स्वामिनी असून तू गुणवती आहेस, तू त्रिभुवनाचा उद्धार करणारी आहेस. तुझी स्तुती वेदांनी गायली आहे. तुला विष्णुचरणांचा स्पर्श असल्याने, तुझ्यात अनंत जन्माची पातके नष्ट करण्याचे सामर्थ्य आहे. तसेच, तुझ्या कृपेने हा भवसागर पार करता येईल. तुझ्या पाण्याच्या प्राशनाने आत्मपद प्राप्त होत असल्याने यमदेव त्याच्याकडे पाहत नाही. तसेच तू पतितांचा उद्धार करणारी असून तू या भीष्माची माता आहेस. तुला जो शरण येतो, त्याचा सर्वप्रकारचा शोक नष्ट होतो, आणि जे तुझ्या पाण्यात स्नान करतात त्यांचे जन्ममरणाचे फेरे संपून जातात. तुझ्या चरणी इंद्रादि देवही शरण येतात, कारण तू सर्वांना सुखदायक आहेस. हे माते तू तर माझे रोग, शोक, पाप, महापाप नष्ट कर तसेच दुर्बुद्धीही नष्ट कर. तुझ्यामुळे या सृष्टीला शोभा प्राप्त झाली आहे. या संसारात मला तर तुझा आधार आहे. जो तुझ्या तीरावर राहतो त्याचे वास्तव्य हे वैकुंठात असल्यासारखे आहे. तसेच राजा होऊन राहण्यापेक्षा तुझ्या पाण्यात कासव वा मासा होऊन राहणे श्रेयस्कर वाटते. किंवा

तुझ्या काठावर सरडा वा दरिद्री चांडाळ बनून राहणे इष्ट आहे. हे जान्हवी, तू जलमय असून तुझे स्तोत्र जो पठण करील त्याला जीवनाच्या सर्व क्षेत्रात यश मिळेल. ज्याच्या हृदयात गंगेविषयी भक्ती स्थिर होईल त्यांना परमानंदाचा सुखरूप अनुभव येईल असे हे पवित्र स्तोत्र आहे.

**।। यमुनाष्टकम् ।।**

पू. आचार्यांनी यमुनाष्टक हे यमुना उगम, म्हणजे यमनोत्रीला लिहिले असावे. यात आठ कडवी आहेत. यमुनानदीचे त्यानी स्थूल स्वरूपाचे वर्णन केले असून आचार्य यात म्हणतात,

हे यमुना माते, तुझा कृष्णवर्ण हा श्रीकृष्णाला शोभेल असा आहे. तुझ्या दर्शनाने स्वर्गादि सुखे ही तुच्छ असून तू सर्वांचा शोक हरण करतेस. जीवांचे तू सर्व दोष, पापे दूर करून त्यांना तू शुद्ध करतेस. तुझे पाणी अमृतासमान असून, मी त्यात सुस्नात झालो आहे. श्रीकृष्णाने तुझ्या प्रवाहात जलक्रिडा केल्याने तुला कृष्णवर्ण प्राप्त झाला आहे असे मला वाटते. तुझ्या किनारी भक्तीचा आस्वाद घडल्याने भक्तीला नित्य नूतनता प्राप्त झाली आहे. त्यामुळेच तुझ्या तीरावर चातक पक्षी, हंसपक्षी राहतात. तुझ्या जलात क्रीडा केल्याने त्यांना त्या प्रवाहात स्नान घडते. त्याने शरीरतापाचा परिहार घडतो. तुझ्या प्रवाहावरून जो वारा वाहतो तो भक्तांना धीर, आत्मबळ देतो. पृथ्वीवर वाहताना तुला अनेक नद्या येऊन मिळतात, त्यांनाही तू तुझे रूप देतेस. चंद्राच्या चांदण्यात तुझ्या प्रवाहाची शोभा अवर्णनीय आहे. तू त्यात अत्यंत मोहक दिसतेस. या तुझ्या जलात राधेने स्नान केले असल्याने, व कृष्णाने स्नान केल्यामुळे याला एक गंध (भक्तीचा) प्राप्त झाला आहे. यातच तिचे कौशल्य आहे. या कृष्ण राधा स्नानामुळे भ्रमरही तेथे गुंजारव करीत असतात. राधेच्या वेणीतील चाफ्याच्या फुलांच्या पाकळ्यांनी तुझा काठ सुशोभित झाला आहे. तुझ्या तीरावर अनेक वृक्ष, लता वेली, वने उपवने आहेत. तेही तुझ्या ठिकाणी प्रसन्न आहेत. तुझ्यात असे सामर्थ्य आहे की तू भक्तांना भवनदी पार करून देत असतेस.

असे तिचे वर्णन असून या अष्टकाचे पालुपद **'धुनोतु नो मनोमलं कलिन्दनदिनी सदा ।'** हे आहे. आचार्य यात म्हणतात. हे कालिंदी माझ्या मनातील मल सतत धुऊन टाक.

**।। यमुनाष्टकस्तोत्रम् ।।**

या स्तोत्रात एकूण ८ कडवी असून यात ९ वे कडवे हे फलश्रुतीचे आहे. या स्तोत्रात आचार्य म्हणतात,

हे सूर्यकन्ये, यमुने, तुझ्या जलात जे स्नान करतात, त्यांचे त्रिविध ताप तू हरण करतेस. तू श्रीकृष्णाला प्रिय असून भक्तांचा संसारताप हरण करतेस. तू नित्य फल देणाऱ्या लक्ष्मीची सुखप्राप्ती होण्यासाठी तुझी उपासना करावी. गोकुळ वृंदावनाच्या परिसरातील उपवनांना मधुबन म्हणतात. तू सूर्यकन्या असून या वनातून वाहत असतेस. तू श्रीकृष्णाचे भूषण असून माधवाला संतोष देऊन, गोकुळवासियांची भीती तू दूर केली आहेस. तू जगताची पापे नष्ट करून भक्तांच्या मनोकामना पूर्ण करतेस. श्रीकृष्णाच्या रासक्रिडा तुझ्या आसमंतातच घडल्या आहेत. तुझे पाणी गोड असून तू या मधुबनातील आनंदसोहळे अनुभवले आहेस. तुझा वेग प्रचंड असल्याने तू पर्वतांचे कडे तोडले आहेस. तू तुझ्या परिवारातील भक्तांचे रक्षण करतेस. मी या संसार सागरात बुडलो आहे. मी तुला शरण आलो आहे. तू माझे भयनिवारण करून मला संकटातून सोडव. तुझा घन:श्याम वर्ण शोभून दिसत असून, तुझ्या पाण्यात जे पर्वत शिखराचे प्रतिबिंब पडले आहे, ते पिवळे वस्त्र परिधान केल्यासारखे वाटत आहे. तुझ्या पात्रातील खडे हे रत्नांप्रमाणेच शोभत आहेत. तुझा प्रवाह उंचावरून खाली पडतो तेव्हा तू सिंहासनावर बसल्यासारखी वाटतेस. तुझे तेज सूर्यकिरणांनाही लाजवीत असते. तुझ्या विस्तीर्ण किनाऱ्यावरील वाळू शुभकारक आहे. तुझ्या किनाऱ्यावर कृष्ण रासलीलांचे अद्भुत उत्सव रंगले आहेत. उंच पर्वतमाळा हा तुझा गळा असून त्याला व पृथ्वी आणि नभाला तुझ्या शुभ्र मोत्यांच्या हाराने शोभा आणली आहे. कोट्यावधी सूर्याच्या तेजाप्रमाणे चकाकणाऱ्या मण्यांनी तुझी चोळी सुशोभित दिसत आहे. तुझ्या गळ्यात जणू चांदण्यांचा हार आहे. तुझ्या नाकातील नथीला लावलेले टपोरे मोती शोभून दिसत आहेत. ते वाऱ्याने हालत असलेले पाहताना मोठे विलक्षण दृश्य दिसत आहे. तुझ्या कानात तेजस्वी रत्नांची कुंडले आहेत. ती हलतात तेव्हा त्यांची प्रभा तुझ्या दोन्ही गालांवर फाकते ते फार रमणीय दिसते. तुझे चरणकमल आरक्त असून तेथे सुवर्णाचे नुपूर आहेत. जो या चरणांचा आश्रय घेतो त्याचे सर्व ताप नष्ट होतात. याचे जो पठण करेल त्याची सर्व दुःखे हरण होतील. जो हिची उपासना करेल त्याला ऐहिक भोग प्राप्त होऊन मरणकाळी तो विष्णुस्वरूप होईल असे आचार्यांनी सांगितले आहे.

या स्तोत्राचे पालुपद **'जय यमुने जय भीतिनिवारिणि संकटनाशिनि पावय माम् ।'** हे यमुने तू भवभयाचे निवारण करणारी असून सर्व संकटांचा नाश करणारी आहेस. तुझा जयजयकार असो. तू मजवर प्रसन्न हो.

**।। नर्मदाष्टकम् ।।**

या स्तोत्रात एकूण ८ कडवी असून यात ९ वे कडवे हे फलश्रुतीचे आहे. या स्तोत्रात आचार्य म्हणतात,

हे नर्मदे देवी, तू वेगाने समुद्राकडे जात आहेत. तुझ्या तरंगाची

शोभा वाढलेली दिसते. आमची षड्रिपूंमुळे असणारी पापे तुझ्या तीर्थरूप जलाने नष्ट होत आहेत. तू मृत्यूच्या भयापासून आम्हाला कवच देत असतेस. तुझ्या पाण्यावर अवलंबून असणारे मासे आहेत. त्यांना उत्तम गति प्राप्त होते. कलियुगात पातकाचा ओघ असल्याने तू ते नष्ट करीत असतेस. तुझ्या पाण्यात राहणारे मासे, कासव, सुसरी तसेच काठावर पोपट, चक्रवाक इ. पक्ष्यांना तू सुख देत असतेस. तू भक्तांचे दु:ख हरण करणारी असून जगाच्या प्रलयाचे भय ओढवले असताना तू मार्कंडेय ऋषींचा सांभाळ केला आहेस. तुझ्या दर्शनाने माझे भय हरण झाले असून शौनकादि ऋषी, इंद्रादि देव सर्वांनी तुझे तीर्थ प्राशन केले आहे. भक्तांचे तू जन्म-मरणाच्या फेऱ्याचे दु:ख हरण करीत असतेस. गंधर्व, किन्नर व देव हे सर्व तुझी सतत पूजा करीत असतात. तुझ्या रमणीय काठावर पक्षी न भिता गातात, तसेच वसिष्ठ, पिप्पलाद, कर्दम अशा ऋषींना तू आश्रय दिला आहेस. सनकादिक कुमार, नारदादि महर्षींना तू तृप्त केलेस. चंद्र व सूर्यानेही तुझ्या किनारी तपश्चर्या केली. इंद्रालाही तू आश्रय दिला आहेस. कळत नकळत घडलेली लक्षावधी पापे नष्ट करून, प्रापंचिक व पारमार्थिक सुख त्यांना प्रदान करतेस. तुझ्या या प्रवाहात ब्रह्म, वैकुंठ व शिव लोकांचा समावेश आहे. भगवान शंकर ऋष्य पर्वतावर तपाला बसले असताना, त्यातून तू प्रकट झाली असून तुझ्या खळाळणाऱ्या पाण्याचा आवाज श्रवण करणे हे भाग्यदायक आहे. तुझ्या किनारी मृत्यू आल्यास पुण्यलोक प्राप्त होतो. तुझ्या किनारी भिल्ल, सूत, ब्राह्मण, विद्वान, लबाड आणि सोंगाडे कोणी असले तरी त्यांची पातके तू नष्ट करतेस; अशाप्रकारे तू भक्तांचे त्रिविध ताप दूर करणारी आहेस. हे स्तोत्र पठण करणाऱ्यांना कधीही दुर्गती प्राप्त होणार नाही. त्यांना सहज शिवलोक प्राप्त होतो. अशाना गर्भवास व नरकवास कधीही वाट्याला येत नाही. या स्तोत्राचे पालुपद म्हणजे **त्वदीयपादपंकजं नमामी देवि नर्मदे ।** असे आहे. आचार्य नर्मदेला म्हणतात, हे देवी नर्मदे, मी तुझ्याच चरणकमलांना वंदन करीत आहे. असे हे सुंदर स्तोत्र आहे.

**– डॉ. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, नवीन मराठी शाळे समोर,
पुणे ४११०३०. फोन : २४४८७०३०

# श्रीराम

श्रीयंत्र हे शक्तिसंपन्न व भौमित्तिक मंडळ असून ती शक्तीची आकृती म्हणून प्रसिद्ध आहे. आणि मातृदेवतेचे हे सगुणरूप आहे.

हे यंत्र सर्वसाधारणत: मातृदेवतेशी निगडित आहे आणि ते देवता व विश्व यांचे प्रातिनिधिक स्वरूप आहे.

ते ध्यानासाठी साधन असून त्यांत भौमित्तिक आकृतीचा नमुना आहे. त्यांत वर्तुळे, त्रिकोण आणि एकमेकांशी जोडलेल्या आकृती एका केंद्रीय बिंदूपासून निर्माण होतात. देवता बिंदूमध्ये भौतिक- शारीरिक स्वरूपात वसलेली आहे. त्याबरोबरच सर्व विश्वाचेही प्रतिनिधित्व करते. हे ऊर्जा केंद्र असून ते निर्मितीचे उगम स्थान आणि एकत्वाचे गूढत्व दाखवते.

देवतेचे आसन ४ खांबावर आहे- निर्माणकर्ता- ब्रह्मा- ईशान्येस, रक्षणकर्ता- विष्णू- आग्नेयेस, संहारकर्ता- रूद्र- नैऋत्येस आणि सदाशिव- वायव्येस.

बिंदू हा यंत्राचा गाभा आहे आणि अनेकवेळेला तत्त्व किंवा क्रिया- म्हणजे पंचक्रिया अशी-

१) त्याच्या मुळापासून ऊर्जा बाहेर पडते.

२) पोकळीमध्ये निर्मितीचे उत्सर्जन करते.

३) निर्माण झालेल्या विश्वाचे रक्षण.

४) निर्माण करणाऱ्या आणि रक्षण करणाऱ्या ऊर्जा काढून घेते.

५) विश्वप्रलयाच्या वेळेला विश्वाच्या ऊर्जानिर्मितीसाठी ऊर्जाचे जतन करते.

एकमेकाविरुद्ध असलेल्या त्रिमिति पुरुष आणि स्त्री तत्त्वाचे प्रतिनिधित्व करते- बिंदूच्या परस्पर विरोधी निर्माण कर्तृत्व दाखवते. सभोवतलाची भौमितीका निर्मितीच्या जागा दाखवते. याचे श्रेष्ठत्व मूळ उगम स्थानात आहे.

श्रीचक्र शब्दश: मातृदेवतेचे चक्र आहे. परंतु यंत्र हे तिच्या शक्तीचे प्रतिनिधित्व आहे. यंत्रासमोर ध्यान केले तर कुंडलिनी जागृत होते. यंत्राची उपासना केल्यास त्यातून ऊर्जास्रोत निर्माण होऊन परिसराचे संतुलन राखले जाते. शांतता व भरभराट निर्माण करते.

# आदि शंकराचार्यांच्या रचना आणि शिल्पांकने

**डॉ. गोरक्ष बंडामहाराज देगलूरकर**

*एम.ए.पीएच.डी, डीलिट, नागपूर विद्यापीठ व डेक्कन कॉलेज, अभिमत विद्यापीठ पुणे येथे अध्यापन रायपूर, भोकरदन, पवनी, मांढळ इत्यादि ठिकाणी पुरातत्त्वीय उत्खनने. बिंबब्रह्म आणि वास्तुब्रह्म, विष्णुमूर्ते नमस्तुभ्यम्, सुरसुंदरी, वेरूळदर्शन, टेंपल आर्किटेक्चर ॲण्ड स्कल्प्चर ऑफ महाराष्ट्र इत्यादि पुस्तकांचे लेखन. परदेशात व्याख्याने व अभ्यासासाठी प्रवास. सध्या डेक्कन कॉलेजचे अध्यक्ष (कुलपती)*

श्रीमदाद्य शंकराचार्यांचे चरित्र आणि कार्यकर्तृत्व अलौकिक होते. त्यांच्या तत्त्वज्ञानाचा विलक्षण प्रभाव होता व आहेही. अद्वैत तत्त्वज्ञानाचे ते उद्गाते आहेत. श्रीरमणमहर्षी तर त्यांना शिवाचा अवतारच मानत. अद्वैताचा थोरामोठ्यावरील प्रभाव आहे. महात्मा गांधी म्हणत की ते अद्वैती आहेत. पंडित नेहरु 'भारताचा शोध' या ग्रंथात, अवघे ३२ वर्षांचे आयुष्य लाभलेल्या या विद्वत्वर्याचे कार्य वाखाणतात. आद्य शंकराचार्य विद्वान होते, तत्त्वज्ञानी होते, कवी होते, संत होते, व्यवहारी सुधारक आणि कुशल संघटक होते असे पंडितजींचे म्हणणे. मध्ययुगातल्या विचारवंतांमध्ये अगदी ठळकपणे शंकराचार्य उठून दिसतात. त्यांचे तत्त्वज्ञान न्यूनाधिक्य-विरहित परिपूर्ण आहे असे सर्वपल्ली राधाकृष्ण म्हणतात.



श्रीशंकराचार्यांचे असामान्य कार्य आणि अजेय तत्त्वज्ञान या संबंधात देशोदेशीच्या अनेक विद्वानांनी ऊहापोह केलेला आहे. अजूनही हे चालूच आहे. त्याबाबत अधिक काही न लिहिता श्रीशंकराचार्यांच्या अनेकानेक रचनातून व जी काही देव-देवतांची वर्णने आली आहेत त्यांचे अनुषंगाने मूर्तिशास्त्रीय विचार या लेखात करावयाचा आहे. एका परीने श्रीआचार्यांच्या रचनांचा हा एक वेगळा आयाम ठरावा.

**सदाशिव :** शिवकेशादि पादान्तवर्णनस्तोत्रम् मध्ये ते सदाशिवाच्या पांचही मुखांचे वर्णन प्रत्ययकारीपणे करतात. ते असे



'सद्योजातारव्यमाप्यं यदुविमलमुदग्वर्ति यद्वामदेव नाम्ना हेम्ना सदृक्षं जलदनिभमघोराह्वयं दक्षिणं यत्। यद्वालार्कप्रभं तत्पुरुषनिगदितं पूर्वमीशानसंज्ञं यद्दिव्यं तानि शम्भोर्भवदभिलषितं पञ्च दद्युर्मुखाति ।। हीच पाच मुखे पाच दिशांना असतात. यातील पूर्वेकडे असते त्याचे नाव तत्पुरुष, पश्चिमेकडचे ते सद्योजात, दक्षिणेकडील ते अघोर, उत्तरेकडचे ते वामदेव आणि ऊर्ध्व दिशेचे ते सदाशिवाचे. ही पाचमुखे अनुक्रमे पृथ्वी, वायु, तेज, आप आणि आकाश यांची रूपे होत. ही पाचमुखे नंदी, महादेव, भैरव, उमा आणि सदाशिव या नावांनीही ओळखली जातात.

सदाशिवाच्या मूर्ती भारतात अनेक ठिकाणी उपलब्ध आहेत. त्या इसवीच्या सातव्या शतकापासून पुढे मिळतात.

**कालभैरव :** कालभैरव अष्टकात याचे वर्णन आलेले आहे. शिवपुराणात भैरवाला शिवाचे पूर्णरूप मानले आहे. तो सर्व जगाचे भरण (पालन पोषण) करतो. मात्र रूपाने तो भीषण आहे. प्रत्यक्ष काळही त्याला वचकून असतो. म्हणून त्याला कालभैरव असेही संबोधितात. त्याला



वाराणसी (काशी) नगरीचा अधिपती मानतात. महाराष्ट्रातही याच्या अनेक प्रतिमा उपलब्ध आहेत. शतरुद्रीयात (कृष्णयुजर्वेदाची तैत्तिरीय संहिता). सृकावन्तो निषंगिण: असे म्हटले आहे. तो छुरिकायुक्त आणि खड्‌गयुक्त दाखविलेला असतो.

औंढा नागनाथ येथे द्वादशज्योतिर्लिंगा पैकीचे स्वयंभू शंकराचे एक स्थान आहे. या देवळाच्या मंडोवरावर (बाह्यभिंतीवर) भैरवाची एक प्रतिमा आहे. तो स्थानकावस्थेत आहे. जटा पिंजारलेल्या असून तो नग्न आहे. हातीं ढाल, तलवार इ. आयुधे आहेत. चतुर्भुज आहे. पायाशी प्रेत आहे.

**दक्षिणामूर्तिशिव :** योगशास्त्राचा आचार्य म्हणून शिवाचे हे ध्यान प्रसिद्ध आहे. प्रसिद्ध मूर्तिशास्त्रज्ञ श्री. गोपीनाथराव यांनी (एलेमेंटस ऑफ हिंदू आयफानोग्राफी, १९१६, २७३.) या रूपाचे योग, वीणा, ज्ञान आणि व्याख्यान असे चार भेद सांगितले आहेत. अद्वैत तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्यासाठी दक्षिणामूर्तीचे प्रयोजन सांगितले आहे. अशा मूर्ती दक्षिणेकडे अधिक प्रमाणात सापडतात आणि त्या दक्षिणाभिमुखच असतात. दक्षिणा म्हणजे सुंदर. म्हणून



दक्षिणामूर्ती म्हणजे सुंदर ध्यान असलेला भगवान् शंकर. भोक्ता जीव, भोग्य जग, भोगदाता परमात्मा आणि मोक्षदाता सद्गुरु हे तत्त्वत: एकरूपच होत. ईश्वर म्हणजे काय? जीव म्हणजे काय? इत्यादी अनेक प्रश्नांची उत्तरे दक्षिणामूर्तिस्तोत्रात आचार्यांनी दिली आहेत. दक्षिणामूर्ती वेरूळ येथील कैलास लेणीत आढळते ती योगदक्षिणामूर्ति या प्रकारात मोडते. (नागपूर येथे पं. बाळशास्त्री हरिदास यांचे घरी असलेले दक्षिणामूर्ति मंदिर हे महाराष्ट्रातील असे एकमेव मंदिर होय.)

वृक्षाखाली पद्मासनात बसलेला शिव ज्ञान वा व्याख्यानमुद्रेत दाखविलेला असला की ती झाली दक्षिणामूर्ती. तो चतुर्भुज असतो. काही वेळा तो योगमुद्रेतही असतो. वेरुळ येथील कैलास लेण्यात तो योगमुद्रेतही आहे. त्याचे आजूबाजूला काही साधक बसलेले दिसतात. त्याचे डोक्याचे वरचे बाजूस अष्ट दिक्पालही आहेत.

आद्य शंकराचार्यांनी रचलेल्या अन्नपूर्णास्तोत्रात वर्णन केलेली अन्नपूर्णा (कैलास लेणे, उत्तर ओवरी), श्रीकृष्णाष्टकात वर्णिलेला श्रीकृष्ण, इत्यादी देवतांच्या प्रतिमा घडविल्या गेल्याचे दिसते. गोवर्धनधारी कृष्ण तर समुद्र पार करून कंबुज देशात (कंबोडियात) गेल्याचे आढळते.

*'करारविंदभूधरं स्मितावलोकसुन्दरं ।*
*महेन्द्रमानदारणं नमामि कृष्णवारणम् ।।४।।'*

असे वर्णन श्रीकृष्णाष्टकात आचार्यांनी केलेले आहे.

श्रीशंकराचार्यांनी चंचल मनाबद्दल शिवानंदलहरीमध्ये म्हटलेय 'मन एव मनुष्यानां कारणम् बंधमोक्षयो:' इसवीच्या १० ते १३व्या शतकात महाराष्ट्रात आणि अन्यत्र उभारल्या गेलेल्या मंदिरांचे बाह्यभिंतीवर कोरल्या गेलेल्या स्त्रीशिल्पातून त्याचे प्रत्यंतर येते. एक माकड एका स्त्रीचे वस्त्रहरण करते आहे असे ते शिल्प असते. मनाची चंचलता चंचल माकडावरून लक्षात यावी हे येथे अभिप्रेत आहे.



**संदर्भ :**


१) सी. शिवराममूर्ती 'शतरुद्रीय विभूती ऑफ शिव', नवी दिल्ली.

२) देगूलरकर गो. बं, १९७४, टेंपल आर्किटेक्चर ॲण्ड स्कल्प्चर ऑफ महाराष्ट्र, नागपूर.

३) देगूलरक गो. बं. २००४ सुरसुंदरी.

४) गोस्वामी पां. ग, (संपा. १९६२ सुबोध स्तोत्रसंग्रह, पुणे.)

५) रुक्मिणी टी.एस. (पुनर्मुद्रित) २०००, शंकराचार्य (इंग्रजीत) नवी दिल्ली.



**– गो. बं. देगलूरकर,**
९०१, पुरुषोत्तम निवास, भांडारकर रोड, गुप्ते हॉस्पिटल,
पुणे ४११००४. फोन नं. : २५६७६६९३

# A Tribute to Sankaracharya A Modernday Revivalist

**Shri. Shanker Ramanathan**

**B.Tech. in Electrical Engineering from IIT Mumbai, 1973, Diploma in Management from XLRI Jamshedpur, Certified Leadership Trainer and a post Graduate in Hindi from Wardha University. After a long stint in the software Industry he is now into soft skills training for Corporates. The current article is his humble tribute to the great modern day revivalist of the Sanatana Dharma Sri Adi Sankaracharya.**

Sankaracharya was born at a time when the Hindu religion was under decline due to the rise of various other religions in India.Unlike the other Avtaras where Lord Vishnu was incarnated with arms to establish Dharma Sankara was incarnated into the world to re-establish the glory of Sanatana Dharma.

Sankara was born in very poor family in the year 788 A.D. in a village named Kaladi, six miles to the east of Alwaye,Kerala.One day, Sankara and his mother went to take bath in the river.Sankara plunged into the water and felt that a crocodile was dragging him by the foot.He shouted out to his mother at the top of his voice: "O dear mother! A crocodile is dragging me down. I am lost. Let me die peacefully as a sannyasin. Let me have the satisfaction of dying as a sannyasin. Give me your permission now. Let me take a Apath-sannyasa".

The mother immediately allowed him to take Sannyasa. Sankara took Apath-sannyasa (the adoption of Sannyasa when death is near) at once. The crocodile let him go unharmed. Sankara came out of the water as a nominal Sannyasin. He again repeated his promise to his mother.He left her under the care of his relatives and gave away his little property to them.He then proceeded to find out a Guru with a view to get himself formally initiated into the sacred order of Sannyasa. Sanakara met Swami Govindpada Acharya in a hermitage in Badrikashram (Badrinath) in the Himalayas and he prostrated at the teacher's feet. Having initiated him and invested him with the robe of a Sannyasin, Swami Govinda taught him the philosophy of Advaita which he himself had learnt from his Guru-Gaudapada Acharya. Sankara learnt all the philosophical tenets from his Guru-Govindapada. Govinda asked Sankara to go to Kashi. Sankara proceeded to Kashi where he wrote all his famous commentaries on the Brahma Sutras, the Upanishads and the Gita and successfully met all the criticisms levelled against them. He then began to propagate his philosophy. Sankara had the greatest esteem for his Guru Govindapada and his Param Guru or the teacher's teacher, Gaudapada.

Mandana Misra was the chief Pandit of the court of Mahishmati. Mandana was brought up in the Karma Mimamsa faith and so he had intense hatred for the Sannyasins. He was performing a Sraaddha ceremony when Sankara somehow dropped down there. Immediately Mandana Misra became very furious. An ugly conversation was started when the Brahmins,who were present there for dinner, interposed and pacified Mandana Misra. Then Sankara challenged Mandana to a religious controversy. Mandana agreed. Bharati who was the wife of Mandana Misra and who possessed scholarly erudition was appointed as the umpire. It was agreed beforehand that Sankara, if defeated, would become a householder and marry; and that Mandana, if defeated, would become a Sannyasin and receive the robe of a Sannyasin from the hands of his own wife. The controversy began in right earnest and continued for days without any interruption. Bharati did not sit and listen to their controversy. She threw two garlands, one each over the shoulders of each of the disputants, and said: "He whose garland begins to fade first should consider himself defeated." She left the place and began attending to her household duties.The controversy went on for seventeen days. The garland of Mandana Misra began to fade first.Mandana Misra accepted his defeat and offered to become a Sannyasin and follow Sankara.

Bharati was an Avatara of Saraswati, the Goddess of Learning.Once the sage Durvasa chanted the Vedas before Brahma and his wife in a big assembly. Durvasa committed a small mistake.Saraswati laughed at it. Durvasa became enraged and gave a curse that she would take birth in the world. Hence Saraswati had to take birth as Bharati.

Bharati now interposed and said to Sankara: "I am the other half of Mandana. You have defeated only one half of Mandana. Let us have a controversy". Sankara objected to have controversy with a woman. Bharati quoted instances wherein there had been controversies with women. Sankara then agreed and this controversy also went on uninterruptedly for seventeen days. Bharati passed from one Shastra to another. At last she found out that she could not defeat Sankara. She decided to defeat him by means of the science of Kama Shastra.

Sankara asked Bharati to give him an interval of one

month for his preparation to hold controversy with her in the science of Kama Shastra. She agreed. Sankara went to Kashi. He separated his astral body from his physical body by means of his Yogic powers and left his physical body in the hole of a big tree and asked his disciples to take care of his physical body. He then entered into the dead body of Raja Amaruka which was about to be cremated. The Raja rose up and all the people rejoiced at the astounding incident.

The ministers and queens soon found out that the revived Raja was a different person, with different qualities and thought. They realised that a soul of great Mahatma had entered the body of their Raja. Therefore, messengers were sent out to search for a human body hidden somewhere in lonely forests and caves and to burn it when found. They thought that if they did so, the new Raja might remain with them for a long time.

Sankara was acquiring all the experience of love with his queens.Maya is very powerful. In the midst, of those queens, Sankara entirely forgot all about his promises to his disciples about his going back to them. The disciples began to search for him. They heard about the miraculous resurrection of Raja Amaruka. They immediately proceeded to the city and had an interview with the Raja. They sang a few philosophical songs which at once revived the memory of Sankara.The disciples immediately repaired to the place where the physical body of Sankara was kept hidden. By that time the messengers of the queen had found out the physical body and had just begun to set fire to it. The soul of Sankara just then entered his own body.Sankara prayed to Lord Hari to help him. There was a shower of rain immediately and that extinguished the flames.

Then Sankara returned to the residence of Mandana Misra. He resumed the old controversy and answered all the questions raised by Bharati satisfactorily. Mandana Misra gave all his property as a gift to Sri Sankara and Mandana was made to distribute it to the poor and the deserving. He then became a disciple of Sankara. Sankara initiated him into the holy order of Sannyasa and gave him the name of 'Sureswara Acharya'. Sureswara Acharya was the first Sannyasin who took charge of the Sringeri Mutt. Bharati also accompanied Sankara to Sringeri and there she is worshipped even today.

**Some Anecdotes :-**

Sankara was going along the street one day with his pupils to take bath in the Ganges when he met a Chandala who was also passing along the street with his dogs by his side. The disciples of Sankara shouted and asked the Chandala to clear off the road. The Chandala asked Sankara: " O, venerable Guru! You are a preacher of Advaita Vedanta and yet you make a great difference between man and man. How can this be consistent with your teaching of Advaitism? Is Advaita only a theory?". Sankara was very much struck by the intelligent query of the Chandala. He thought within himself, "Lord Siva has assumed this form just to teach me a lesson". He composed then and there five Slokas called the 'Manisha Panchaka'. Every Sloka ends thus: "He who learnt to look on the phenomena in the light of Advaita is my true Guru, be he a Chandala or be he a Brahmin".

In Kashi, a student was cramming the Sutras in Sanskrit grammar. He was repeating again and again "Dukrin karane, Dukrin karane....". Sankara heard it and was struck by the preserverance of the boy. He immediately sang a small poem, the famous Bhaja Govindam song, in order to teach the uselessness of such studies in the matter of the liberation of the soul. The meaning of the song is: "Worship Govinda,worship Govinda,worship Govinda,O fool! When you are about to die, the repetition of these Sanskrit Sutras will not save you".

Once some mischief-mongers offered meat and liquor to Sankara, who touched those items with his right hand. The meat turned into apples and the liquor into milk.

A Kapalika came to Sankara and begged for his head as a gift.Sankara consented and asked the Kapalika to take his head when he was alone and absorbed in meditation. The Kapalika was just aiming with a big sword to sever the head of Sankara. Padmapada, the devoted disciple of Sankara came, caught hold of the arm of the Kapalika and killed him with his knife. Padmapada was a worshipper of Lord Narasimha. Lord Narasimha entered the body of Padmapada and killed the Kapalika.

**Sankara's Philosophy** :- Sankara wrote commentaries on the Brahma Sutras, the Upanishads and the Gita. The Bhashya on the Brahma Sutras is called Sareerik Bhasya. Sankara wrote commentaries on Sanat Sujatiya and Sahasranama Adhyaya. It is usually said, "For learning logic and metaphysics, go to Sankara's commentaries; for gaining practical knowledge, which unfolds and strengthens devotion, go to his works such as Viveka Chudamani, Atma Bodha, Aparoksha Anubhuti, Ananda Lahari, Atma-Anatma Viveka, Drik-Drishya Viveka and Upadesa Sahasri". Sankara wrote innumerable original works in verses which are matchless in sweetness, melody and thought and are to this day sung with reverence.

Sankara's supreme Brahman is Nirguna (without the Gunas), Nirakar (formless), Nirvisesha (without attributes), and Akarta (non-agent). He is above all needs and desires. Sankara says," This Atman is self-evident. This Atman or Self is not established by proofs of the existence of the self. It is not possible to deny this Atman, for it is the very essence of he who denies it. The Atman is the basis of all kinds of knowledge. The Self is within, the Self is without, the Self is before and the Self is behind. The Self is on the right hand, the Self is on the left, the Self is above and the Self is below". Satyam-Jnanam-Anantam-Anandam are not seperate attributes. They form the very essence of Brahman. Brahman cannot be described, because description implies distinction. Brahman cannot be distinguished from any other than He. The objective world-the world of names

and forms -has no independent existence.The Atman alone has real existence. The world is only Vyavaharika or phenomenal.

Sankara was the exponent of the Advaita philosophy. His teachings can be summed up in the following words:

**Brahma Satyam Jagat Mithya, Jeevo Brahmaiva Na Aparah**

Brahman alone is real, this world is unreal; the jiva is identical with Brahman.

Sankara preached Vivarta Vada. Just as the snake is superimposed on the the rope, this world and this body are superimposed on Brahman or the Supreme Self. If you get a knowledge of the rope , the illusion of the snake will vanish. Even so, if you get a knowledge of Brahman, the illusion of the body and the world will vanish.

Sankara is the foremost among the master-minds and the giant souls which India has produced. He was the expounder of the Advaita philosophy. Sankara was a giant metaphysician, a practical philosopher, an infallible logician, a dynamic personality and a stupendous moral and spiritual force. His grasping and elucidating powers knew no bounds. He was a fully developed Yogi, Jnani and Bhakta.

There is not one branch of knowledge which Sankara has left unexplored and which has not received the touch, polish and finish of his superhuman intellect. For Sankara and his works, we have a very high reverence. The loftiness, calmness and firmness of his mind, the impartiality with which he deals with various questions, his clarity of expression make us revere the philosopher more and more. His teachings will continue to live as long as the sun shines.

The existence of Vedic Dharma in India today is due to Sankara. The forces opposed to Vedic religion were more numerous and powerful at the time of Sankara than they are today. Still, single-handed, within a very short time, Sankara overpowered them all and restored the Vedic Dharma and Advaita Vedanta to its pristine purity in the land. The weapon he used was pure knowledge and spirituality. The previous Avataras, like Rama and Krishna, used physical forces because the obstacles to Dharma in those days arose from the physical obstructions and molestations of the Asuras (demons). The menace to Dharma in the kaliyuga (age of destruction) arose from obstacles that were more internal than external, more mental than physical. The seeds of Adharma (unrighteousness) were then working in the minds of almost everyone. Hence the evil had to be combated purely by the weapon of knowledge and self-purification.

**Shanker Ramanathan**
9, Ambika Apartments,
Hare Krishna Mandir Road, Pune-411016

# बाल-शंकराचार्य

**सौ. रजनी अनिल साबदे**

*एस.एस.सी., निवृत्त सरकारी कर्मचारी*
*ज्योतिष समुपदेशक, दासबोध अभ्यासक, समाजसेवेची आवड*

निसर्गसंपन्न केरळ मधील कालडी येथील नंबुद्री ब्राह्मण कुळाचा आसमंतात अतिशय आदरयुक्त दबदबा होता तो त्यांच्या केवळ श्रीमंतीनेच नाही तर त्यांची ज्ञानी, दानी व आदरयुक्त वागण्या-बोलण्याची वृत्ती! श्री. विद्याधिराज मोठे पंडित व विद्वान होते. त्यांच्या पोटी शिवगुरू सारखा ज्ञानी- विद्वान- बुद्धिमान तरीही प्रखर वैरागी असा पुत्र जन्मास आला. त्या काळच्या प्रथेप्रमाणे त्यांनी गुरूगृही शिक्षण घेतले होते. तेव्हाच ते संन्यास घेण्याच्या विचारात होते. परंतु गुरूंच्या प्रतिबंधामुळे त्या विचाराला गती मिळाली नाही. पुढे सात्त्विक आर्याम्बाशी विवाह झाला व शिवगुरू गृहस्थाश्रमी झाले. बरेच दिवस पोटी संतान नव्हते पण घराण्याच्या प्रखर शिवोपासनेमुळे शिव-प्रसाद मिळाला व पुत्ररत्न प्राप्त झाले. शिवगुरु व आर्याम्बाचा हा पुत्र म्हणजे प्रत्यक्ष शिवाचा प्रसाद- म्हणजे शंकराचे रूप. तो 'शंकर' म्हणून त्यांच्या अंगणात खेळू- बागडू लागला. पण त्या बाललीला बघण्यास आजोबा विद्याधिराज राहिले नव्हते. 'ईश्वरेच्छा बलीयसि!'

खेळता- बागडता- हसता- हसता बाळशंकर वर्षाचा झाला. आणि त्याच्या मुखातून शब्दब्रह्म अवतरले. 'अम्ब' अतिशय शुद्ध, स्वच्छ शब्द- कुठेही न अडखळता- एकही अक्षर बोबडे नाही- असे नादब्रह्म शंकरच्या मुखातून अवतरत राहिले. व सर्व घर- कुटुंब शंकरच्या नादब्रह्मात आनंदित- प्रसन्न होत गेले. सायंकाळी शिवगुरू शिवोपासनेला बसले की, छोटा शंकर तेथे शांतपणे मांडी घालून बसू लागला. वडिलांच्या तोंडून जे काही बाहेर पडे ते ते- शंकर आत्मसात करण्याचा प्रयत्न करीत राही. शंकर दीड वर्षांचा असता तो पित्याच्या बरोबरीने पुरुषसूक्त म्हणू लागला. मातेने झटकन् मीठ मोहऱ्या उतरवून टाकल्या. कारण हे अगदी अनपेक्षित- विलक्षणच होते! पित्याला उत्साहाचे उधाण आले. आपल्या लाडक्याला काय शिकवू, किती शिकवू असे झाले. वडील शिकवू लागले, अथर्वशीर्ष, श्रीसूक्त, शिवमहिम्न, पवमानसूक्त व मुलगा भराभर शिकवलेले पाठ करून अस्खलित पणे म्हणू लागला. गावात सर्वत्र चर्चेचा व कौतुकाचा विषय झाला. बाळ आता तीन वर्षांचा झाला. वडील नित्याप्रमाणे त्याला शिवमंदिरात रूद्राभिषेक करण्यासाठी घेऊन गेले. भस्माचे पट्टे सर्वांगावर व रुद्राक्षाची माळ गळ्यात घातलेले पिता-पुत्र शिवलिंगापुढे ध्यानस्थ बसले व पित्याबरोबर बाल शंकराच्या मुखातून संपूर्ण रुद्र, टपोऱ्या मोत्याच्या सरातून एक एक मोती ओघळून पडावा- तसा- प्रत्येक शब्द- प्रत्येक ऋचा बाहेर पडत होती. देवदर्शनाला येणारे प्रत्येकजण ते अलौकिक दृश्य बघून विस्मित होत होते. गावात सर्वत्र ही बातमी वाऱ्यासारखी पसरली. शंकर बाळाची प्रगल्भ बुद्धी, ओजस्वी वाणी, साऱ्या पंचक्रोशीत चर्चेचा विषय झाली. पंचक्रोशीतले शास्त्री-पंडीत येऊन शिवगुरूंकडे त्याची जातीने चौकशी करून, त्याला त्यांच्याकडील ज्ञान देण्याविषयी सांगू लागले. मौजीबंधनाचे वय नसल्याने वेदविद्या देता येणार नव्हती. परंतु तर्कशास्त्र, व्याकरण, न्यायशास्त्र शिकवण्यास काही हरकत नाही असे त्या ज्ञानी लोकांचे म्हणणे पडले. कारण शंकरबाळाची बुद्धीच अतिशय तेजस्वी होती. त्यामुळे असा तेजस्वी शिष्य लाभणे हे शिकवणाऱ्याचेच भाग्य चांगले! हाहा म्हणता शंकरने जे जे काही शिकवले जाईल ते ते भराभर आत्मसात केले. त्याच्या बुद्धीला नवीन नवीन खाद्य लागायचे व वडीलही ते खाद्य पुरविण्यात कमी पडू देत नसत. आर्याम्बाला मात्र आपल्या बाळाला दृष्ट लागण्याची भीती वाटत असे. पण बाळाला दृष्ट लागण्याच्या ऐवजी पिताच दृष्टावला गेला. बोलता बोलता शिवगुरुच धाडकन कोसळले. विधिलिखित असे होते म्हणायचे! आर्याम्बाला तर काहीच समजेनासे झाले. आजूबाजूंच्या आया-बायांनी तिला सावरण्यास खूप मदत केली. हळूहळू परिस्थितीचे भान आले; तेव्हा आपल्या बाळाला आपणच आधार दिला पाहिजे, याची जाणीव आर्याम्बाला झाली. दैव किती निष्ठूर बघा, एवढा अलौकिक- तेजस्वी बुद्धिमत्ता असलेला पुत्र भगवंताने आमच्या पदरात घातला. पण दुसऱ्या बाजूने पतिनिधनाचे दुःख भोगणे कपाळी आले. शेवटी ईश्वरेइच्छा बलीयसी! आता आर्याम्बाला आई-वडील अशी दुहेरी

भूमिका निभवायची होती! व ही जाणीवच तिला या दु:खातून बाहेर काढत होती.

शंकरबाळालाही परिस्थितीचे भान आले होते. रावणकाकांबरोबर तो शेतावर जाई. तेथल्या निसर्गात रमत असे. त्या निसर्गाचाच होत असे. सूर्य कसा उगवतो? कसा मावळतो? झाडाची पाने कशी गळतात? झाड कसे अंकुरते? अधान्तरी ढग कसे राहू शकतात? आणि मग बरसताना त्यात पाणी कोठून येते? एक ना अनेक प्रश्नांची उत्तरे तो शोधीत असे. व शोध लागला नाही की मग घरी आल्यावर आईवर प्रश्नांची बरसात करीत असे. त्या प्रश्नांची उत्तरे देताना आर्याम्बाची तारांबळ उडत असे. अशा वेळेस तिला त्याच्या पित्याची आठवण आर्ततेने होत असे. चेहरा ओढल्या सारखा होत असे. कधी कधी रात्री झोप येत नसे. पण काळ थांबत नाही. शंकरबाळ मोठा होत होता. एके दिवशी अशीच पतीच्या आठवणीने व्याकुळ झालेली आर्याम्बा रात्री नीट झोपू शकली नाही. रात्रीच्या काही प्रहरानंतर शंकरबाळाला अचानक जाग आली. लक्षात आले की आपली 'अम्ब' जागीच आहे. तो चटकन उठला व आईला बोलला, 'आई झोप येत नाही का? डोकं चेपू का?' आईने इतका वेळ दाबून ठेवलेला हुंदका एकदम बाहेर पडला.बाळाला पोटाशी धरून कळवळून म्हणाली, 'राजा तुझे बाबा नाहीत; आपण पोरके आहोत रे, कसे होईल आपले?' हे ऐकून चिमुकल्या शंकरने आईची समजूत घातली. 'आई, बाबा कुठेही गेले नाहीत.' मुलाचा हा ठाम स्वर ऐकून आर्याम्बा चकित झाली. बाळ अतिशय आत्मविश्वासाने बोलू लागला, 'आई, आत्मा अविनाशी आहे. नैनं छिन्दति शस्त्राणि, नैनं दहति पावक:।। आजच पद्‌मनाभगुरुजींनी आम्हाला गीतेच्या दुसऱ्या अध्यायात हे शिकवले! पाने गळतात, कालान्तराने त्याची माती होते. पानांची माती झाल्यामुळे– मातीत पानांचे अस्तित्व असते ना? एखाद्या मोठ्या– सृजणासारखा एवढा छोटा बाळ हे बोलत होता. आर्याम्बा आश्चर्यचकित होऊन ऐकत होती. व बाळाला मिठीत घेऊन हुंदके सावरत होती. तरीही बाळ बोलत होता. आपण एकटे नाही. आपल्या बरोबर बाबा आहेतच. आणि तूच म्हणतेस ना, परमेश्वर ठायी ठायी असतो. प्रल्हादाच्या एका हाकेसरशी भगवान खांबातून त्याच्या रक्षणासाठी प्रगट झाला. अग, हा परमेश्वर आपल्या सोबत आहे. मग आपण पोरके आहोत असे तू का मानतेस? अशा या निर्भय– मुलाचे अवलोकन करता करता, आर्याम्बा मनात म्हणत राहिली– बाळा मी यापुढे कधीही दु:खाश्रू गाळणार नाही! कारण बोलता बोलता शंकर बाळ झोपी गेला होता!

गुरुजी पद्‌मनाभांचा शंकर अगदी आवडता शिष्य होता. त्यांना विद्यादानाची अत्यंत आवड असल्याने– ते गावातल्या मुलांना आवडीने शिकवत असत. एकदा त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना विचारले, 'आपल्या या केरळ भूमीला भार्गव भूमी किंवा परशुराम भूमी का म्हणतात?' छोट्या शंकरने ताबडतोब **हात वर केला.** गुरुजींनी खुणेनेच सांग म्हटल्यावर शंकरने सांगितले, ''हिमालयात राहणाऱ्या, जमदग्नी ऋषी व त्यांची पत्नी रेणुका यांच्या पुत्राचे नाव परशुराम – त्यावेळचा तेथला राजा कार्तवीर्य सहस्रार्जुन. खूप शूर पण अत्यंत उन्मत्त. त्याने जमदग्नी ऋषींचा वध केला. परशुरामाला हे कसे सहन होणार? त्याने राजा कार्तवीर्याचा तर वध केलाच पण एकवीस वेळा पृथ्वी नि:क्षत्रिय केली. व तो पृथ्वीचा मालक झाला. पण त्याने राजपद न स्वीकारता– मोठा यज्ञ करून– कश्यपऋषींना सर्व पृथ्वी दान केली. तेव्हा कश्यपांनी परशूरामांना तेथे राहण्याची परवानगी नाकारली. परशूराम खांद्यावर परशू टाकून उत्तरेकडून दक्षिणेकडे निघाले. त्याने वरुणाची करुणा भाकली व स्वत:च्या हक्काची जमीन मागितली. वरुणाने सांगितले, 'भार्गवा हातातला परशू सागराच्या दिशेने फेक. तो जेथे पडेल तेवढी तुझी जमीन!' तेव्हा परशूराम गोकर्ण महाबळेश्वर येथे उभे होते. ते उभे होते तेथून परशू फेकला. जेथे परशू पडला तेथे प्रचंड आवाज झाला. सागरात एक लांब व चिंचोळा पट्टा निर्माण झाला. गोकर्ण महाबळेश्वर ते कन्याकुमारी असा लांब चिंचोळा पट्टा निर्माण झाला. ती ही भार्गवभूमी. तेथे 'चेर' नावाच्या राजाची राजवट सुरू झाली. ते 'चेरतल' म्हणून होते. पुढे चेरतल चे 'केरळ' बनले.'' प्रखर– बुद्धीच्या छोट्या शंकरने ही केरळची गोष्ट सांगून गुरुजी व आपल्या सहाध्यायानांही चकीत केले. असा हा चौकस– हुशार शंकर आपल्या बुद्धीने– नम्र वाणीने, आदरयुक्त वागणुकीने सर्वांच्या कौतुकास पात्र होत राहिला.

एके दिवशी वाडीतले मार्तंडस्वामी व जगन्नाथ नायर हे प्रतिष्ठित लोक, आर्याम्बाला विनंती करून शंकरला गुरूगृही शिक्षणास पाठविण्यासाठी सांगण्यास आले. कारण हे दोघेही शिवगुरूंचे मित्र होते. गुरूगृही पाठवायचे म्हणजे अगोदर शंकरचे मौंजीबंधन करावे लागणार होते. यासर्व गोष्टी साठी आर्याम्बाचे मन तयार होत नव्हते. तिचे म्हणणे होते, बाळ अजून लहान आहे. आर्याम्बा आतल्या खोलीत बसली होती. बैठकीतून मार्तंडस्वामी सांगत होते, ''वहिनी, तुमचा मुलगा अत्यंत हुशार आहे. प्रखर बुद्धिमत्तेचा असून, आपल्या गावाला लाभलेला हा भगवंताचा प्रसाद आहे. त्याचे गुरूपद स्वीकारणारा खरोखर धन्य होणार आहे! त्यामुळे तुम्ही मन छोटे करू नका. प्रथम त्याची मुंज करून घेऊ!'' 'पण घरात कोणी जबाबदार पुरुष माणूस नाही–' आर्याम्बा

म्हणाली. त्यावर 'शंकरच्या मौजीची जबाबदारी सर्व कालडी गांव घेईल. तुम्ही अजिबात काळजी करू नका.' अशी ग्वाही आलेल्या मंडळींनी दिल्यावर आर्याम्बाला काही बोलता आले नाही व तिने त्यांच्या प्रस्तावास होकार दिला. कालडी गावातल्या सर्व लोकांनी, शिवगुरू व आर्याम्बाच्या लाडक्या बाळाची मुंज अतिशय थाटाने- हौसेने व आपुलकीने केली. आर्याम्बानेही अगदी संयमित व स्थिर मनाने- नंब्रुदी घराण्याला साजेशी सर्व तयारी केली. मुंजविधीत तिला सारखे- शिवगुरू तेथे असल्याचा भास होत होता. कारण तिच्या बाळाने तिला सांगितले होते, 'माझे बाबा गेलेले नाही. ते येथेच आहेत!'' भिक्षावळही मोठ्या थाटात- हत्तीवरून निघाली होती. सर्व गाव त्या मिरवणुकीत सामील होता. अद्याप गावात असा सोहळा कधी कोणी पाहिलाच नव्हता.

अम्ब-माऊलीच्या सावलीतून छोटा शंकर गुरुकुलांत गुरू माऊलीच्या छत्राखाली आला. गुरुदेवांना साष्टांग दंडवत घालून बरोबरच्या छात्रांमध्ये शंकर बसला. पण त्या प्रसन्न व तेजस्वी बालछात्रावरून गुरूंची नजर हालत नव्हती. त्याचे छोटे वय पाहून त्यांनी त्याला जवळ घेतले व येथे विनासंकोच राहून मनापासून अभ्यास करण्यास सांगितले व आपल्या पत्नीच्या स्वाधीन केले. त्याचे छोटे वय- प्रसन्न व आत्मविश्वासू मुद्रा बघून तीही सुखावली. छोट्या शंकरच्या स्पर्शात त्या दोघांना अगदी जवळीक जाणवली.

कालडीकडे वाहत जाणाऱ्या पूर्णा नदीच्या किनारी- निसर्ग सान्निध्यात हे गुरुकुल वसले होते. बालशंकरला येथे तसे वेगळे काहीच जाणवले नाही. आई उगाचच आपली काळजी करते असे त्याला वाटले.

अगदी पहाटेच तेथला दिनक्रम सुरू होत असे. प्रातर्विधी उरकून सर्वजण पूर्णा नदीवर स्नानासाठी जात. पूर्णेत उतरल्यावर, वाहाणारे पाणी कालडीकडे जाणारे होते. तेव्हा छोटा शंकर पाण्यात दोन्ही हात फिरवीत पूर्णेच्या कानात हे सांगत असे, ''हे पुण्य सलिले, तू येथून कालडीकडे वहातेस, तेव्हा याच प्रवाहात स्नान करणाऱ्या माझ्या मातेस हळूच सांग की तुझा बाळ सुखरूप आहे. त्याचे अध्ययन सुरू झाले असून, तो येथे रुळला आहे, त्याची काळजी करू नकोस व मनी दु:ख करू नकोस. तुझे स्मरण कायम माझ्या मनात आहे!' कारण आर्याम्बा रोज पूर्णेवर नियमाने स्नान करायला जात असे.

स्नान झाल्यावर सूर्यनमस्कार, व नंतर गोरस प्राशन करून, अध्ययन सुरू होत असे. आश्रमातली कामे करण्यासही शंकरची मदत असे. सूर्य वर आल्यावर भिक्षा मागावयास सर्व विद्यार्थी जात. शंकरला प्रथम संकोच वाटे. नंतर भिक्षाव्रताचे महत्त्व त्याच्या लक्षात आले. भिक्षाव्रतामुळे माणसाच्या स्वभावातले अनेक कंगोरे कळतात. भिक्षान्न पवित्र तर आहेच पण त्यामुळे जिभेचे चोचले चालत नाहीत. अन्नाला फारसे महत्त्व राहत नाही. केवळ शरीर पोषणासाठी अन्न असते 'उदर भरण नोहे जाणिजे यज्ञकर्म' या उक्तीची जाणीव होते. व सर्व बुद्धी अभ्यासावर लावता येते.

गुरुकुलात अध्ययनाबरोबर विद्याग्रहणाबरोबर, स्वावलंबन, शिस्त, नियमितपणा, आज्ञाधारकपणा, शारीरिक श्रम, आरोग्य, नित्योपासना- या गुणांबरोबरच मनावर नियंत्रण ठेवणे, सहकार्य, सेवाभाव, स्वाध्याय इ. गुणाचे रोपण करून त्याचा विकास केला जातो. त्याबरोबर गुरुसेवा हे व्रतही आचरावे लागते. शंकर आता या वातावरणात चांगलाच रुळला. ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडुक्य, तैत्तिरिय, ऐतरय, छांदोग्य, बृहदारण्य या दशोपनिषदाचे अध्ययन होत होते. गुरुजींचे शंकरकडे विशेष लक्ष होते. कारण त्याची प्रचंड आकलन शक्ती- प्रखर बुद्धिमत्ता. सर्व अध्ययनानंतर गुरुजी, इतर शास्त्री- पंडितांबरोबरच्या चर्चासत्रात शंकरला बरोबर नेत असत. गुरुकुलात कोणी शास्त्री पंडित आल्यास शंकरला त्यांच्या बरोबर साधक- बाधक चर्चेला बसवत. त्यामुळे शास्त्री-पंडित- विद्वान शंकरसारखा शिष्योत्तम गुरुदेवांना मिळाला म्हणून त्यांच्या भाग्याचा हेवा करीत. हेच शास्त्री-पंडित बाहेर बालशंकरची वाहवा करीत असत. गुरुदेव बालशंकरला, इतर विद्यार्थ्यांना काही विषयही शिकवायला सांगत. त्यावेळेस शंकर आपल्या मधुर वाणीने- उत्तम अभ्यासाने व स्पष्ट शब्दोच्चाराने विद्यार्थ्यांना अंतरंग उपासनेत ॐ - म्हणजेच प्रणवउपासनेचे श्रेष्ठत्व समजावून सांगत. ॐकार हा अ उ म या दोन ऱ्हस्व स्वर व एक व्यंजन यापासून निर्माण झाला आहे. नाद-ध्वनी ती कशी सर्वाधार आहे. शंकर ॐकाराची उकल इतकी सुरेख व श्रवणीय करीत असे की ऐकणारा मंत्रमुग्ध होत असे. एकदा गुरुदेवांनी हे ॐकार आख्यान ऐकले- तेव्हा शंकर मुंडकोपनिषदातला प्रणवाचा हा श्लोक समजावत होता,

***प्रवणो धनुः शरोह्यात्मा । ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।***
***अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत् तन्मयो भवेत-***

ॐ कार हे धनुष्य. त्याला जोडलेला बाण म्हणजे आत्मा- जीव- त्या बाणाचे लक्ष्य 'ब्रह्म'. शिकारी ज्याप्रमाणे सर्व जग विसरून लक्ष्याकडे एकदृष्टी होतो त्याप्रमाणे अवधान सुटू न देता पूर्ण तल्लीनतेने उपासना केल्यास बाण जसा लक्ष्याला भिडतो- त्याप्रमाणे जीव ब्रह्ममय होतो, तो वेगळा राहूच शकत नाही.

हा पाठ ऐकताना गुरुदेवांचे डोळे आनंदाश्रूंनी वाहू लागले. 'शिष्यात इच्छेत् पराजयम्' या उक्तीचा आनंद त्यांना पुरेपुर आला होता.

शंकर त्याच्या इतर सहअध्यायांपेक्षा कित्येक पटीने श्रेष्ठ होता. दशोध्यायाबरोबर- चार वेद- शिक्षा- ज्योतिष, छंद, इत्यादी विषयांचाही अभ्यास त्याने उत्तम पूर्ण केला. तसेच त्याचे इतरांशी सौहार्दपूर्ण वागणे-विनम्र स्वभाव व आश्रम-नियमांचे निष्ठेने पालन, त्यामुळे तो इतरांप्रमाणे गुरूदेवांचाही आवडता होता. इतर विद्यार्थी त्याच्याबद्दल कधी द्वेष-मत्सर ठेवत नव्हते. कारण शंकर सगळ्यांनाच अतिशय प्रेमाने व स्नेहाने वागवीत असे. बुद्धिमान- निर्बुद्ध, गरीब- श्रीमंत हा भेद त्याने कधी केला नाही. भिक्षाव्रतही सर्वांसारखेच होते.

एकदा भिक्षा मागण्यासाठी शंकर व त्याचे दोन सहाध्यायी गावात गेले. नेहमीप्रमाणे 'ॐ भवति भिक्षां देही' अशी आरोळी दिली. बराच वेळ झाला. कोणी बाहेर येत नाही म्हटल्यावर- ते परत जाण्याचा विचार करू लागले. इतक्यात घरातली गृहिणी बाहेर आली. पण रिक्त हस्त! अपराधी भाव चेहऱ्यावर दिसत होते. मोठ्या कष्टाने ती म्हणाली, 'अतिथी दारात येणे- हे भाग्यवंताचे लक्षण- पण आम्ही दुर्भागी, घरात दाण्याचा कणही नाही- काय देऊ मी तुम्हाला?' त्यावर शंकर म्हणाला, 'घरात जे काही असेल ते वाढ माई!' ती माऊली आत गेली व ओंजळभर आवळे घेऊन आली. डोळ्यात पाणी आणून ते सर्व आवळे त्या बटूंच्या झोळीत तिने टाकले. मनाने अत्यंत हळवेपणा असलेला शंकर अगदी गहिवरून गेला व आर्ततेने लक्ष्मीची प्रार्थना केली,

***अङ्गं हरेः पुलकभुषणमाश्रयन्ती***
***भृङ्गाङ्गनेव मुकुलाभरणं तमालम् ।***
***अङ्गीकृताखिलविभूतिरपाङ्गलीला***
***माङ्गल्यदास्तु मम मङ्गलदेवतायाः।।१।।***

(श्रीहरीच्या अंगावरील ते रोमांच भूषणासारखे सुंदर दिसतात. नीलवर्णाच्या कळ्यांनी भूषित असलेल्या तमालवृक्षावर जसे भुंगे असावेत त्याप्रमाणे लक्ष्मीच्या कटाक्षाने पुलकित झालेला श्रीहरीचा देह शोभत आहे. सर्व वैभवांनी संपन्न असलेली ती लक्ष्मीची कृपाकटाक्ष लीला मला सर्व काळ मंगलदायक होवो.)

अशातऱ्हेने कनकधारा स्तोत्राचे अठरा श्लोक म्हणून झाले व शंकरासह सर्व पुढच्या घरी भिक्षा भागावयास पुढे गेले. तेव्हा बरोबरच्या छात्रांनी विचारले, 'तू हे आज कोणते स्तोत्र म्हटलेस?' चालता चालताच शंकर बोलला, 'हे कनकधारा स्तोत्र आहे. या स्तोत्रामुळे कदाचित् त्या बाईंची दरिद्रता नाहीशी होईल!

पुढील घर हे श्रीमंत गृहस्थाचे होते. 'भिक्षां देही' असे उद्गार ऐकून ते श्रीमंत गृहस्थ बाहेर आले. ते या छात्रांना पाहून आनंदित झाले. कारण त्यात शंकरसारखा तेजस्वी छात्र होता. धनिकाने, भिक्षा घालायला झोळी पुढे करा सांगितले. परंतु नम्रतेने शंकरने नकार दिला. धनिकाने आश्चर्य व्यक्त केले. त्यावर शंकर म्हणाला, 'महोदय, आपल्या आजूबाजूला अशा खूप व्यक्ती आहेत- त्यांच्याजवळ अन्नसुद्धा नाही. अशा लोकांबद्दल आपल्या सारख्यांना त्याची जाणीव असायला हवी. आपण धनिक आहात- स्वत:ला समाजाबद्दल कळकळ आहे असे सांगत असता, पण आपल्या शेजारी असलेले कुटुंब अतिशय विपन्नावस्थेत जगत आहे. आपल्याला त्याबद्दल काही जाणवत नाही का? तेव्हा त्या धनिकाला उपरती झाली. त्यांनी शंकरच्या झोळीतले आवळे घेतले व तेवढेच सोन्याचे आवळे करून त्या कुटुंबाला दिले व त्या कुटुंबाची दरिद्रता कमी केली.

असा या कनकधारा स्तोत्राचा प्रभाव आहे!

शंकरबाळ गुरूगृही गेल्यापासून आर्याम्बा अगदी विरक्त भावनेने आयुष्य कंठत होती. आजूबाजूच्या बाळ-गोपाळांमध्ये आपल्या शंकरला पहात होती. शंकरबाळाला गुरुकुलात जाऊन तीन वर्षे झाली होती. आणि एके दिवशी गुरुकुलातून आर्याम्बाकडे निरोप आला की, शंकरचा अभ्यासक्रम संपला असल्याने कुणी जबाबदार व्यक्तीने त्याला घेऊन जावे. या निरोपामुळे, आर्याम्बाच्या मनात अनेक कुशंकानी घेर घातला. १२ वर्षांचा अभ्यासक्रम तीन वर्षात कसा संपला? शंकरची तब्येत तर बरी नसेल? की त्याला विद्याग्रहण जमत नसेल? म्हणतात ना, मन चिंती ते वैरी न चिंती । म्हणता म्हणता गावात सुद्धा ही बातमी पसरली. म्हणून आर्यम्बाच्या विनंती वरून वीरभद्राचार्य, पुट्टूस्वामी- राघवराव शंकरला आणण्यासाठी गुरुकुलात गेले. गुरुकुलात शंकरची गुरुदेवांनी खूप स्तुती केली, खूप कौतुक केले. इतर छात्रांपेक्षा शंकरची बौद्धिक क्षमता चौपट आहे. त्यामुळेच बारा वर्षांचा अभ्यासक्रम, त्याने तीन वर्षात पुरा केला. त्यामुळे कालडीच्या तीनही दिग्ज्जांना खूप अभिमान वाटला.

शंकरला निरोप देण्यासाठी गुरुदेवांनी छानसा निरोप समारंभ आयोजित केला. शंकरसारखा दैदिप्यमान बुद्धी असलेला शिष्य लाभणे हे सुद्धा गुरुदेवांचे भाग्य होते. त्याबरोबर शंकरचा अत्यंत विनम्र स्वभाव, त्यामुळे तो सर्वांना आपलासा वाटे! अशा शिष्योत्तमाचा विरह गुरुदेवांना वाटणे अगदी सहाजिक होते. तसेच शंकर बरोबरच्या छात्रगणांना सुद्धा हा क्षण अत्यंत कठीण होता.

आर्याम्बाने पाठविलेली गुरुदक्षिणा शंकरने अत्यंत नम्रतेने, गुरुदेवांच्या पायी ठेवली. गुरुदेवांनी आपल्या जवळील वल्कल शंकरच्या पाठीवर मायेने पांघरले व बोलते झाले ते अत्यंत गद्‌गदलेल्या स्वरातच: 'शंकरने आपल्या असामान्य बुद्धीने १२

वर्षांचा अभ्यासक्रम तीन वर्षांत पूर्ण केला आहे. असा शिष्य मिळणे माझे भाग्य आहे. आपल्या नम्र स्वभावाने त्याने सर्वांना जिंकले आहे. हा आदर्श इतर छात्रांनाही घेण्यासारखा आहे. अशा या शिष्योत्तमाला मी 'आचार्य' ही पदवी बहाल करतो. कारण शंकर सर्व शास्त्रांचा अर्थ तर उत्तमप्रकारे जाणतोच- पण तसा आचार आचरणात आणून त्याची नीट स्थापना व्हावी म्हणून सतत प्रयत्नांत असतो व स्वत:ही तसे आचरण करीत असतो. म्हणनूच त्याला 'आचार्य' ही पदवी शोभून दिसते. चि. शंकर शिवगुरू नंब्रुदी हा माझा छात्र 'आचार्य' ही पदवी धारण करण्यास अत्यंत योग्य आहे. त्याबद्दल मला अतिशय आनंद व अभिमान आहे.''

राघवराव, वीरभद्राचार्य - पुट्टू-स्वामींचाही ऊर आनंदाने व अभिमानाने भरून आला. सर्वांनी टाळ्यांचा कडकडाट केला. अशा 'बाल शंकरचार्यांची' मिरवणूक हत्तीवरून कालडी गावात काढली व सर्व कालडीकरांनी या 'बाल शंकराचार्यांचे' मनापासून स्वागत केले.

**- सौ. रजनी अनिल साबदे**
८/१२६ कामदा हौसिंग सोसायटी, चिंचवड,
पुणे ४११०३३.
फोन नं. : २४३५३९४३

---

# *श्रीशंकराचार्यरचित गंगास्तोत्र - स्वैर अनुवाद*

**सौ. शैला सुहास पटवर्धन**

विमले, गंगे, त्रिभुवनतारिणि, भगवति सुरेश्वरी ।
शंकरमौलिनिवासिनि, शालिनि, तरंग तव सुस्वरी ।।

सुखदायिनि तू, तवजलमहिमा वेदोविख्यात,
भागिरथि तू, कृपामयी, तव अपार पावित्र्य।
मी अज्ञानी, चंचलमति मी, रक्षण माझे करी,
चरणकमलि तव मन्मन राहो, कृपा करी मजवरी ।।

हरिचरणी तव उगम सुभाग्ये, तुषारकांती तू !
मौक्तिक म्हणुकी शशिमुखि म्हणू ग? धवला, शुभ्रा तू ।।

भवसागर हा दुस्तर माते, नौका पार करी
पापभार मम शिरिचा नाशुन मजवर कृपा करी ।।

ज्याने ज्याने निर्मल जल तव थेंब प्राशिले जरी
परमपदाचा हक्कदार तो शंका नच तिळभरी-
मृत्युहि म्हणतो ''नको! न करतो दृष्टिक्षेप यावरी''
'हरगंगे जय भागिरथि' स्वर ज्याच्या अधरांवरी ।।

पतितोद्धारिणि तूच जाह्नवी, जह्नु ऋषिकन्या-
अनंत पापी उद्धरिलेसी, त्रिभुवनि तू धन्या!!
खंडित पर्वतकडे खुलविती कमनिय तव पात्र
स्वर्गि अप्सरा लज्जित होती पाहुन तव नृत्य ।

तू भीष्मांची माता! गाथा विक्रमि वीरांची-
रामायणी अन् महाभारती साक्ष तुझ्या कार्याची ।।

तू तटिनी, उच्छृंखल लहरी तुझ्या नाचती जेव्हा
स्वर्ग उतरतो या धरतीवर नंदनवन तेव्हा!
कल्पतरुपरी कितिकां होसी माते, फलदायिनी
तवजलस्नाने गर्भवासही- मुक्ति पापनाशिनी।।

तुझ्या जळीचा मीन होऊ की कासव झालो जरी,
य:कश्चित् सरडा जरि झालो मला धन्यता खरी ।
चांडालाचा जन्म लाभला तरी दे तीरावरती
वैकुंठचि हे मानिन माते, ह्या पुण्यक्षेत्री ।।

अलकानंदे, मोदस्वरूपिणी, सुखदायी दर्शने,
तवचरणी इंद्रादिमुकुटमणी चमचमती रत्ने
विशालिनी, वसुधाकंठीची तूचि रत्नमाला!
अक्षयहर्षिणी, तुझी भक्ती दे मोक्ष साधकाला ।।

पज्झटिका छंदात बांधिले स्तोत्र आचार्यांनी
स्वैररूप हे देते रसिका 'केवळ भक्ति' म्हणूनी।।

**- सौ. शैला सुहास पटवर्धन**
D-३, प्राजक्ता अपार्टमेंटस्, १/१४, कर्वेनगर,
पुणे ४११०५२. फोन नं. ६५२१८५३१

# जगद्गुरु शंकराचार्यांचे चार शिष्योत्तम


**सौ. सुनंदा आनंद शाळिग्राम**

*एम.ए. मराठी, प्रवचनकार.*
*स्वामी सत्यदेवानंद यांच्या शिष्या श्रीगीता, श्रीज्ञानेश्वरी व भागवत यांची निरूपणसेवा.*


***''कृते विश्वगुरुर्ब्रह्मा, त्रेतायां ऋषिसत्तमः ।***
***द्वापारे व्यास एवं स्यात्, कलावत्र भवाम्यहम् ।।'***

''सत्ययुगात ब्रह्मदेव हे विश्वगुरु होते. त्रेतायुगात महर्षि वसिष्ठ व द्वापारयुगात व्यास होते. आता कलियुगात मी विश्वगुरु आहे''- राजा सुधन्व्याच्या विनंतीवरून आद्य शंकराचार्यांनी हे सांगितले आहे. या जगाला विश्वगुरूची आवश्यकता आहे का आणि कशासाठी?

***''त्रिजगति सज्जनसंगतिरेका,***
***भवति भवार्णवतरणे नौका ।''***

''या त्रैलोक्यात फक्त सज्जनसंगतीच भवसागरातून तारून नेण्याला नौकेप्रमाणे उपयुक्त आहे.''

(-द्वादशपंजरिकास्तोत्र)

पुढे श्रीशंकराचार्य म्हणतात,

***''गुरुचरणाम्बुजनिर्भरभक्तः।***
***संसारादचिराद्भवमुक्तः ।।''***

''श्री गुरुचरणकमलांची दृढभक्ती करणारा संसारातून लवकर मुक्त होतो.''

या सत्संगापासून मुक्तीपर्यंत सच्छिष्य कसा पोहोचतो?

***''सत्संगत्वे निःसंगत्वं, निःसंगत्वे निर्मोहत्वम् ।''***
***निर्मोहत्वे निश्चलितत्वं, निश्चलितत्वे जीवन्मुक्तिः।।''***

म्हणून श्रीगुरुप्राप्ती होणं आणि आपण सच्छिष्य होणं अत्यंत महत्त्वाचं आहे.

आद्य शंकराचार्यांच्या चरित्राकडे सहज नजर टाकताच आपल्या लक्षात येते की, ते सच्छिष्य तर होतेच. पण त्याहून ते एक श्रेष्ठ गुरू होते. आणि आपल्या अमर्याद ज्ञानानं आणि विशाल अंतःकरणानं ते जगद्गुरु झाले. गुरुपरंपराप्राप्त ज्ञानाचं महत्त्व त्यांनीच या भरतभूमीत रुजवलं, वाढवलं. 'आचार्य' म्हणजे 'आचिनोति सर्व शास्त्रार्थान्'. सकल शास्त्रांचे सार जो वेचतो आणि आचरून जो जगाला देतो, तो आचार्य.

श्री ज्ञानदेवांच्या शब्दात ते 'वडिल' होत-

***''श्रुतिस्मृतींचे अर्थ । आपणचि होऊन मूर्त ।***
***अनुष्ठोनि जगा देत । वडिल जे ।।''***

'बालपणीच सर्वज्ञता वरी तयाते' असा बालशंकर वयाच्या आठव्या वर्षी गुरुशोधार्थ घराबाहेर पडला नि नर्मदेकाठी ओंकारमांधाता इथे श्रीगुरु गोविंदपादांच्या चरणी आला. परमगुरु श्री गौडपादाचार्य व सद्गुरु गोविंदपाद यांच्याकडून केवळ चार वर्षांत सर्वविद्या पारंगत झालेला शंकर बाराव्या वर्षी 'आचार्य' पदी आरूढ झाला. ''वैदिक धर्माच्या पुनस्स्थापनेसाठी तुझा जन्म झालेला आहे. आस्तिक-नास्तिक हजारो मतांना तू अद्वैत ब्रह्मज्ञानात विलीन करशील. वेदव्यासांच्या ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहून अद्वैत वेदान्ताला तू सर्वोच्च स्थानी सुप्रतिष्ठित करशील'' असा श्रीगुरुंचा आशीर्वाद घेऊन त्यांच्या आज्ञेने शंकराचार्य काशीक्षेत्री आले.

चोलदेशात राहणारा सनंदन नावाचा ब्राह्मण तरुण गुरुशोधार्थ व तत्त्वज्ञानप्राप्तीच्या उद्देशाने काशीत आला होता. श्री शंकराचार्यांच्या अलौकिक प्रतिभेने व असामान्य व्यक्तिमत्त्वामुळे त्यांच्यावर त्याची श्रद्धा बसली. त्याने त्यांचे चरण धरले आणि शिष्य म्हणून स्वीकार करण्याची विनंती केली. कोण होता हा सनंदन? चोल देशातील अहोबल गावचा, माधव व लक्ष्मी यांच्या पोटी जन्मलेला एक ब्राह्मणकुमार. आईबाप लहानपणीच वारले. मामानेच शिक्षण केले. मामा दिवाकरध्वरी हा प्रख्यात मीमांसक प्रभाकराचा पट्टशिष्य होता. मामाच्या अध्यापनाने सनंदन विद्वान पंडित झाला; पण चित्ताचे समाधान झाले नाही. वैराग्य प्रबल होऊन बालवयातच त्याने गृहत्याग केला. भगवद्प्राप्तीसाठी दक्षिणेतील बल पर्वतावर गेला. फलमूल भक्षण करून श्रीनृसिंहदेवांची आराधना करू लागला. एके दिवशी एका व्याधाने त्याला वनात येण्याचे कारण विचारले. त्याने श्रीनृसिंहदर्शनाची अभिलाषा सांगितली. व्याध गेला व थोड्या वेळात लतापल्लवांनी बांधलेला श्रीनृसिंह घेऊन आला. श्रीनृसिंहाला पाहताच सनंदनाने त्याला वंदन केले व स्तवन करू लागला. श्रीनृसिंहाने वर मागण्यास सांगितले. सनंदन म्हणाला, ''प्रभो, संकटकाळी मी आपले स्मरण करताच आपण मला दर्शन

द्यावे व संकटमुक्त करावे.'' श्रीनृसिंहांनी 'तथास्तु' म्हटले व ते अंतर्धान पावले.

भगवंताचा असा वर प्राप्त केलेला सनंदन आचार्य चरणी शिष्यभावाने सादर झाला होता. श्री शंकराचार्यांनी त्याचा शिष्य म्हणून अंगीकार केला व त्याला संन्यासदीक्षा दिली. आचार्यांचा हा प्रथम शिष्य. अगदी छायेप्रमाणे सदैव त्यांच्या सोबत असे. हनुमंतासम त्याने श्रीगुरुसेवा केली व श्रीगुरुंचे रक्षण केले– प्रसंगी आपले प्राणही धोक्यात घालून! तीक्ष्ण बुद्धी, पांडित्य, विद्याप्रेम, प्रतिभा, मेधा आणि अपरंपार गुरुभक्ती या गुणांमुळे तो आचार्यांचा पट्टशिष्य झाला. मात्र इतर शिष्यांना सनंदनाचा मत्सर वाटू लागला. आचार्यांच्या ते लक्षात आले. एकदा स्नानानंतर आचार्यांना छाटी हवी होती. सनंदन पलीकडील तीरावर उभा होता. त्याला हाक मारून आचार्यांनी छाटी आणायला सांगितले. मोठा वळसा घेऊन बेटावरून जावे, तर आचार्यांना बराच वेळ ओलेते रहावे लागेल, म्हणून संनदनाने 'पाण्याला पावलांनी स्पर्श करायचा नाही' ही आपली प्रतिज्ञा बाजूस ठेवून तात्काळ पाण्यात पाय घातला नि तो नदीच्या प्रवाहावरून सरळ आचार्यांकडे चालत आला. तेव्हा त्याच्या पावलाखाली मोठी रक्तकमळे उत्पन्न झाली; जणू कमळांचा रस्ताच. आचार्यांनी धन्योद्गार काढले. म्हणाले, ''माझ्या सनंदनावर देवी भगवतीची किती कृपा आहे पाहिलेत ना?.. आजपासून हा 'पद्मपाद' झाला.''

ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहिण्याचे आचार्यांचे कार्य सुरू असताना एके दिवशी एक वृद्ध ब्राह्मण आले. आचार्यांशी वाद करू लागले. सात दिवस असे चालले होते. हा व्यर्थ कालक्षेप आहे, असे वाटून आचार्य पद्मपादाला म्हणाले, 'याला आता जायला सांग.' तेव्हा पद्मपादानेच त्यांना सांगितले की, 'हा वृद्ध ब्राह्मण व्यासरूपी नारायण आहे.'

आचार्यांच्या सर्व शिष्यांत पद्मपादाचे यौगिक सामर्थ्य अधिक होते. अमरुराजाच्या शरीरात प्रवेश केल्यानंतर आचार्यांना पूर्व देहाचा काही काळ विसर पडला, तेव्हा पद्मपादानेच त्यांना स्वस्वरूपाचे स्मरण दिले व कामशास्त्रावरील ग्रंथ आचार्यांनी युक्तीने पद्मपादाच्याच हाती सोपविला. पद्मपाद आचार्यांचा जणू शरीररक्षकच होता. आचार्यांच्या जीवनात जेवढे जिवावरचे प्रसंग आले, पद्मपाद त्यांचा नुसता साक्षीदार नव्हता, तर प्रत्येक प्रसंगी त्याने आचार्यांचे रक्षण केले. उग्रभैरवाने जेव्हा आचार्यांचे शिरच भैरवदेवतेला अर्पण करण्याचा घाट घातला, तेव्हा पद्मपादच मंदिरात धावला व त्याच्यात श्रीनृसिंहाचा आविर्भाव झाल्याने उग्रभैरवाचाच शिरच्छेद झाला. शृंगेरीला वास्तव्य असताना एका कापालिकानेही असेच आचार्यांचे शिर अर्पण करायचे ठरविले असता पद्मपादांनीच योगबलाने तिथे जाऊन श्रीनृसिंहांना आवाहन केले व कापालिकाला ठार केले. कामरूपातील अभिनवगुप्ताचा वादात पराजय झाल्यावर संतप्त होऊन त्याने आचार्यांच्या शरीरात भगंदर रोग उत्पन्न केला, तेव्हा पद्मपादानेच श्रीनृसिंहदेवांच्या स्वप्नदृष्टांतावरून ओंकारमंत्राने प्रत्यभिचार क्रिया आरंभली आणि आचार्य रोगमुक्त झाले व अभिनव गुप्तांना भगंदर झाला व ते मरण पावले. एकदा तीर्थयात्रेला गेलेला पद्मपाद ब्रह्मसूत्रभाष्याच्या पहिल्या पहिल्या चार सूत्रांवरील आपली टीका मामाने मत्सराने जाळून टाकल्याचे दु:ख घेऊन आचार्यांकडे परतला; तेव्हा गुरुदेवांनी त्याला प्रेमाने जवळ घेऊन सांगितले, ''तुझी ती टीका शृंगेरीला असताना मी तुझ्याकडून सगळी ऐकली होती. आजही मला ती स्मरते. ही टीका तुला अमर करील. तू शोक का करतोस?'' आणि आचार्य 'पंचपदिका' जशीच्या तशी सांगत होते नि पद्मपाद उतरून घेत होता. असे गुरुदेव लाभले म्हणून तो धन्य धन्य झाला होता. आपल्या या नि:स्सीम गुरुभक्ताला आचार्यांनी पुरीधामी गोवर्धनपीठाचे प्रमुख आचार्य नेमले. पद्मपादाचार्यांनी पंचपदिका, विज्ञानदीपिका, विवरण टीका व पंचाक्षरी भाष्य हे ग्रंथ लिहिले.

***

श्री व्यासांच्या आज्ञेप्रमाणे श्री शंकराचार्य कुमारिलभट्टांकडे आले. पण त्यांनी तुषानलात प्रवेश करून जीवनयात्रा संपविण्याचे ठरविले होते. कारण आपण काही काळ ईश्वराविषयी आस्तिक वादाचा अभाव दाखविला व गुरुद्रोह केला, याबद्दल स्वत: प्रायश्चित घ्यायचे म्हणून! त्यामुळे त्यांच्याशी आचार्यांना शास्त्रार्थ करता आला नाही. पण कुमारिलभट्टांनी सांगितले, ''मगध प्रांतात माहिष्मती येथे मंडनमिश्र माझा शिष्य आहे. माझी बहिण साक्षात सरस्वती त्याची पत्नी आहे. त्याच्याजवळ वादभिक्षा मागा. तो आपला अनुयायी झाला तर आपल्या कार्याला गती येईल.'' श्री शंकराचार्य माहिष्मती नगरीला आले. लोक मंडनमिश्रांना ब्रह्मदेवाचा अवतार मानीत होते. पूर्वमीमांसेवर प्रभुत्व असणारा एकमेव विद्वान म्हणून ते प्रसिद्ध होते. विद्वत्ता, तपस्या, अभ्यास, वेदांवर अपूर्व श्रद्धा, तर्कशुद्ध पांडित्यपूर्ण तत्त्वज्ञानपर साहित्याचा लेखक म्हणून ते विख्यात होते, कर्मकांडात प्रवीण होते. त्यांच्या घराचे नाव 'विद्यालय' होते. अहोरात्र पंडितांच्या चर्चा ऐकून त्यांच्या अंगणातील पिंजऱ्यातल्या पोपट–मैनाही तेच शब्द बोलत होत्या. आचार्य मंडनमिश्रांच्या घरी आले; तेव्हा 'विद्यालया'चे दरवाजे बंद होते. मंडनमिश्रांच्या घरी श्राद्ध होते. म्हणून संन्याशाला आत जाण्यास अटकाव केला गेला. तेव्हा आचार्य योगसामर्थ्याने गवाक्षातून आत गेले. श्राद्धाच्या वेळी

अचानक आलेल्या संन्याशाला पाहून मंडनमिश्र रागावले. त्यांनी विचारलेल्या वेड्यावाकड्या प्रश्नांना आचार्यांनी श्लेषात्मक उत्तरे देऊन त्यांना निरुत्तर केले.

मंत्रसिद्धीने मंडनमिश्रांनी श्राद्धाला व्यासांना व जैमिनीला बोलविले होते. व्यासांनी आचार्यांना ओळखले व मंडनाला आतिथ्यधर्मपालनाची आज्ञा केली. तेव्हा मंडनांनी आचार्यांना श्राद्ध होईपर्यंत अग्निशाळेत बसायला सांगून सरस्वतीला भिक्षा वाढण्यास सांगितले. पण आचार्य पाणी प्यायले नाहीत. तेव्हा कारण विचारता म्हणाले, 'मला वादभिक्षा हवी आहे. ती देणार असाल, तरच मी पाणी घेईन.' 'वाद कशासाठी?' म्हणून विचारता आचार्य म्हणाले, ''आपण वेदवेत्ते आहात; पण कर्मसिद्धीलाच सर्वस्व समजणारे आहात. कर्मकांडानं क्षणिक स्वर्गभोग प्राप्त होतात. त्यानं मन:शांती तर मिळणार नाहीच; पण आत्मज्ञानासाठी कर्मकांडाचा काही उपयोग नाही. आत्मज्ञान प्राप्त करायचं असेल तर चित्तशुद्धीद्वारा साधन करून मोक्षप्राप्ती होते नि साधकाला शाश्वत शांती मिळते. कर्मकांडाने स्वर्गच्युत झालेल्या साधकाप्रमाणे याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. माझ्या या पूर्णाद्वैत तत्त्वज्ञानाचा प्रसार मला करावयाचा आहे. त्यासाठी मला आपल्याशी वाद हवा आहे.'' मंडनमिश्र वाद करण्यास तयार झाले. सरस्वतीने न्यायदात्री व्हावे असे ठरले. जो वादात हरेल, त्याने दुसऱ्याचे शिष्यत्व पत्करावे व आपल्या तत्त्वांना तिलांजली द्यावी, असेही ठरले. अनेक विद्वानांसमोर सतत सात दिवस नि रात्री हा वाद चालला होता. गृहकृत्याला जाताना सरस्वतीने दोघांच्या गळ्यात पुष्पमाला घालून सांगितले की, 'ज्याची माला म्लान होईल, तो हरला.' आणि एके दिवशी मंडनमिश्र निरुत्तर झाले. त्यांची माला सुकली. सरस्वती ते पाहून आचार्यांना म्हणाली, 'पत्नी ही पतीची अर्धांगिनी असते. माझे पती अजून पूर्णत: पराजित झाले नाहीत. माझा पराभव केल्याशिवाय माझे पती पूर्णत: पराभूत झाले, असे तुम्हाला मानता येणार नाही. तुमच्याशी शास्त्रार्थ करण्याची माझी इच्छा आहे.' आचार्य तिच्याशी वादाला तयार झाले. पण तिनं त्यांना बुद्ध्याच कामशास्त्रातले प्रश्न विचारले. आचार्यांनी मुदत मागून घेतली. दरम्यान त्यांनी एका मृत राजाच्या शरीरात प्रवेश करून कामकलेचे संपूर्ण ज्ञान मिळविले व कामशास्त्रावरील ग्रंथ लिहिला. एका महिन्यानंतर आचार्यांनी योगबलाने पुन्हा आपल्या देहात प्रवेश करून सरस्वतीपुढे ग्रंथ ठेवला व आपल्या सगळ्या प्रश्नांची उत्तरे यात आहेत, असे सांगितले. सरस्वतीने आचार्यांचा विजय मान्य केला. मंडनमिश्र आचार्यांचे शिष्य झाले. मंडनमिश्रांनी माहिष्मती नगरीतील सर्वांना पाचारण केले व आपल्या घरातील प्रत्येक वस्तू त्यांना घेऊन जायला सांगून सर्वांकडून सर्व संपत्ती लुटवून टाकली आणि सर्वांसमक्ष आचार्यांकडून चतुर्थाश्रम स्वीकारला. आचार्य त्यांना म्हणाले, ''सुरेश्वराचार्य' हा योगपट्ट मी तुला देत आहे. शाश्वत सुखाची प्राप्ती आता तुला दूर राहिलेली नाही.''

सरस्वतीने मंडनांचा व सर्वांचा अखेरचा निरोप घेतला आणि तुंगभद्रेच्या विशाल प्रवाहात उडी घेतली. तिच्या देहाची कृष्णवर्णीय शिळा झाली. आचार्यांनी त्या शिलेवर श्रीयंत्र कोरवून घेतले. आणि तीवर शारदाम्बेची प्राणप्रतिष्ठा केली. तिच्याच नावानं शृंगेरीला शारदापीठाची स्थापना करून या पीठावरचा पहिला आचार्य म्हणून सुरेश्वराचार्यांची नेमणूक केली. सुरेश्वराचार्यांनी नैष्कर्म्यसिद्धि, ब्रह्मसिद्धि, उपनिषदभाष्य वार्तिके व पंचीकरणटीका आणि अन्य काही ग्रंथ लिहिले. विद्वत्तेने व प्रसिद्धीने हे शंकराचार्यांचे सर्वांत श्रेष्ठ शिष्य होते. आचार्य कांचीला सर्वज्ञान पीठावर आरूढ होताना हे तिथे उपस्थित होते.

***

तीर्थयात्रा करीत आचार्य श्रीवल्ली येथे आले. तिथे प्रख्यात मीमांसक प्रभाकर राहात होते. त्यांना पृथ्वीधर नावाचा मुलगा होता. तेरा वर्षांचा झाला तरी तो काहीच बोलत नसे. आचार्यांची ख्याती ऐकून प्रभाकर त्यांच्या दर्शनास गेला व त्याने पृथ्वीधराला आचार्यांच्या चरणी अर्पण केले. व आपली व्यथाही सांगितली. पृथ्वीधराने आचार्यांना साष्टांग नमस्कार घातला. आचार्यांनी त्याला विचारले,

*''कस्त्वं शिशो, कस्य, कुतोसि गन्ता?*
*किं नाम ते, त्वं कुत आगतोसि?*
*एतन्मयोक्तं वद चार्भकत्वं*
*मत्प्रीतये प्रीतिविवर्धनोऽसि ।।''*

''वत्सा, तू कोण आहेस? कोणाचा आहेस? कोठे जात आहेस? तुझे नाव काय? तू कोठून आलास? या माझ्या प्रश्नांची उत्तरे दे. तुला पाहून मला संतोष वाटतो. तू संतोष वाढविणारा आहेस.'' आचार्यांनी असे विचारताच पृथ्वीधर बोलू लागला, ते श्लोकबद्धच! तो म्हणाला,

*''नाहं मनुष्यो, न च देवयक्षौ ।*
*न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रा: ।*
*न ब्रह्मचारी न गृही वनस्थो ।*
*भिक्षुर्न चाहं निजबोधरूप: ।।'*

''मी मनुष्य नाही, देव किंवा यक्ष नाही. मी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वा शूद्र नाही. मी ब्रह्मचारी, गृहस्थाश्रमी, वानप्रस्थी वा संन्यासी नाही. मी केवळ आत्मबोधरूप आहे.''

सलग बारा श्लोकांमध्ये त्याने आपलं निजस्वरूप वर्णन केलं. आचार्य उद्गारले, 'अरे, याला तर तळहातावरील आवळ्याप्रमाणे आत्मज्ञान झालं आहे. हा हस्तामलक आहे.' आणि पृथ्वीधराचा हस्तामलक' झाला. त्याचे ते बारा श्लोक 'हस्तामलकस्तोत्र' म्हणून प्रसिद्ध आहेत. स्वत: आचार्यांनी त्यावर टीका लिहिली आहे. आचार्यांना प्रभाकरांनी पुत्र अर्पण केला असल्याने ते त्याला सोबत नेऊ लागले; पण पृथ्वीधराची आई शोक करू लागली. आचार्यांनी तिचे सांत्वन करताना म्हटले, 'पूर्वस्मृती जागृत करून पाहा. हा मुलगा दोन वर्षांचा असताना त्याला घेऊन तुम्ही एके दिवशी स्नानाला यमुनेवर गेला होता. तेथे यमुनाकिनारी एक योगी ध्यानस्थ बसले होते. तुम्ही त्या मुलाला त्याच्या समीप ठेवून लक्ष ठेवायला सांगून स्नानाला गेला. पण मूल नदीप्रवाहाकडे गेले व प्रवाहात पडून गतप्राण झाले. तुम्ही स्नान आटोपून पुत्राचा शोध घेताच ते मृत झाल्याचे दिसून आले. तो मृतदेह घेऊन तुम्ही त्या योग्यापुढे टाहो फोडला. तुमच्या हंबरड्याने तो द्रवला. योगबलाने त्याने आपला देह सोडून त्या मृत बालकाच्या शरीरात प्रवेश केला. मूल जिवंत झाले, म्हणून तुम्ही आनंदाने घरी परतलात. पण त्याच्या देहात सिद्ध पुरुष विद्यमान असल्यामुळे मुलगा संसार प्रपंचाबद्दल काहीही बोलेना. तो मुका जडमती आहे, असे तुम्हाला वाटले. पण तो पूर्ण ज्ञानी आहे. मात्र तुम्ही त्याला प्रपंचात गुंतवू शकणार नाही. तुम्हाला लवकरच एक सुपुत्र होईल. याला आम्ही नेतो.'' तेरा वर्षांच्या हस्तामलकाला आचार्यांनी संन्यासदीक्षा दिली. आता ते 'हस्तामलकाचार्य' झाले. द्वारकेला मठ स्थापून त्यांना तिथले प्रमुख आचार्य नेमले.

***

केवळ सेवेने गुरूंना प्रसन्न करून घेणारा शंकराचार्यांचा एक शिष्य होता, गिरी! त्याचे खरे नाव कलानाथ. हा काशीच्या विश्वनाथाध्वरिन् ब्राह्मणाचा पुत्र. बुद्धीने सामान्य पण मनाने निर्मळ. आचार्यांवर पराकोटीची भक्ती. एकनिष्ठपणे त्यांची सेवा करीत असे. अत्यंत विनम्र. तो पर्वतासारखा उंच होता. म्हणून त्याला 'गिरी' म्हणत. आणि सगळेच त्याला गिरी म्हणू लागले. आचार्यांचा पाठ तो एकाग्रचित्ताने श्रद्धापूर्वक ऐकत असे.

एके दिवशी सकाळी आचार्यांचा पाठ सुरू व्हायचा होता. गिरी आचार्यांच्या छाट्या धुण्यासाठी नदीवर गेला होता. त्याला थोडा उशीर लागला. आचार्य त्याची वाट पाहात होते. पद्मपाद आचार्यांना म्हणाले, 'आपण गिरीची का वाट पाहात आहात? तो असला काय नि नसला काय? आपण पाठ सुरू करावा.' पद्मपादामधील सूक्ष्म अहंकाराकडे आचार्यांचे बारीक लक्ष गेले. ते स्तब्ध झाले. इतक्यात खांद्यावर छाट्यांचे पिळे टाकून गिरी येताना दिसला. आचार्यांनी गिरीवर कृपादृष्टी टाकून **चासुषी** दीक्षेने त्याला ज्ञानी केले. तो आल्यावर ते म्हणाले, ''गिरी, आजचा पाठ तूच सांग.'' गिरीने आचार्यांना प्रणिपात केला. 'गुरुआज्ञा प्रमाण' मानून गुरुस्तुतीपर एकामागून एक आठ श्लोक, तेही रचनेला अवघड अशा तोटक वृत्तातले एकदम रचून म्हणू लागला.

*''विदिताखिलशास्त्रसुधाजलधे*
*महितोपनिषत्कथितार्थ निधे ।*
*हृदये कलये विमलं चरणं*
*भव शंकर देशिक मे शरणम् ।।'*

या गुरुस्तुतीतील गूढ रचना, प्रसन्न भाषाशैली व अध्यात्मिक आशय पाहून सगळे चकित झाले. त्या दिवशीचा पाठ त्यानेच सांगितला. तोही तोटक वृत्तात! आचार्य उत्स्फूर्तपणे उद्गारले, ''वा! वा! तोटकाचार्य'' आणि तेव्हापासून गिरी 'तोटकाचार्य' म्हणून विख्यात झाले. त्यांनी दिलेला पाठ आजही 'उपनिषद् सारसंग्रह' म्हणून प्रसिद्ध आहे. पद्मपादांनी आचार्यांना दंडवत घालून गिरीला आलिंगन दिले. आचार्यांनी पुढे गिरीला चतुर्थाश्रमाची दीक्षा दिली व ज्योतिर्मठावर प्रमुख आचार्य म्हणून नेमले. तोटकाचार्यांनी 'तोटक-व्याख्या', 'तोटक-श्लोक', 'श्रुतिसार समुद्धरण' इ. ग्रंथ लिहिले.

***

आद्य शंकराचार्यांचे पद्मपादाचार्य, सुरेश्वराचार्य, हस्तामलकाचार्य, तोटकाचार्य यांच्याशिवाय चित्सुख, चिद्विलास, शुद्धकीर्ति, श्वेतब्रह्मपाद, विश्वगुण, ज्ञानकंद, समित्पाणि, विष्णुगुप्त, भानुमरीच, कृष्णदर्शन, बुद्धिवृद्धी, विरिंचिपाद, शुद्धानंद हेही प्रमुख शिष्य होते. पण पट्टशिष्य पहिले चार होते, ज्यांना आचार्यांनी पीठाधिपती नेमले. वैदिक धर्माची ध्वजा जगभर फडकविणाऱ्या संन्यासी- संप्रदायाची संघटना भारतवर्षात उभी करताना आद्य शंकराचार्यांची भूमिका काय होती, त्यांनी आपल्या शिष्यांना तेव्हा काय सांगितले, ते पाहू या. आचार्य म्हणाले,

''ज्या विराटशक्तीच्या इच्छेनुसार या देहाने जन्म घेतला व कार्य केले, तिचीच इच्छा तुम्हाला प्रेरणा देईल. संप्रदायाशिवाय कोणत्याही विद्येला वा साधनेला स्थायीरूप प्राप्त होत नाही. वेदान्त साधनेचा आदर्श सगळ्या जगाचे संपूर्ण कल्याण करणारा आदर्श आहे. तो या जगात सुप्रतिष्ठित करण्यासाठी व लोकांच्या मनात रुजविण्यासाठी तुम्ही संन्यासीसंघ स्थापन करा. भारताच्या चार दिशांना चार मठ स्थापन झाले पाहिजेत. पद्मपाद, सुरेश्वर, हस्तामलक व तोटक हे माझे चार प्रमुखशिष्य या चार मठांचे प्रथम

मठाधीश होतील. माझे इतर शिष्य त्यांचे सहकारी म्हणून कार्य करतील. तुमची शिष्यपरंपरा निर्माण होईल. ती आपापल्या गुरूंच्या आश्रयाने व त्यांच्या नियंत्रणाखाली राहील. दक्षिणेत श्रृंगेरीमठ स्थापन झाला आहे. त्याचे आचार्य सुरेश्वर होतील. पश्चिमेला द्वारकाधाम आहे. तेथील मठाचे प्रथम आचार्य हस्तामलक होतील. पूर्वेकडे पुरीधामी जो मठ स्थापन होईल, त्याचे प्रथम आचार्य पद्मपाद होतील व उत्तरेसाठी ज्योतिर्धामात एका मठाची स्थापना करा. त्याचे आचार्यपद तोटकांना देण्यात यावे.

"तीर्थ व आश्रम संप्रदाय द्वारकामठाच्या आधीन राहतील. वन व अरण्यसंप्रदाय पुरीधाम येथील गोवर्धन मठाच्या अनुशासनात वागतील. गिरी पर्वत व सागर संप्रदाय ज्योतिर्मठाच्या अनुज्ञेत राहून कार्य करतील. सरस्वती, भारती, पुरी संप्रदाय श्रृंगेरी मठाच्या व्यवस्थेनुसार वागतील. संन्याशांचे हे दहा संप्रदाय अशारीतीने या चार मठांच्या आधीन राहून आपापल्या मठांच्या नियमांनुसार वागून व त्यांच्या आदेशांचे पालन करून धर्मानुष्ठान व प्रचारकार्य चालवितील.

"या चार मठांच्या आधारे चार वेदांचीही विभागणी कशी राहील, ते सांगतो. द्वारकामठात सामवेदाचे, गोवर्धन मठात ऋग्वेदाचे, ज्योतिर्मठात अथर्ववेदाचे व श्रृंगेरीमठात यजुर्वेदाचे प्राधान्य राहील. तद्नुसार हे चार मठ क्रमश: 'तत्त्वमसि', 'प्रज्ञानं ब्रह्म', 'अयमात्मा ब्रह्म', 'अहं ब्रह्मास्मि' या महावाक्यांना आधारभूत मानून आपापल्या साधना चालवितील."

(आचार्यप्रणित मठाम्नाय, शेषाम्नाय व महानुशासन या ग्रंथाच्या शेषांशावरून.)

आचार्य शंकरांचे मठ अनुशासन बद्ध होते. त्या त्या मठांत त्या त्या वेदाचे अध्ययन करणे, त्या त्या महावाक्याचे चिंतन करणे, धर्मरक्षण करणे, लोकांना उपदेश करून त्यांच्यात गुणोत्कर्षाविषयी, नीतिविषयी प्रीति निर्माण करणे, त्यांच्याकडून त्यांना प्रिय असणाऱ्या देवतेची उपासना करून घेणे, योगाभ्यासाला योग्य ती दिशा दाखविणे, प्रवचने, भाष्ये, संवाद इ. द्वारा लोकांचे समाधान करणे- ही मठवासियांची नित्यकर्मे तर होतीच; पण आपल्या आचरणाने, चारित्र्याने लोकांना सद्वर्तनाचा ध्यास घेऊन सद्वर्तन करावे, नीतीची हत्या करू नये म्हणून मठवासियांनी आपल्या आदर्श जीवनात तिळमात्रही उणीव ठेवू नये, अशी आचार्यांची प्रखर आज्ञा होती.

आचार्यांच्या मार्गदर्शनानुसार 'साधारण' संवत्सरात माघ शुक्ल सप्तमीला द्वारकापीठाची स्थापना झाली. हस्तामलकाचार्य पहिले अधिपती. 'राक्षस' संवत्सरात पौष शुद्ध पौर्णिमेला ज्योतिर्मठाची हिमालयात स्थापना झाली. तोटकाचार्य पहिले अधिपती. 'नल' संवत्सरात वैशाख शुद्ध दशमीला जगन्नाथपुरीला गोवर्धनमठाची स्थापना झाली. पद्मपादाचार्य पहिले अधिपती. 'पिंगल' संवत्सरात पौष पौर्णिमेला शृंगेरी मठाची स्थापना झाली. सुरेश्वराचार्य पहिले मठाधिपती. आणि 'सिद्धार्थी' संवत्सरात वैशाख पौर्णिमेला कांचीला कामकोटी पीठाची स्थापना झाली. तिचे पहिले आचार्य स्वत: आद्य शंकराचार्य होते.

आचार्यांचे चार उत्तम शिष्य पुढे, उत्तम आचार्य झाले. आचार्य 'जगद्गुरु' होण्यात या चार शिष्योत्तमांचा मोलाचा वाटा आहे. एकदा तीर्थयात्रेची अनुज्ञा मागणाऱ्या पद्मपादाला आचार्यांनी जो उपदेश केला, तोच गोड घास आपणही अंती सेवन करुया. आचार्य म्हणाले, "वत्सा, गुरुसाहचर्य हीच खरी तीर्थयात्रा आहे. गुरुचरणामृत हेच खरे तीर्थोदक आहे. गुरूंच्या ठायी इष्ट दैवत पाहणे हेच खरे देवदर्शन आहे. गुरूंजवळ राहून त्यांची सेवा करणे म्हणजे सर्वतीर्थसेवाच आहे!"

**सौ. सुनंदा आनंद शाळिग्राम**
'विश्वनाथस्मृति' फ्लॅट ३, दत्तवाडी पोलीस चौकी
समोरील लेन, पुणे ३०.
फोन. २४३३४७५०

# अन्नपूर्णा स्तोत्रम्

**- सौ. रेखाताई पटवर्धन**

*एम.ए. संस्कृत,*
*प.पू. स्वामी प्रज्ञानंद सरस्वती यांच्या अनुग्रहीत 'मानसगूढ चंद्रिका' मानस टीकेचा सखोल अभ्यास.*
*२००६ मध्ये कैलास मानसची यात्रा. १९९८ पासून मानस प्रचारासाठी लेखन व भारत भ्रमण.*

आदि शंकराचार्यांचे काशीक्षेत्री दीर्घ वास्तव्य होते. तेव्हा त्यांच्या नित्यक्रमात पंचपंचउष:काली उठून गंगास्नान, अन्नपूर्णा व विश्वनाथ दर्शन या गोष्टी अविभाज्य होत्या. भगवान शंकर म्हणजे ज्ञान-भक्ती अन् वैराग्य यांची साक्षात मूर्तीच! मग त्यांची अर्धांगिनी, सहधर्मचारिणी जी अन्नपूर्णा तिच्यातही हे सारे म्हणजे प्रखर ज्ञानतेज, भक्तीची रसार्द्रता आणि वैराग्यसंपन्नता कसे होते ते शंकराचार्यांनी जे नित्य अनुभवले तेच या स्तोत्रातून शब्दबद्ध झाले आहे. माता अन्नपूर्णेकडे ते अत्यंत प्रेमादरपूर्वक व विनयाने कळकळीने ज्ञान-भक्ती-वैराग्याची भिक्षा मागत आहेत. अन् तिने त्यांना हे सर्व उदारपणे प्रदान केले आहे. या दिव्य प्राप्तीच्या आनंदात त्यांनी या स्तोत्रातून माता अन्नपूर्णेचे त्यांना भावलेले रूप, गुण, शील म्हणजे स्वभाव व इतर अनेक वैशिष्ट्ये प्रगट केली आहेत. ती आता आपण पाहू...

माता अन्नपूर्णा सुवर्ण सिंहासनावर, सुवर्णसुंदर प्रभावळीने नटलेल्या दिव्यासनावर प्रसन्न मुद्रेने बसली आहे. सोन्याच्या जरीने मढवलेले दिव्य भरजरी वस्त्र ती ल्यायली असून अनेक रत्नाभूषणांनी मंडित अशी ती आहे. तिच्या गळ्यात मोत्यांच्या माळा शोभून दिसत आहेत. एक हात भक्तांना वरदान देणारा तर दुसरा भक्तांना अभयदान देणारा आहे. केशर, कस्तुरी, अगरु चंदनादिंच्या उटीमुळे तिचे सर्वांग अधिक शोभिवंत व सुगंधाने दरवळत आहे. काळ्याभोर केसांची मनोहर वेणी रुळते आहे. तिच्या कानातील कुंडले सूर्य-चंद्राप्रमाणे झळाळत आहेत. तर नुकत्याच उगवणाऱ्या चंद्राप्रमाणे तिचे ओठ आरक्त दिसताहेत. तिने आपल्या हातात माला, पुस्तक, पाश व अंकुशही धारण केलेले आहेत. तिच्या मुखकमलावरून आनंद- प्रसन्नतेच्या लहरी ओसंडत आहेत. अशी ही काशीनगरीची अधिष्ठात्री, शंकरांच्या प्राणवल्लभ तू आपल्या कृपेची पूर्णान्नभिक्षा घालून मला तृप्त कर- म्हणजेच तुझी कृपा हीच केवळ मला ब्रह्मानंद देणारे ज्ञान, रसो वै स: देणारी भक्ती अन् साऱ्या विश्वात राहूनही विश्वापासून अलिप्त करणारे वा राहणारे- वैराग्य देईल असा मला पूर्ण विश्वास आहे. कारण मूर्तिमंत सौंदर्याची पुतळी असूनही तू मला हे दान देण्यास सर्वसमर्थ आहेस- कसे ते पहा.

प्रत्यक्ष भगवान शंकरांची प्राणवल्लभा, हिमालयाची कन्या, तपोमूर्ती- उमा, गणेश- षडाननाची माता- म्हणजे ओंकार बीजास व शक्तिमंत्रास प्रसवणारी अशी तू दिव्य शक्तिस्वरूपिणी आहेस. वेदांचे अर्थ गोचर करून देणारी, मोक्षद्वार खुले करून देणारी, संपूर्ण विश्वमनास प्रसन्न करून नित्य 'दान' देणारी आहेस. तू त्रिपुरेश्वरी बनून भक्तांना तीन अवस्थांच्या पलिकडील (जागृती, स्वप्न, सुषुप्ती) तुरिया देणारी आहेस. तसेच 'विज्ञानदीपांकुरी' बनून विशेष अलौकिक दिव्य ज्ञानाची सारी दालने भक्तांसाठी खुली करवून देणारी आहेस. या समस्त ब्रह्मांडाची सूत्रधार बनून लीलया सर्वांना नाचविणारी अशी नाट्यप्रवीणही आहेस.

हे माते, तू धर्माची अधिष्ठात्री असल्याने धर्माविरुद्ध वागणाऱ्या धर्मरिपूंचा सहजी शर्वरी वा कालरात्री बनून नाश करण्यास समर्थ आहेस. अशाप्रकारे तू तिन्ही लोकांचे रक्षण करतेस. अन् आपल्या भक्तांना सर्व प्रकारची ऐश्वर्ये व योगानंदही देतेस.

स्तोत्राच्या शेवटी आचार्य म्हणतात,

***अन्नपूर्णे सदापूर्णे शंकरप्राणवल्लभे ।***
***ज्ञानवैराग्यसिद्ध्यर्थं भिक्षां देहि च पार्वती ।।***
***माता मे पार्वती देवी पिता देवो महेश्वरः।***
***बान्धवाः शिवभक्ताश्च स्वदेशो भुवनत्रयम् ।।***

पत्नीची स्तुती केली की पतिराज खूष होतात किंवा आईची खुशामत केली की बाबाही प्रसन्न होतात हे मानसशास्त्र नेमके हेरून आचार्यांनी माता अन्नपूर्णेची ही सर्वांगसुंदर स्तुती गायली आहे. जिच्याकडे ज्ञान-भक्ती वैराग्यरूपी अन्नाची भांडारे सदैव भरलेली आहेत अशी ही 'सदापूर्ण' असणारी माता अन्नपूर्णा आहे अन् ती अशी आहे म्हणूनच शंकरांची प्राणवल्लभा म्हणून शोभते आहे. पर्वतकन्या असल्याने आपल्या प्रत्येक कृतीत ती अचल, निश्चल, अढळ, गंभीर व उत्तुंग अशी आहे. दक्षकन्या असल्याने सदैव दक्ष-जागृत, सावध, सजग असणारी दाक्षायणीही आहेस.

अन् या स्तोत्राच्या शेवटी तर आचार्यांची उदारता गगन भेदून राहिली आहे. कारण प्रत्येक जीव हा 'शिवोऽहम्' परिपूर्ण असल्याने सर्व विश्वातले यच्चयावत् जीव माझे बंधू आहेत अन् संपूर्ण त्रैलोक्य हाच माझा देश आहे. या विचारातून त्यांची विशालता कळून येते.

भारताच्या दक्षिणेतील 'कालाडी' येथे जन्मलेला हा असामान्य जीव. गंगेच्या भक्तिज्ञानगंगेच्या काठी विश्वनाथाच्या साक्षीने शंकराचार्य बनला. विस्थापित झालेली हिंदुधर्माची घडी पुन्हा सुव्यवस्थित करण्यासाठी भारताच्या चारही दिशांना त्याने हिंदु धर्मपीठे स्थापन केली. ती आजतागायत कार्यरत आहेत. तसेच सर्व देवांमध्ये एकरूपता जाणवून देण्यासाठी 'पंचायतन-पूजा' ही सर्वसमावेशक किंवा सर्वसमन्वयता असलेली पद्धत सुरू केली. सूर्य, शक्ती, शिव, विष्णू व गणेश या सर्वांमध्ये एकच ईश्वरत्व आहे याचा अनुभव प्रत्येकाने घ्यावा. अन् त्यातही प्रत्येकाची इष्ट वा आराध्य देवता यासही मधोमध राहून प्रधानत्व मिळते- ही फार सुंदर संकल्पना. या निर्मितीमागील शंकराचार्यांची सृजनशीलता विशालता दिसते.

निर्गुण, निराकार परब्रह्माची जी प्रत्यक्ष कार्यशक्ती- आल्हादिनी शक्ती ती अन्नपूर्णा पार्वती, भवानी, उमा कोणत्याही नावाने प्रसिद्ध असणारी ही भगवान शंकरांची पत्नी. ब्रह्मसूत्रांवरील भाष्य लिहिताना शंकराचार्यांची लेखणी ज्ञानसमृद्ध खंडन मंडन आदि निष्णात वकिली ढंगाने करताना दिसते. तितकीच त्यांची लेखणी अशा स्तोत्रातून ललित साहित्याच्या अंगाने प्रसाद- माधुर्ययुक्त होऊन अत्यंत रसाळतेने गेयतेच्या अंगाने भरभरून वाहताना दिसते.

**- सौ. रेखाताई पटवर्धन**

स्टेशन रोड, अक्षय रेस्टॉरंट समोर,

मिरज, जि. सांगली.

फोन नं. : ०२३३-२२२१०८३



# श्री शिवमानस पूजा विधान

**श्री. शांताराम पोतदार**

*बी.ए..एस्सी., कविता व लेख लिखाणाची आवड.*

रत्नजडित ते सिंहासनही केले आपणासी
स्वीकारा ते, स्नानासाठी थंडगार जलही
गंगोदक ते असून तुम्हा प्रिय ते होत सदा
स्नान घालि मी त्या उदकाने दयानिधे शंकरा ।।१।।

अनेक रत्ना विभुषित असती सुंदर ही वस्त्रे
कस्तुरिमिश्रित झाली असती सुंगधित चंदने
चाफ्याची ती फुले सुवासिक फुले ती जाईची
बेल-पत्र अन् इत्यादीसह परिपूर्ण झाली ।।२।।

ओंजळ तीही पुष्प-फुलांची अर्पी चरणासी ।
धूप दीप अन् उपचार सर्वही मनात जे असती
भावभक्तिच्या अंत:करणे अर्पित तुम्हासी
स्वीकारहि तो तुम्ही करावा विनंति देहाची ।।३।।

अनेक रत्ने जडवुनि केली सुवर्णी ही पात्रे
उत्तम पैलू असति त्यावरी त्यातहि नैवद्ये
साजुक घृतासहित पायसा बासुंदी आहे
श्रीखंडाच्या आणिक पांचहि पक्वाने होये ।।४।।

तोंडि-लावण्या कोशिंबरही चटण्याच्या सहिता
दूध दह्यासह केळी लोणी सरबत तो मठ्ठा
पहा आणिले चूका चाकवत मेथी अळु भोपळा
काकडी भेंडी पडवळ दोडका भाज्या त्या केल्या ।।५।।

कापुर वाळा सुंगधि द्रव्ये घालुनि ते पाणी
थंडगार ते असोनि आणिले करण्या तव प्राशनी
त्रयोदशगुणी तांबुल देवा भक्तीने कल्पिले
भगवंता ते तुम्हि स्वीकारा श्रद्धेने अर्पिले ।।६ ।।

सर्व व्यापका तुम्हीच असता विश्वेश्वर देवा
तुम्हा मस्तकी छत्र धरुनिया करितो मी सेवा
चवऱ्या ढाळित वारा घालित पंख्याने मीही
निर्मळ आरसा तुम्हा पुढेही मीही तो ठेवी ।।७।।

तंबोरा अन् वीणेसह ती सतार सारंगी
तंतूवाद्ये ढोल नगारे मृदुंग पखवाजही
चर्मावाद्ये इतरहि ठेवित कला ति वाद्यांची
संगित नृत्या भो भगवंता अर्पित हो तुजसी ।।८।।

साष्टांगहि तो प्रणिपात तुम्हाला स्तुतिस्तोत्रें म्हणित
संकल्पाने मानसपूजा अर्पण मी करित
दयासागरा करुणाघन ते आपण स्वीकारी
मनापासुनी नमन करित मी प्रभु तुम्हि अवतारी ।।९।।

आत्मा हे परि रूपहि तुमचे, बुद्धि ती पार्वती
पंचप्राण अन् इंद्रिये नेहमी प्रथमगती असती
तुमच्यासंगे सदाच राहुनि शरीर मंदिर हे
निद्रावस्था समाधि होवुनि तुम्हा सवे राहो ।।१०।।

विविध प्रकारे विषयासेवन माण्डणि मी केली
तीच आपुली पूजा समजुनि शोभा ती आणली
चहूं बाजूनी फिरणे म्हणजे प्रदक्षिणा समजा
जे मी कांही बोलत असतो स्तुति ती हो आपणा ।।११।।

अशाप्रकारे शंकर देवा जे जे मी करतो
सदासर्वदा हो आराधन तुमचे मी मानतो ।।१२।।

हाता पाया वाणी देहे तसेच ते कर्मही
कान, मुखे अन नयन इंद्रिये अथवा मनातही
जे जे कांही दु:श्चित केले करी क्षमा मजला
विहित असो वा अविहित असु द्या तुम्हीच मज तारा
योग्या योग्य हि क्षमा मागतो मी त्या सर्वांची

देवाधिदेवा करुणासागरा तव जयजयकार करी ।।१३।।

**श्री गुरु निरोपे परिपूर्ण गोपालसुत**

**– श्री. शांताराम पोतदार**
१५८८, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.
फोन नं. : २४३३७५६२

# वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् अशी वाहिली जीवन-सरिता आचार्य शंकरांची

**श्री. शांताराम पोतदार**

*बी.ए..एस्सी., कविता व लेख लिखाणाची आवड.*

असामान्य हा शब्दचि असतो विभुती खरी थोर जी
चारित्र्याचरिता असेच वर्णन खरे कर्तृत्व कार्यात ही
होता जो गतिमान महत् पुरुष जो हिंदुत्व ते वाचवी
त्यासी नाम असे महापुरुष या शब्दात ना मावती ।।१।।

इतिहासा सिद्ध कार्य ते विलक्षण किती होती तया योग्यता
इतिहासा परि डावलूनही पुढती जाता नये सर्वथा
दुर्दैवे इसलामि इंग्रज राज्य समयी परिपाक जो जाहला
इतिहासा देत पहा विकृत स्वरूप जे पाखंडि हो जीवना ।।२।।

केले कष्ट अपार अस्मितासह परि अस्तित्व ते राखण्या
परदास्या जणु शाप तोचि ठरला होता किती दारुणा
केले कर्म स्वये समर्पित असे नि:स्वार्थि ती भावना
त्याच्या या चरिता यथार्थहिपणे माहीत हो बहुजना ।।३।।

अद्वैताचा थोर प्रचारक हिंदुधर्म पुनरुत्थापक
हिंदु समाजा नि:स्पृह संघटक अनाचारा कठोर विवादक
भगवत् भक्तिचा रसिक कवी अशाच शब्दा स्तवन करोनी
देश समाजा धर्म संस्कृती बत्तिस वरुषे करी जागृती ।।४।।

मखा पंडिता पुत्री होती आर्याम्बा नामे
विद्याधिराजे पुत्रासाठी तियेसि पाहियले
पूर्व सूकृता घटना घडती पूर्वदत्त भार्या
पूर्वादत्ता धनही मिळते पूर्वदत्त विद्या ।।५।।

कर्माचे फळ पूर्वदत हे मख पंडित कन्या
विद्याधिराजे अन् पुत्र शिवगुरु त्यासी हो मान्या
अनुरुप वधुही तयासि वाटे निश्चय तो केला
आर्याम्बा अन् शिवगुरु यांचा विवाह तो झाला ।।६।।

आर्याम्बा ती जरी जाहली शिवगुरुची पत्नि
वंशवेल ती फुलतहि नसता माता शोक करी
प्रारब्ध संचित क्रियमाणाच्या फेऱ्यातचि अडकली
वृषांचलावरि जावुनि तेथे शिवाराधना करी ।।७।।

महिने अकरा करीत होते दोघे शिवाराधना
शिवशंकर ते प्रसन्न होवुनि देती पुत्र तया
यथावकाशे पुत्र प्रसवली आर्याम्बा सोज्वळा
अत्यानंदे शिवगुरु करिती विपुलहि दान पहा ।।८।।

झाला पुत्र स्वयेचि शंकर गुरु आर्याम्बा माते
नाम ठेविले शंकर हेची शिव-शंकरा कारणे
अनेक वादहि असती त्यांच्या जीवनिच्या सरिते
साक्षात तो परमेश अवतरे सांवरि हिंदुत्वे ।।९।।

होते बालक बुद्धिमान अति साक्षहि ती मनिची
तिसऱ्या वरुषे ज्ञान जाहले मल्याळि संस्कृत लिहिलेले
वर्षे पाचहि होता त्याने काव्य व्याकरण पाठही ते केले
एकपाठिही असुनि पुराणे, वेदादि गीता सहजचि ते म्हटले ।।१०।।

एके समई बाल शंकरा गळ्या भोवती विषारि नागाचा
विळखा होता; सर्व पाहती, भयभित होवुनिया
लोकहि जमले काय करावे विचार तो करण्या
रुपांतर त्या नागा झाले माळहि रुद्राक्षा ।।११।।

असे सदोदित् प्रसंग घडती बालशंकराप्रती
पांचहि वरुषे होता त्याचे उपनयनहि होओी
उपनयनाच्या नंतर शिवगुरु गुरुकुलात धाडती
असामान्य अन अपूर्व बुद्धि त्यास साथ देई ।।१२।।

गुरुगृही तो असता शंकर गेला भिक्षेसी
दरिद्रि बाह्मणि बटुला पाहुनि भारावुनि गेली
कांहीही नव्हते तिच्या गृहासी आवळा देत तया
कनकधारा हे स्तोत्रहि रचिले त्या ब्राह्मणीच्या करिता ।।१३।।

ब्रह्मचर्याश्रम चालू असतां शिवगुरु देहाला सोडती
गौतम, दधिची, काश्यप, नारद ऋषि अन् मुनि येती
बालशंकरा ऋषिही म्हणती ऋषीप्रणित मार्गा
आचरूनी त्वा भाष्ये लिहावे पसरवि अद्वैता ।।१४।।

शिवगुरु निधनानंतर मामा अन् आर्याम्बा माता
विचार करिती तया शंकरा विवाह तो व्हावा
शंकर सांगे ''निश्चय माझा संन्यासा अटळ
म्हणोनि माते विवाह गर्ते नको लोटु तू मला'' ।।१५।।

अनुज्ञा घेवुनि त्या मातेची सद्गुरु शोधासी
तया क्षणी श्री अच्युत येती स्वर्गातुनि भू वरी
''तिरी नर्मदा जा तू शंकरा भेटति गोविंदयती''
अच्युत स्तुति ती करण्या तेहि रचिती अच्युताष्टकी ।।१६।।

उत्तर भारती करिती भ्रमणा गोकर्णी येती
विष्णुशर्मा भेट होवुनि पुढती ते चित्सुखाचार्य होती
अमरकंटकी मेघलकन्या नर्मदा पावि उगमा
पात्र सन्निधी गोविंदायतिचा आश्रम तो दिसला ।।१७।।

दर्शन होता श्री गोविंदायति अत्यानंदि होती
''भगवन अच्युत सांगुनि गेले तू येसी म्हणुनी''
शुभकृत संवत्सरी शंकरा क्रमसंन्यासहि देती
फाल्गुनि शुद्धा द्वितियेची होती ती ही तिथी ।।१८।।

एक संवत्सरी राहती आश्रमी शंकर यती
गुरु आज्ञेने लेखन करिती विष्णुसहस्रे नामावरी
नंतर लिहिले नर्मदाष्टक साधन- पंचकावरी
प्रात:स्मरणी यतीपंचका वाक्यवृती लिहिती ।।१९।।

विवेकचूडामणी लिहोनी दशश्लोकी लिहिले
आत्मानात्मविवेक तो लिहुनिया मायाविवरण लिहिले
बालबोधिनी, एकादशोत्तर, शतवाक्यग्रंथा वर्णिता
साऱ्या रचना आचार्यहि करिती शिष्याच्या करिता ।।२०।।

वर्षाकाली नदी नर्मदा रौद्रारूपी होई
सारी धरणी जलमय होवुनि आश्रम तो वेढी
शांत शंकरा कमंडलु तो आडवा करुनि ठेवी
जलाकर्षणा मंत्र म्हणोनि नर्मदेसि आडवी ।।२१।।

मांडुक्योपनिषदी करिका लिहिल्या गौडापादांनी
आचार्यांना आवडती अन् कथिती सूत्ररूपी वेदान्ती
प्रारंभही तो तुम्ही करावा भाष्यारचनेला
होकारुनी परि इच्छि दर्शना गौडापादांची ।।२२।।

श्री गुरुसंगती शंकर जाती शुकदत्ता आश्रमी
गौडपाद अन् शुकदत्तही असती एकचि मुनी
गौडपाद हे प्रौढहि असती सवाशे वर्षाचे
शरीर संपदा गौडापादा वार्धक्या न दिसे ।।२३।।

विचार करिती गौडपाद मुनि या शंकरयतिला
सर्व ज्ञानाधिकारि करुनी व्हावे विलीन परब्रह्मा
चारहि वरुषे आचार्य राहती गौडापादाश्रमी
अखंड ब्रह्मस्वरूप मोक्षा अधिकारी होती ।।२४।।

गौडपादमुनि आचार्यांना कैलासी नेती
शुकमुनि, बादरायणा संगती व्यास स्वये येती
त्या त्रय मूर्ती तेज पाहुनि आचार्या स्फुरले
ध्यानशतक ते रचूनि त्यांनी आदरी त्या नमिले ।।२५।।

शुकमुनि म्हणती आचार्याना शिव शंकर आपण
विशिष्ट कार्या नियुक्ति आपुली करा तेहि पूर्ण
वाराणशिला जावुनि तुम्ही संप्रदाय वाढवा
मठासि स्थापुनि वेदप्रणीत धर्मा उद्धारहि तो करा ।।२६।।

त्या नंतर ते सांब सदाशिव आचार्या भेटती
चिन्मय सच्चितानंदस्वरुपा भगवन् दक्षिणामूर्ती
महेश यांचा शंकराचार्यही करिती ते वंदन
वेदान्ताचा अमृतकुंभ जणू रचिती दक्षिणामूर्ती स्तोत्रम् ।।२७।।

धर्म प्रसारा आज्ञा करिती शिव ते आचार्या
ज्येष्ठ नि श्रेष्ठ ऋषिच्या देखत श्री शंभू पूजा
कशी करावी गोंधळ मनिचा तो जागृत होता
परापुजा हे स्तोत्र रचूनी पूजी एकविस उपचारा ।।२८।।

श्री शिव नेती आचार्यांना महाकैलासावरी
आनंदाची परिसीमा म्हणुनि शिवपादादि केशान्त वर्णनम् रचिले
तसेच शिवकेशादिपादान्तवर्णनम् रचुनि जीवनमुक्त होती
त्याचि अवस्थे आत्मभुजङ्गम् अन् स्वानुभव प्रकरण स्तोत्रेही
रचिली ।।२९।।

प्रभू सदाशिव आचार्यांना परमहंस परिव्राजकाचार्य ऐसे संबोधिती
गोविंदयति आचार्यांना आशिरवच देती
देह सोडिती श्री गोविंदयती प्रदीर्घ ओंकारे
विष्णुशर्मासी संन्यास देवुनि चित्सुखाचार्य केले ।।३०।।

त्यानंतर ते धर्मप्रसारा कार्याच्या करिता
वाराणसिला स्थीर राहुनिया प्रसंगाष्टक रचिता
यमुनाष्टका, माधवाष्टका शिवस्तोत्रा रचुनी
लक्ष्मीनृसिंह पंचरत्न अन् वेदासारा भाष्याला गुंफिती ।।३१।।

काळ लोटला दश वर्षीचा माता ती थकली
प्रदीर्घ कालि या भेटहि नव्हती शंकर बाळाची
आता परि तो झाला होता भगवत्पाद शंकर आचार्य
माता प्रार्थी श्री गोविंदा प्रति शंकर मज भेटव ।।३२।।

*क्षणात आला तेजोगोलहि गगनातुनि खाली*
*दण्डकमंडलु घेवुनि उतरति षोडवर्षिय संन्यासी*
*अम्मे मी तरि तुझाच शंकर ओळखि तूं मजसी*
*वचनिबद्ध मी असे म्हणोनि आलो दर्शनासी ।।३३।।*

*माते तूं तरि बाल्यापासुनि भजिले शिवशंकरा*
*कैलासाप्रति घेवुनि जाईल आता तोही तुला*
*श्री शिवभुजंगम स्तोत्रहि रचुनि प्रार्थि शंकराला*
*प्लवंग संवत्सरी जाहले मातेचे निधना ।।३४।।*

*घट्ट मन ते करोनि शंकर अंत्यक्रिया ती करी*
*संन्याशाला शवसंस्कारा अधिकारहि नाही*
*त्या प्रेताचे परशूने ते तीन खण्ड केले*
*योगाग्निची करूनि निर्मिती देह दहन केले ।।३५।।*

*मातृस्तव ते स्तोत्रहि रचिले प्रदक्षिणा घाले चित्ता*
*आप्तस्वकीया न येती म्हणुनि शापहि तो दिधला*
*मातृवचनाची ती पूर्ती करिता समाधान जाहले*
*नरेश केरळा सर्व नाटके लिहूनि देता तेही आनंदले ।।३६।।*

*अशी अलौकिक मानवते प्रति सेवा ती केली*
*हिंदु धर्मा रक्षणार्थही होता तो जन्मला*
*चारि दिशांना मठ ते स्थापुनि सांगति ते बौद्धा*
*मंडनमिश्रा पराभवोनी संन्यासी केले ।।३७।।*

*अतुलनीय हे कार्यहि केले शंकर आचार्या*
*तया सम तो नाही कोणी पृथ्विवरि जाहला*
*बत्तिस वरुषे अखंड केली हिंदुधर्म सेवा*
*रक्तांक्षी या संवत्सरी ब्रह्मीभाव धारण केला ।।३८।।*

श्री गुरुनिरोपे परिपूर्ण
सेवा सादर


गोपालसुत
**शां. गो. पोतदार**
१५८८, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०




# श्रीशंकराचार्यांचा दिग्विजय

**डॉ. इंदु चंद्रशेखर देशपांडे**

*एम.ए.पीएच.डी., निवृत्त प्राध्यापक*
*भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंडळ व इतर संस्थांमधून उच्चपदस्थ संस्कृत वाङ्मयात विपुल लेखन. पीएच.डी. गाईड २७ नियतकालिकांतून लेखन 'नॅशनल मिशन फॉर कॉन्झरवेशन प्रॉजेक्ट' या प्रॉजेक्टवर कार्यरत.*

भारतवर्षातील वैदिक धर्म आणि तत्त्वज्ञानाच्या इतिहासात श्री शंकराचार्य एक दिव्य विभूती होती. आजही त्यांचे कार्य भारताला प्रकाशमान करीत आहे. वैदिक धर्माच्या विपन्नावस्थेच्या काळात श्रीशंकराचार्यांचा आविर्भाव झाला. अलौकिक बुद्धिमत्ता हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विशेष होता. श्रीशिवगुरू आणि आर्याम्बा (सती) यांच्या पोटी जन्मलेल्या श्रीशंकराचार्यांचे वयाच्या ५व्या वर्षी उपनयन झाले. पित्याच्या मृत्यूनंतर आईने दु:ख आवरून त्यांना कालडी ग्रामी गुरुकुलात शिकण्यास ठेवले. श्रीशंकराचार्यांनी अवघ्या तीन वर्षात सर्व वेदांचे अध्ययन केले. वयाच्या आठव्या वर्षी ते वेदशास्त्रसंपन्न झाले. त्यानंतर त्यांनी संन्यासग्रहण केले.

शंकरपूर्व भारत म्हणजे नाना मतांचे क्रीडास्थान बनले होते. इ.स.च्या ७व्या, आठव्या शतकात भारतात अनेक धर्म-संप्रदाय प्रचलित होते. वैदिक धर्माचा संघर्ष जैन तथा बौद्ध धर्माशी नेहमी होत आला आहे. मौर्य काळात बौद्ध धर्म, शुंगकाली वैदिक धर्म, तर कुषाणकाळात पुन: डोके वर काढलेला बौद्ध धर्म, गुप्त कालात वैदिक धर्म असा चढउताराचा वैदिक धर्माचा प्रवास इ.स.पूर्व ७व्या शतकात दिसून येतो. तान्त्रिकता प्रधान असेही बहुविध संप्रदाय या काळात प्रचलित होते. पाञ्चरात्र, कापालिक, पाशुपत, शाक्त, गाणपत्य इत्यादि हे प्रमुख संप्रदाय होते. विशुद्ध वैदिकधर्मासाठी प्रतिकूल असे हे युग होते. यावेळी इ.स.च्या ९ व्या शतकाच्या मध्यावधिपूर्वी श्रीशंकराचार्यांचा अवतार झाला.

श्रीशंकराचार्यांनी स्वत:च्या विद्यागुरूकडून पातंजल महाभाष्य शिकत असताना भाष्यकार पतंजलि गोविंदभगवत्पादरूपात अवतीर्ण झाले आहेत, त्यांनी श्रीगौडपादाचार्यांकडून अद्वैत वेदान्ताची शिक्षा प्राप्त केली आहे असे ऐकले. याच गोविंदपादाचार्यांकडून अद्वैत वेदान्त शिकण्यास ते नर्मदातीरी ओंकारनाथ येथे निघाले. श्रीशंकराचार्यांची अलौकिक बुद्धिमत्ता आणि विलक्षण प्रतिभा पाहून गुरू आश्चर्यचकित झाले. त्यांनी अद्वैत वेदान्ताचे सिद्धांत शंकराचार्यांना सुगमतेने शिकविले. तेथे तीन वर्षे अध्ययनासाठी वास्तव्य करून शंकराचार्यांनी उपनिषद्, ब्रह्मसूत्रे यांचे विशेष अध्ययन केले. गोविन्दाचार्यांनी आपले गुरू गौडपादाचार्य यांचेकडून ऐकलेली ब्रह्मसूत्रांची अद्वैतपर व्याख्या श्री श्रीशंकराचार्यांना ऐकवली. त्यांनी ब्रह्मसूत्रांचे यथावत् भाष्य करण्याचे सामर्थ्य शंकराचार्यांकडे आहे असे व्यासवचन त्यांना सांगितले. गुरूने काशीला जाऊन श्रीविश्वनाथाचे दर्शन घ्यावे असे सुचविल्याने श्रीशंकराचार्य काशीला जाऊन तेथे ते छात्रांना वेदान्त सूत्राची व्याख्या शिकवू लागले. प्रत्यक्ष श्रीशंकराचे चाण्डालरूपात दर्शन झाल्यानंतर ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहिण्याची बलवती इच्छा त्यांच्यात निर्माण झाली. त्यासाठी प्रथम हरिद्वार नंतर बदरिकाश्रम येथे शिष्यांसमवेत जाऊन शंकराचार्यांनी वयाच्या १२व्या वर्षापासून १६व्या वर्षापर्यंत वास्तव्य करून ४ वर्षात ब्रह्मसूत्र, उपनिषदे आणि भगवद्‌गीता यावर भाष्ये लिहिली. येथेच सनन्दन शिष्याची गुरुभक्ती पाहून त्याला 'पद्मपाद' हे नाव दिले. कृष्णकाय ब्राह्मणवेशातील व्यासांनी शंकराचार्यांना दर्शन देऊन काही सूत्रांची व्याख्या विचारली. ते ऐकून संतुष्ट होऊन त्यांनी १६ वर्षांचे अधिक आयुष्य शंकराचार्यांना प्रदान केले. प्रयागात त्रिवेणीतटावर वास्तव्य असलेल्या कुमारिलभट्टाना आपल्या मतात आणण्यास सांगितले.

भारताच्या सांस्कृतिक इतिहासात आचार्यांची कुमारिल- भेट विशेष महत्त्वाची आहे. आर्यधर्मातील कर्मकांडावर बौद्ध दार्शनिकानी घेतलेल्या आक्षेपांचे कुमारिलभट्टांनी आपल्या पांडित्याने सडेतोड खंडन केले होते. तन्त्रवार्तिक, श्लोकवार्तिक, टुपटीका या ग्रंथात कुमारिलभट्टांच्या विद्वत्तेचा प्रत्यय येतो. वैदिक धर्म तथा दर्शन, वैदिक आचार यासंबंधीचे तत्त्व यांचे युक्तियुक्त प्रतिपादन, अन्य दार्शनिकांच्या मतांचे खंडन, शब्द-नित्यता, वेदांची अपौरुषेयता इत्यादी मीमांसा सिद्धान्तांचे तर्ककुशल प्रतिपादन, पाली ग्रंथातील बौद्ध सिद्धान्तांचे खण्डन करून वैदिक कर्मकांडाला प्रतिष्ठा प्राप्त करून देणे असे विस्तृत कार्य आपल्या ग्रंथांच्या द्वारा कुमारिलभट्टांनी केले. कुमारिलभट्टांनी मण्डनमिश्र

या कर्मकाण्डात निष्णात आणि कर्ममीमांसेचे सर्वश्रेष्ठ पंडित असलेल्या आपल्या शिष्याला आपल्या अद्वैतमताच्या प्रसारकार्यांत सामील करून घ्यावे असे श्रीशंकराचार्यांना सुचवले.

मण्डनमिश्रांबरोबर झालेला शंकराचार्यांचा शास्त्रार्थ फार प्रसिद्ध आहे. त्यांना शास्त्रार्थात परास्त करणे म्हणजे सर्व पण्डितांना परास्त करण्यासारखे होते. येथूनच शंकराचार्यांचा दिग्विजय सुरू झाला. वादात शंकराचार्यांची प्रतिज्ञा होती– ब्रह्म सत् चित् निर्मल तथा यथार्थ वस्तु आहे. ब्रह्म जगद्रूपात भासित होते. शिंप जशी चांदीच्या रूपात भासित होते तसे ब्रह्म जगद्रूपात भासते. पण ते मिथ्या असते. ब्रह्माच्या ज्ञानाने प्रपंचाचा नाश होतो. जीव बाह्य पदार्थांपासून मुक्त होऊन आपल्या विशुद्ध स्वरूपात प्रतिष्ठित होतो. त्यावेळी तो जन्म, मरणरहित होऊन मुक्त होतो.

मण्डनमिश्रांची प्रतिज्ञा पुढीलप्रमाणे होती– वेदांचा कर्मकाण्ड भाग प्रमाण आहे. वेद विधींचे प्रतिपादन करतात. कर्माने दु:खांपासून मुक्ती मिळते. कर्माचे अनुष्ठान प्रत्येक मनुष्याने जीवनभर करत राहिले पाहिजे.

या शास्त्रार्थात पराजित झाल्यास स्वत: संन्यास घेईन अशी मण्डनमिश्रांनी प्रतिज्ञा केली होती.

मण्डनमिश्र द्वैतवादी मीमांसाशास्त्रानुयायी होते. तर शंकर अद्वैताचे प्रतिपादक होते. मण्डनमिश्रांचा पूर्वपक्ष पुढीलप्रमाणे होता. 'तत्त्वमसि' म्हणजे 'जीवच ब्रह्म होय' या वाक्याने जीव व ब्रह्म यांची अभिन्नता सिद्ध होऊ शकत नाही. कारण प्रत्यक्ष प्रमाण हे अभेदवादाचा मोठा विरोधक आहे. या एकतेचे प्रत्यक्ष ज्ञान होत नाही. शंकराचार्यांचा उत्तरपक्ष पुढीलप्रमाणे होता– जीव व परमात्मा यांच्या भेदाचे ज्ञान इन्द्रियांनी होत नाही. प्रत्यक्ष हे ज्ञानाचा विषय आणि इंद्रिय यांच्या संनिकर्षावर अवलंबून आहे. इंद्रियाचा ईश्वराशी संनिकर्ष कधीच होत नाही. तेव्हा विरोधाचा प्रश्नच उद्‌भवत नाही.

या शास्त्रार्थसभेत मण्डनमिश्रांची पत्नी शारदा मध्यस्थ परीक्षक होती. मण्डनमिश्रांनी वादात पराभूत झाल्यावर संन्यास घेतला. त्यानंतर शारदेने शंकराचार्यांशी शास्त्रार्थ करण्याचा निर्णय घेतला. त्यात तिने त्याना कामशास्त्रविषयक अद्‌भुत प्रश्न विचारले. शंकराचार्यांचे संन्यासाश्रमामुळे या शास्त्रातील ज्ञान शून्य होते. त्यांनी त्यासाठी एक महिन्याची मुदत मागून घेतली. योगविद्येच्या द्वारा परकायाप्रवेशाने म्हणजे मृत अमरुक नावाच्या राजाच्या शरीरात प्रवेश करून कामशास्त्राचे ज्ञान मिळवून पुन: स्वत:च्या शरीरात प्रवेश करून शारदेच्या प्रश्नांना उत्तर दिले.

**अद्वैततत्त्वज्ञान–** शंकराचार्यांनी अद्वैतवादाचे प्रतिपादन केले. या तत्त्वाचे प्रतिपादन करण्यास उपनिषदे, गीता, ब्रह्मसूत्रे या प्रस्थानत्रयीवर भाष्ये लिहिली. ''ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापर:'' असा अद्वैतसिद्धान्ताचा मूलमंत्र आहे. परमार्थसत्तारूप ब्रह्माची एकता तथा अनेकात्मक जगताची मायिकता आहे. आत्मा सूर्यासारखा स्वयंसिद्ध आहे. तो ज्ञाता व ज्ञान असा उभयरूप आहे. ज्ञान हे आत्म्याचे स्वरूप आहे. जगत् ज्ञेयरूपात अस्तित्वात आहे. त्याची सत्ता केवळ लोकव्यवहारासाठी मानलेली म्हणून ती परमार्थरूपाने सत्य नाही. जगत् कार्यरूप आहे. मातीशिवाय घट तन्तूशिवाय पट राहू शकत नाही तसे ब्रह्माशिवाय जगताचे आहे.

जगतातील भावरूप पदार्थ अव्यक्त, त्रिगुणात्मिका, ज्ञानविरोधी, परमेश्वराश्रित मायेमुळे खरे वाटतात. माया अनिर्वचनीय आहे. सूर्योदयानंतर अंधार टिकत नाही; तसे ज्ञानोदयानंतर माया टिकू शकत नाही. जगत् व्यवहारात: सत्य वाटण्याचे कारण अध्यास, विकार, विवर्त ह्या कल्पना आहेत. **अध्यास** म्हणजे तद्‌भिन्न पदार्थावर तत् पदार्थाचा आरोप (अध्यासो नाम अतस्मिन् तद्‌बुद्धि:।) शिंप चांदीसारखी वाटते. एक चन्द्र प्रतिबिंबामुळे दोन असल्यासारखे भासतात. **विवर्त** म्हणजे कल्पनेमुळे एक पदार्थ दुसराच आहेसे वाटणे. उदा. अंधारात दोरीच्या स्पर्शाने तो साप आहे अशा कल्पनेने झालेले ज्ञान.

**अतत्त्वतोऽन्यथाप्रथा विवर्त इत्युदीरित:** (वेदान्तसार)

**विकार–** उदा. **दही हा दुधाचा विकार आहे. तत्त्वतोऽन्यथाप्रथा विकार इत्युदीरित: ।** (वेदान्तसार). यात बदल अपेक्षित आहे.

ज्ञानप्राप्तीकरिता शिष्याला पुढील चार साधनांनी युक्त असणे आवश्यक आहे. १) नित्यानित्यवस्तुविवेक (ब्रह्म नित्य असून तद्भिन्न पदार्थ अनित्य आहेत असा विचार; २) इहामुत्रफलभोगविराग (इहपरलोकी फलाशेप्रति विरक्तता); ३) शमदमादि साधनसंपत्ति; ४) मुक्तीची इच्छा (मुमुक्षा).

अलौकिक प्रतिभा, सूक्ष्म अर्थ ग्रहण करण्याची शक्ती, गाढ अनुशीलन तथा विशुद्ध चारित्र्य आणि स्मरणशक्ती हे गुण श्रीशंकराचार्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विशेष होते. त्यांची विलक्षण प्रतिभा पाहून गुरु विस्मित झाले होते. आपल्या धर्मोद्धारक कार्याला अक्षुण्ण राखण्यास श्रीशंकराचार्यांनी भारतवर्षाच्या चार बाजूंना चार प्रसिद्ध धामात प्रधान पीठांची स्थापना केली. दक्षिणेत म्हैसूर राज्यात श्रृंगेरी मठाची प्रथम पीठ म्हणून स्थापना केल्यानंतर गोवर्धन मठ (जगन्नाथपुरी), शारदामठ (द्वारका), ज्योतिर्मठ (बदरिकाश्रमी जोशी मठ) या मठांची स्थापना केली. मठांची स्थापना करून आचार्यांनी आपल्या पट्टशिष्यांना त्यांचे अध्यक्ष केले. आचार्य पद्मपाद, तोटकाचार्य, सुरेश्वर, हस्तामलक हे आचार्यांचे प्रसिद्ध

शिष्य होत. पद्मपादांची शांकरभाष्यावरील 'पञ्चपादिका' टीका, सुरेश्वराचार्यांचा नैष्कर्म्यसिद्धी ग्रंथ, हस्तामलकाचे भाष्य इ. आचार्यांच्या शिष्यांचे ग्रंथ वेदान्तशास्त्रात प्रसिद्ध आहेत.

काश्मीरमधील शारदापीठ हे सर्वज्ञपीठ म्हणून ओळखले जाते. सकल ज्ञान-विज्ञान-कला व शास्त्र यात निष्णात पंडीतच या पीठावर आरोहण करू शकत असे. याठिकाणी शास्त्रातील पण्डितांच्या विविध प्रश्नांना उत्तरे देऊन शंकराचार्यांनी आपली विद्वत्ता निर्विवाद सिद्ध केली. प्रत्यक्ष शारदेच्या आकाशवाणीने विचारलेल्या शंकेला उत्तर देऊन त्यांनी पवित्र शारदापीठाच्या सर्वज्ञ पीठावर अधिरोहण केले. शंकराचार्यांची पवित्रता, सर्वज्ञता यावर अशा रीतीने शिक्कामोर्तब झाले.

शृंगेरीमठाची स्थापना तथा शिष्यांना वेदान्त ग्रंथांची रचना करण्यास सांगणे हा शंकराचार्यांचा आरंभिक काळ होता. आता त्यांच्यापुढे भारतवर्षात सर्वत्र अद्वैतमताचा प्रचार करण्याचे उद्दिष्ट होते. त्यासाठी आपल्या शिष्यांसह त्यांनी भारतातील प्रसिद्ध तीर्थक्षेत्री भ्रमण केले. ही तीर्थक्षेत्रे त्यांच्या काळात तामस तांत्रिक पूजा, अवैदिक आचारविचार यांची केंद्रे होती.

**अनन्तशयन** – येथे शंकराचार्यांचा एक महिना मुक्काम होता. वैष्णवमताचे हे प्रधान केंद्र होते. वासुदेव परमेश्वर तथा सर्वज्ञ आहे. त्याच्या उपासनेने मुक्ती प्राप्त होते. परमेश्वराचा लोक प्राप्त होतो या त्यांच्या युक्तीचे आचार्यांनी सप्रमाण खण्डन केले. कर्माने मुक्ती प्राप्त होत नसून निष्काम बुद्धीने केलेल्या कर्माने चित्त शुद्ध होते. त्यावेळी अद्वैत ज्ञान होऊन त्यामुळे मुक्ती मिळते. वैष्णवांनी या मताचा स्वीकार केला.

**उज्जैनी** – धार्मिक दृष्ट्या महत्त्वाच्या या ठिकाणी कापालिक, जैन, चार्वाक, बौद्ध मतानुयायी लोक होते. उग्रभैरव नावाच्या कापालिकाची सेना वैदिक धर्मावलम्बी लोकांवर आक्रमण करीत असे.

**कर्नाटक** – कापालिक मताचे हे प्रधान पीठ होते. वैदिकांवरील आक्रमणाचे राजा सुधन्वाच्या मदतीने पारिपत्य करून शंकराचार्यांनी शिष्यांचे रक्षण केले. आचार्यांचा विजय झाला.

**काञ्ची** – मद्रासजवळील या स्थानी तांत्रिकांना पराजित करून तेथे आचार्यांनी कामाक्षीचे मंदिर निर्माण केले.

**काशी** – आचार्यांना आपले लक्ष्य पूर्ण करण्यास काशीवास लाभदायक झाला. येथे नाना मतांचे खण्डन करून वैदिक धर्माची आचार्यांनी प्रतिष्ठापना केली.

**जगन्नाथ** – येथे शंकराचार्यांनी गोवर्धनपीठ स्थापन केले.

**द्वारिका** – भारताच्या पश्चिम सीमेवर समुद्रकाठी आचार्यांनी आपले शारदापीठ स्थापन केले.

**बदरी** – या स्थानाचा शंकराचार्यांशी विशेष संबंध आहे. येथे तप्तकुण्डाचा शोध घेऊन आचार्यांनी आपल्या शिष्यांचे शीतताकष्ट दूर केले होते. येथे आचार्यांनी भगवान विष्णूच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली. वर्तमान पद्धतीनुसार तेथे पूजा, अर्चेची व्यवस्था केली.

**पंढरपूर** – येथे भगवान पांडुरंगाचे सुप्रसिद्ध मंदिर आहे. आचार्यांनी पांडुरंगांच्या स्तुतिपर स्तोत्र रचिले आहे.

भारताच्या दक्षिण भागात मद्रास प्रांतात कर्नूल जिल्ह्यात श्रीपर्वत (श्रीशैल) नावाचे कापालिकांचे स्थान होते. महाभैरवाचे उग्र स्वरूप त्यांचे उपास्य दैवत होते. शंकराचार्यांनी काही काल येथे वास्तव्य केले. तेथे ते शिष्यांना अद्वैतमार्गाचा उपदेश करीत. हळूहळू तेथील जनतेच्या मनात परिवर्तन होऊन तेथील विद्वान अद्वैत मताकडे झुकू लागले.

**गोकर्ण** – येथे शंकराचार्यांनी विद्वज्जनांसमोर अद्वैत मार्गाचा उपदेश केला.

**श्रीवलि अग्रहार** – आचार्यांना येथेच हस्तामलक शिष्याची प्राप्ती झाली. तोटक वृत्तातील त्याने केलेल्या स्तोत्रावरून आचार्यांनी त्याचे नाव तोटकाचार्य ठेवले. त्याच्यावर पुढे ज्योतिर्मठाचा कार्यभार सोपवला. शंकराचार्यांच्या नावावर प्रसिद्ध १२० मंदिरे येथे आहेत.

**रामेश्वर** – या स्थानाचे धार्मिक महत्त्व आजही अबाधित आहे. शंकराचार्यांनी या स्थानाला भेट दिली होती. येथे शाक्त पंथानुयायी लोकांचे वर्चस्व होते.

**नेपाळ** – येथे बौद्ध धर्माचे प्रमुख केंद्र होते. प्रसिद्ध पशुपतिनाथाची पूजा यथार्थरूपाने येथे होत नसे. यासंबंधीचे शैथिल्य दूर करण्यासाठी शंकराचार्य आपल्या शिष्यमंडळींसह नेपाळला गेले. तेथील बौद्ध विद्वानांना परास्त करून नेपाळला बौद्ध मताच्या प्रभावापासून मुक्त केले. आणि पशुपतिनाथाची वैदिक पद्धतीने पूजाअर्चा होईल अशी व्यवस्था केली. मंदिराच्या जवळ आजही शंकराचार्यांचा मठ आहे.

शंकराचार्यांच्या जीवनाचे प्रधान लक्ष्य वैदिक धर्माची प्रतिष्ठापना करणे, प्रचार करणे हे होते. त्यांनी आपल्या अलौकिक पाण्डित्याने अवैदिक, अर्धवैदिक सिद्धांत नामशेष केले. वेदप्रतिपाद्य अद्वैत मताचा ऊहापोह करून श्रौत धर्म निरपवाद असल्याचे सिद्ध केले. यासाठी त्यांनी शास्त्रीय विचारपद्धतीवर आधारित तर्कवादाचे अवलंबन केले. श्रुतिग्रंथात मूर्धन्य उपनिषदांवर भाष्य लिहून त्यांतील गूढ अर्थ प्रगट केला. वेदान्त शास्त्रातील सिद्धांताच्या प्रचाराच्या इच्छेने आपल्या भाष्यग्रंथांवर वृत्ति तथा वार्तिक

लिहिण्यास विद्वानांना प्रोत्साहित केले. संन्यासीसंघांची स्थापना व आपले कार्य अक्षुण्ण राहावे यासाठी भारतवर्षात चार दिशाना मठांची स्थापना केली. श्रीशंकराचार्यांची भाषा सुगम असून त्यांचे ज्ञान व्यापक होते. अद्वैतमताचा उपदेश केवळ शिष्यांपुरता मर्यादित न ठेवता चहूबाजूच्या जनतेसमोर उपदेश करण्याचा त्यांचा संकल्प होता. वैदिक धर्माची आरंभी प्रमुख स्थाने असलेली तीर्थक्षेत्रे सांप्रत तांत्रिक पूजा तथा अवैदिक मतांची प्रचारस्थाने बनली होती. आचार्यांनी या मतांचे खण्डन केले आणि सर्वत्र वेदान्ताची ध्वजा फडकविली. विरोधकांच्या युक्तिवादांचे तर्कपद्धतीने खण्डन करीत आपल्या अद्वैतमताची दीक्षा त्यांनी विरोधकांना दिली. आचार्यांचे हे तीर्थभ्रमण 'दिग्विजय' नावाने प्रसिद्ध आहे. असे असले तरी अद्वैत-मताचे अध्ययन, अध्यापन, सूत्रांवर भाष्य लिहिणे, अद्वैतशास्त्राचा प्रसार यासाठी आचार्यांना प्रथमपासूनच भ्रमण करावे लागले होते. खऱ्या अर्थाने तोच त्यांचा दिग्विजयारंभ होय.

(आधारग्रंथ- श्रीशंकराचार्य- बलदेव उपाध्याय)

**इंदु चंद्रशेखर देशपांडे**
प्लॉट नं. १३, गणंजय सोसायटी, युनिट नं. १,
आझादनगर, कोथरूड, पुणे ४११०३८.
फोन नं. : २५३८३१८८

# आद्य जगद्‌गुरू श्री शंकराचार्य

**श्री जगद्‌गुरु शंकराचार्य, करवीरपीठ, कोल्हापूर**

आद्य जगद्‌गुरु श्री शंकराचार्य यात दोन शब्द येतात. एक जगद्‌गुरु तर दुसरा शंकराचार्य. यातील पहिला शब्द सर्वांना परिचयाचा आहे. कारण हल्ली कोणीहि कुणालाहि तो शब्द जोडतात. त्यामुळे या शब्दाचे अवमूल्यन झाले आहे असे आम्हाला वाटते.

***वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।***
***देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्‌गुरुम् ।।***

पहिले जगद्‌गुरु श्रीकृष्ण- गोपालकृष्ण, तर दुसरे शंकराचार्य. या दोहोत फरक काय आहे? असेल तर तो कसा आहे? कारण वरवर पाहता असे दिसते की श्रीकृष्ण तर लीला- पुरुषोत्तम व आद्य शंकराचार्य तर चतुर्थाश्रमी असूनहि मर्यादा पुरुषोत्तम. मग दोन विरुद्ध टोके असताना एकच जगद्‌गुरु शब्द दोघाना कसा मिळाला? याचे उत्तर असे आहे की, पहिला जगद्‌गुरु श्रीकृष्ण. यात जगद्‌गुरु शब्दाची व्याख्या- जगाने ज्याला गुरू केला आहे तो. श्रीकृष्ण परमात्म्याला सर्व- लक्षण- लक्षण्य: असेहि म्हणतात. म्हणजे जी काही बरी-वाईट लक्षणे आहेत ती सर्व त्याचीच आहेत. त्याच्याच आधारावर आहेत. त्यातील चांगली कोणती, स्वीकारण्यास योग्य कोणती ते आपण ठरवावयाचे आहे व ती आचरणात आणावयाचीहि आहेत. उलट त्याच्या जवळील वाईट लक्षणे टाकायची आहेत. काय घ्यावे हे कळण्यासाठी काय टाकावे याचे ज्ञान असावे लागते. हे सर्व ज्ञान श्रीकृष्णापासून आपणास प्राप्त होते. म्हणूनच तो जगद्‌गुरु होय. गुरु हा ज्ञानदायक असतो. योग्यायोग्यतेचे ज्ञान श्रीकृष्णाकडून सर्व जगाला मिळते म्हणून भगवान श्रीकृष्ण हे जगद्‌गुरु आहेत.

आता शंकराचार्यांच्या बाबतीत जगद्‌गुरु शब्द कसा लागू पडतो ते पाहूया. येथे जगद्‌गुरु पदाची व्याख्या- जग ज्याचा गुरू आहे ते- अशी करावी. आद्य शंकराचार्यांनी जगाला गुरू कसे केले? आद्य शंकराचार्यांच्या अद्वैत-तत्त्व-प्रणालीनुसार नाना रूपत्वाने दिसणारे जग हे मायेतील आहे म्हणून ते मिथ्या आहे. मिथ्या आहे म्हणून ते स्वीकारण्यास योग्य नाही. म्हणूनच उपनिषद् म्हणते **'नेह नानास्ति किंचन ।'** व आद्य शंकराचार्य म्हणतात, **'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या।'** हे जगाचे मिथ्यत्व जगाकडूनच शिकायला मिळते म्हणून जगाकडे गुरुत्व जाते व शिष्यत्व आद्य शंकराचार्यांचेकडे येते. म्हणूनच आद्यशंकराचार्य हे जगद्‌गुरु होत.

या वरील दोन्ही कसोटीवर आजकाल जे स्वत:ला जगद्‌गुरु म्हणवितात ते कितपत योग्य आहे हे वाचकानी स्वत:च ठरवावे. याशिवाय आद्य शंकराचार्यांना जगद्‌गुरु हे पद कसे बहाल केले गेले ते पाहण्यासारखे आहे.

त्याकाळात अखंड भारतात असणाऱ्या काश्मीरमध्ये सरस्वती- मंदिर होते. आजच्या दृष्टीने जम्मू जवळ ते मंदिर आहे. या सरस्वती मंदिरात एक उच्चासन होते. त्यावर बसण्याचा मान ज्याच्याबाबत साक्षात् सरस्वती आदेश देईल त्यालाच होता. त्या आसनापर्यंत पोचायचे झाले तरी मंदिराच्या चारी दिशांच्या चारी द्वारावरील पंडितांना वादविवादात पराभूत करावे लागे. आद्य शंकराचार्यापावेतो ते कोणालाही शक्य झाले नव्हते. आद्य शंकराचार्य दक्षिणेतून निघून द्वैतमताचे खंडन करून अद्वैतमत असणाऱ्या सनातन धर्माची स्थापना करत करत उत्तरेत असणाऱ्या या काश्मीर मधील सरस्वती मंदिराजवळ पोचले. प्रथेप्रमाणे मंदिराच्या दारावरील विद्वजनानी त्यांना आडवले. आद्य शंकराचार्यांच्या बरोबर त्यांचा शास्त्रीय वादविवाद झाला. आद्य शंकराचार्य विजेते ठरले. येथे बाकींच्या विद्वानांना आद्य शंकराचार्यांनी कमी लेखले नाही. हा आद्य शंकराचार्यांचा विनयातून सिद्ध होणारा मोठेपणा आहे. अशाप्रकारे चारहि द्वारावरील चारी वेदांच्या पंडितांना पराभूत करून आद्य शंकराचार्य मंदिरात गेले. तेथे त्यांनी सरस्वतीला सदंड प्रणिपात केला. त्यावेळी सरस्वती प्रसन्न झाली व तिने सर्व मान्यवरांना दृष्टांत दिला कि हे या उच्च पदाला योग्य आहेत. त्यांना या पीठावर सन्मानपूर्वक बसवावे. नंतर सर्व पंडितांनी आचार्यांना मानपुरस्सर पीठाधिष्ठित केले व जगद्‌गुरु ही उपाधि अर्पण केली.

किती कठोर परिश्रमानंतर ही उपाधि प्राप्त झाली? आणि आज...?

आता शंकराचार्य- शब्दाबाबत- यात दोन शब्द आहेत. शंकर + आचार्य. शंकर = शं (कल्याणं) करोति इति शंकर: । म्हणजे कल्याण करतो तो शंकर व आचार्य- आचिनोति शास्त्रार्थम् । स्वयम् आचरति स्थापयति च। म्हणजेच शास्त्रार्थ पूर्णार्थाने जाणून घेऊन अंगी मुरवून जो आचरण करतो व नंतर आचार-धर्माची

स्थापना करतो तो आचार्य. येथे आचरण हे स्वधर्मानुसार असलेच पाहिजे. कारण तेच आचरण जगाच्या कल्याणासाठी उपयोगी पडते.

समर्थ रामदास स्वामी म्हणतात,

*'आधी पहावा आचार । मग करावा विचार।'*

संत म्हणतात,

*'विहिताचरणाच्या पायावर । उपासनेचे मंदिर ।*
*उभारिता चढे शिखर । तेथे आत्मज्ञानाचे ।।*

संतश्रेष्ठ तुकाराम महाराज म्हणतात,

*'प्रत्यवाय आहे अशास्त्री वागता ।*
*पावन अवस्था जरी झाली ।।*
*तुका म्हणे जोवरी न होय उन्मन ।*
*तोवरि विधी सोय पाळी ।।*

**विधी-धर्माचे आचार नियम.**

आचरणाने काय घडते? तर चरण वंदनीय होतात. म्हणून आ-चरण. आचरणाने अलक्षणाचा नाश होतो व दैवी संपत्ति प्राप्त होऊन उद्धार होतो.

*आचाराद् वर्धते आयु: । आचारादीप्सिता प्रजा :।*
*आचाराद्धनमक्षय्यं आचारो हन्त्यलक्षणम् ।।*
*दुराचारो हि पुरुष: लोको भवति निन्दित:।*
*सततं दु:खभागी च व्याधितोऽल्पायुरेवच ।।*

एकंदरीत सर्वांगाने विचार करता असे लक्षात येते की, भगवान गोपाळकृष्णाला जगद्गुरु म्हटले गेले पण आचार्य म्हटले गेले नाही. तर कांहीना आचार्य म्हटले गेले पण जगद्गुरु म्हटले गेले नाही. उदाहरणार्थ- रामानुजाचार्य, मध्वाचार्य इ. पण केवळ आद्य शंकराचार्यांनाच दोन्हीहि उपाधि जगद्गुरु व शंकराचार्य मिळाल्या. हे एकमेवाद्वितीयच होय.

आद्यशंकराचार्यांनी केलेल्या उपदेशापैकी आचरणाबाबतच एक उक्ती अशी

*आचार्येणाभ्यनुज्ञात: चतुर्णामेकमाश्रमम् ।*
*आशरीराद् विमोक्षस्य सोऽनुतिष्ठेत् यथाविधि ।।*

शेवटी सर्वांनी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवावी-

*धर्म एव हतो हन्ति । धर्मो रक्षति रक्षित: ।।*
*विहितस्याननुष्ठानात् निषिद्धस्य च सेवनात ।*
*अनिग्रहाच्चेन्द्रियाणाम् नर: पतनमृच्छति ।।*

आदि शंकराचार्यांच्या ठिकाणी दंडवत. इति शम ।

**श्रीविद्यानृसिंहभारतीस्वामी महानुशासनम् वरीवर्ति.**

**- श्री जगद्गुरु शंकराचार्य,**
करवीर पीठ, कोल्हापूर

# The greatness of Sankaracharya

SWAMI SATSWARUPANANDA SARASWATI

*''श्रुतिस्मृतिपुराणानां आलयं करुणालयं*
*नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम् ।।*

Poojya Sankara Charya is the greatest of teachers in the field of Advaita Vedanta, which is acknowledged by one and all Vedantic Scholars. He is an Acharya- teacher. Not a philosopher as people say. He taught by this way of studying and also teaching through his commentaries (भाष्य) on Upanishada, Bhagawat Geeta and Brahma Sutras- (प्रस्थानत्रयी) Becasue of this he was referred as भाष्यकार. His style was unique and simple to understand but had its own depth. He helped the entire humanity (laymen) by his work of STOTRAS/ Prayers on all dieties. He also helped all Vedantic students by his indepedent works - प्रकरण ग्रंथ.

He emphasized and made it explicitly clear that MOKSHA can be gained only through ATMA JNANA, and never through other Sadhana's. Why? because they are all in the field of the cause of SAMSARA i.e. AJNANA. AJNANA being similar to darkness, can not be dispelled by its own by- product SADHANAS. Then are they to be totally Rejected? No. They should be practiced with the changed attitude of DEVOTION to ISWARA, which will help in preparing the ANTHAKARANA for ATMA JNANAM-

*अविरोधितया कर्म न अविद्यां विनिवर्तयेत ।*
*विद्याऽविद्यां निहन्त्येव तेन तिमिर संगवत् ।।*

*(आत्मबोध)*

Since अज्ञान gives rise to शोक, this product of अज्ञान can be removed only through ज्ञान he says. In Bhagawat Geeta introduction he says-

*तत्रेवं सति धर्माधर्मोपचयादिष्टानिष्टजन्मदु:खादिप्राप्तिलक्षण: संसारोऽनुपरतो भवतितत: संसारबीजभूतौ शोकमोहौ । तयोश्च आत्मज्ञानात नान्यत: निवृत्ति: इति तदुपदिदिक्षु: सर्वलोकानुग्रहान् निमित्तीकृत्य आह भगवान् वासुदेव:- अशोच्यान् ।। इत्यादि.*

How or why does AJNANA give rise to संसार if anyone asks, he says अज्ञान- causes mistaken notions about oneself as well as the world. At one's own level one thinks and mistakes that I am Body, Born and liable to death and inbetween that I am doer, enjoyer and sufferer and that is my reality. At the world level, they think that the world is real सत्यं and its causes Sukham and dukham. But he says that our Vedanta says- His great and popular statement.

*श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रन्थकोटिभि: ।*
*ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नाऽपर: ।।*

As long as one has opposite vision to what is stated above we will have unbroken/ repeated SAMSARA. Hence he often says ज्ञानादेव तु कैवल्यं.

*चित्तस्य शुद्धये कर्म न वस्तूपलब्धये ।*
*वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित् कर्मकोटिभि: ।।*

(विवेकचूडामणी)

Hence he is said as करुणालयं, the embodiment of compassion to humanity. He was not a mere logician or मायावादी, as people say. That is great disrespect people show to him.

But for him, the VISION OF VEDANTA would have remained ever in the wilderness of confusion. OM TATSAT

**SWAMI SATSWARUPANANDA SARASWATI**

# श्री शारदापीठम्, शृंगेरी- मठातर्फे भगवद्गीता प्रचार

**श्रीमती वसुधा श्रीकृष्ण पाळंदे**

भगवद्गीतेत भगवंतांनी रणांगणावर अर्जुनाला जो उपदेश केला तो त्याला एकट्याला नसून अखिल मानवजातीसाठी आहे. त्यातही सामान्य माणसासाठी आहे. आपले जीवन सुखी, समृद्ध आणि आनंदमय होण्यासाठी माणसाने जीवनात कसे वागावे? कर्म–काम करणे तर टळत नाहीच तर मग ते कोणत्या युक्तीने करावे? हे सारे गीतेने सांगितले आहे. आज जगात सुखसाधने मुबलक आहेत. हरप्रयत्नांनी ती प्राप्त करून सुद्धा माणसाला सुख, समाधान निखळ शाश्वत आनंदाची प्राप्ती होत नाही, असे दिसून येते. माणूस गीतेच्या सान्निध्यात आला तर त्याला सुख मिळविण्याची वाट सापडेल असे वाटल्यामुळे– नव्हे तशी खात्री झाल्यामुळे गीतेचा प्रचार समाजात व्हायलाच हवा असे अनेकांना वाटले. त्यातूनच गीताधर्म मंडळाची स्थापना ८४ वर्षांपूर्वी झाली. पुण्यात सदाशिव पेठेत कार्यरत असलेल्या या संस्थेने त्यासाठी अनेक उपक्रम चालविले आहेत त्यापैकी एक गीता– संथावर्ग. या वर्गात गेली सुमारे १५ वर्षे शास्त्र–शुद्ध उच्चारात गीतापठण शिकविले जाते. पुणे शहरात व उपनगरात संथावर्गाच्या सुमारे ३० शाखा असून तेथे संथा देणारे सुमारे ७० शिक्षक कोणत्याही प्रकारच्या मानधनाची इच्छा न करता श्रद्धेने आणि निष्ठेने काम करीत आहेत. हे सर्व वर्ग नि:शुल्क आहेत.

२३ जुलै २००७ रोजी गीताधर्ममंडळाचा ८४ वा वर्धापनदिन साजरा झाला. त्यावेळी शृंगेरी येथील श्री शारदापीठाचे पीठाधीश्वर श्री श्री भारतीतीर्थ महास्वामी यांनी समारंभाच्या अध्यक्षस्थानावरून भाषण करताना एक उद्घोषणा केली. 'जो कोणी संपूर्ण गीता तोंडपाठ म्हणून दाखवील त्याला २१,००० रुपयांचा पुरस्कार दिला जाईल.' मा. शंकराचार्यांचा मुक्काम चेंबूर येथील मठात असताना गीता संथा वर्गाचे दोन गट संपूर्ण गीतेचे पठण करून दाखविण्यासाठी चेंबूर येथे दाखल झाले. मठातील अधिकारी वर्गाने जवळ जवळ २॥ ते ३ तास सर्वांचे वैयक्तिक पठण म्हणून घेतले. मा. शंकराचार्यांच्या दर्शनासाठी पुरस्कारार्थी गेले तेव्हा खुद्द त्यांनीही कोणत्याही अध्यायातील कोणत्याही श्लोकापासून पठण करावयास सांगून पारख केली. त्यावेळी संथावर्गाच्या २६ छात्रांना प्रत्येकी रु एकवीस हजारचा पुरस्कार प्राप्त झाला. भगवद्गीतेच्या १८ अध्यायातील एकूण ७०० श्लोक तोंडपाठ करून परीक्षकांसमोर त्यांचे अस्खलित, शास्त्रशुद्ध उच्चारात पठण करणे ही 'अगदी सहज' अशी गोष्ट नाही. त्यासाठी भरपूर परिश्रम या छात्रांनी घेतलेले होते.

त्यानंतर २००८ मध्ये शृंगेरी मठाचे पुण्यातील कार्यकर्ते श्री. गजानन अवचट यांनी गीतासंथावर्गाच्या कार्यकर्त्यांशी संपर्क साधला. शृंगेरीमठाच्या श्री. पूजनीय शंकराचार्यांनी त्यांना गीता पाठांतर करवून घेण्यासाठी अधिकृतपणे मान्यता दिल्याचे एका पत्रकाद्वारे त्यांनी जाहीर केले. लहान मुलांपासून अगदी वृद्धांपर्यंत कोणीही गीतेच्या १८ अध्ययांपैकी कोणताही एक अध्याय अस्खलितपणे शुद्धोच्चारात पठण करून दाखवील त्याला प्रत्येक अध्यायामागे (रु. २५०) चा पुरस्कार दिला जाईल असेही त्या पत्रकात त्यांनी जाहीर केले होते. गीतासंथावर्गाच्या शिक्षकांच्या मदतीने पुरस्कारार्थींची नावे नोंदणी, त्यांचे प्रत्यक्ष पठण करून घेणे आणि रोख पुरस्कार पठणानंतर लगेच देणे हा कार्यक्रम गीता–धर्म मंडळाच्या वास्तूत संपन्न झाला. १ आणि २ अध्याय म्हणून दाखविणाऱ्या सुमारे २२५ आणि ३ अध्याय म्हणून दाखविणाऱ्या सुमारे ११२ पुरस्कारार्थींना अनु. रु. २५०, ५०० आणि ७५० ची रोख रक्कम पुरस्कार म्हणून दिली गेली.

नोव्हें. २००८ मध्ये २३ जणांचा एक गट संपूर्ण गीतापठण करून दाखविण्यासाठी आणि १० जणांचा एक गट ६ अध्याय पठणासाठी शृंगेरी येथे, गीता– धर्ममंडळातर्फे गेला होता. तिथेही सर्वांचे गीतापठण म्हणून घेतले गेले आणि संपूर्ण (गीतापठण) करणाऱ्यांना रु. २१,००० चा व ६ अध्यायांचे पठण करणाऱ्यांना रु. ५,००० चा पुरस्कार पीठाधिकारी मा. भारतीतीर्थ आचार्यांच्या शुभहस्ते देण्यात आला.

हे काम एवढ्यावर थांबले नाही. मा. श्री. अवचट गुरुजींची खरी तळमळ शालेय विद्यार्थ्यांपर्यंत गीता पोहोचावी ही आहे. त्यासाठी ते पुण्याच्या शाळा–शाळातील मुख्याध्यापकांना भेटले. आठवड्यातील, महिन्यातील काही तासिका गीता शिकविण्यासाठी मागून घेतल्या. इयत्ता ५ वी ते ९ वीच्या काही शाळांतील विद्यार्थ्यांना त्यांनी स्वत: संथा दिली. काहींना गीता संथावर्गाच्या शिक्षकांनी दिली. हे सारे काम ऐच्छिक व नि:शुल्क होते, नव्हे तसेच चालू आहे. एक अध्याय पाठ म्हणून दाखविणाऱ्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेऊन लगेच रोख रक्कम (रु. २५०) त्या विद्यार्थ्यांना, शाळेच्या

मुख्याध्यपाक व इतर विद्यार्थी यांचे समक्ष पुरस्कार म्हणून दिली.

आर्थिक फायद्याच्या निमित्ताने का होईना तरुण विद्यार्थी, शिक्षक, पालक, प्रौढ व्यक्तीही गीतेच्या प्रांगणात याव्यात. गीता संस्कृत भाषेत असली तरी देवनागरी लिपीत आहे. वाचता येणे, शुद्ध उच्चारात म्हणता येणे ही गोष्ट त्यांना पटावी आणि गीतापठण तर त्यांना करता यावेच पण हळूहळू त्यांनी गीतेच्या अर्थाकडे वळावे. समजून घेता घेता गीतेच्या वाचन, मनन- चिंतनाने त्यांच्या जीवनदृष्टीत सकारात्मक परिवर्तन घडावे अशी या साऱ्या धडपडीमागची तळमळ आहे. आज जगात सगळीकडे मन:स्वास्थ्य हरवलेली सामान्य माणसे, कसे तरी जीवन जगत आहेत. त्यांना कर्मयोगाचा मार्ग गीतेतून दिसेल. आपले कर्तव्य अत्यंत उत्तम रीतीने, मनापासून, नि:स्पृहतेने आणि निरहंकाराने कसे पार पाडायचे हे ते गीतेच्या अभ्यासाने शिकतील. त्यातून आपल्या राष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्याकडे भारतीयांची वाटचाल सुरू होईल. राष्ट्रोद्धार हेच तर जगद्गुरु आद्य शंकराचार्यांचे मनोगत होते. त्या दिशेने समाजाची पावले पडोत हीच त्या जगन्नियंत्याच्या चरणी प्रार्थना!

**श्रीमती वसुधा श्रीकृष्ण पाळंदे**
(संचालिका- गीता संथा वर्ग, गीताधर्ममंडळ, पुणे)
पत्ता - 'यशोदा' ३० नारायण पेठ, पुणे ४११०३०.
दूरध्वनी : २४४६०४५८

# श्रीमदाद्यशंकराचार्यांची संस्कृत आरती

जय भगवन् जय शंकर विद्याकल्पतरो ।
निर्मथितश्रुतिसागर जय जय भुवनगुरो ।।

धर्मस्थापनहेतोर्लीलातनुधारिन् ।
लोकानुग्रहहेतोर्ब्रह्मणि संन्यासिन् ।
कल्युद्भव नानाविध पाखंडध्वंसिन् ।
अद्वैतामृतवृष्ट्या जडजीवोद्धारिन् ।।१।।

श्रुतिशिरसस्तत्त्वानां एकस्त्वं वेत्ता
परपक्षाणां पविरिव विदितस्त्वंभेत्ता ।
संशीतेर्युक्तिबलादेकस्त्वं छेत्ता ।
त्वद्भाष्यामृतपुष्टः कोनु जनः खेत्ता ।।२।।

शारदयापिनुतंस्त्वां स्तोतुमलं कोहम् ।
मर्षयमेत्यसमंजसमक्षरसंदोहम् ।
स्पर्शमणे स्वर्णी कुरु मां मलिनं लोहम् ।
स्थित्वा मे हृद्यनिशं वारय मम मोहम् ।।३।।

त्वच्चरितानुध्यानात् आचारेशुद्धिम् ।
त्वद्भाष्यश्रवणादप्यनघामिह बुद्धिम् ।
विंदेमत्वन्मार्गाद्रवणात् पुण्यर्द्धिम् ।
देहि गुरो करुणाघन निश्रेयससिद्धिम् ।।४।।

वि. ना. दंडगेशास्त्री यांच्या संग्रहातून...

# जगद्गुरु श्री आद्य-शंकराचार्यांची आरती

जयदेव जयदेव आदिशंकरा श्री आदिशंकरा
अज्ञानासी हरुनि उद्धरिसि जगतां जयदेव जयदेव ।।धृ।।

जगती झाले थोर ज्ञानावतार
व्यासानंतर प्रकटे आदिशंकर
भाष्यकारा पुसतु ज्ञानेश्वर बोले
ब्रह्मानंदी डुंबुन वारकरी चाले,- जयदेव जयदेव ।।१।।

नास्तिक मत करिती श्रुतिमत उध्वस्त
त्याचे खंडन करुनि स्थापिसी वेदान्त
अज्ञानाने जगती पडल्या ज्या रुढी
मोडूनी सांगसी सर्वा ज्ञानाची प्रौढी-जयदेव जयदेव ।।२।।

स्तोत्रे सुंदर रचुनी सामान्यांसाठी
भक्तिमार्गी त्यांची रुचि तू वाढविसी
चित्तशुद्धी साधुनि पावती सद्मार्गा
सामान्यसहि ज्ञानबोध तू केला- जयदेव जयदेव ।।३।।

ज्याचेपासूनि उगवे ज्ञानाचा स्रोत
गुरू त्यासी मानावे पुसूं नये जात
काशीक्षेत्री रचुनि मनिषापंचक
सर्वांसाठी केला अद्वैत बोध- जयदेव जयदेव ।।४।।

जयदेव जयदेव आदिशंकरा श्री आदिशंकरा
अज्ञानासि हरुनि उद्धरिसी जगतां जयदेव जयदेव ।।

- निर्मला जोशी